॥ श्रीराम प्रसन्न. ॥

# बृहत्पंचांगफलादर्श सार्थ.

हा ग्रंथ,

स्त्री सामुद्रिक सार्थ, स्त्री जातक सार्थ, षट्पंचाशिका

सटीक व सार्थ इत्यादि ग्रंथांचे कर्ते,

## अमृत माधव वाघोलीकर,

यांनीं तयार केला तो,

" विद्याविलास " व " श्रीसिद्धेश्वर "

या दोन छापखान्यांत छापून प्रसिद्ध केला.

शके १८४५, सन १९२४.

किंमत चार रुपये.

हा ग्रंथ रामकृष्ण शंकरशास्त्री गोखले यांनीं
" विद्याविलास " छापखान्यांत व वासुदेव
नारायण ठकार यांनीं " श्रीसिद्धेश्वर "
छापखान्यांत छापिला
आणि
अमृत माधव वाघोलीकर यांनीं प्रसिद्ध केला.



श्रीमंत माधवराव पंडीत उर्फ बाळासाहेब पंतअमात्य
बावडेकर, चीफ ऑफ् बावडा.



A. B. Press, Poona.]

# प्रस्तावना.

**अप्रत्यक्षाणि शास्त्राणि विवादास्तेषु केवलं ॥**
**प्रत्यक्षं ज्योतिषं शास्त्रं चंद्रार्कौ यत्र साक्षिणौ ॥ १ ॥**

ज्योतिषशास्त्र कां उत्पन्न झालें असें जर कोणी विचारील तर, आमच्या पूर्वाचार्यांच्या जिज्ञासेनें तें उत्पन्न झालें; यापेक्षां जास्त कांहीं सांगतां येणार नाहीं. फार प्राचीन काळापासून या शास्त्राकडे आमच्या पूर्वजांचें लक्ष्य लागलें असावें; किंबहुना पूर्वाचार्यांनीं जीं शास्त्रें रचिलीं आहेत, त्यांतलेंच हें आद्यशास्त्र होय, असें झटलें असतां कांहीं बाध येईल असें मला वाटत नाहीं. आपल्या देशांत या शास्त्राची फार प्राचीन काळापासून अभिवृद्धि कशी कशी होत गेली याविषयीं साग्र विवेचन करण्याचें प्रयोजन नाहीं.

ह्या ग्रंथासारखा ग्रंथ पंचांगाच्या अंतर्बाह्य अंगाचा एकाच ग्रंथांत समावेश असलेला असा पूर्वीचा एकादा ग्रंथ माझ्या पाहण्यांत आलेला नाहीं. काळाच्या परंपरेनें ग्रंथाची योग्यता इत्यादिकांचा विचार करण्याकडे आमच्या लोकांचा कल फारसा आहे असें दिसत नाहीं. दोन तीनशें वर्षांपूर्वी झालेला ग्रंथकार आणि हजार दोन हजार वर्षांपूर्वी झालेला ग्रंथकार ह्यांची योग्यता ते बहुधा सारखीच मानितात. कोणत्याही शास्त्रांचा इतिहास समजून घेण्याविषयीं आमची प्रवृत्ति नसलेमुळें अशा प्रकारचा ग्रंथ करण्याची स्फूर्ति आजपर्यंत कोणासही झालेली नाहीं असें मला वाटतें.

शके १८३३ ह्मणजे इ० सन १९११ सालीं विद्यार्थ्यांस पंचांग शिकवीत असतांना पंचांगांतील फलें, धर्मशास्त्रार्थ वगैरे विषय एकाच ग्रंथांत नसल्यानें बरेच ग्रंथ पाहून त्यांतून पंचांगांतील फलें, धर्मशास्त्रार्थ वगैरे विषय शोधून काढून मग पंचांगांत लिहावे लागतात; ही उणीव फार मोठी आहे. एकाच ग्रंथांत पंचांगोपयोगी सर्व तऱ्हेचे विषय असले ह्मणजे विद्यार्थ्यांस पंचांग करणें फार सोयीचें होईल; व त्याकरितां अशा तऱ्हेच्या ग्रंथाची अवश्यकता आहे असें मला वाटल्यावरून बृहत्पंचांग-फलादर्शसार्थ हा ग्रंथ करण्यास सुरवात केली. त्यास आज जवळ जवळ ११।१२ वर्षें होत आलीं, तरी आमचा ग्रंथ अजूनपर्यंत लिहून तयार झाला नाहीं. इतके दिवस लागण्याचें कारण स्वतःची प्रकृति व इतर कांहीं घरगुती अडचणी, ह्या कारणांनीं दिनावधी झाली. माझ्या हयातींत हा ग्रंथ तयार होऊन विद्यार्थ्यांचा उपयोग होईल किंवा नाहीं या विचारांत मी रात्रंदिवस होतों; परंतु ईश्वरकृपेनें सर्व संकटपरंपरेंतून पार पडून ग्रंथाचें काम माझ्या हातून परमेश्वरानें शेवटास नेलें ह्याबद्दल मी त्या दयाघनाचा अत्यंत ऋणी आहे.

हा ग्रंथ लिहितांना ज्योतिषाचे जुने ग्रंथ मिळविण्याला किती श्रम पडले, कोणाचे किती व कसे आर्जव करावे लागले, मिळविलेले ग्रंथ वाचून त्यांतून पंचांगोपयोगी जेवढे विषय सांपडतील तितके ह्या ग्रंथांत घेण्यास एकंदर शारीरिक व मानसिक श्रम किती झाले ह्याविषयीं पूर्ण कल्पना विद्यार्थ्यांस व वाचकांस ग्रंथावलोकन केल्यावांचून होणार नाहीं.

हा ग्रंथ फार मोठा झाला असें कित्येकांचें ह्मणणें आहे व अगदीं संक्षिप्त झाला असें कित्येकांचें ह्मणणें आहे. दोन्हीहि अभिप्रायांत तथ्य आहे व ह्याच कारणानें मी मधला मार्ग स्वीकारून थोडा संक्षेप केला आहे. विस्तार केला तर एकेका पृष्ठाचीं दोन दोन पृष्ठेंही लिहितां येतील, व विषय गाळले असतां संक्षेप होईल; परंतु अशा प्रकारचे ग्रंथ होण्याची संधि वारंवार येते असें नाहीं; ह्मणून ज्या विषयाची माहिती या पुस्तकांत असावी असें मला वाटलें त्या सर्व विषयांची माहिती या पुस्तकांत अवश्य तेवढी दिली आहे.

प्रस्तुत ग्रंथ शास्त्रीय असल्यामुळें एकाद्या कादंबरीसारखा सर्वांस सुबोध होईल असें नाहीं; तथापि सगळेच भाग समजण्यासारखे नाहींत असेंही नाहीं. प्रत्येक भागांत सर्वांस सुबोध असें कांहीं ना कांहीं सांपडेल; कोठें कांहीं गहन भाग असल्यास तो समजत नाहीं ह्मणून निराश न होतां पुढें वाचीत जावें. ज्यास या पुस्तकांतील एकही भाग समजणार नाहीं असा एकही वाचक आढळणार नाहीं अशी माझी समजूत आहे. कोणाला एक विषय समजेल तर दुसऱ्यास दुसरा विषय समजेल. एकास एक भाग मनोरंजक व उपयोगी वाटेल तर दुसऱ्यास दुसरा वाटेल; ह्मणून प्रस्तुत पुस्तकाच्या पूर्वापार संबंधानें त्या त्या विषयांची माहिती सहज समजेल. या एकंदर ग्रंथाच्या परिशीलनापासून कोणकोणत्या गोष्टींचें ज्ञान होईल याचें दिग्दर्शन करणारी अभिप्रायरूपी प्रस्तावना श्रीयुत रावसाहेब दाजी नागेश आपटे बी. ए. एलएल्. बी. वकील, हायकोर्ट बडोदा, व अध्यक्ष भारतीय ज्योतिर्मंडळ यांनीं लिहिली आहे. त्यावरून या ग्रंथाचें स्वरूप प्रत्येक मनुष्यास सहज समजेल. व या ठिकाणीं सदर रावसा० आपटे यांनीं आपला अमूल्य वेळ खर्चून काळजीपूर्वक प्रस्तावना लिहून पाठविली याबद्दल त्यांचे अत्यंत आभार मानणें अप्रासंगिक होणार नाहीं.

या ग्रंथाचा आरंभ ब्रह्मदेवाच्या उत्पत्तीपासून केला आहे. ह्यांत शक्य तितकी माहिती श्रीमद्भागवत, कल्पलता, राजावलि, मयूरचित्रक, पंचांगसाधनसार, मुहूर्तसिंधु, मुहूर्तमाला, मुहूर्तचिंतामणि, सूर्यसिद्धांत, सिद्धांतशिरोमणि आणि इतर ज्योतिष ग्रंथांतून घेतली आहे आणि याशिवाय आणखी ज्या बरेच ग्रंथांतील माहिती या ग्रंथांत गोविली आहे, त्यांचीं नांवें पुढें दिलीं आहेत.

मंगळादि पांच ग्रहांस दोन दोन राशि व सूर्यचंद्रास एक एक राशि असण्याचे कारणांसह उपपत्ति दिली आहे. अवकहडाचक्र कसें तयार झालें याची माहिती सोपपत्तिक ‘ समरसार ’ यांतील घेतली आहे. कल्पलता हा ग्रंथ शके १५६४ त जलद ग्रामवासी रुद्रभट्टात्मज सोम नामक दैवज्ञ यांनीं केला. हल्लीं पंचांगातील फलें यावरून लिहितात, किंवा राजावलीवरूनही लिहितात. राजावलि हा ग्रंथ कोणी केला व कोणते शकांत झाला हें राजावलींत कोठें सांगितलें नाहीं; परंतु इतकें खास दिसतें कीं, कल्पलता झाल्यावर हा ग्रंथ केव्हांतरी थोडक्याच कालांत झाला असावा या दोनही निर्दिष्ट केलेल्या ग्रंथांपूर्वी जगन्मोहन, नरेंद्रवल्ली आणि समयसिद्धांजन ह्या तीन ग्रंथांवरून पंचांगांत फलें लिहिण्याची वहिवाट होती असें दिसतें. हे तीनही ग्रंथ फार जुने आहेत; हे माझ्या पाहण्यांत आले नाहींत. तथापि कल्पलतेंत जगन्मोहनाचें नांव आलें आहे, व बाकी दोहोंचीं नांवें कै० दीक्षित यांच्या भारतीय ज्योतिष ग्रंथावरून समजलीं. प्रस्तुत पुस्तकांत कल्पलता व राजावलि या दोहोंची सांगड घालून श्लोक एके ठिकाणीं लिहिले आहेत. ( श्लोकापुढें कल्पलता व राजावलि ह्याबद्दल क० अगर रा० ) अशीं सांकेतिक अक्षरें लिहिलीं आहेत. कल्पलता व राजावलि या दोन्ही ग्रंथांचा समावेश या पुस्तकांत केला आहे.

अकोट गांवांत राहणाऱ्या देव ज्योतिर्विदांच्या कुळांत नागेश दैवज्ञांच्या शिव नामक पुत्रानें संक्रांतिफलादेश या नांवाचा ग्रंथ लिहिला आहे. तो सर्व या ग्रंथांत दिला आहे. याशिवाय बरेच ग्रंथांचे संक्रान्ति प्रकरणांतील निवडक उतारे घेतले आहेत.

मयूरचित्रक हा ग्रंथ वराहमिहिराचार्य ह्यानें केला. यांत कोणकोणतें धान्य कोणकोणत्या महिन्यांत महाग अगर स्वस्त होईल, पाऊस कोणत्या महिन्यांत कोणते नक्षत्राचा पडेल अगर पडणार नाहीं वगैरे माहिती दिली आहे. ह्मणून हा ग्रंथ पंचांगोपयोगी असल्यानें त्यांतील सर्व विषय विषयानुक्रमानें प्रत्येक स्थळीं घेतले आहेत. बृहत्संहिता हा ग्रंथ वराहमिहिराचार्यांनीं केला. त्याचें मुळासहीत मराठी भाषांतर रा० रा० आठल्ये यांनीं करविलें. त्या ग्रंथांतील कांहीं उतारे पंचांगोपयोगी

असल्यामुळें घेतले आहेत. संहितेंत व्यक्तिविषयक फलें नसतात. देशास होणारीं शुभाशुभ फलें असतात. पर्जन्य, मेघगर्भलक्षण, मेघगर्भधारण आणि प्रवर्षण यांपैकीं पर्जन्य विचाराची मार्गशीर्ष, पौष, माघ आणि फाल्गुन या महिन्यांत पूर्व पश्चिम क्षितिजाकडे आकाशांत सतत प्रातःकाळीं व सायंकाळीं दृष्टि लाऊन वशिष्ठ, गर्ग, पराशर, काश्यप, वात्स्य इत्यादि ऋषींनी संहितेंत जीं जीं लक्षणें सांगितलीं आहेत, तीं दृष्टिगोचर आहेत किंवा नाहींत, व तसेंच कोणत्या नक्षत्रांचें गर्भधारण व कोणत्या नक्षत्रांचें गर्भपतन झालें आहे हें पाहून संहितेंतील नियमाप्रमाणें पर्जन्याचें अनुमान करावें. याप्रमाणें केलेलें पर्जन्याचें अनुमान बहुतकरून चुकणार नाहीं; परंतु हें अनुमान देशपरत्वें भिन्न होईल हें सांगावयास नकोच. या विषयाचें ज्ञान सांप्रत कांहीं गणकांस व इतर कांहीं मेंढ धनगर वगैरे लोकांस आहे. ते गर्भधारणावरून व गर्भपात न झालेल्या नक्षत्रावरून या नक्षत्रांची वृष्टि होईल किंवा नाहीं हें बिनचूक सांगतात असें माझ्या अनुभवास आलें आहे.

शके १४४७ सांत गणेश दैवज्ञानीं लघुचिंतामणि ग्रंथ केला. त्यावरून हल्लीचीं पंचांगें करितात. पंचांग कसें तयार करावें हें समजण्याकरितां एक उदाहरण करून दाखविलें आहे. तें पाहिलें म्हणजे समजेल. मुळांतील तिथ्यादिक साधनांचीं कोष्टकें विस्तारभयास्तव यांत दिलीं नाहींत. या ग्रंथापूर्वी गणेशदैवज्ञांनीं बृहत् चिंतामणि ग्रंथ शके १४४१ सांत केला होता; परंतु त्यांत अंकजाल फारच असल्यानें तो रहित करून सदरचा ग्रंथ केला. वृत्तिशतक ग्रंथांत धान्य, धातु आणि जनावरें यांच्या क्रयविक्रयाचा विचार सांगितला आहे. कान्हा कवीश्वरनंदन गोविंदकवीश्वर यांनीं धान्य वगैरे क्रयविक्रय करण्याचा विचार प्रश्नावरून सांगितला आहे. छत्रेकृत पंचांगसाधन व ग्रहसाधन, दीक्षितकृत रात्रीचा दोन घटका मौज, ज्योतिर्भयूख व वर्षप्रबोध आणि प्रश्नवैष्णव इत्यादि ग्रंथांतील कांहीं वेंचे घेतले आहेत, आणि याशिवाय बरेच ग्रंथांतील उतारे घेतले आहेत. त्यांचीं नांवें श्लोकांवर घातलीं आहेत म्हणून तीं येथें दिलीं नाहींत. हरीश्वरापासून मच्छेंद्रनाथास, मच्छेंद्रनाथापासून गोरक्षकास ज्योतिष व गणितविद्या मिळाली, व त्यानीं गोरक्षमतें गमनास मुहूर्त असा जो पंचांगांत विषय घातलेला आहे तो ह्याच गोरक्षनाथाचा होय. ह्याशिवाय ह्या सत्पुरुषांचे ज्योतिष विषयावर कांहीं ग्रंथ असले पाहिजेत असें मला वाटतें; पण ते कोठें आढळले नाहींत. दिवारात्रौ शिवालिखीत हा विषय पंचांगांत असतो; पण ज्योतिष ग्रंथांत मला ह्याविषयीं कोठें माहिती मिळाली नाहीं, म्हणून तो विषय पुस्तकांत गाळला आहे. ज्या ग्रंथकारांच्या पुस्तकांतून आम्हीं कांहीं उतारे घेतले आहेत त्या सर्वांचे आभार मानून हा विषय येथें पुरा करितों.

गणित स्कंध कोणाचा, यासंबंधानें दोन शब्द लिहिणें येथें अप्रासंगिक होणार नाहीं. अनादि कालापासून गणितशास्त्राची उत्पत्ति पाहूं गेल्यास वेदवचनावरून असें दिसतें कीं, आरंभीं ब्रह्मदेवानें गणित विद्येसंबंधीं एक लक्ष सूत्रें रचून तीं दक्ष प्रजापतीस अंगासह शिकविलीं. त्यानें तीं अश्विनीकुमारास, अश्विनीकुमारानें इंद्रास, व इंद्रानें भरद्वाजऋषीस या क्रमानें एका ऋषीपासून दुसऱ्यास अशीं मिळत मिळत शेवटीं कौत्स ऋषीस प्राप्त झालीं. पुढें कौत्सांच्या कल्याण नांवाच्या शिष्यापासून कालस नांवाच्या प्रवाशास तीं मिळालीं. पुढें कालस हा निरनिराळ्या देशांत फिरून अरबस्थान, इराण या मार्गानें काबुलाकडे आला. तेथून अरब लोकांनीं ती गणितविद्या आपल्या देशांत नेली व तेथून ती परंपरेनें युरोपमध्यें गेली.

हें मत निश्चित होण्यापूर्वी १७ व्या शतकांत असा एक समज होता कीं ग्रीक लोकांना बीजगणिताचें पृथक्करण माहीत होतें; तथापि हल्लीं हें मत खोटें ठरलें आहे. ग्रीस देशामध्यें महापंडित

युक्लिड होऊन गेला. त्यानें सिद्धांतरूपानें भूमितीचा प्रसार केला; परंतु बीजगणिताचीं मूलतत्त्वें अरब लोकांचा महमद बिन मूसा अथवा मोझेस यानेंच पुढें आणलीं असें ठरतें. या मूसानें केलेलें पुस्तक हें टांचणरूपानें असल्यानें हें टिपण दुसऱ्या कोणत्यातरी भाषेंतून घेतलें असावें असें ठाम सिद्ध होतें. दुसरें असें कीं याच मूसाला ज्योतिषशास्त्राची व गणितविद्येची माहिती हिंदु लोकांपासूनच मिळाली आहे. अर्थात् बीजगणित हेंहि अरबी भाषेंत प्रथम हिंदुस्थानांतूनच गेलें यांत संशय नाहीं.

आतां युरोपमध्यें बीजगणित प्रथम पीजा येथील लिओनार्डो नांवाच्या व्यापाऱ्यानें नेलें व त्यानें युक्लिडच्या व वरील हिंदूच्या बीजगणिताचे आधारें स्वतः एक पुस्तक लिहिलें. त्याचप्रमाणें डमार्गन आल्जिब्रा नांवाच्या पुस्तकावरून दिसतें कीं राबर्ट रेकार्ड या वैद्यानें मेरी राणीचे वेळीं इंग्लंड-मध्यें दशांशपद्धति व बीजगणित नेलें. इंग्रजींत आल्जिब्रा असें नांव अरबी भाषेंतील आल जिबर या शब्दावरून आलें असलें पाहिजे. निरनिराळ्या देशांतील शकपद्धतीवरून तुलनात्मक विचार केला तरीसुद्धां अरबांना बीजगणिताचें ज्ञान होण्यापूर्वी ब्रह्मगुप्तानें बीजगणितावर ग्रंथ लिहिला त्याचेपूर्वीसुद्धां गणेश या नांवाचा अति प्रसिद्ध ज्योतिषी व गणिती होऊन गेला. त्यानें त्या पूर्वीच्या एका जुन्या ग्रंथांतून उतारा घेतला आहे. तो उतारा आर्य भट्टांच्या बीजगणितांतील आहे. आर्यभट्ट हे इ० स० ३६० या वर्षी झाले आतां बीजगणिताचा भूमिती आणि खगोल विद्येशीं फार निकट संबंध असल्यानें भूमिती व खगोल विद्येबरोबर बीजगणितहि ख्रिस्त सनाचे अगोदर ३००० वर्षांपूर्वी हिंदुस्थानांत उदय पावलें असेंच ह्मणावें लागतें. थोडक्यांत असें ठरतें कीं, आपल्या या हिंदभूमध्येंच बीजगणिताची प्रथम उत्पत्ति होऊन ती सर्व जगावर प्रामुख्यानें विस्तृत झाली.

या ग्रंथाचे प्रकाशनाचे कामीं ज्या श्रीमंत गृहस्थांनीं उदार हस्तानें द्रव्यद्वारा साह्य केलें त्यांत श्रीमंत माधवराव बाळासाहेब पंडित पंत अमात्यसाहेब संस्थान गगनबावडा, यांना अग्रस्थान देणें योग्य होय. श्रीमंत नारायणराव बाबासाहेब घोरपडे संस्थान इचलकरंजी, श्रीमंत सर परशरामराव भाऊसाहेब पटवर्धन संस्थान जमखिंडी, श्रीमंत भालचंद्रराव अण्णासाहेब पटवर्धन कुरुंदवाड ( थोरली पाती ), श्रीमंत विनायकराव नानासाहेब पटवर्धन कुरुंदवाड ( धाकटी पाती ), श्रीमंत रामराव रावसाहेब भावे सं० रामदुर्ग, रा० रा० हरी लक्ष्मण कन्हेरकर कारभारी नि० गाईकवाड विश्वासराव कोल्हापूर, श्रीमंत मार्तंड त्र्यंबक ऊर्फ अप्पासाहेब गद्रे शेडाणीकर इनामदार पुणें या श्रीमंत सद्गृहस्थांच्या नांवांचा उल्लेख करणें अत्यंत अगत्याचें आहे; व त्यांच्या सौजन्याबद्दल मी त्यांचा अत्यंत ऋणी झालें आहे. श्रीमंत पंत अमात्यसाहेब संस्थान गगनबावडा यांनीं वेळोवेळीं द्रव्याची पूर्ण मदत केल्यामुळें मी श्रीमंतांचा फार फार आभारी आहें; आणि श्रीमंतांच्या औदार्याविषयीं जितकें वर्णन करावें तितकें थोडेंच होणार आहे. यांत बिलकुल शंका नाहीं.

हा ग्रंथ सर्वथैव निर्दोष झाला आहे असें ह्मणतां येणार नाहीं. ह्यांत कांहीं दोष असणें स्वाभाविक आहे. तेव्हां ते दोष कोणी दैवज्ञ किंवा शास्त्रज्ञ यांस आढळतील तर त्यांनीं कृपा करून मला कळविलेस त्याबद्दल त्यांचे आभार मानून ते पुढील आवृत्तीचे वेळीं दुरुस्त करीन.

शवटीं ज्या जगच्चालकाच्या कृपेनें हा माझा अल्प प्रयत्न सिद्धीस गेला त्याच्या चरणीं अनन्य भावानें मस्तक ठेवून ही अल्प प्रस्तावना पुरी करितों.

हा ग्रंथ तपासणेचे कामीं माझे परमस्नेही वे० रा० रा० पांडुरंगशास्त्री निपाणीकर यांनीं आपला अमूल्य वेळ खर्चून ग्रंथांत राहिलेले प्रमाद दुरुस्त केले व प्रुफेंही वेळोवेळीं तपासून दिलीं याबद्दल त्यांचे आभार जितके मानावेत तितके थोडेच होणार आहेत. तसेंच विद्याविलास छापखान्याचे मालक रा० रा० रामकृष्ण शंकरशास्त्री गोखले यांनीं ठरावीक मुदतींत या ग्रंथाचा

पहिला भाग छापून दिला याबद्दल त्यांचा मी आभारी आहे; आणि रा० रा० वासुदेव नारायण ठकार श्रीसिद्धेश्वर छापखान्याचे मालक यांनीं या ग्रंथाचा दुसरा व तिसरा भाग वेळेवर छापून दिला याजबद्दल त्यांचाही मी फार आभारी आहे.

मुकाम कोल्हापूर,
ता० १६ जानेवारी १९२४
पौष शुद्ध १० शके १८४५.

अमृत माधव वाघोलीकर.

---

# उपोद्घात.

भरतखंडांतील धार्मिक व व्यावहारिक सर्व कृत्यें ज्योतिषाच्या आधारांवर निश्चित आहेत ही गोष्ट सर्वविश्रुतच आहे. ईश्वरप्राप्तीसाठीं केलेले यज्ञयाग असोत, पुत्रकामेष्टिसारखे फलोद्दिष्ट याग असोत, षोडश संस्कारांसारखे नैमित्तिक प्रसंग असोत, अथवा प्रवासाला निघण्यासारखीं नित्य कार्यें असोत, हीं सर्व ज्योतिषाच्या आधारावर अवलंबून ठेविलेलीं आहेत. अर्थात् या सर्वांच्या मुळाशीं असलेलें ज्योतिषशास्त्र समजल्यावांचून ता आधार कितपत शुद्ध आहे, त्याला तर्काची बळकटी कितपत आहे, त्याला प्रत्यक्षाची कसोटी कितपत लागू पडते वगैरे समजणें कठिण आहे. यासाठीं त्या ज्योतिषाची माहिती असणें दर एक आर्याला अवश्य आहे. स्वतःला ज्ञान असल्याशिवाय अमुक गोष्ट शास्त्रोक्त आहे हें ह्मणणें निरर्थक आहे. वेद हे पवित्र खरें; पण त्या वेदांचा अर्थ न समजतां त्यांचें केलेलें पारायण फलावह नाहीं. 'अधीत्य वेदं न विजानाति योऽर्थम् । भारहारः किलभूत् ।' या वेदवचनाप्रमाणेंच आपण नित्य कर्माचे भारवाहक मात्र समजले जाऊं. यासाठीं तो आरोप टाळण्याकरितां धर्मकृत्यांचें आधारभूत ज्योतिष जाणणें अवश्य आहे हें उघड आहे.

परंतु हें अवश्य असलें तरी सुलभ नाहीं. तद्विषयक सर्व ग्रंथ संस्कृतांत असल्यामुळें भाषांतराच्या अभावीं प्राकृत जनसमाजाला त्यांचें ज्ञान होणें अशक्य आहे. शिवाय हे ज्योतिषाचे निरनिराळे भागही एकत्रित नसल्यामुळें सर्वांचें संकलित ज्ञान होणेंही अशक्य असतें. यासाठीं हा सर्व उपयुक्त भाग एकत्र करून त्याचें सरळ, सुलभ मराठी भाषांतर होणें फार अवश्य होतें. तें महत्त्वाचें कार्य ज्योतिर्विद रा० अमृत माधव वाघोलीकर यांनीं केलें याबद्दल सर्व आर्यधर्मीयांनीं त्यांचें ऋणी असलें पाहिजे. बृहत्पंचांगफलादर्श ह्मणजे त्या विषयाचा 'विश्वकोश' ह्मणावयास हरकत नाहीं. तो विषयांच्या अनुक्रमानें पूर्वापरभाव ध्यानांत धरून रचिलेला असल्यानें त्यांत एकसूत्रीपणा दिसून येत आहे व यामुळें तो विषयाच्या अभ्यासाला फार सुसंगत झाला आहे.

प्रथमारंभीं आपली युगादि कालगणनापद्धति सविस्तर दिलेली आहे. युगभेद, त्यांची मर्यादा, त्यांचे सूक्ष्म भाग, संवत्सर, त्यांचीं फलें, त्यानंतर ऋतु, नंतर मास, अधिक व क्षय यांचा शास्त्रार्थ, त्या त्या मासांचीं फलें व त्यांत ग्रह असण्यानें त्यांचीं भिन्न भिन्न फलें, नंतर तिथी व वार व त्यांचीं फलें, नक्षत्रें, संक्रांती व त्यांचीं फलें, वर्षप्रवेश व त्या कालाचीं संवत्सरफलें, आर्द्राप्रवेशफलें इतके विषय पहिल्या भागांत सविस्तर दिले आहेत. धर्मशास्त्रादिकांत लागणाऱ्या सर्व ज्योतिष ज्ञानाचा संग्रह या भागांत केलेला असल्यामुळें यासाठीं इतर कोठेंही शोधण्याची अवश्यकता यामुळें राहणार नाहीं.

यानंतरच्या दुसऱ्या भागांत ज्याला फलज्योतिष व विशेषत: त्यांतील जातकभाग ह्मणतात त्याचें विवरण केलेलें आहे. त्यांत प्रथमत: ग्रहचार, अथवा मेषादि दरएक राशींत आदित्यादि नऊ ग्रहांच्या भ्रमणाचें फल दिलेलेंच आहे. यांतही या गोचराचें सर्वसामान्य संहिता फल दिलेलेंच आहे. यानंतरचा महत्वाचा भाग ह्मणजे वधूवरपत्रिकामेलन हा होय. यांत सर्व ३६ गुणांची मांडणी व जुळणी कशी करावयाची तें दिलेलें असून त्यामुळें कोणालाहि ज्योतिष्याच्या मदतीशिवाय हें कार्य स्वत: करितां येईल. यानंतर अशौचनिर्णय केलेला आहे. तोही व्यवहारांत नित्योपयोगाचा आहे.

तिसऱ्या भागांत गणितस्कंधाची अथवा सिद्धांताची माहिती दिलेली आहे. त्यांत, क्षितिज, वृत्तें, संपात, अयन, अयनांश भोग, शर, क्रांति, राशि इत्यादि संज्ञांचें स्पष्टीकरण देऊन नंतर देशांतर संस्कार, तिथिसाधन, नक्षत्रसाधन, क्षयवृद्धींचा स्पष्टार्थ, योग व करण काढण्याची रीत वगैरे दिली आहे. यावरून साध्या गणितानें कोणासहि पंचांग तयार करितां येईल. यानंतर हें पंचांगगत गणित शुद्ध येण्यासाठीं, वेधलब्ध नॉटिकल आल्मनॅकवरून हिंदु पंचांग करण्याची रीत दिली आहे. अखेर, दरएक ग्रहासंबंधाची माहिती दिलेली आहे. ही Astronomical ह्मणजे वेधगणितदृष्ट्या दिलेली आहे. अखेर, हिंदुस्थानांतील सर्व प्रमुख स्थलांचे अक्षांशरेखांश व पलभा देऊन कोणत्याही वेळीं कोणत्याही ठिकाणीं लग्नसाधन कसें करावें हें स्पष्ट करून दाखविलें आहे.

तात्पर्य ज्योतिषाचें जें लक्षण

सिद्धांतसंहिताहोरारूपं स्कन्धत्रयात्मकम् ॥
वेदस्य निर्मलं चक्षुर्ज्योतिःशास्त्रमनुत्तमम् ॥

असें दिलेलें आहे. त्या लक्षणाप्रमाणें स्कंधत्रयात्मक वेदनेत्राचें संपूर्ण ज्ञान करून देणारा हा एकच ग्रंथ मराठींत आहे, व तो निर्माण केल्याबद्दल ज्यो० वाघोलीकर हे खरोखर अत्यंत प्रशंसेस पात्र आहेत. हा ग्रंथ मी बारीक रीतीनें तपासून पाहिला आहे.

आधींच या विषयाचे अभ्यासक थोडे व त्यांतही ग्रंथाभावीं या विषयाची उपेक्षा व अधिक्षेप करण्यास साहजिकच अवसर अधिक असतो. त्यापैकीं एक उणीव तरी या ग्रंथानें नि:संशय कमी करण्यांत आली आहे.

या ग्रंथाचा स्वीकार सर्व ज्योतिर्विद आनंदानें करतील व ग्रंथलेखकाच्या श्रमांचें चीज करून त्यांना या विषयावर अधिक परिश्रम करण्यास उत्तेजन देतील अशी मला आशा आहे.

बडोदे, रावपुरा.
मिति मार्गशीर्ष
कृष्ण पंचमी शके १८४५.

दाजी नागेश आपटे,
अध्यक्ष,
भारतीय ज्योतिर्मंडळ.

# अनुक्रमणिका.

| विषय. | पृष्ठ. |
|---|---|



---

## भाग २ रा.

---

## भाग ३ रा.

# अभिप्राय.

॥ श्री. ॥

कोल्हापूरचे ज्योतिषी वे० शा० सं० रा० रा० अमृत माधव वाघोलीकर यांनीं रचलेला "बृहत्पंचांगफलादर्श" (सार्थ) हा ग्रंथ आह्मीं वाचून पाहिला. चालू पंचांगांतून ग्रह, नक्षत्र, दिन, संक्रांत, अयन, संवत्सर वगैरेसंबंधानें जीं फळें देण्यांत येतात त्यांस आधारभूत असलेलीं वचनें रा० रा० वाघोलीकर यांनीं अनेक प्राचीन ग्रंथ शोधून आपल्या ग्रंथांत एकत्र केलीं आहत, आणि त्यांचा मराठी अर्थही त्या त्या वचनाखालींच दिलेला आहे. तसेंच पंचांगांतील गणित सोपें व्हावें ह्मणून या ग्रंथाच्या तिसरे भागांत तिथिसाधनाच्या सारण्यावरून तिथि, नक्षत्र, योग व करण पूर्व पद्धतीनें करून दाखविलें आहे, आणि नाटिकल आल्मनॉकवरून इकडील स्पष्ट रवि चंद्रावरून तिथि, नक्षत्र, योग आणि करण व ग्रहरीतिसह स्पष्ट करून दाखविले आहेत; आणि इतर गणित-विषयांचाही संग्रह केला आहे. सारांश, पंचांग तयार करण्यास जीं साधनें लागतात त्यांची सर्व माहिती या एकाच ग्रंथांत दिली असल्यामुळें हा ग्रंथ संग्रहणीय व लोकाश्रयास पात्र झाला आहे. असे ग्रंथ लिहिण्यास पूर्व ग्रंथांचें विस्तृत अवलोकन लागतें इतकेंच नव्हे तर पुष्कळ दिवस सतत परिश्रमही करावे लागतात. हें अवलोकन आणि परिश्रम करून रा० रा० वाघोलीकर यांनीं हा ग्रंथ लिहिला आहे याबद्दल आमची खात्री झाली आहे; आणि आमची अशी आशा आहे कीं, योग्य साहाय्य मिळून हा ग्रंथ लवकरच प्रसिद्ध होईल आणि ग्रंथकर्त्यास आपल्या श्रमाचें चीज झालेलें पहावयास मिळेल.

पुणें, तारीख २१ जून १९१६. } बाळ गंगाधर टिळक.

---

॥ श्री ॥ पुणें ता. २२ जुलै १९१६ इ.

वे. शा. सं. राजश्री अमृत माधव वाघोलीकर रहाणार संस्थान कोल्हापूर यांनीं नुकतीच तयार केलेली "बृहत्पंचांगफलादर्श" या ग्रंथाची हस्तलिखित प्रत (सार्थ) आह्मीं वाचून पाहिली. पंचांग विषयीं हल्लीं आमच्या देशांत इतकें अज्ञान पसरलें आहे कीं बऱ्याच लोकांना पंचांग ह्मणजे जंत्रीसारखें केवळ अंकांनीं भरलेलें पातडें. त्यांत कोठें कोठें एखादे अ, भ, अशीं अक्षरें असतात. त्याचा अर्थ काय हें आह्मांस समजत नाहीं. तेव्हां तुमच्या केतकी पंचांगांत कोणत्या रकान्यांत कोणत्या गोष्टी लिहिल्या असतात वगैरे गोष्टींचा खुलासा असावा आणि पंचांग कसें पहावें यांविषयीं चार पृष्ठें जास्त घालावीं' अशी सुशिक्षित गृहस्थांनीं कांहीं दिवसांपूर्वी सूचना केली आतां ही त्यांची सूचना चमत्कारिक ह्मणता येत नाहीं. कारण गृहस्थाचें कालज्ञान क्यालेंडरवरून संपादितां येतें. त्यामुळें उभ्या वर्षांत फार क्वचित् प्रसंगीं पंचांगाशिवाय त्यांचें अडतें. व अडलेंच तर उपाध्येबुवा आहेतच. असो. अशा निकृष्टप्रसंगीं पूर्वोक्त "बृहत्पंचांगफलादर्श" हा ग्रंथ बाहेर पडणें ह्मणजे आंधळ्याला डोळस करणें आहे.

यांत ग्रहगणित मात्र नाटिकल आल्मनॉकमधील रवि मध्यस्थ ग्रहाचे भूमध्यस्थ ग्रह करण्याचे एक रीतिसह उदाहरण करून दाखवलें आहे. बाकीचे सर्व विषय सविस्तर व साधार वर्णिले आहेत. तिथी, वार, नक्षत्रें यांचें गणित कसें करावें, क्षय, वृद्धि ह्मणजे काय, पुढील व मागील शेकडों

वर्षांच्या इष्ट तारखेवरून तिथि ठरविणें किंवा तिथीवरून तारीख ठरविणें, फारशी, मुसलमानी व इंग्रजी या कालगणनेचा परस्पर संबंध इत्यादि अत्यंत महत्त्वाचे व मनोरंजक विषय यांत आले आहेत. सारांश या पुस्तकावरून पंचांग म्हणजे काय याचें मार्मिक ज्ञान होईल एवढेंच नव्हे तर ज्योतिःशास्त्र म्हणजे काय याचीही बरीच कल्पना मनांत येईल.

पंचांगाचा दुसरा भाग जो शास्त्रार्थ त्याविषयीं जी माहिती दिली आहे ती भरपूर व व्यवस्थितपणें दिली आहे. एतत्संबंधीं कल्पलता, राजावली अनेक ज्योतिष ग्रंथ, मयूरचित्रक, बृहत्संहिता, कालमाधव, निर्णयसिंधु, धर्मसिंधु इत्यादि ग्रंथांचीं वचनें सार्थ दिलीं आहेत. हें पुस्तक म्हणजे मुहूर्त, होरा, शास्त्रार्थ, इत्यादिविषयक ज्ञानाची एक खाणच आहे असें म्हणणें अतिशयोक्ति होणार नाहीं

हें पुस्तक तयार करण्याच्या कामीं माहिती मिळवितांना ग्रंथकर्त्यांस किती कष्ट व मानसिक परिश्रम करावे लागले आहेत त्याची कल्पना पुस्तक प्रत्यक्ष पाहिल्याशिवाय पूर्णपणें संभवनीय नाहीं. हें पुस्तक ज्योतिःशास्त्रेच्छूंनीं संग्रहीं करण्यास योग्य आहे व असा सर्वांस उपयोगीं पडणारा ग्रंथ लिहिल्याबद्दल आम्हीं ग्रंथकर्ते यांचें मनापासून अभिनंदन करितों.

वेंकटेश बापूजी केतकर.

---

॥ श्री. ॥ कोल्हापूर ता० १७।४।१९१७ इ०.

श्रीयुत अमृतराव वाघोलीकर यांनीं तयार केलेलें 'बृहत्पंचांगफलादर्श सार्थ" या नांवाचें पुस्तक मी वाचून पाहिलें. हें पुस्तक पंचांग करणारे ज्योतिषी व इतर ज्ञानेच्छु लोक यांस फारच उपयोगी पडेल, यांत शंका नाहीं. कारण यामध्यें पंचांगोपयोगी संवत्सरादि फलें, धर्मशास्त्रार्थ वगैरे विषय कल्पलता, राजावली, मयूरचित्रक, मुहूर्तसिंधु इत्यादि ग्रंथांवरून एकत्र करून त्यांचें विवेचन चांगल्या रीतीनें केलेलें आहे. तसेंच तिथी, वार, नक्षत्र योग आणि करण हीं जीं पंचांगाचीं पांच अंगें तीं कशीं काढावीत याकरितां श्रीमत् गणेश दैवज्ञकृत तिथिचिंतामणि नामक ग्रंथाचें भाषांतर देऊन शके १८३६ सालचें एक उदाहरणही करून दाखविलें आहे त्यामुळें जिज्ञासू वाचकांस गुरुवांचून कोणत्याही दिवशीं तिथ्यादिकांचें साधन करितां येईल क्रांति व अक्षांश यावरून चर संस्कार कसा आणावा हें सांगून चैर कोष्टकेंही तयार करून दिलेलीं आहेत. क्यॉलेंडर कसें तयार करावें याची उपपत्ति प्रथम भागांत सांगून तिसरे भागांत त्याचें, इ० सनाअगोदर पांच हजार व इ० सनानंतर पांच हजार वर्षे जुनें व नवीन पद्धतीनें कोष्टक तयार केलें आहे तें पाहिलें म्हणजे समजेल. तिथीवरून इंग्रजी तारीख व इंग्रजी तारखेवरून तिथि काढण्याची रीत उपपत्तिसह प्रथम भागांत सांगून तृतीय भागांत त्याचीं कोष्टकें दिलीं आहेत. नाटिकल आल्मनॉक यांतील रवि, चंद्र व ग्रह कसे तयार करितात याचें एक उदाहरण करून तिथि, नक्षत्र, योग आणि करण हे काढून दाखविले आहेत सारांश जुनें व नवीन पद्धतीनें पंचांग कसें तयार करावें हें या ग्रंथांत विद्यार्थ्यांस व इतर जिज्ञासू लोकांस समजण्या सारखें सोपे रीतीनें करून दाखविलें आहे. इत्यादि अनेक उपयुक्त विषय यांत असल्यामुळें वाचकांस व विद्यार्थ्यांस हें नवीन ज्ञानभांडारच मिळालेसें होणार आहे करितां श्रीमान् सद्गृहस्थांनीं या पुस्तकास आश्रय देऊन हें पुस्तक प्रसिद्धीस आणावें अशी शिफारस करितों. म्हणजे ग्रंथकाराच्या हेतूचें चीज होईल.

विनायकशास्त्री खानापूरकर.

॥ श्रीगणेशाय नमः ॥

# बृहत्पंचांगफलादर्श सार्थ.

## मंगलाचरण.

स जयति सिंधुरवदनो देवो यत्पादपंकजस्मरणम् ।
वासरमणिरिव तमसां राशिं नाशयति विघ्नानाम् ॥ १ ॥ क.

**अर्थ**—ज्याप्रमाणें सूर्य अंधकारपटलाचा नाश करतो त्याप्रमाणें ज्याच्या चरणकमलाचें चिंतन केलें असतां सकल विघ्नें नाहींशीं होतात असा व ज्याचें मुख हत्तीप्रमाणें आहे असा देदीप्यमान जो गणपति त्याचा जयजयकार असो.

स्वभजनरतविघ्नध्वांतविध्वंसभानुः
कमलजकमलेशाद्यैः स्तुतः स्वेष्टसिद्धयै ।
विलसदलघुशुंडादंडसंताडितारि-
र्दिशतु गिरिसुताया नन्दनो मंगलं वः ॥ २ ॥ क.

**अर्थ**—आपल्या सेवेंत निमग्न असलेल्या लोकांच्या विघ्नरूपी अंधकाराचा नाश करण्याविषयीं जणूं काय सूर्यच असा, आपल्या मनकामना पूर्ण होण्याकरितां ब्रह्मदेव, विष्णु आदिकरून देवांनीं ज्याची स्तुति केली आहे असा, शोभायमान व दीर्घ अशा शुंडारूपी दंडानें शत्रूवर जो प्रहार करतो असा, पार्वतीचा तनय गणपति तुमचें कल्याण करो.

स्वानन्दाय सनन्दनादिनतसत्पादारविन्दद्वयम्
नानानन्दनिदानमेकरदनं दुष्टार्दनं सद्वयम् ॥
भालेन्दुं मदमत्तदन्तिवदनं दानं दधानं सदा
तं वन्दे मदनारिनन्दनमहं देवं सुतुन्दं मुदा ॥ ३ ॥

**अर्थ**—आत्मानंदप्राप्तीकरितां सनंदन आदिकरून ऋषि ज्याच्या सुंदर चरणकमलयुगुलास नमस्कार करितात, जो निरनिराळ्या आनंदाचें आदिकारण

आहे, ज्यास एकदंत आहे, जो दुष्टांना त्रासवून सोडतो, जो ऋद्धिसिद्धींनीं युक्त आहे, ज्याच्या मस्तकावर चंद्र आहे, ज्याचें मुख उन्मत्त झालेल्या हत्तीच्या मुखाप्रमाणें आहे, जो सर्वकाळ दानोदक धारण करतो असा जो शंकराचा दैदीप्यमान तुन्दिलपुत्र त्यास मी आनंदानें नमस्कार करितों.

करारविन्देन पदारविन्दं मुखारविन्दे विनिवेशयन्तम्
वटस्य पत्रस्य पुटे शयानं बालं मुकुन्दं मानसा स्मरामि ॥ ४ ॥ कं.*

अर्थ—हस्तकमलानें चरणकमल मुखकमलांत घालणारा व वटपत्राच्या पुटामध्यें निजणारा असा जो चिमुकला मुकुंद त्याचें मी मनानें स्मरण करितों.

अचिन्त्याव्यक्तरूपाय निर्गुणाय गुणात्मने
समस्तजगदाधारमूर्तये ब्रह्मणे नमः ॥ ५ ॥ कं. ×

अर्थ—ज्याच्या रूपाची कल्पना करितां येत नाहीं, ज्याचें रूप स्पष्ट दिसत नाहीं, जो गुणरहित असून गुणस्वरूप आहे, ज्याचा आकार सर्व जगाला आधारभूत आहे असा जो परमेश्वर त्याला नमस्कार असो.

## सृष्टिरचना.

उदाप्लुतं विश्वमिदं तदासीद्यन्निद्रया मीलितदृङ् न्यमीलयत्
अहींद्रतल्पेऽधिशयान एकः कृतक्षणः स्वात्मरतौ निरीहः ॥ १ ॥ इत्यादि.
भागवत ३—८—१०-११-१२.

अर्थ—पूर्वी महाप्रलयकालीं हें विश्व जलामध्यें असलेल्या शेषशायी भगवंताच्या स्वरूपांत लीन होऊन राहिलें होतें. पुनः सृष्टि करण्याकरितां कालशक्तीला प्रेरणा करून भगवंतांनीं बहुतकाल समाधिसुख घेतलें. नंतर कालशक्तीनें प्रेरणा केल्यामुळें परमेश्वराचे मनांत सृष्टि निर्माण करण्याची इच्छा झाली व त्यास आपले ठिकाणीं लीन झालेलें जग पुनः दिसूं लागलें.

इच्छाशक्तिः । प्रथमं बुद्बुदः । तस्मादण्डं । अण्डादहंकारः
अहंकारात्कमलं । तस्य पद्मनाभेर्ब्रह्मा । ततोऽ शरीरिणीवाक् ।

---

* हा श्लोक पुढें सृष्टिरचना दिली आहे तिचा उपोद्घात आहे.

× परमेश्वराची ब्रह्मदेव आदिसृष्टि असल्यानें हा श्लोक पंचांगांतील तिथि सांगण्यापूर्वी म्हणण्याची ज्योतिषी लोकांत वहिवाट आहे.

' तपस्तप्त्वा सृष्टिं कुरु ' इति । तत्र चतुर्धोत्पत्तिः । अण्डजाः ।
जरायुजाः । स्वेदजाः । औद्भिजाश्चेति ॥ क.

अर्थ—प्रथम परमेश्वराला सृष्टि निर्माण करण्याची इच्छा उत्पन्न झाली. तोच बुडबुडा, त्यापासून एक अंडें उत्पन्न झालें. अण्ड्यापासून अहंकार, अहंकारापासून कमल, त्या नाभिकमलापासून ब्रह्मदेव उत्पन्न झाला. नंतर आपणास कोणी व कशाकरितां उत्पन्न केलें अशी ब्रह्मदेवास चिंता पडली; तेव्हां तप करूनं सृष्टि निर्माण कर अशी आकाशवाणी झाली. त्याप्रमाणें त्यानें तपश्चर्या करून जरायुज, स्वेदज, अण्डज व औद्भिज्ज अशी चार प्रकारची सृष्टि निर्माण केली.

तासु चतुरशीतिलक्षयोनयः ता यथा :—

जलजा नवलक्षाश्च स्थावरा लक्षविंशतिः
कृमयो रुद्रसंख्याश्च पक्षिणो दशलक्षकाः ॥ २ ॥ क.
त्रिंशल्लक्षाश्च पशवश्चतुर्लक्षंतु मानवाः
ब्रह्मयोनिशतं गत्वा देवत्वमधिगच्छति ॥ ३ ॥ क.

अर्थ—ह्या जरायुजादि चार प्रकारांमध्यें ८४ लक्ष योनी उत्पन्न झाल्या त्या अशाः—नऊ लक्ष जलांत राहाणारे प्राणी, वीस लक्ष वृक्षलतादि, अकरा लक्ष किडे, दहा लक्ष पाखरें, तीस लक्ष जनावरें, आणि चार लक्ष मनुष्यें. ब्रह्मदेवानें उत्पन्न केलेल्या या योनी शेंकडों वेळ फिरतां फिरतां देवपण प्राप्त होतें.

या नानाविध सृष्टींतील जीवाचें आयुर्मान खालीं लिहिल्याप्रमाणें आहे.

मनुष्याणां शतायुष्यं वृक्षाणां च सहस्रकम्
द्वात्रिंशत्तु तुरंगाणां गजानां विंशतिः शतम् ॥ ४ ॥
व्याघ्राणां च चतुष्षष्टिः काकव्यालौ सहस्रकम्
भल्लूकवानराणां च मंडूकानां शतत्रयम् ॥ ५ ॥
विंशद्वर्षं विहंगानां वर्षमेकं पिपीलिका
गर्दभाणां चतुर्विंशदजानां च तथा दश ॥ ६ ॥
शुनां द्वादशवर्षाणि मृगाणां सप्तविंशतिः
चतुःशतमुल्लूकानां पिंगलानां शतत्रयम् ॥ ७ ॥
आरूणां सप्त वर्षाणि मार्जाराणां तथा दश
चतुर्विंशद्गोमहिषी जंबूकाः षोडशस्तथा ॥ ८ ॥

मक्षिका नवमासं च उष्ट्राणां शतसंख्यया
चतुःशतं राक्षसाणां शूकरा विंशतिस्तथा
कुक्कुटाः षट् च वर्षाणि मत्स्यानामयुतं तथा ॥ ९ ॥ क.

| नं. | प्राणी | वर्षें. | नं. | प्राणी. | वर्षें. | नं. | प्राणी. | वर्षें. | नं. | प्राणी | वर्षें. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | मनुष्यें | १०० | ८ | अस्वल | ३०० | १५ | कुत्रा | १२ | २२ | कोल्हा | १६ |
| २ | वृक्ष | १००० | ९ | वानर | ३०० | १६ | हरिण | २७ | २३ | माशी | ९ महिने |
| ३ | घोडा | ३२ | १० | बेडूक | ३०० | १७ | घुबड | ४०० | २४ | उंट | १०० |
| ४ | हत्ती | १२० | ११ | पांखरें | २० | १८ | पिंगळा | ३०० | २५ | राक्षस | ४०० |
| ५ | वाघ | ६४ | १२ | मुंगी | १ | १९ | खेंकडा | ७ | २६ | डुक्कर | २० |
| ६ | कावळा | १००० | १३ | गाढव | २४ | २० | मांजर | १० | २७ | कोंबडा | ६ |
| ७ | नाग | १००० | १४ | शेळी | १० | २१ | गाय म्हैस | २४ | २८ | मासा | १०००० |

याप्रमाणें साधारणपणें आयुष्याची परम मर्यादा आहे. प्रत्यक्ष ब्रह्मदेवाच्या आयुष्याचीही मर्यादा आहे. तो प्रकार पुढें यावयाचा आहे.

वर सांगितल्याप्रमाणें भूगोलसृष्टि निर्माण करून ब्रह्मदेवानें खगोलाचीही रचना केली. ती अशी—

सृष्ट्वा भचक्रं कमलोद्भवेन ग्रहैः सहैतद्भगणादिसंस्थैः ।
शश्वद्भ्रमे विश्वसृजा नियुक्तं तदंततारे च तथा ध्रुवत्वे ॥ १० ॥

सिध्दांतशिरोमणी, अ. १.

अर्थ—सर्व जग उत्पन्न करणाऱ्या ब्रह्मदेवानें प्रथम राशी व नक्षत्रें यांच्या समुदायांत राहणाऱ्या सूर्यादिग्रहांसहवर्तमान हें राशिचक्र उत्पन्न केलें व त्या चक्रानें निरंतर फिरत असावें अशी योजना केली ; आणि त्या चक्राच्या दोन्ही शेवटांकडील दोन तारे स्थिर असावे असा नियम केला.

ततः पराशाभिमुखे भपंजरे सखेचरे शीघ्रतरं भ्रमत्यपि ।
तदल्पगत्यैंद्रदिशं नभश्चरा भ्रमंति नीचोच्चतरात्मवर्त्मसु ॥ ११ ॥

अर्थ—त्यानंतर तो राशींचा पिंजरा सूर्यादिग्रहांसह फार त्वरेनें पश्चिमाभिमुख फिरत असतांही सूर्यादि ग्रह अति उच्च किंवा अति नीच अशा आपापल्या मार्गानें पूर्व दिशेस जातात.

नक्षत्रकक्षाखचरैः समेतो यस्मादतस्तेन समाहृतोऽयम् ॥
भपंजरः खेचरचक्रयुक्तो भ्रमत्यजस्रं प्रवहानिलेन ॥ १२ ॥

अर्थ—हा राशींचा पिंजरा नक्षत्रें, कक्षा (तारे राहण्याचीं स्थळें) व ग्रह यांनीं युक्त आहे. यास्तव तो त्या नक्षत्रादिकांच्या समुदायासह प्रवहनामक वायूच्या योगानें सर्वकाळ फिरतो.

कुंभकारचरचक्रनेमिगः कीटको भ्रमविलोमगो यथा।
शीघ्रचक्रगतिवद्विभात्यसौ तद्वदत्र खचरो भचक्रगः ॥ १३ ॥

अर्थ—जसा कुंभारानें त्वरित फिरविलेल्या चाकावर बसलेला कीटक जरी चाकाच्या गतीहून विपरीत गतीनें जात असला तरी तो चाकाच्या शीघ्रगतीनें चाकाच्याच दिशेनें जात आहे असा दिसतो, तसा राशिचक्रावर बसलेला ग्रह जरी आपल्या सूक्ष्म गतीनें पूर्वेस जात असतो तरी तो राशिचक्राच्या शीघ्रपश्चिमाभिमुख गतीनें पश्चिमेकडे जातो असा दिसतो.

याप्रमाणें भूगोल व खगोल यांतील सृष्टीची रचना झाली. आतां कालगणनेचा क्रम लक्षांत आला पाहिजे म्हणून तो देतों.

## कालप्रकरणम्.

भूतानामंतकृत्काल[1]: कालोन्यः कलनात्मकः
स द्विधा स्थूलसूक्ष्मत्वान्मूर्तामूर्तः स उच्यते ॥ १४ ॥ सू. सि.

अर्थ—परमेश्वरानें सृष्टि करण्याकरितां कालशक्तीला प्रेरणा केली असें मागें सांगितलें. तो काल दोन प्रकारचा— एक अखंडदंडायमान स्थावरजंगमाचा नाश करणारा व दुसरा खंडकाल खंडकाल ज्ञानगम्य आहे. तोही दोन प्रकारचा, स्थूल व सूक्ष्म मूर्त (म्हणजे ज्याचे घटक वर्ष, मास, आदिकरून असून जो मोजतां येतो तो) व अमूर्त (म्हणजे याहून भिन्न त्रुट्यादि). अमूर्त काल योग्यांनाच समजतो. कारण तो फारच सूक्ष्म आहे. स्थूल किंवा मूर्त काल सर्वांना समजतो म्हणून तो मोजण्याचा प्रकार सांगतात.

## कालमापन.

प्राणादि[2]: कथितो मूर्तस्त्रुट्याद्योऽमूर्त संज्ञकः ॥
षड्भिः प्राणैर्विनाडीस्यात्तत्षष्ट्या नाडिका स्मृता ॥ १५ ॥

---

१ कालयति नाशयतीति कालः

२ स्वस्थसुखासीनस्य श्वासोच्छ्वासांतर्वर्ती कालः प्राणसंज्ञकः

नाडिषष्ट्या तु नाक्षत्रमहोरात्रं प्रकीर्तितम् ॥
तत्त्रिंशता भवेन्मासः सावनोऽर्कोदयैस्तथा ॥ १६ ॥
ऐंदवस्तिथिभिस्तद्वत्संक्रात्या सौर उच्यते ॥
मासैर्द्वादशभिर्वर्षं दिव्यं तदह उच्यते ॥ १७ ॥ सू. सि.
योऽक्ष्णोर्निमेषस्य खरामभागः स तत्परस्तच्छतभाग उक्ता ।
त्रुटिर्निमेषैर्धृतिभिश्च काष्ठा तत्त्रिंशता सद्गणकैः कलोक्ता ॥ १८ ॥
त्रिंशत्कलार्क्षी घटिका क्षणः स्यान्नाडीद्वयं तैः खगुणैर्दिनं च ॥
गुर्वक्षरैः खेंदुमितैरसुस्तैः षड्भिः पलं तैर्घटिका खषड्भिः ॥ १९ ॥
स्याद्वा घटीषष्ठिरहः खरामैर्मासो दिनैस्तैर्द्विकुभिश्चवर्षम् ॥
क्षेत्रे समाद्येत्त समा विभागाः स्युश्चक्रराश्यंशकलाविलिप्ताः ॥ २० ॥
गणिताध्याय, पृ. ७.

### कोष्टक पहिलें.

( ६० प्रतिविपलें = १ विपल किंवा एक गुरु अक्षर उच्चारण्यास लागणारा काल.

१० विपलें किंवा }
१० गुरु अक्षरें उच्चारण्यास लागणारा काल } = १ असु किंवा प्राण

६ असु किंवा प्राण किंवा ६० विपलें } = १ पल किंवा विनाडी

६० पलें ( विनाडी ) = १ घटिका ( नाडी )
६० घटिका = १ दिवस.
३० दिवस = १ महिना.
१२ महिने = १ वर्ष. ( संवत्सर ).

### कोष्टक दुसरें.

१०० त्रुटि = १ तत्पर.
३० तत्पर = १ निमेष [ पापणी हलण्यास लागणारा काल ].
१८ निमेष = १ काष्ठा.
३० काष्ठा = १ कला.
३० कला = १ घटिका.
२ घटिका = १ क्षण ( मुहूर्त ).
( ७ १/२ ( घटिका ) = १ प्रहर. )

३० क्षण ( मुहूर्त ) }
अ०
६० घटिका अ० }
८ प्रहर } = १ दिवस.

१५ दिवस = १ पक्ष ( पंध्रवडा )
२ पक्ष = १ मास.
२ मास = १ ऋतु.
३ ऋतु = १ अयन.
२ अयनें = १ वर्ष.

---

१ रवेश्चक्रभोगोऽर्कवर्षं प्रदिष्टं द्युरात्रं च देवासुराणां तदेव ।
रवींद्वोर्युतैः संयुतिर्यावदन्या विधोर्मास एतच्च पित्र्यं द्युरात्रम् । सि. शि.

**कोष्टक तिसरें ( कालमान ).**

| | | |
|---|---|---|
| २ $\frac{1}{2}$ विपळें | | = १ सेकंद. |
| ४० सेकंद | | = १ पळ. |
| २ $\frac{1}{2}$ पळें किंवा ६० सेकंद | | = १ मिनिट. |
| २४ मिनिटें किंवा ६० पळें | | = १ घटिका. |
| ६० मिनिटें किंवा २ $\frac{1}{2}$ घटिका | | = १ तास. |
| ३ तास | | = १ प्रहर. |
| ८ प्रहर किंवा २४ तास | | = १ दिवस. |

सुरासुराणामन्योन्यमहोरात्रं विपर्ययात्
तत्षष्टिः षड्गुणादिव्यं वर्षमासुरमेव च ॥ २१ ॥
तद्द्वादशसहस्राणि चातुर्युगमुदाहृतम्
सूर्याब्दसंख्ययाद्वित्रिसागरैरयुताहतैः ॥ २२ ॥
संध्यासंध्यांशसहितं विज्ञेयं तच्चतुर्युगम्
कृतादीनां व्यवस्थेयं धर्मपादव्यवस्थया ॥ २३ ॥
षष्टिः षष्ठ्या च गुणिता पुनः षष्ठ्या च निघ्निता
वस्वंगाब्धियमैर्निघ्नं क्रमाद्युगचतुष्टयम् ॥ २४ ॥
युगस्य दशमो भागश्चतुस्त्रिद्व्येकसंगुणः
क्रमात्कृतयुगादीनां षष्ठोऽशः संधिगः स्मृतः ॥ २५ ॥
युगानां सप्ततिः सैका मन्वन्तरमिहोच्यते
कृताब्दसंख्या तस्यांते संधिः प्रोक्तो जलप्लवः ॥ २६ ॥
ससंधयस्ते मनवः कल्पे ज्ञेयाश्चतुर्दश
कृतप्रमाणः कल्पादौ संधिः पंचदशः स्मृतः ॥ २७ ॥
इत्थं युगसहस्रेण भूतसंहारकारकः ।
कल्पो ब्राह्ममहः प्रोक्तं शर्वरी तस्य तावती ॥ २८ ॥
परमायुः शतं तस्य तयाऽहोरात्रसंख्यया ॥ सू. सि.

**अयनांपासून पुढील कालमापन कोष्टक चवथें.**

| | |
|---|---|
| उत्तरायण | = देवांचा दिवस व राक्षसांची रात्र. |
| दक्षिणायन | = राक्षसांचा दिवस व देवांची रात्र. |
| २ अयनें किंवा १२ मास | = १ वर्ष ( भौम = पृथ्वीवरील ). |
| १ वर्ष ( भौम ) | = १ देवासुरांची अहोरात्र |
| ६० वर्षें | = १ संवत्सरचक्र. |

६ संवत्सरचक्रें किंवा ३६० भौम वर्षें किंवा दिव्य अहोरात्र (दिवस) = १ दिव्य वर्ष.

१२०० दिव्य वर्षें = १ कलियुग.
२४०० दिव्यवर्षें = १ द्वापरयुग.
३६०० दिव्य वर्षें = १ त्रेतायुग.
४८०० दिव्य वर्षें = १ कृतयुग.

१२००० दिव्यवर्षें किंवा ४३२०००० मानवीवर्षें = १ चातुर्युग (कृत, त्रेता, द्वापार, कलि).

१ चातुर्युग = १ चौकडी = १ महायुग = १० अवतार.
७१ महायुगें = १ मन्वंतर = १४ इंद्र.
१४ मन्वंतरें किंवा १००० महायुगें = १ कल्प किंवा ब्रह्मदेवाचा १ दिवस (फक्त रात्र निराळी तितकीच.)
२ कल्प = ब्रह्मदेवाची अहोरात्र.
७२००० कल्प = ब्रह्मदेवाचें आयुष्य.

सू सि.

१००० ब्रह्मदेव = १ विष्णूची घटिका.
१००० विष्णु घटि = १ शिवनिमिष.
१०००शिवनिमिष १ = महामाया निमिष.

(ज्योतिःप्रकाश).

| | | आरंभसंधि. | | कृतयुग. | | अंत्यसंधि. |
|---|---|---|---|---|---|---|
| कृतयुग १७२८००० भौमवर्षें | = | १४४००० | + | १४४०००० | + | १४४००० |
| त्रेतायुग १२९६००० ,, | = | १०८००० | + | १०८०००० | + | १०८००० |
| द्वापारयुग ८६४००० ,, | = | ७२००० | + | ७२०००० | + | ७२००० |
| कलियुग ४३२००० ,, | = | ३६००० | + | ३६०००० | + | ३६००० |

१ चौकडी = ४३२०००० = १ महायुग.

७१ चौकड्या किंवा महायुगें किंवा ३०६७२०००० भौमवर्षें = मन्वंतर.

१७२८००० भौमवर्षें = १ मन्वंतरसंधि = जलप्रलय.

१४ मनु × (३०६७२००००) + १५ मन्वंतरसंधि (×१७२८०००)
= ४२९४०८०००० + २५९२००००
= ४३२०००००००० भौमवर्षें
= १ ब्रह्मदेवाचा दिवस किंवा रात्र किंवा कल्प किंवा १००० महायुगें.

२ कल्प
२००० महायुगें = ८६४०००००००० भौमवर्षें = १ ब्रह्मदेवाचें अहोरात्र.

३० ब्रह्मदिनें = २५९२०००००००० भौमवर्षे = १ ब्रह्ममास.

१२ ब्रह्ममास = ३११०४००००००००० भौमवर्षे = १ ब्रह्मवर्ष.

१०० ब्रह्मवर्षे = ३११०४००००००००००० भौमवर्षे = ब्रह्मायुष्य.

यांप्रमाणें ब्रह्मदेवाची आयुष्यमर्यादा आहे. यांविषयीं अन्यप्रमाणः—

शतायुः शतानंद एवं प्रदिष्टस्तदायुर्महाकल्प इत्युक्तमाद्यैः ।
यतो ऽ नादिमानेष कालस्ततो ऽहं न वेद्मयत्र पद्मोद्भवा ये गतास्तान् ॥ २९ ॥

ग. अ. १ पृ. १०.

अर्थ—दोन कल्प किंवा २००० महायुगें गेलीं ह्मणजे ब्रह्मदेवाचें १ अहोरात्र, अशा ३० अहोरात्रांनीं १ मास व त्या १२ मासांनीं १ वर्ष, याप्रमाणें १०० वर्षे ब्रह्मदेवाचें आयुष्य आहे. या कालास महाकल्प असें पूर्वाचार्यांनीं नांव दिलें आहे. परमेश्वराची विभूति असा जो हा काल तो अनादि असल्यामुळें आजपर्यंत ब्रह्मदेव किती होऊन गेले हें सांगतां येत नाहीं.

शतं हि तस्य वर्षाणां परमित्यभिधीयते ॥
पंचाशद्भिस्तथा वर्षैः परार्धमिति कीर्त्यते ॥ ३० ॥

ज्यो. नि. मु. चिं.

अर्थ—ब्रह्मदेवाच्या शंभर वर्षांस पर असें ह्मणतात, आणि पन्नाशीस परार्ध असें ह्मणतात.

प्रथमं तत्परार्धं तु यातं तन्मुनिसत्तम ॥
यस्यांते भून्महाकल्पः पाद्म इत्यभिधीयते ॥ ३१ ॥

द्वितीयस्य परार्धस्य वर्तमानस्य वै द्विज ॥
वाराह इति कल्पोऽयं प्रथमः परिकीर्तितः ॥ ३२ ॥ मु सिं.

आयुषोऽर्धं गतं तस्य शेषकल्पोऽयमादिमः ॥ सू. सि.

अर्थ—ब्रह्मदेवाच्या आयुष्यापैकीं पहिली पन्नाशी उलटून गेली. तिच्या शेवटीं पाद्म नांवाचा मोठा कल्प होऊन गेला. हल्लीं दुसरी पन्नाशी सुरू असून त्यापैकीं वाराह नांवाचा पहिला कल्प चालू आहे.

तथा वर्तमानस्य कस्यायुषोऽर्धं गतं सार्धवर्षाष्टकं केचिदूचुः ।
भवत्वागमः कोऽपिनास्योपयोगो ग्रहा वर्तमानाद्युयातात् प्रसाध्याः ॥ ३३ ॥

यतः सृष्टिरेषां दिनादौ दिनांते लयस्तेषु सत्स्वेव तच्चारचिंता ॥
अतो युज्यते कुर्वते तां पुनर्येऽप्यसत्स्वेषु तेभ्यो महद्भ्यो नमोऽस्तु ॥ ३४ ॥

गणि. अ. १ पृ १०.

अर्थ—ब्रम्हदेवाच्या आयुष्यापैकीं निम्में आयुष्य ह्मणजे ५० वर्षे होऊन गेलीं. कित्येक आचार्यांच्या मतें ५० वर्षांवर आणखी ८ ½ वर्षे झालीं. तें कसें का असेना. ग्रहसाधनास त्याचा उपयोग नाहीं ह्मणून त्यांचा विचार करूं नये व जे करीत असतील त्यांस नमस्कार असो.

कल्पादस्माच्च मनवः षडतीताः ससंधयः ।
वैवस्वतस्य च मनोर्युगानां त्रिघनो गतः ॥ ३५ ॥ सू. सि.

अर्थ—प्रस्तुत ब्रह्मदेवास ५१ वें वर्ष सुरू असून त्याचा पहिला दिवस चालू आहे. त्यापैकीं पहिला कल्प चालू असून त्याचें नांव वाराहकल्प आहे असें वर सांगितलेंच आहे. त्या वाराहकल्पांत आतांपर्यंत ६ ससंधि मनु होऊन जाऊन हल्लीं ७ वा ह्मणजे वैवस्वत मनु सुरू असून त्यापैकीं २७ महायुगें जाऊन हल्लीं २८ वें महायुग चालू आहे.

याताः षण्मनवो युगानि भमितान्यन्यन्युगांघ्रित्रयं
नंदाद्रींदुगुणास्तथा नृपशकस्यांते कलेर्वत्सराः ।
गोद्रींद्वद्रिकृतांकदस्रनगगोचंद्राः शकाद्वान्विताः
सर्वे संकलिताः पितामहदिने स्युर्वर्तमाने गताः ॥ ३६ ॥

ग. अ. १ पृ. ११.

अर्थ—ब्रह्मदेवाच्या ५१ वे वर्षाच्या पहिल्या दिवसाच्या आरंभापासून शालिवाहन शकाच्या आरंभापर्यंत ६ मनु, कृताब्दतुल्य ७ संधि, २७ महायुगें, कृत, त्रेत, द्वापार हीं युगचरणें आणि कलीच्या आरंभापासून ३१७९ वर्षे इतका काल ह्मणजे १९७२९४७१७९ वर्षे चालू ब्रह्मदेवाच्या एका दिवसापैकीं होऊन गेलीं. यांमध्यें शालिवाहन शकाचीं गतवर्षे मिळविलीं असतां चालू शकापर्यंत ब्रह्मदिनांतील गतवर्षे येतात.

स्पष्टीकरण. मन्वंतर.

६ मनु = १८४०३२०००० [= ३०६७२०००० × ६]
७ मनु संधि = १२०९६००० [= १७२८००० (१ मनु संधि) × ७]

२७ महायुगें = ११६६४०००० [ = ४३२०००० ( = १ महायुग ) × २७ ]
३ युगचरणें = ३८८८००० [ = १७२८००० ( = कृत ) + १२९६०००
कलीपासून वर्षें = ३१७९ ( = त्रेता ) + ८६४००० ( = द्वापर ) ]

योग = १९७२९४७१७९

इतकीं वर्षें शालिवाहन शकाच्या आरंभापर्यंत होऊन गेलीं.

आतांपर्यंत ६ मनु होऊन गेले असें वर सांगितलें आहे, त्याच्या पुढील नांवें पुढें सांगतों.

स्वायंभुवोमनुरभूत्प्रथमस्ततोऽमी ॥
स्वारोचिपोत्तमजतामसरैवताख्याः ॥
षष्ठस्तुचाक्षुषइति प्रथितः पृथिव्यां ।
वैवस्वतस्तदनु संप्रति सप्तमोऽयम् ॥ ३७ ॥

गणिताध्याय १, पृ. ११.

**अर्थ**—१ स्वायंभुव, २ स्वारोचिष, ३ उत्तमज (औत्तम), ४ तामस, ५ रैवत, ६ चाक्षुष याप्रमाणें ६ मनु होऊन जाऊन हल्लीं सातवा वैवस्वत मनु चालू आहे. प्रत्येक मनूला इंद्रपद ७१ चौकड्या असतें. त्यापैकीं वैवस्वत मनूच्या २७ चौकड्या संपून हल्लीं २८ व्या चौकडीपैकीं कलियुग सुरू आहे. वैवस्वतानंतर सावर्णि नांवाचा मनु होणार आहे. ज्योतिषशास्त्रज्ञांनीं १४ मनूंचीं नांवें सांगितलीं आहेत तीं—

स्वयंभूः स्वरोचिर्मनुश्चोत्तमाख्यस्ततस्तामसो रैवतश्चाक्षुषश्च ।
सवैवस्वतः पंचसावर्णिरेवं रुचिर्भूतिरुक्ता इमे दैवविद्भिः ॥ ३८ ॥

**अर्थ**—वरचीं ७ नांवें व ८ वा सावर्णि, ९ वा दक्षसावर्णि, १० वा ब्रह्मसावर्णि, ११ वा रुद्रसावर्णि, १२ वा धर्मसावर्णि, १३ वा रुचि, १४ वा भूति याप्रमाणें मनूंचीं नांवें आहेत.

मागें दिलेल्या माहितीवरून हें वाचकांच्या ध्यानीं येईल कीं—
१ ब्रह्मदेवाची घटिका = १४४०००००० मानवी वर्षें.
१ ब्रह्मदेवाचें पल = २४००००० मानवी वर्षें.

यावरून हल्लीं ब्रह्मदेवाच्या ५१ व्या वर्षाच्या पहिल्या दिवसाच्या १३ घटिका ४२ पळें होऊन ४३ वें पल सुरू आहे.

## कालमापन मानानि.

सृष्टिरचनेचा जो प्रकार वर सांगितला त्याचा काल मोजण्याचीं ९ मानें आहेत तीं :—

### माननवकम्.

ब्राह्मं दिव्यं तथा पित्र्यं प्राजापत्यं गुरोस्तथा ।
सौरं च सावनं चांद्रमार्क्षं मानानि वै नव ॥ ३९ ॥ * सू० सि०.

अर्थ—१ ब्राह्म — ब्रह्मदेवाच्या आयुर्मर्यादेवरून ( कल्पो ब्राह्ममहः श्लोक २८ ) कालगणना करणें.

२ दिव्य—( देवमान ) देवांच्या कालगणनेच्या मानावरून ( दिव्यं तदह उच्यते. श्लो० १७ ) काल मोजणें.

३ पित्र्य—( पैत्र्य ) एका चांद्रमासानें पितरांचें १ अहोरात्र होतें. याप्रमाणें पुढें मोजणें.

४ प्राजापत्य—( मानव ) मन्वंतरावरून मोजणें.

५ बार्हस्पत—गुरूला १ राशी आक्रमण करण्यास जो काळ लागतो त्यास सांहितिक लोक संवत्सर असें ह्मणतात. त्यावरून मोजणें.

६ सौर—सूर्यास १ राशि आक्रमण करण्यास जो काळ लागतो त्यास १ महिना मानून त्याप्रमाणें पुढें मोजणें.

७ सावन—३० सूर्योदय झाले ह्मणजे १ महिना होतो याप्रमाणें मोजणें.

८ चांद्र—प्रतिपदेपासून अमावास्येपर्यंत १ महिना. याप्रमाणें मोजणें.

९ आर्क्ष—( नाक्षत्र ) चंद्रास १ नक्षत्र चक्र फिरून येण्यास लागणारा काल ह्मणजे १ महिना. याप्रमाणें मोजणें.

### व्यवहारोपयोगी मानचतुष्टय.

चतुर्भिर्व्यवहारोऽत्र सौरचांद्रर्क्षसावनैः ।
बार्हस्पत्येन षष्ट्यब्दं ज्ञेयं नान्यैस्तु नित्यशः ॥ ४० ॥

---

* एवं पृथक् मानवदैवजैवपैत्र्यार्क्षसौरेंदवसावनानि ।
ब्राह्मयंच काले नवमं प्रमाणं ग्रहास्तु साध्या मनुजैः स्वमानात् ॥ गणिता० ९ ॥

अर्थ—वरील ९ मानापैकीं १ सौर, २ चांद्र, ३ नाक्षत्र व ४ सावन या चहूंनींच मनुष्यलोकांत व्यवहार चालतो. बृहस्पतिमानावरून फक्त प्रभवादि ६० संवत्सरें होतात.

## मानोपयोगः

सौरेण द्युनिशोर्मानं षडशीतिमुखानि च ।
अयनं विषुवं चैव संक्रांतेः पुण्यकालता ॥ ४१ ॥

तिथिःकरणमुद्वाहः क्षौरः सर्वक्रियास्तथा ।
व्रतोपवासयात्राणां क्रिया चांद्रेण गृह्यते ॥ ४२ ॥

भचक्रभ्रमणान्नित्यं नाक्षत्रं दिनमुच्यते ।
नक्षत्रनाम्ना मासास्तु ज्ञेयाः पर्वांतयोगतः ॥ ४३ ॥

* उदयादुदयं भानोः सावनं तत्प्रकीर्तितं ।
सवनानि स्युरेतेन यज्ञकालविधिस्तुतैः ॥ ४४ ॥

सूतकादि परिच्छेदो दिनमासाब्दपास्तथा ।
मध्यमा ग्रहभुक्तिस्तु सावनेन च गृह्यते ॥ ४५ ॥

सुरासुराणामन्योन्यमहोरात्रं विपर्ययात् ॥
यत्प्रोक्तं तद्भवेद्दिव्यं भानोर्भगणपूरणात् ॥ ४६ ॥

मन्वंतरव्यवस्था च प्राजापत्यमुदाहृतम् ॥
न तत्र द्युनिशोर्भेदो ब्राह्मं कल्पं प्रकीर्तितम् ॥ ४७ ॥ सू. सि.

---

* इनोदयद्वयांतरं तदर्कसावनंदिनं । तदेव मेदिनीदिनं भवासरस्तु भभ्रमः ॥ १ ॥
वर्षायनर्तुयुगपूर्वकमत्र सौरान्मासास्तथाच्च तिथयस्तुहिनांशुमानात् ॥
यत्कृच्छ्रसूतकचिकित्सितवासराद्यं तत्सावनाच्च घटिकादिकमार्क्षमानात् ॥ २ ॥ सि. शि.
सत्राण्युपास्यान्यथ सावनेन लौक्यंच यत्स्याद्व्यवहारकर्म
नक्षत्रसत्राण्ययनानि चेंदोर्मासेन कुर्याद्भगणात्मकेन ॥ ३ ॥ हेमाद्रौ विष्णुधर्मोत्तरे
ग्रहाणां निखिलश्चारो गृह्यते सौरमानतः ॥ वृद्धेर्विधानं स्त्रींगर्भं सावनेनैव गृह्यते ॥ ४ ॥
प्रवर्षणं मेघगर्भं नाक्षत्रेण प्रगृह्यते । यात्रोद्वाहव्रतक्षौरतिथिवर्षेशनिर्णयः ॥ ५ ॥
पर्ववास्तूपवासादि कृत्स्नं चांद्रेण गृह्यते । गृह्यते गुरुमानेन प्रभवाद्यब्दलक्षणम् ॥ ६ ॥
ज्योतिर्निबंधे नारदः

तात्पर्य — १ सौरमानावरून ( सूर्यादिग्रहांचा संचार प्रकार, ) दिनमान व रात्रिमान, षडशीति पुण्यकाल, अयनें ( कर्क व मकर ), विषुव ( मेष व तूळ ) व इतर संक्रांति याचे पुण्यकाल हे समजतात.

२ चांद्रमानावरून तिथि, करण, विवाह, वास्तु वगैरे कृत्यें, व्रतें, उपोषणें, यात्रा यांचे काल ठरतात व मासाचा निर्णयही ठरतो.

३ नाक्षत्रमानावरून नाक्षत्र दिवस, नाक्षत्र माससंज्ञा इत्यादि होतात. मेघाची गर्भधारणा व वृष्टिप्रमाणही याच मानानें घेतात.

४ एका सूर्योदयापासून दुसऱ्या सूर्योदयापर्यंतच्या कालास सावन (अर्कसावन) दिवस ह्मणतात. त्यावरूनच होमकाल; अशौच निर्णय; दिवस, मास व वर्ष यांचे अधिपति; मध्यम ग्रहभोग; व्याज घेणें; स्त्रीच्या गर्भाची मासगणना इत्यादिकांचा निर्णय होतो.

५ प्राजापत्य मानावरून प्रस्तुत कोणता मनु आहे हें ठरतें. या मानानें गणना करण्यामध्यें दिवसरात्र हे भेद धरले जात नाहींत. आणि यावरूनच ब्रह्मदेवाचा दिवस ठरतो.

## युगस्वरूप.

७१ चौकड्या किंवा महायुगें गेलीं ह्मणजे एक मन्वंतर होतें असें मागें सांगितलें आहे. कृतयुग, त्रेतायुग, द्वापारयुग व कलियुग या चार युगांस मिळून चौकडी ह्मणतात. या युगांची वर्षसंख्या मागें दिलीच आहे. आता या युगांचें

---

१ दिनप्रमाणं त्वयनादिसर्वं संक्रांतिकालस्य त्रिनिर्णयश्च ।
कृतादिमानं निखिलग्रहाणां यत्कर्म सौरेण विगृह्यमेतत् ॥

२ षडशीति ह्मणजे काय हे पुढें संक्रांतिप्रकरणांत येईल.

३ उद्वाहयज्ञोपनयप्रतिष्ठातिथिव्रतक्षौरमहोत्सवाद्यम् ।
सर्वक्रिया वास्तुगृहप्रवेशपूर्वं च चांद्रेण विगृह्यमेतत् ॥

४ जीमूतगर्भं निखिलं तु सम्यक्तद्भस्य मानेन निरीक्षितव्यम् ।
नृगर्भवृद्धिः प्रसवस्यकालो यत्सूतकाद्यं खलु सावनेन ॥

५ हें प्रकरण आमच्याजवळ काशीमध्यें छापलेली कल्पलतेची प्रत आहे त्यावरून आह्मीं देत आहों. मूळ संस्कृत असून फार सोपें-वाक्यरूपानें आहे. ग्रंथविस्तारभयास्तव आह्मी संस्कृत मूळ न देतां मराठी भाषेंत त्याचें तात्पर्य देत आहों. मतांतरें टीपेंत साधार दिलीं आहेत.

स्वरूप सांगावयाचें आहे ह्मणजे प्रत्येक युगांत कोय कोय गोष्टी घडतात त्या सांगणेचें आहे. तें खालीं लिहिलेप्रमाणें.

कृतयुगः[1]—या युगास माघ शुं० १५ रविवारीं आरंभ झाला. यांत मत्स्य, कूर्म, वराह आणि नारसिंह असे चार अवतार झाले. मत्स्य.वतार[2]—प्रभवसंवत्सर, दक्षिणायन, कार्तिक कृ० ३ सोमवार, मृगनक्षत्र, शोभनयोग, दिवसा घ. २० प. ९ यावेळीं झाला. कूर्मा[3]वतार—शुक्लसंवत्सर, दक्षिणायन, श्रावण शुं० १३, गुरुवार, मूळनक्षत्र, विष्कंभ योग, दिवा घ. १० प. ७ यावेळीं झाला. वराह[4]अवतार—आंगिरससंवत्सर, उत्तरायण, ज्येष्ठ शुं० १२, भानुवार, स्वातीनक्षत्र, वरीयान् योग, रात्रीं घ. १० प. २ यावेळीं झाला. नारसिंह[5] अवतार—आंगिरस संवत्सर, उत्तरायण, वैशाख शुं० १४, शनिवार, स्वाती नक्षत्र, वरीयान् योग, सूर्यास्तानंतर घ. ० प. ५ या वेळीं झाला.

परमेश्वरानें मत्स्यावतार धारण करून बुडालेले वेद वर काढले.

कूर्मावतारांत पृथ्वी पाठीवर धारण करून तिचें रक्षण केलें.

वराहावतारांत हिरण्याक्षाचा वध करून पृथ्वी आपल्या दाढेवर धरून तिचें रक्षण केलें.

नारसिंह अवतार धारण करून हिरण्यकशिपु दैत्यास मारून प्रल्हादाचें रक्षण केलें.

या युगांत मनुष्याचें आयुष्य १००००० वर्षें असून त्याची उंची २८ हात होती. अस्थिगत प्राण असे. एक मुलगा व एक मुलगी याप्रमाणें मुलें होत व तीं पूर्णायुषी असत. गाई २ घागरी दूध देत. कामधेनु व कल्पवृक्ष इष्टपदार्थ देत. धर्मास चार पाय असत ह्मणजे तो पूर्ण किंवा २० विस्वे असे. पापाचा लेशही नसे. सर्व बायका पतिव्रता असत. सर्वत्र सोन्याचीं भांडीं व रत्नाचे दिवे असत. ब्राह्मण

---

१ कृतयुगादिः कार्तिकशुक्ल ९.

२ मत्स्यजयंती चैत्र शुक्ल ३ अपराण्हीं.

३ वैशाख पूर्णिमायां सायं कूर्मोत्पत्तिः—धर्मसिंधु—अर्थ-वैशाख शु० १५ सायंकाळीं कूर्मावतार.

४ भाद्रपद शुक्ल तृतीयायामपराण्हे वराहोत्पत्तिः—ध. सिं. अर्थ—भाद्रपद शुद्ध ३ अपराण्हीं वराहजयंती.

५ वैशाख शुक्ल चतुर्दश्यां सायं नारसिंहावतारः—ध. सिं. अर्थ—नृसिंहजयंती वैशाख शु० १४ सायंकाळीं.

सूर्यासारखें असून त्यांचे शाप तांबडतोब लागू होत. तें सर्वदा तपश्चर्येत निमग्न असत. सर्व लोक श्रुति, स्मृति, पुराणें यांत सांगितलेला धर्म मानीत. दाता याचकांस सामोरा जाऊन त्यास दान देत असे व त्याचे दारांतही उभा राही. या वेळेंच सर्व राजे दैत्यकुलांत उत्पन्न झालेले असत.

त्रेतायुग[1]:—याचा आरंभ भाद्रपद कृ० १४ गुरुवारीं, पुष्य नक्षत्रीं झाला. यांत वामन, परशुराम व राम असे ३ अवतार झाले.

वामनावतार[2]:—धातृ संवत्सर, भाद्रपद शु० १२ बुधवार, दक्षिणायन, श्रवण नक्षत्र, वरीयान् योग, दिवा घ. १५ प. १० या वेळीं झाला व यानें बळी राजास पादाक्रांत केलें.

परशुरामावतार[3]:—पार्थिव संवत्सर, उत्तरायण, वैशाख शु० ३, इंदुवार, रोहिणी नक्षत्र, सुकर्मा योग, रात्रीं घ० ९ पळें १ या वेळीं झाला व त्यानें २१ वेळ पृथ्वी निःक्षत्रिय केली.

रामावतार[4]:—तारण संवत्सर, उत्तरायण, चैत्र शु० ९, शुक्रवार, पुनर्वसु नक्षत्र, वरीयान् योग, दिवा घ० १५ प० ९ या वेळीं झाला व त्यानें रावण कुंभकर्ण इत्यादिकांचें निर्दलन केलें.

या युगांत मनुष्याचें आयुष्य १०००० वर्षें असून मांसगत प्राण होते. मनुष्याची उंची १४ हात असून २ मुलगे व २ मुली याप्रमाणें ४ अपत्यें होत. धर्मास ३ पाय ह्मणजे १५ विस्वे पुण्य व ५ विस्वे पाप याप्रमाणें प्रवृत्ति होती. गाई १ घागर दूध देत. तपोनिष्ठ ब्राह्मण व पतिव्रता स्त्रिया यांची संख्या थोडी कमी झाली. ब्राह्मणांचे शाप १० दिवसांनीं सफल होत. सर्वत्र रुप्याचीं भांडीं व सोन्याचीं नाणीं झालीं. दाते याचकांस सन्मानपूर्वक बोलावून दान देत असत. या युगांत सूर्यवंशोद्भव क्षत्रिय राजे झाले.

---

१ वैशाख शुक्ल ३ त्रेतायुगादिः

२ भाद्रपद शुक्ल द्वादश्यां मध्यान्हे वामनप्रादुर्भावः ध. सिं. भाद्रपद शु. १२ मध्यान्ह कालीं वामनजयंती.

३ वैशाख शुक्ल तृतीयायां मध्यान्हे परशुरामोद्भवः प्रदोषे इति बहवः ध० सिं० वै० शु० ३ मध्यान्हीं परशुराम जयंती. पुष्कळांच्या मतें सायंकाळीं.

४ चैत्र शुक्ल नवम्यां मध्यान्हे दाशरथीरामव्यक्तिः ध० सिं०.

द्वापरयुग[1]—यांस वैशाख शु० ३ बुधवार रोजीं आरंभ झाला. यांत फक्त कृष्णावतार[2] झाला. तो दुर्मति संवत्सर, दक्षिणायन, श्रावण कृ० ८, बुधवार, रोहिणी नक्षत्र, अतिगंडयोग, रात्रौ घ. १९ प. ३० या समयीं झाला व त्यानें कंस, चाणूर, शिशुपाल, दंतवक्त्र इत्यादिकांचें मर्दन केलें.

या युगांत मनुष्याचें आयुष्य १००० वर्षें असून चर्मगत प्राण होते. मनुष्याची उंची ७ हात. अपत्यें ८, चार मुलगे व चार मुली. धर्मास २ पाय ह्मणजे पुण्य १० विस्वे व पाप १० विस्वे. तपोनिष्ठ ब्राह्मण क्वचित्. पतिव्रता स्त्रियांची संख्या निम्यावर आली. कृतयुगांत १ पट दाणे पेरले ह्मणजे २१ पट धान्य निपजे व त्रेतायुगांत १४ पट निपजे. द्वापरांत पृथ्वीवर धान्य पुष्कळ होई; पण वरचें प्रमाण राहिलें नाहीं. नाणें रुप्याचें झालें व दिवा तुपाचा झाला. लोक कपटी निघूं लागले. गाईचें दूध पांच शेरांवर आलें. या युगांत सोमवंशांतील क्षत्रिय राजे झाले.

कलियुग[3]:—या युगास कार्तिक शु० ९ सोमवारीं आरंभ झाला. यांत २ अवतार—१ बौद्धावतार[4] व २ कल्कि[5] अवतार. कलियुगामध्यें मनुष्याची उंची ३ $\frac{1}{2}$ हात. आयुष्यप्रमाण १०० वर्षें. अन्नमय प्राण. भागीरथीतीर्थ. विश्वेश्वर देव. काशी हें क्षेत्र. धर्मास कंचित् १ पाय ह्मणजे पुण्य ५ विस्वे व पाप १९ विस्वे. शाप बिलकुल लागणार नाहीं. नोकरी केल्यानें पैसा मिळेल. ज्याचा विश्वास असेल तो ईश्वरचिंतन करील. मातीचीं व लोखंडाचीं भांडीं. देवघेव व्यवहार तांब्याच्या धातूनें. पेरलेलें बीं खाऊन टाकणारी जमीन. ब्राह्मण जिव्हालंपट ह्मणजे पोटार्थी किंवा त्रोंडपुजे. लौकिक धर्म ह्मणजे लोक ठरवितील तो धर्म.

---

१ माघ कृष्ण ३० द्वापरयुगादि.

२ श्रावणकृष्णाष्टम्यां निशीथे श्रीकृष्णाविर्भावः—ध. सिं.

३ भाद्रपद कृष्ण १३ कलियुगादिः.

४ आश्विन शुक्ल दशम्यां सायं बुद्धोऽभूत्—ध. सिं. अर्थ—आश्विन शु० १० सायंकाळीं बुद्धजयंती.

५ श्रावण शुक्ल षष्ठयां सायं कल्किर्जातः ध. सिं. अर्थ—श्रावण शु० ६ सायंकाळीं कल्किजयंती. अत्र मत्स्यकूर्मवराहबुद्धकल्किनामाषाढादि मासांतराणि एकादश्यादि तिथ्यंतराणि प्रातरादि कालांतराणि वचनांतरानुसारेणोक्तानि कल्पभेदेन व्यवस्थापनीयानि. अर्थ · जयंतीकालामध्यें मतांतरें आहेत तीं कल्पभेदामुळें आहेत.

दृष्टिमांद्य. लोक खोटें बोलणारे. पितापुत्रामध्यें द्वेषभाव. बायका फार त्या व्यभिचारिणी. युगाच्या शेवटीं आंगठ्याच्या पेऱ्याएवढी मनुष्याची आकृति होईल. कलियुगांत धर्मराज, विक्रमादित्य वगैरे शककर्ते राजे व म्लेंछराजे, व पृथ्वीराज, शिवछत्रपति वगैरे क्षत्रिय राजे आणि श्रीमती व्हिक्टोरियाप्रभृति पाश्चात्य राजे झाले. कलियुगांत गाई २ शेर दूध देतील.

कलियुगे षट् शककर्तारः

युधिष्ठिरो विक्रमशालिवाहनौ ततो नृपःस्याद्विजयाभिनन्दनः ।
ततस्तु नागार्जुनभूपतिः कलौ कल्की षडेते शककारकाः स्मृताः ॥ ४८ ॥
प्रथम इंद्रप्रस्थे युधिष्ठिरः । तस्यशकः ३०४४ वर्षाणि ।
द्वितीय उज्जयिन्यां विक्रमः । तस्यशकः १३५ वर्षाणि ।
तृतीयः प्रतिष्ठाननगरे शालिवाहनः । तस्य शकः १८००० वर्षाणि ।
चतुर्थो वैतरिण्यां सिंधुसंगमे विजयाभिनन्दनः । तस्य शकः १०००० वर्षाणि ।
पंचमो गौडदेशे धारातीर्थे नागार्जुनः । तस्य शकः ४००००० वर्षाणि ।
षष्ठः करवीरपत्तने कर्नाटके कल्क्यवतारः । तस्य शकः ८२१ वर्षाणि ।
एवं षट् शककर्तारः । ततः कलियुगं समाप्तम् ।

अर्थ—कलियुगांत ६ शककर्ते. — १ हास्तिनापुरांत युधिष्ठिर. त्याचा शक ३०४४ वर्षे. २ उज्जयिनींत विक्रम. त्याचा शक १३५ वर्षे. ३ पैठणांत शालिवाहन. त्याचा शक १८००० वर्षे. ४ वैतरिणीचे ठिकाणीं सिंधुसंगमीं विजयाभिनंदन. त्याचा शक १०००० वर्षे. ५ गौडदेशांत धारातीर्थी नागार्जुन. त्याचा शक ४००००० वर्षे. ६ कर्नाटक देशांत करवीरपट्टणीं कल्की अवतार. त्यांचा शक ८२१ वर्षे. याप्रमाणें ६ शककर्ते होऊन नंतर कलियुग समाप्त होणार.

## संवत्सरप्रकरणम्.

### वत्सरभेदाः

संवत्सरः पंचधा । चांद्रः सौरः सावनो नाक्षत्रो बार्हस्पत्य इति । शुक्लप्रतिपदादि दर्शांतैश्चैत्रादिसंज्ञैर्द्वादशभिर्मासैश्चतुःपंचाशदधिकशतत्रयदिनैः सति

---

१ आसीद्धर्मस्तु वेदांबुधिवियदनलै ३०४४ र्विक्रमोर्थाग्निभूमि इत्यादि.

मलमासे त्रयोदशभिर्मासैश्चांद्रो वत्सरः। मेषादिषु द्वादशराशिषु रविभुक्तेषु पंचषष्ठ्यधिकशतत्रयदिनैः सौरो वत्सरः । षष्ठ्युत्तरशतत्रयदिनैः सावनः। द्वादशभिर्नाक्षत्रमासैर्नाक्षत्रो वत्सरः सच चतुर्विंशत्यधिकशतत्रयदिनैः स्यात्। मेषाद्यन्यतमराशौ बृहस्पतिना भुक्ते बार्हस्पत्यः सच एकषष्ठ्यधिक शतत्रयदिनैः स्यात्. । ( ध. सिं. )

अर्थ—संवत्सराचे चांद्र, सौर, सावन, नाक्षत्र, बार्हस्पत्य असे पांच प्रकार आहेत.

१ चांद्रसंवत्सर—शुक्लप्रतिपदेपासून अमावास्येपर्यंत एक महिना याप्रमाणें चैत्रादि बारा महिन्यांनीं ह्मणजे ३५४ दिवसांनीं होणारें वर्ष. यांत अधिकमास आला असतां १३ महिने ह्मणजे ३८४ दिवस होतात.

२ सौरसंवत्सर—मेष आदिकरून १२ राशी फिरून येण्यास सूर्यास लागणारा काल. हा पूर्वींच्या मताप्रमाणें ३६५ दि० १५ घ० ३१ पलांचा आहे, व अधुनिक विद्वानांच्या मतें वेधावरून ३६५ दि० १५ घ० २३ पलांचा मानला जातो.

३ सावनवर्ष—हें वर्ष ३६० दिवसांचें आहे.

४ नाक्षत्रवर्ष—बारा नाक्षत्र महिन्यांनीं एक नाक्षत्रवर्ष होतें. त्याचे दिवस ३२४ होतात. ( मतांतरानें ३२८ दिवस मानले आहेत. )

५ बार्हस्पत्यवर्ष—गुरूला मेषादि एक राशि क्रमण करण्यास लागणाऱ्या कालास बार्हस्पत्यवर्ष ह्मणतात. त्याचे ३६१ दिवस होतात. बार्हस्पत्यमानानें गंगेच्या उत्तरेस वर्षप्रतिपदादिक करण्याचा सांप्रदाय आहे.

निरनिराळ्या लोकांच्या सहवासानें अलीकडे इसवी, अरबी, फसली, हिजरी, पार्शी, यहुदी आणि राजशक ( श्रीशिवछत्रपति ) असे वर्षांचे भेद झाले आहेत. पूर्वींपैकीं नर्मदेच्या उत्तरेस विक्रमशक मात्र हल्लीं चालू आहे. त्यास संवत् ह्मणतात, व त्याचा चांद्रवर्षांतच अंतर्भाव होतो.

## चांद्रस्य मुख्यत्वम्.

स्मरेत्सर्वत्र कर्मादौ चांद्रं सवत्सरं सदा ॥
नान्यं यस्माद्वत्सरादौ प्रवृत्तिस्तस्य कीर्तिता ॥ १ ॥
व्यावहारिकसंज्ञोऽयं कालः स्मृत्यादिकर्मसु ॥
योज्यः सर्वत्र तत्रापि ज्ञेयो वा नर्मदोत्तरे ॥ २ ॥

अर्थ—वर संवत्सराचे पोटभेद सांगितले त्यांत प्रथमच चांद्रसंवत्सराचें नांव आहे. ह्मणून सर्व कर्मांचे प्रारंभीं त्याचेंच संकीर्तन करावें. दररोजचा व्यवहारही याच कालमानावरून होतो. ह्मणून सर्व ठिकाणीं याचेंच स्मरण करावें. नर्मदेच्या उत्तरेस मात्र क्वचित् बार्हस्पत्यमानही उपयोगांत आणितात.

## प्रमाणान्तराणि.

चांद्रश्चैत्रमुखोथसौर उदितो मेषादिकः सावनो ।
व्योमांगत्रिदिनः कुषट्त्रिदिवसः संवत्सरो गौरवः ॥
चांद्रोब्दे विगुरुस्फुटेन मलिनो मध्यात्तुमानादयं ।
व्याचार्यो यदि सोधिको गुरुसवं यागं प्रतिष्ठां हरेत् ॥ ३ ॥ मु. का.

अर्थ—चांद्रसंवत्सराचा चैत्र शुक्ल प्रतिपदेपासून प्रारंभ होतो. सौर संवत्सराचा मेष संक्रांत झाल्यापासून प्रारंभ होतो. मीन संक्रांत झाल्यापासून सौर संवत्सरास प्रारंभ होतो असेंही मतांतर आहे. सावन संवत्सर पाहिजे त्या दिवसापासून तीनशेंसाठ दिवसांनीं होतो. बार्हस्पत्य संवत्सर तीनशेंएकसष्ट दिवसांनीं होतो. ज्या चांद्र-संवत्सरांत स्पष्ट गतीनें बृहस्पतीचें दुसरे राशीस गमन होत नाहीं त्यास मलिन संवत्सर असें समजावें. तसेंच ज्या संवत्सरांत मध्यम गतीनें बृहस्पतीचें दुसरे राशीस गमन होत नाहीं तो अधिक संवत्सर जाणावा. त्या अधिक संवत्सरांत बृहस्पती ह्या नांवाचा यज्ञ आणि देवांची स्थापना करूं नये.

बृहस्पतेर्मध्यमराशिभोगात्संवत्सरं सांहितिका वदंति ।
ज्ञेयं विमिश्रं तु मनुष्यमानं मानैश्चतुर्भिर्व्यवहारसिद्धिः ॥ ४ ॥

अर्थ—मध्यमगतीनें बृहस्पतीचा एक राशिभोग संपूर्ण झाला ह्मणंजे त्या कालास सांहितिक बार्हस्पत संवत्सर असें ह्मणतात. मनुष्यांचें कालमान तर मिश्रित आहे. कारण त्यांचा व्यवहार सौर, चांद्र, सावन् व नाक्षत्र ह्या चार मानानींच चालतो.

राशिद्वयप्रवेशः स्याद्गुरोर्यत्रेंदुवत्सरे ॥
क्षयाब्दस्तत्र शुद्धं च शुभं कर्म न कारयेत् ॥ ५ ॥ उ. सौ.

अर्थ—ज्या चांद्रसंवत्सरांत बृहस्पतीचा दोन राशींत प्रवेश होतो तो क्षयसंवत्सर जाणावा. त्या संवत्सरांत शुद्धिकारक कर्म आणि मंगल कर्म करूं नये.

गोजांत्यकुंभेतरभेतिचारगो नो पूर्वराशिं गुरुरेति वक्रितः ॥
तदावलुप्ताब्द इहातिनिंदितः शुभेषु रेवासुरनिम्नगांतरे ॥ ६ ॥ मु. चिं.

**अर्थ**—कुंभ, मीन, मेष आणि वृषभ ह्या चार राशींशिवाय इतर आठ राशींत अतिशय गतीनें दुसरे राशीस गेलेला बृहस्पति वक्री झाला असून जर पूर्व राशीस आला नाहीं तर त्या कालीं लुप्त संवत्सर होतो. तो नर्मदा आणि भागीरथी ह्यांच्या मध्यभागीं मंगल कार्याविषयीं अति निंदित आहे.

यदातिचारं सुरराजमंत्री करोति गोवृश्चिकमीनसंस्थः ॥
नायात्यसौ यद्यपि पूर्वराशिं शुभाय पाणिग्रहणं वसिष्ठः ॥ ७ ॥ लल्ल.

**अर्थ**—ज्या कालीं वृषभ, वृश्चिक आणि मीन ह्या तीन राशींवर असणारा बृहस्पति, अतिशय गतीनें पुढचे राशीवर जाईल व वक्री होऊन पूर्वराशीस जरी येणार नाहीं तरी त्या काळांत विवाह करणें कल्याणकारक आहे असें वसिष्ठ ह्मणतो.

मासान् दशैकादश वा प्रभुज्य राशेर्यदा राशिमुपैति जीवः ॥
भुंक्ते न पूर्वं च पुनस्तथापि न लुप्तसंवत्सरमाहुरार्याः ॥ ८ ॥
यांत विशेष पीयूषधारेंत लल्ल.

**अर्थ**—बृहस्पती दहा किंवा अकरा मासपर्यंत एका राशीवर राहून दुसरे राशीवर गेला आणि जरी पुनः पूर्वराशीवर आला नाहीं तरी लुप्तसंवत्सर होत नाहीं असें ऋषी ह्मणतात. तेव्हां दहा मासांचे आंत गेलेला बृहस्पति जर पूर्वराशीस न येईल तर वर लिहिलेला लुप्ताब्द होतो असें अर्थसिद्ध होतें.

वक्रातिचारौ धिषणस्य निंद्यौ स्यातां शुभे कर्माणि नर्मदायाः
उदक्प्रदेशे क्षयवत्सरोपि निंद्योधिकाब्दस्त्वथसर्वदेशे ॥ ९ ॥ का. शे.

**अर्थ**—बृहस्पतीचें वक्र, अतिचार आणि क्षयसंवत्सर हे तीन नर्मदेपासून उत्तर देशांत मंगल कार्याविषयीं निषिद्ध आहेत, व अधिक संवत्सर सर्व देशांतच वर्ज्य आहे.

## संवत्सरनामानि.

प्रभवो विभवः शुक्लः प्रमोदोऽथ प्रजापतिः
अंगिराः श्रीमुखो भावो युवा धाता तथैवच ॥ १० ॥
ईश्वरो बहुधान्यश्च प्रमाथी विक्रमो वृषः
चित्रभानुः सुभानुश्च तारणः पार्थिवो व्ययः ॥ ११ ॥
सर्वजित्सर्वधारी च विरोधी विकृतिः खरः
नंदनो विजयश्चैव जयो मन्मथदुर्मुखौ ॥ १२ ॥

हेमलंबी विलंबी च विकारी शार्वरी प्लवः
शुभकृच्छोभनः क्रोधी विश्वावसुपराभवौ ॥ १३ ॥
प्लवंगः कीलकः सौम्यः साधारण विरोधकृत्
परिधावी प्रमादी च आनंदो राक्षसानलौ ॥ १४ ॥
पिंगलः कालयुक्तश्च सिद्धार्थी रौद्रदुर्मती
दुंदुभी रुधिरोद्गारी रक्ताक्षी क्रोधनः क्षयः ॥ १५ ॥

**अर्थ**—संवत्सरांचीं नावें--१ प्रभव, २ विभव, ३ शुक्ल, ४ प्रमोद, ५ प्रजा पति, ६ अंगिरा, ७ श्रीमुख, ८ भाव, ९ युवा, १० धाता, ११ ईश्वर, १२ बहु-धान्य, १३ प्रमाथी, १४ विक्रम, १५ वृष, १६ चित्रभानु, १७ सुभानु, १८ तारण, १९ पार्थिव, २० व्यय, २१ सर्वजित्, २२ सर्वधारी, २३ विरोधी, २४ विकृति, २५ खर, २६ नंदन, २७ विजय, २८ जय, २९ मन्मथ, ३० दुर्मुख, ३१ हेमलंबी, ३२ विलंबी, ३३ विकारी, ३४ शार्वरी, ३५ प्लव, ३६ शुभकृत्, ३७ शोभन, ३८ क्रोधी, ३९ विश्वावसु, ४० पराभव, ४१ प्लवंग, ४२ कीलक, ४३ सौम्य, ४४ साधारण, ४५ विरोधकृत्, ४६ परिधावी, ४७ प्रमादी, ४८ आनंद, ४९ राक्षस, ५० अनल, ५१ पिंगल, ५२ कालयुक्त, ५३ सिद्धार्थी, ५४ रौद्र, ५५ दुर्मति, ५६ दुंदुभि, ५७ रुधिरोद्गारी, ५८ रक्ताक्षी, ५९ क्रोधन, ६० क्षय.

## संवत्सरस्वामिविचारः

युगं भवेद्वत्सरपंचकेन युगानि च द्वादश वर्षषष्ट्या
भवन्ति तेषामधिदेवताश्च क्रमेण वक्ष्यामि मुनिप्रणीताः ॥ १६ ॥
विष्णुर्जीवः शक्रो दहनस्त्वष्टाऽहिर्बुध्न्यः पितरः
विश्वेदेवाश्चंद्रज्वलनौ नासत्यनामानौ च भगः ॥ १७ ॥

**अर्थ**—पांच वर्षांचें एक युग या मानानें साठ संवत्सरांचीं बारा युगें होतात. या बारा युगांचे स्वामी अनुक्रमानें १ विष्णु, २ बृहस्पति, ३ इंद्र, ४ अग्नि, ५ ब्रह्मा, ६ शिव, ७ पितर, ८ विश्वेदेव, ९ चंद्र, १० अग्नि ११ अश्विनीकुमार, १२ सूर्य असे आहेत.

मतांतरम्—आनंदादिर्भवेद्ब्रह्मा भावादिर्विष्णुरेव च ।
जयादिः शंकरः प्रोक्तः सृष्टिपालननाशकाः ॥ १८ ॥

अर्थ—आनंदादि वीस संवत्सरांचा स्वामी ब्रह्मदेव, तो सृष्टिकर्ता; भावादि वीस वत्सरांचा स्वामी विष्णु, तो पालनकर्ता; आणि जयादि वीस संवत्सरांचा स्वामी शंकर, तो संहारकर्ता.

या क्रमांत आनंद संवत्सरापासून आरंभ केला आहे. कित्येक प्रभवसंवत्सरापासूनच आरंभ मानितात. उदाहरणार्थ शीघ्रबोध ग्रंथांत "ब्रह्मविंशतिरत्रैका सृष्टिरत्रप्रजायते" हें फल प्रभवसंवत्सरापासून वीस संवत्सरें जेथें संपतात तेथें लिहिलें आहे. चाळीस संवत्सरांचे शेवटीं "पराभवाख्यो ह्यपरो विष्णोरित्येकविशंतिः" असें लिहिलें आहे व साठ संवत्सरांच्या शेवटीं "रुद्रस्यापि तु विंशतिः" असें लिहिलेलें आहे. या साठ संवत्सरांच्या फलाविषयीं त्या पुस्तकांत "वत्सराः षष्टिराख्याता नामतुल्यफलप्रदाः" याप्रमाणें साठ संवत्सरांचीं नांवें सांगितलीं, तीं आपल्या नांवांप्रमाणें फलें देतात असें लिहिलें आहे.

## युगभेदः

संवत्सरोऽग्निः परिवत्सरोऽर्कः इडाधिपः शीतमयूखमाली ॥
प्रजापतिश्चाप्यनुवत्सरः स्यादिद्वत्सरः शैलसुतापतिश्च ॥ १९ ॥
संवत्सरः प्रथमकः परिवत्सरोऽन्यस्तस्मादिडान्विदितिपूर्वपदाद्ववेयुः ।
एवं युगेषु सकलेषु तदीयनाथा वन्ह्यर्कशीतगुविरिंचिशिवाः क्रमेण ॥ २० ॥

अर्थ—वर ( श्लोक १६ ) पांच वर्षांचें एक युग होतें असें सांगितलें. या पांच वर्षांतील पहिल्या वर्षाला संवत्सर, दुसऱ्यास परिवत्सर, तिसऱ्यास इडावत्सर, चवथ्यास अनुवत्सर व पांचव्यास इद्वत्सर अशा संज्ञा आहेत. अग्नि, सूर्य, चंद्र, ब्रह्मा व शंकर हे या पांच वर्षांचे अनुक्रमानें स्वामी आहेत.

## युगफलानि.

सुवृष्टिराद्येऽ प्रमुखा द्वितीये प्रभूततोया कथिता तृतीये ।
पश्चाज्जलं सिंचति यच्चतुर्थं स्वल्पोदकं पंचममब्दमुक्तम् ॥ २१ ॥

अर्थ—पहिल्यांत ह्मणजे संवत्सरांत चांगली वृष्टि होईल. परिवत्सरांत मध्यमवृष्टि होईल. इडावत्सरांत पुष्कळ पाऊस पडेल. अनुवत्सरांत मागाहून पाऊस पडेल व इद्वत्सरांत पाऊस कमी पडेल.

चत्वारि मुख्यानि युगानि तेषां विष्ण्वींद्रजीवानलदैवतानि ॥
चत्वारि मध्यानि च मध्यमानि चत्वारि चांत्यान्यधमानि विद्यात् ॥ २२ ॥

अर्थ — वर ( श्लोक १६ ) जीं बारा युगें सांगितलीं त्यांपैकीं पहिलीं चार युगें उत्तम; मधलीं चार मध्यम; व शेवटचीं चार कनिष्ठ होत. यांचे स्वामी विष्णु, इंद्र, बृहस्पति व अग्नि असे अनुक्रमें आहेत.

## अथ संवत्सरफलानि.

क० क्षितिपतिरपभीतिः प्रोल्लसद्दंडनीतिर्यदपि जलदपंक्तिर्मध्यवृष्टिं करोति ॥
तदपि कणसमृद्धिर्हीनरोगो भवाब्धिः प्रभव उदितशुद्धिः स्याज्जनः साधुबुद्धिः ॥१॥

रा० दंडनीतिनिरताः क्षितीश्वरा मध्यवृष्टिरपि सस्यसंपदः ।
रोगहानिभयमत्र यद्यपि स्युस्तथापि सुखिनः प्रभवाब्दे ॥ १ ॥

अर्थ—प्रभवनाम संवत्सर प्राप्त झालें असतां राजे लोकांचें सर्व भय जाऊन त्यांचा दरारा चांगला राहील. जरी पाऊस मध्यम पडेल तरी धान्यांश पुष्कळ वाढेल. प्रपंचांत रोगराई होणार नाहीं. लोकांची बुद्धि चांगली होऊन त्यांचें भाषण शुद्ध होईल. ( ते पवित्र राहतील. ) रा० रोगापासून भय उत्पन्न होईल.

क० सकलमनुजतुष्टिर्लोकदोषैकदृष्टिः क्षितिपतिरतिवृष्टिर्वह्निभीतिः प्रपुष्टिः ।
बहुधनकणचारा मेदिनी शांतचौरा विभव उरुशरीरा धेनवः क्षीरपूराः ॥ २ ॥

रा० हुताशरोगेतिभयं जनानां नृपाः प्रजादोषदृशः सुवृष्टिः ।
निर्वैरिणः स्युः सुखिनश्च लोकाः सुभिक्षमस्मिन्विभवे समर्घम् ॥ २ ॥

अर्थ — विभव संवत्सरांत सर्व लोकांना संतोष होईल. राजे लोक, लोकांचे अवगुण हुडकून काढीत राहतील. अतिशय पाऊस पडेल. आगीचें भय फार फैलावेल. जमिनीस कस फार येईल. चोरांचा नायनाट होईल. गाई पुष्ट होऊन पुष्कळ दूध देतील. रा० रोग, पीडा इत्यादिकांपासून त्रास होईल. वैर राहणार नाहीं आणि सुभिक्ष होईल.

क० पुत्रमित्रवनितानुरागतः स्याज्जनः प्रविततां मुदं गतः ।
दुष्टभूपनिकरः परस्परं शुक्लनाम्नि विदधाति संगरम् ॥ ३ ॥

रा० कलत्रपुत्रस्वजनानुरक्ताः श्रिया सुखेशं जयिनश्चसर्वे ।
लोका नृपा युद्धविधायिनः स्युर्जनेच्छयान्योन्यमतविशुक्ले ॥ ३ ॥

अर्थ---शुक्रनाम संवत्सरांत मुलगे, स्नेही, बायको यांच्या प्रीतीमुळें लोकांना अतिशय आनंद होईल. दुष्ट राजांचा समुदाय एकमेकांशीं लढाई करील.

क० नृपाः स्वल्पसंग्रामकर्माभिधाना जनाः किंचिदीत्यामयैः पीड्यमानाः ।
तथापि प्रमोदान्विता स्त्यक्तदंभा भवेयुः प्रमोदाभिधेऽभीष्टलाभाः ॥ ४ ॥

रा० रोगेणत्या पीडिताः सर्वलोका राजानः स्युर्युद्धलीलानुरक्ताः ।
प्रामोदेनानंदिताः स्युः प्रमोदे वर्षे सर्वाभीष्टलाभप्रवृद्धिम् ॥ ४ ॥

अर्थ---प्रमोद संवत्सर आलें असतां राजेलोकांमध्यें लहान लहान लढाया होतील. लोकांना रोग व उंदीर वगैरे यांपासून थोडासा उपद्रव होईल. तथापि लोक अभिमान सोडून आनंदांत राहतील व त्यांना इष्ट वस्तु मिळतील.

क० क्लेशिनो यदपि देहिनो ह्यलं न त्यजंति निजवर्त्म निर्मलम् ।
वर्षणाद्बहुकणाः प्रजापतिख्यातनाम्नि बहुसौख्यसंभृतिः ॥ ५ ॥

रा० क्लेशान्विताः सर्वशरीरिणः स्युस्तथापि न स्वां प्रकृतिं त्यजंति ।
बन्हर्षसस्यान्यातिवृष्टिरेव प्रजापतौ सौख्यसुखानि वर्षे ॥ ५ ॥

अर्थ---प्रजापति संवत्सरांत लोकांना जरी फार त्रास झाला तरी ते आपलें पवित्र ब्रीद सोडणार नाहींत. पाऊस पडून धान्य पुष्कळ येईल व लोकांना पुष्कळ सुख होईल.

क० अन्नदानवशतो जनान्निजान्प्रीणयन्ति बहुशोऽतिथिव्रजान् ।
जन्मिनः स्ववनितासुखान्विता भूभुजोऽगिरसि संगरे रताः ॥ ६ ॥

रा० अतिथीन्प्रीणयंत्यन्नैः स्वजनानपि नित्यशः ।
लोकाः स्वप्रमदासक्ताः स्युरब्देऽगिरसिध्रुवम् ॥ ६ ॥

अर्थ---आंगिरस संवत्सरांत लोक आपापल्या मंडळीस व अतिथि अभ्यागत मंडळीस अन्नदान करून आनंदवितील व लोकांना स्वस्त्रियांपासून सौख्य मिळेल. क० राजेलोक युद्धांत निमग्न होतील.

क० स्युर्द्विजा बहुमखक्रियोत्सुका वारिपूरिततडागवापिकाः ।
भूः प्रभूतधनधान्यसंयुता श्रीमुखे न रिपुता न रोगिता ॥ ७ ॥

रा० यज्ञक्रियायां निरताश्च सर्वे वापीतडागादिषु भूरिवारि ।
धात्रीष्टसस्यैः पिहिता स्वरूपानंदप्रदा श्रीमुखनाम्निवर्षे ॥ ७ ॥

अर्थ—श्रीमुखनामक संवत्सरांत ब्राह्मण पुष्कळ यज्ञयागादि कर्में करण्याविषयीं उद्युक्त होतील. तळीं, विहिरीं पाण्यानें भरून जातील. पृथ्वी पुष्कळ धनधान्ययुक्त होईल. लोकांत द्वेष व रोग हीं होणार नाहींत. रा० पृथ्वीकडे पाहून लोकांना आनंद होईल.

क० अल्पवृष्टिवशतोऽल्पसस्यता भूभृतामतिरणक्रिया मता ।
भावनाम्नि यदपि प्ररोगिणः स्युस्तथापि सुखिनः शरीरिणः ॥ ८ ॥

रा० नृपाः प्रपूर्णाः कनकेन युद्धक्रियासु सक्ताःस्युरथोऽल्पवर्षं ।
इतस्ततः सर्वजना भ्रमंति सुखं न विंदति हि भाववर्षे ॥ ८ ॥

अर्थ—पाऊस कमी पडल्यामुळें धान्य कमी पिकेल. राजे लोकांमध्यें लढाया पुष्कळ होतील. जरी आजाराचा फैलाव फार झाला तरी आजाऱ्यास आराम पडेल. भावनामक संवत्सरीं याप्रमाणें फळें मिळतील. रा० राजे लोक संपन्न होतील व लोक धान्याकरितां इकडे तिकडे भ्रमण करतील व लोकांना सौख्य होणार नाहीं.

क० तृणानि क्षितौ धेनवो दुग्धपूर्णाः सुवर्णाभिसंतोषिणः सर्ववर्णाः ।
सुभिक्षं नृपा देवभूदेवभक्ता युवाब्दे युवानः स्त्रियोऽन्योन्यसक्ताः ॥ ९ ॥

रा० कामिन्यः प्रियमानसेप्सितरतं यच्छंति पुत्राप्तये ।
गावः पीनपयोधरा नवतृणं भुक्त्वा प्रहृष्टांतराः ।
राजानः सुखकांक्षया युवजनाः कामक्रियातत्पराः ।
सर्वे स्युर्युवनाम्नि शक्तिसहिताः पृथ्वी सुभिक्षोत्कटा ॥ ९ ॥

अर्थ—युवनाम संवत्सरांत पृथ्वीवर गवत पुष्कळ उत्पन्न होईल. गाई दूध पुष्कळ देतील. सर्व जातीचे लोकांना सोनें मिळून आनंद होईल. सवंगाई होईल. राजे, देवब्राह्मणांची भक्ति करणारे होतील. तरुण पुरुष व त्यांच्या बायका परस्परांवर प्रेमासक्त होतील. रा० सर्व लोक सामर्थ्यवान् होतील.

क० युद्धकर्मनिरता अवनीशाः स्युः परस्परकृताभिनिवेशाः ।
भूः सुवृष्टिवशतः कणपुष्टा धातृनाम्नि जनता धनतुष्टा ॥ १० ॥

रा० मही सस्यपूर्णा जनान्पालयंती यथा कापि धात्री शिशूंस्तर्पयंती ।
प्रमत्ताः क्षितीशा जयायोद्यताः स्युस्तथा धातृवर्षे समस्ताः प्रहृष्टाः ॥ १० ॥

अर्थ—धातृसंवत्सरांत राजे लढण्यांत गुंग होऊन एकमेकांवर चढून जातील. चांगला पाऊस पडून पृथ्वीवर धान्य पुष्कळ होईल. लोक धनसंपन्न होत्साते संतुष्ट राहतील.

क० स्युः सुवर्षणकराः पयोधरा इक्षुशालिरुचिरा वसुंधरा ।
नैव संगरपराः क्षितीश्वरा ईश्वरे शुचितराः सदा नराः ॥ ११ ॥

रा० प्रशांतवैराः क्षितिपा जनानां मही च संपूर्णफलप्रदात्री ।
शालीक्षुसंपत्प्रचुरांबुवृष्टिं करोति शक्रश्च तथेश्वराब्दे ॥ ११ ॥

अर्थ—ईश्वरनामक संवत्सरीं मेघ पुष्कळ पाऊस पाडतील. भात, ऊंस हीं पिकें चांगलीं येतील व त्यामुळें पृथ्वी सुशोभित दिसेल. राजे लढाया करणार नाहींत आणि सर्व लोक सर्वकाळ पवित्रपणानें वागतील.

क० फलसस्ययुतं महीतलं सुपयोवर्षि पयोदमंडलम् ।
अवनीपतिमानसांतरे सुविनीतिर्बहुधान्यवत्सरे ॥ १२ ॥

रा० सुनीतिवंतः क्षितिपा धरित्री नानाविधैः सस्यफलैः प्रपूर्णा ।
प्रकामवर्षी मघवा जनानां सुखं बहु स्याद्बहुधान्यवर्षे ॥ १२ ॥

अर्थ—बहुधान्यनामक संवत्सरांत फळें आणि धान्यें पृथ्वीच्या पाठीवर पुष्कळ होतील. मेघसमूह चांगला पाऊस पाडील. राजांच्या मनांमध्यें चांगली न्यायबुद्धि जागृत राहील.

क० ज्वराधिकतरातुरा अतिदुरापसस्यांबरा ।
दराश्रितधराधरा निरनुरागदारा नराः ।
अवर्षणकराश्चिराज्जलधराः सचौरा धरा ।
प्रमाथिनि परस्पराहवरता धराधीश्वराः ॥ १३ ॥

रा० जीमूतभ्रमणाकुलो दिनकरः संछादितोऽहर्निशं ।
राजानः समरे पराजयमिताश्चोरप्रभूता मही ।
दुर्भिक्षं कुहचित्प्रमाथिनि जना नानामयैः पीडिता ।
वृद्धा योगरताः प्रशांतमनसः सौख्यं कचिद्दृश्यते ॥ १३ ॥

अर्थ—प्रमाथिनाम संवत्सर प्राप्त झालें असतां लोकांना ज्वरापासून अतिशय पीडा होईल. धान्य आणि वस्त्रें दुर्मिळ होतील. भीतीमुळें लोक पर्वताचा आश्रय करितील व त्यांच्या बायका त्यांच्यावर प्रीति करणार नाहींत. मेघ पुष्कळ कालपर्यंत पाऊस पाडणार नाहींत. पृथ्वीवर चोरांचा सुळसुळाट फार होईल. राजे एकमेकांशीं युद्ध करण्यांत गुंतून जातील. रा० रात्रंदिवस सूर्य मेघाच्छादित राहील. राजे लोक युद्धांत पराजित होतील. लोकांना नानाप्रकारचे रोग बाधा करतील. वृद्ध लोक

मात्र योगाचा आश्रय करून आपलें मन शांत ठेवितील, परंतु या वर्षी लोकांना सुख क्वचितच मिळेल.

क० अतिसस्यसमन्वितामही घनपंक्तिर्बहुनीरदायिनी ।
जितवैरिगणाः सुपार्थिवाः सुखिनो विक्रमनाम्नि मानवाः ॥ १४ ॥

रा० राजानो रिपुवाहिनीमुपगतां निर्जित्य तेषां रथा
नश्वांश्चापि च दंतिनश्च पदगान् हत्वा पुरोगान् भटान् ।
भोक्तारः पृथिवीमनल्पसलिलां पुष्पैः फलैर्विक्रमे ।
वर्षे पूर्णतमां जनाश्च सुखिनः कुर्वंति नित्योत्सवान् ॥ १४ ॥

अर्थ—विक्रम नामक संवत्सरांत पृथ्वीवर धान्य फार होईल. मेघमाला पुष्कळ पाऊस पाडील. चांगले राजे आपल्या शत्रुवर्गाला जिंकितील आणि मनुष्यांना सौख्य होईल.

क० सुरुचिरा धनधान्यचयैर्धरा जलधरा जलवर्षणतत्पराः ।
द्विजवराः सततं विहिताध्वरा रणपरा वृषनाम्नि महीश्वराः ॥ १५ ॥

रा० यज्ञक्रियायां निरता द्विजेंद्रा नृपाः प्रपूर्णाश्च मदोद्धताश्च ।
युद्धं नृपेंद्राश्च सदारभंते वृषा वृषाब्दे बहुवारिवर्षी ॥ १५ ॥

अर्थ—वृषनामक संवत्सरीं पृथ्वीवर धन व धान्य यांची समृद्धि होईल. मेघ पाऊस चांगला पाडतील. ब्राह्मण नेहमीं यज्ञ करितील. राजे युद्ध करितील.

क० अतिशिल्पकलादिभिः समेताः सुखिनः स्युः सकला जनास्सुवृत्ताः ।
भुवि मेघगणे कृतांबुवर्षे सति धान्यं बहु चित्रभानुवर्षे ॥ १६ ॥

रा० विचित्रसस्यैः सुफलैर्धरित्री विचित्रिता भूरिजनान्विता च ।
नानाकलाशिल्पविदो हि लोकाः सौख्यं तथाब्दे सति चित्रभानौ ॥ १६ ॥

अर्थ—चित्रभानु संवत्सरांत सर्व लोक नानाप्रकारचीं शिल्पकलेसंबंधीं कामें करतील व ते सदाचरणानें वागतील व त्यांना सुख होईल. पृथ्वीवर मेघ पाऊस पाडतील व धान्य पुष्कळ पिकेल.

क० अतीवाहवेस्यान्मतिर्भूपतीनां महाव्याधिराधिश्च संघे जनानां ।
सुभिक्षं क्वचित्क्वापि सौख्यानुभूतिः सुभानौ क्वचिद्वृष्टिमिंद्रः करोति ॥ १७ ॥

रा० परस्परं विग्रहकारिणो नृपा जनाः प्रभूतामयपीडिताः स्युः ।
क्वचित्सुवृष्टिः क्वचिदेव सौख्यं सुभिक्षमस्तीह सुभानुवर्षे ॥ १७ ॥

**अर्थ**— सुभानुनामक संवत्सरांत राजे लोकांना युद्ध करण्याची अतिशय इच्छा होईल. लोकांत मोठमोठे रोग व मानसिक व्यथा उत्पन्न होतील. विरळा सर्वंगाई होईल. सुखाचें वारें तुरळक लागेल. इंद्र कोठें कोठें पाऊस पाडील.

क० पार्थिवाः धनरता रुजान्विता मानवा गणितविषया युताः ।
भूरिधान्यफलसंभृता क्षितिस्तारणे घनततिः प्रवर्षति ॥ १८ ॥

रा० नक्षत्रविद्यानिरता द्विजेंद्राः क्षितीश्वराश्चार्थपरा रुजार्ताः ।
जना धनाढ्याः सुलभं जलं च सुभिक्षमस्मिन्नपि तारणाब्दे ॥ १८ ॥

**अर्थ**—तारण नामक संवत्सर आलें असतां राजे लोकांची धनावर नजर राहील व त्यांना रोगापासून पीडा होईल. लोकांचें गणितविषयाकडे लक्ष लागेल. पृथ्वीवर धान्य व फळें पुष्कळ होतील. मेघ पाऊस पाडील.

क० धनकणाः सुलभा भुवि नीरदाः नृपवराः कनकादिवसुप्रदाः ।
परमधर्मविधायिनि पार्थिवे सति जनेषु सुखं बहु पार्थिवे ॥ १९ ॥

रा० वृष्टिप्रभूतां कनकैः समेतां सुभिक्षधात्रीं कुरुते तुराषाट् ।
क्षितीश्वराणां सुकृतौ प्रवृत्तिरर्थो बहुः स्यादिह पार्थिवाब्दे ॥ १९ ॥

**अर्थ**— पार्थिव संवत्सरांत धान्य सवंग होईल. पाऊस चांगला पडेल. राजे लोक सुवर्णादि धन देणारे होतील व राजा अत्यंत धर्माचरण करीत असल्यामुळें लोकांना फार सुख होईल.

क० रणतत्परभूभृतां बलैः सहिता भू स्तुरगादिसंकुलैः ॥
जनताऽतिनता रता व्यये धनधान्यादिसुखान्विता व्यये ॥ २० ॥

रा० रणोन्मुखानां मनुजेश्वराणां बलैः प्रपूर्णा पृथिवी समग्रा ॥
व्यपेतरोगाः सुखिनश्च सर्वे सुभिक्षमस्मिन् व्ययसंज्ञकेऽब्दे ॥ २० ॥

**अर्थ**—घोडे वगैरे ज्यांत आहेत अशा युद्धास प्रवृत्त झालेल्या राजांच्या सैन्यांनीं पृथ्वी दणाणून ( व्यापून ) जाईल. व्ययनाम संवत्सरांत लोक फार नम्र असून खर्चिक असतील व धान्य व धन वगैरे सुखानें युक्त होतील.

क० जनता कणतोषिता ऽ गदा सुरराजं हसति स्वसंपदा ।
इह सर्वजिदाख्यवत्सरे मरणं यांति नृपा रणाजिरे ॥ २१ ॥

रा० जना विभूत्या त्रिदशान्हसंतो भयादपेताः सुखिनो ह्यरोगाः ।
नृपाः क्षयं यांति रणाजिरेषु सुभिक्षदे सर्वजितीह वर्षे ॥ २१ ॥

अर्थ — सर्वजित् नामक वर्षांत लोक निरोगी असून धान्य पुष्कळ झाल्यामुळें संतुष्ट होऊन आपल्या वैभवानें इंद्रासमुद्धां हंसतील. इंद्राची बरोबरी करितील. राजे लोक युद्धभूमीवर मृत्यु पावतील.

क० लोकपालनपरा अवैरिणः स्युर्नृपा जलधराः प्रवर्षिणः ।
पुत्रपौत्रधनधान्यतोषिणः सर्वधारिणि सदा शरीरिणः ॥ २२ ॥

रा० भूपाः प्रजापालनतत्पराः स्युरतीववृष्टिर्बहु सस्यसंपत् ।
प्रशांतवैरास्त्विह सर्वधारिण्यब्दे जनानां सुतसौख्यवृद्धिः ॥ २२ ॥

अर्थ—सर्वधारी संवत्सरांत राजांमध्यें कलह नाहींसा होऊन ते आपल्या प्रजेचें संरक्षण करण्यामध्यें निमग्न होतील. मेघ पुष्कळ पाऊस पाडतील. लोकांना मुलगे नातू होऊन धनसंपन्न होतील व सर्वकाळ आनंदांत राहतील.

क० अतिधान्यफलप्रकरा वसुधा जलदा जलवृष्टिकरा बहुधा ।
मनुजा अभया अगदाः ससुताः क्षितिपाश्च विरोधिनि वैररताः ॥ २३ ॥

रा० विरोधवंतः क्षितिपा मिथः स्युरनर्घवृष्टिर्मनुजाः सुपुष्टाः ।
सस्योत्धृता भूमिरितस्ततः स्याद्विरोधिवर्षे भयरोगहानिः ॥ २३ ॥

अर्थ—विरोधि संवत्सरांत पृथ्वीवर धान्यें व फळें यांची फार समृद्धि होईल. मेघ पुष्कळ पाऊस पाडतील. लोकांचें सर्व भय व रोग नाहींसे होऊन त्यांना मुलेंबाळें होतील. राजे एकमेकांचा द्वेष करीत राहतील.

क० मनुजाः क्षितिपा रुचिरां प्रकृतिं प्रविहाय च यांति परां विकृतिम् ।
स्वपदच्युतितः परदेशगता विकृतौ कणवस्त्रधनाधिकृताः ॥ २४ ॥

रा० हित्वा स्वकीयां प्रकृतिं विकारमाप्ता जना भूमिभुजोऽथ सर्वे ।
त्यक्त्वा स्वदेशं परदेशसंस्थाः किंचित्सुखाद्यं विकृतौ सुभिक्षम् ॥ २४ ॥

अर्थ—विकृतिनामक वर्षांत राजे व लोक आपले मूळचे चांगले स्वभाव टाकतील व त्यांच्या स्वभावांत विलक्षण फेरबदल होईल. ते आपल्या स्थानापासून भ्रष्ट होऊन दुसऱ्या देशांत जातील व तेथें धन, धान्य, वस्त्र यांनीं युक्त होतील.

क० अवनीपतयो विकारयुक्ता सततं संगरकर्मणि प्रसक्ताः ।
मनुजाः सरुजः स्युरल्पवृष्टिस्तदपि स्यात्खरनाम्नि धान्यपुष्टिः ॥ २५ ॥

रा० संग्रामसंदर्शनहृष्टचित्ताः क्षितीश्वरास्तत्रविनाशमाप्ताः ।
आप्तामयाः स्वल्पजलाः पयोदास्तथापि सस्यं प्रचुरं खराब्दे ॥ २५ ॥

अर्थ—खरसंवत्सरांत राजे लोकांचीं मनें खवळून जाऊन ते नेहमीं लढाया करीत राहतील. मनुष्यें रोगी होतील. पाऊस थोडा पडेल, तथापि पिकें चांगलीं जोरांत येतील.

क० धरणीकणयुग् भवेदलं सुजलं वर्षति मेघमण्डलम् ।
क्षितिपाः सधना बुधार्चने निरता लोकसुखानि नंदने ॥ २६ ॥

रा० महीश्वरा भूरिधनैः प्रपूर्णा नंदंति पृथ्वी फलसस्ययुक्ता ।
बहूदकं वर्षति वृत्रहास्मिन् जनस्य सौख्यं सति नंदनाब्दे ॥ २६ ॥

अर्थ—नंदन नामक वर्षांत पृथ्वीवर धान्य पुष्कळ पिकेल. मेघसमूह पुष्कळ पाऊस पाडतील. राजांजवळ पुष्कळ द्रव्यसंचय होऊन ते विद्वान् लोकांचा गौरव करण्यांत निमग्न होतील व लोकांना सुख होईल.

क० अभितोल्पसस्ययुगिला सजला जनता भवेद्विकला सकला ।
क्षितिपा अतीव निरता विजयेऽल्पकमग्रधान्यमखिलं विजये ॥ २७ ॥

रा० सर्वे महीशा विजयार्थिनः स्युरनल्पसस्यं बहुवारिवृष्टिः ।
जनाः सुखेनात्र रमंति पूर्वसस्यस्य नाशो विजयाख्यवर्षे ॥ २७ ॥

अर्थ—विजय संवत्सरांत पृथ्वीवर धान्य थोडें पिकेल, पण पाणी विपुल होईल. सर्व लोकांत व्यंग कांहीं राहणार नाहीं. ( निर्व्यंग होतील. नियमितपणानें वागतील. ) राजांना पराक्रम करून जय मिळविण्याचा निदिध्यास लागेल. पूर्वींचीं पिकें अल्प येतील. रा० पृथ्वीवर धान्य विपुल पिकेल. ( उत्तर धान्य. )

क० सदानंदधान्यादिकीर्णा धरित्री पयोदावली स्यात्पयोवृष्टिकर्त्री ॥
विवाहोरुयज्ञादिसत्कर्मसिद्धिर्जये वापिकारामकूपादिवृद्धिः ॥ २८ ॥

रा० आरामवापीतटजातशालीफलाकुला भाति मही सुवृष्टिः ॥
विवाहयज्ञोत्सवनंदितानां सौख्यं जनानामतुलं जयाब्दे ॥ २८ ॥

अर्थ—जय नामक वर्षांत पृथ्वी सर्वकाळ आनंदानें व धान्यांनीं भरून जाईल. मेघसमुदाय पाऊस पाडील. लग्नें, मोठमोठे यज्ञ वगैरे चांगलीं पुण्यकारक कार्यें होतील. विहिरी, बाग, आड वगैरे पुष्कळ होतील.

क० गोधूमशालीक्षुयवैरुपेता सर्वसहाऽल्पजलदः किलवृत्रहंता ।
चोरैर्गदैश्च नितरां परिपीड्यमानः सर्वो जनो भवति मन्मथनाम्निवर्षे ॥२९॥

रा० शालीक्षुगोधूमयवैर्धरित्री भवेज्जनानां नयनाभिरामा ॥
कंदर्पकेलीप्रवणानृपा स्युः सुभिक्षपुंजैरिह मन्मथाब्दे ॥ २९ ॥

अर्थ—मन्मथ संवत्सरांत पृथ्वीवर गहूं, साळी, मोठे ऊंस व सातू हे जिन्नस पुष्कळ होतील. इन्द्र थोडा पाऊस पाडील. सर्व लोकांना चोरापासून व रोगापासून फार पीडा होईल. रा० राजेलोक रतिक्रीडेंत निमग्न होतील आणि या संवत्सरीं उत्तम सुभिक्ष होईल.

क० देहिनः सुगदिनः स्युरधीरा ईतिचोरभयतो धनहीनाः ।
नूनमल्पजलदा घनमाला दुर्मुखे रिपुजिताः क्षितिपालाः ॥ ३० ॥

रा० पुरंदरो मध्यमवृष्टिकर्ता जनाश्चवैरामयभीतियुक्ताः ।
नृपा रणे वैरिपराजिताः स्युः क्वचित्सुभिक्षं सति दुर्मुखाब्दे ॥ ३० ॥

अर्थ—दुर्मुख वर्षी मनुष्यांना रोग होऊन त्यांच्या तोंडचें पाणी पळून जाईल. टोळधाड वगैरे उपद्रव व चोर यांच्या भीतिमुळें लोक धनहीन होतील. मेघसमूह निश्चयेंकरून थोडा पाऊस पाडील. राजे लोकांचा शत्रूकडून पराभव होईल.

क० रणक्षुब्धभूपालबाणाग्रशल्या हतारिव्रजासृक्प्रवाहोरुकुल्या ॥
धरा मध्यसस्याऽर्धकीलालवृष्टिस्तथापि श्रिया हेमलंबे नृपुष्टिः ॥ ३१ ॥

रा० परस्परं क्षितीश्वरा विरोधिनः सुखी जनः ॥
सृजंति वारि चांबुदास्त्वतीव हेमलंबिनि ॥ ३१ ॥

अर्थ – हेमलंब संवत्सरांत पृथ्वीवर युद्धांत खवळलेल्या राजांच्या बाणांच्या टोंकांच्या फळांनीं मारलेल्या शत्रुवर्गाच्या रक्तांच्या पाटाच्या मोठमोठ्या नद्या वाहत राहतील. धान्य मध्यम पिकेल. पाऊस निंमा पडेल. तरी द्रव्याच्यायोगानें मनुष्याचें पोषण होईल. रा० मेघ अतिशय पाऊस पाडतील.

क० रणकर्मरताः क्षितिपालगणाः ध्रुवमल्पपतरा भुवि वस्त्रकणाः ।
जलवृष्टिरतीव जना गदिनस्तदपीह विलंबिनि ते सुखिनः ॥ ३२ ॥

रा० महीपतीनां कलहो मिथः स्यादनल्पवर्षी सुरनायकश्च ॥
लोके भयं रुग्जनितं तथापि विलंबिवर्षे सुखिनश्च लोकाः ॥ ३२ ॥

अर्थ विलंबी संवत्सरांत राजे लोक युद्ध करण्यांत गर्क होतील. धान्य आणि वस्त्र पृथ्वीवर खात्रीनें कमी होईल. पाऊस अतिशय पडेल. लोक रोगी होतील तथापि त्यांना सुख होईल.

क० स्वल्पं जलं यच्छति देवराजः क्षितीश्वराश्चितविकारभाजः
प्राग्धान्यमल्पं परधान्यवृद्धिर्विकारिवर्षे नृषु रोगव्याधिः ॥ ३३ ॥

रा० स्वल्पांबुवर्षी सुरपो जनानां रोगोद्भवः स्वल्पमिवादिसस्यं
परं सुपूर्णं पृथिवीश्वराणां विकारमाहुश्च विकारिवर्षे ॥ ३३ ॥

अर्थ—विकारी संवत्सरांत इंद्र थोडा पाऊस पाडील. राजांचीं मनें ताळ्यावर राहणार नाहींत. पहिलीं पिकें थोडीं येतील. पुढच्या पिकांची समृद्धि होईल व लोकांमध्यें रोगराई फार होईल.

क० नानासंपत्पोषिता भूमिपाला सर्वे लोकाः सौख्ययुक्ताः सुशीलाः ।
देवाधीशोऽतीवकीलालदः स्यांच्छार्वर्यब्दे मेदिनी पूर्णसस्या ॥ ३४ ॥

रा० मेघवाहनकृता बहुवृष्टिः स्युर्मिथो नृपतयो जयलुब्धाः ।
सस्यपुष्पफलसंपदनल्पा शार्वरीशरदि चारु सुभिक्षम् ॥ ३४ ॥

अर्थ—राजे लोकांजवळ निरनिराळ्या प्रकारचें ऐश्वर्य होऊन ते बलाढ्य होतील. सर्व लोक सुखी व चांगल्या स्वभावाचे होतील. इंद्र पुष्कळ पाऊस देईल. शार्वरी संवत्सरांत पृथ्वी धान्यानें भरून जाईल.

क० जलवर्षणतोऽग्रधान्यनाशः सततं स्याददितितस्करप्रकाशः ।
भृशमीतिभयं गदातिरेकः सुखहीनः प्लवनाम्नि सर्वलोकः ॥ ३५ ॥

रा० वारि नैव ददते घनसंघाः पूर्वसस्यनिधनं कलहश्च ।
आमयेन जनितं भयमुर्वीनायका जयरताः प्लववर्षे ॥ ३५ ॥

अर्थ—प्लव संवत्सरांत पाऊस फार होऊन पुढल्या पिकांची नासाडी होईल. चोरांचा सुळसुळाट फार होईल. टोळधाडी वगैरे उपद्रवाची फार भीति राहील. रोग फार होतील. सर्व लोकांना सुख होणार नाहीं. रा० मेघ पाऊस पाडणार नाहीत. लोकांत कलह उत्पन्न होईल व राजे जय मिळविण्याविषयीं तत्पर राहतील.

क० धनधान्ययुता धरा भृशं पशुवृद्धिर्मघवांबुदोऽनिशं ।
समुपात्तविवाहमंगलाः शुभकृन्नाम्नि नरा निराकुलाः ॥ ३६ ॥

रा० नित्योत्सवैः प्रमुदिताः सुजनाः पशूनां वृद्धिर्भवेत्सुरपतिः शुभवृष्टिकारी ।
सस्यैः फलैः सुखयुता अतुलैर्धरित्री द्रव्योत्कटं प्रकुरुते शुभकृत्समायां॥३६॥

अर्थ—शुभकृत्संवत्सरांत पृथ्वीवर धान्य व पैसा फार होईल. जनावरें फार होतील. इंद्र निरंतर पाऊस पाडील. लोक लग्नें वगैरे मंगलकार्यें करतील व निष्काळजी होतील.

—

क० मित्रभावमुपयांति भूभृतः सस्यसंपदधिकांबुवृष्टितः ॥
शोभकृच्छरदि रोगपीडितः स्याज्जनस्तदपि सौख्यसंयुतः ॥ ३७ ॥

रा० बलाहका भूरिजलप्रदाः स्युः सस्यप्रवृद्धिः फलपुष्पसंपत् ।
नृपा मिथः प्रीतियुजो भवंति जनः सुखी शोभकृदाख्यवर्षे ॥ ३७ ॥

अर्थ शोभन किंवा शोभनकृत् संवत्सरांत राजे एकमेकाशीं सख्य करतील, पुष्कळ पाऊस पडून धान्याची समृद्धि होईल. लोकांना रोगपीडा होईल, परंतु तें सुखी राहतील.

क० कामार्ताः स्युर्भूमिपालाः समस्ता युद्धे सक्ता ईतिजा भीतिरुग्रा ॥
क्रोधिन्यब्दे मध्यवृष्टिः कणानां वृद्धिः स्यातां क्रोधलोभौ जनानाम् ॥ ३८ ॥

रा० संभावयंति प्रमदाः क्षितीशा नूनं परस्परविरोधमुपार्जिताश्च ।
सस्यानि भूरि सुजनाः सुखिनोऽतिवृष्टिः क्रोधिन्यनल्पधनलुब्धहृदः प्रजाः स्युः ॥ ३८॥

अर्थ -क्रोधी संवत्सरांत सर्व राजे मदनातुर होऊन लढाई करण्यांत गुंग होतील. उंदीर, टोळ वगैरे उपद्रवाचें मोठें भय उत्पन्न होईल. पाऊस मध्यम (रा० अतिशय) पडेल. धान्यें पुष्कळ वाढतील. लोकांत राग व लोभ हे मनोविकार फार वाढतील.

क० स्वल्पं जलं जलदमंडलमादधाति प्रायेण धान्यमखिलं विलयं प्रयाति ।
लक्ष्मीश्चिरादधिगतापि चला नृपाणां विश्वावसौ भवति रोगभयं नराणाम् ॥ ३९॥

रा० स्वल्पांबुवृष्टिः फलसस्यसंपत् मध्या जनानां गदसंभवश्च ॥
विश्वावसौ स्यात्पृथिवीश्वराणां लक्ष्मीर्विलोला चिरसंचितापि ॥ ३९ ॥

अर्थ—विश्वावसु संवत्सरांत मेघ थोडा पाऊस पाडील. बहुतकरून सर्व पिकांची नासाडी होईल. (रा० फळें धान्यें मध्यम येतील). राजे लोकांनीं पुष्कळ दिवस सांठविलेलें द्रव्य त्यांच्याजवळ टिकणार नाहीं. लोकांमध्यें रोगाची भीति उत्पन्न होईल.

क० अग्रधान्यमधिकं जलमल्पं भूभृतां भवति युद्धमनल्पम् ॥
स्याज्जनो गदवशाद्गतधामा वत्सरो यदि पराभवनामा ॥ ४० ॥

रा० रणांगणे युद्धविशारदानां क्षितीश्वराणां प्रभवेत्परेभ्यः ॥
पराजयो रोगभयं जनानां सत्यग्रधान्यानि पराभवाब्दे ॥ ४० ॥

अर्थ—पराभवनामक संवत्सर असेल तर पहिलीं पिकें पुष्कळ येतील. पाण्याचा तुटवडा येईल. राजे लोकांत पुष्कळ लढाया होतील. (रा० शत्रूपासून त्यांचा पराभव होईल). रोगामुळें लोकांना आपलीं घरें सोडावीं लागतील.

क० क्षितौ दुर्लभं धान्यपुष्पादि नित्यं क्षितीशा मिथः कुर्वते युद्धकर्म ॥
पयोवर्षणं स्वल्पमत्यंतरोगः प्रजानां यदा वत्सरः स्यात्प्लवंगः ॥ ४१ ॥

रा० मध्यांबुवर्षी त्रिदशाधिनाथः परस्परं विग्रहकारिणः स्युः ॥
क्षितीश्वराः सस्यामहातितुच्छं प्लवंगवर्षे गदसंभवोऽपि ॥ ४१ ॥

अर्थ—जेव्हां प्लवंग संवत्सर येईल तेव्हां पृथ्वीवर धान्य, फुलें वगैरे दुर्मिळ होतील. राजे एकमेकाशीं नेहमीं लढाया करतील. पाऊस थोडा (रा० मध्यम) पडेल. लोकांना अतिशय रोगपीडा होईल.

क० वसुधाल्पधान्यफलमूलसमेता भृशमीतिरल्पजलदो बहुमेता ॥
नृपतिव्रजो विहितसंगरकर्मा यदि वत्सरो भवति कीलकशर्मा ॥ ४२ ॥

रा० मध्यं सस्यं वृष्टयभावो नृपाणां संग्रामः स्याद्दारुणश्चोरभीतिः ॥
सौख्यं लोके दृश्यते कुत्रचिद्वा पुष्पैर्वृक्षाः कीलकेऽब्दे विहीनाः ॥ ४२ ॥

अर्थ—कीलक नांवाचें वर्ष येईल तेव्हां पृथ्वीवर धान्यें, फळें, मुळें (रा० फुलें) थोडीं निपजतील. उंदीर. टोळ वगैरेंचा उपद्रव फार होईल. पाऊस थोडा पडेल. (रा० पडणार नाहीं). राजे लोक युद्ध करीत राहतील. (रा० लोकांत सुखी प्राणी क्वचित् दृष्टीस पडेल).

क० • नित्यमध्वररताः क्षितिदेवाः श्रीयुता अरिपवो नरदेवाः ।
• भूः प्रभूतजलतो बहुधान्या सौम्यनाम्नि जनता भयशून्या ॥ ४३ ॥

रा० बलाहकेभ्यो नभसंस्थितेभ्यः पतत्यतिस्वल्पजलं न भूरि ।
सस्यानि मध्यानि महीपतीनां वैरं प्रशांतं सति सौम्यवर्षे ॥ ४३ ॥

अर्थ—सौम्यनामक संवत्सरांत ब्राह्मण नेहमीं यज्ञयागादि कर्मे करण्यांत गढून जातील. राजांचे शत्रू नाहीसे होऊन त्याच्याजवळ संपत्ति पुष्कळ होईल. पृथ्वीवर पुष्कळ पाऊस पडून धान्य विपुल होईल. (रा० पाऊस मध्यम पडेल आणि धान्येंही मध्यम मानानें पिकतील.)

क० जलवृष्टिकराः पयोधराः पशुवृद्धिः सुखिनोऽखिला नराः ॥
क्षितिपा निरता न मत्सरे सति साधारणनाम्नि वत्सरे ॥ ४४ ॥

रा० क्षितीश्वराणां गतमत्सराणां कोशप्रवृद्धिः सुखिनश्च सर्वे ॥
जनाः पशूनामपि पुष्टिरस्मिन्साधारणाब्दे बहु वर्षतींद्रः ॥ ४४ ॥

अर्थ—साधारण नांवाच्या वर्षांत पाऊस चांगला पडेल. जनावरांची समृद्धि होईल. सर्व लोक सुखी होतील. राजे लोक एकमेकांशीं मत्सर ( हेवा ) करणार नाहींत. (रा० व त्यांचा खजिना वाढेल. )

क० असदाचरणा विगतद्रविणा कृतवैरिगणा नरपालगणाः ।
सलिलं न ददाति पयोदततिर्जनता भयमेति विरोधकृति ॥ ४५ ॥

रा० विरोधकृद्वत्सर उद्धतानां महीभुजां दारुणमस्ति युद्धम् ॥
पयोदजालं नभसि स्थितं वै तथापि नो मुंचति भूरि वारि ॥ ४५ ॥

अर्थ—विरोधकृत् वर्षांत राजांचा समुदाय दुराचारी व निर्धन होऊन आपणास पुष्कळ शत्रू करून घेईल. मेघसमूह पाऊस पाडणार नाहींत. त्याकारणानें लोक गांगरून जातील. ( रा० राजे लोकांत भयंकर युद्ध होईल. )

क० गदचोरजतापयुता जनता कुभृतां विततावहताभिमता ॥
जलदः प्रचुरं न ददाति पयः परिधाविनि धान्यधनापचयः ॥ ४६ ॥

रा० रोगः प्रजानामतुलेतिभीतिः सस्यं महर्घं न च भूरिवृष्टिः ।
युद्धे लयं यांति नृपाश्च सर्वे क्वाप्यस्ति सौख्यं परिधाविवर्षे ॥ ४६ ॥

अर्थ—परिधावी संवत्सरांत रोग व चोर यांपासून लोकांना त्रास होईल. राजे लोकांना लढाई चालू ठेवणें विशेष आवडेल. मेघ पुष्कळ पाऊस पाडणार नाहींत. धान्य व द्रव्य यांचा ऱ्हास होईल. ( रा०—लोकांत रोग उद्भवतील व उंदीर, टोळ वगैरेपासून त्रास होईल. धान्य महाग होईल. पाऊस फार पडणार नाहीं. युद्धांत राजें लोकांचा नाश होईल. फार थोडे लोकांना सुख होईल.

क० जलवर्षणकृन्नदेवदेवः कणनाशः कुभृतां विरोधभावः ।
कथमप्यभिजीवति प्रमादी जनसंघो यदि वत्सरः प्रमादी ॥ ४७ ॥

रा० वृथा जलं वर्षति मेघनाथः स्वल्पं हि सस्यं च जनस्य पीडा ॥
जीवंति लोकाः कथमप्यनाथाः प्रमादिवर्षे कुहचित्सुभिक्षम् ॥ ४७ ॥

अर्थ— प्रमादी संवत्सर असेल तर पाऊस पडणार नाहीं ( रा० पाऊस अकालीं वगैरे पडल्यानें त्यापासून उपयोग होणार नाहीं ) धान्याची नासाडी होईल ( रा०

धान्य थोडें येईल.) राजे लोकांत वैर वाढेल. लोकसमाजाचें लक्ष ताळ्यावर न राहतां तो कसातरी मोठ्या संकटानें जीव धरून राहील.

क० जलदा जलदानतत्पराः क्षितिपालाः क्षितिपालनादराः ।
वसुधा धनधान्यसंकुला जनतानंदशरद्घनाकुला ॥ ४८ ॥

रा० सर्वे महीशाः सकलाश्च लोका गावो हया वारिभवा झषाद्याः ॥
आनंदवर्षे सुखिनो भवंति प्रकामवर्षी त्रिदशाधिपोऽत्र ॥ ४८ ॥

अर्थ—आनंद संवत्सरांत मेघ पुष्कळ चांगला पाऊस पाडतील. राजे लोक मोठ्या उत्सुकतेनें पृथ्वीचें संरक्षण करतील. द्रव्य व धान्य यांनीं पृथ्वी भरून जाईल. सर्व लोक स्वस्थचित्त होतील. (रा० सर्व लोक, गाई, घोडे, मासे वगैरे जलचर प्राणी यांना फार सुख होईल.)

क० राक्षसा इव दयोनिता जना रोगिणो निरतकार्यसाधनाः ।
राक्षसे विहितधान्यनाशना भूरिवारिपरिवर्षणाद्घनाः ॥ ४९ ॥

रा० नक्तंचरा इव जनाः कृपया विहीनाः सर्वे स्वकार्यनिरताः परकृत्यमूकाः ॥
इंद्रः प्रभूतजलदः प्रचुरामयश्च किंचित्सुभिक्षमपि तिष्ठति राक्षसाब्दे ॥४९॥

अर्थ—राक्षस नामक वर्षांत लोक राक्षसाप्रमाणें निर्दय अंतःकरणाचे, रोगी, व आपमतलबी (रा० दुसऱ्याच्या कामाविषयीं दुर्लक्ष करणारे) होतील. मेघ अतिशय पाऊस पाडून पिकांची नासाडी करतील. (रा० थोडी सवंगाईही होईल).

क० क्षितिपालकुलं रणकर्मकरं धनधान्यफलादिकमल्पतरम् ॥
अनलादिकभीतिरिला विजलानलनाम्नि जनाः सकला विकलाः ॥ ५० ॥

रा० वन्हेर्भयं त्वीतिकृतं च मध्या वृष्टिस्त्वनर्घं बहुलं च धान्यम् ॥
नृपाः परेषां हृतभूरिराज्याः संक्षोभयुक्ताश्च सदानलाब्दे ॥ ५० ॥

अर्थ—अनलनामक संवत्सरांत राजे लोकांचा समुदाय युद्ध करीत राहील. द्रव्य कमी होईल व धान्यें, फळें वगैरे थोडीं निपजतील. आगीचें वगैरे भय फार होईल. पृथ्वीवरचें पाणी नाहींसें होईल. सर्व लोक तेजोहीन होऊन जातील. (रा० आगीचें भय, उंदीर, टोळ वगैरेचें भय फार होईल. पाऊस मध्यम पडेल. धान्य पुष्कळ होईल; पण तें महाग होईल. राजे लोक शत्रूचा प्रदेश हरण करून सर्व काळ क्षुब्ध राहतील.)

क० भवतीतिभयं क्षितिरल्पकणा क्षितिपा भुजवीर्यजितारिगणाः
दधते जलदा अतिनिर्जलतामिह पिंगलनाम्नि न मंगलता ॥ ५१ ॥
रा० आशाः प्रपूर्णा घननिस्वनेन न वारि पश्यंति जनास्तृषार्ताः ॥
महीभुजो बाहुपराक्रमेण जितान्यदेशाः सति पिंगलाब्दे ॥ ५१ ॥

अर्थ--या पिंगलनामक संवत्सरांत उंदीर, टोळ वगैरेची भीति उत्पन्न होईल. पृथ्वीवर धान्य थोडें पिकेल. राजे लोक आपल्या मणगटाच्या जोरानें शत्रुवर्गाला जिंकतील. (रा० आकाशांत मेघगर्जना पुष्कळ होईल; पण) ढगांत पाणीच असणार नाहीं आणि शुभ होणार नाहीं.

क० ईतयो यदपि रोगभीतयः स्युस्तथापि धनधान्यसंचयः ॥
लोकलोकपतयो निराधयः कालयुक्तशरदि व्युपाधयः ॥ ५२ ॥
रा० गीर्वाणनाथः प्रचुरांबुवर्षी संतस्तपःसौख्ययुता जनाश्च ॥
सस्यानि रम्याणि फलैः प्रपूर्णाः पृथ्वीरुहः संति च कालयुक्ते ॥ ५२ ॥

अर्थ—कालयुक्त संवत्सरांत जरी उंदीर, टोळ वगैरेचा उपद्रव अधिक झाला व रोगराईचें भय अधिक झालें तरी लोकांजवळ द्रव्य व धान्य पुष्कळ होईल. राजे व इतर लोक यांना मानसिक त्रास किंवा बाह्यत्रास होणार नाहीं. (रा०) पाऊस पुष्कळ पडेल. सज्जनलोक तपश्चर्या करून सुखानें राहतील. पिकें चांगली येतील. वृक्षांना पुष्कळ फळें लागतील.

क० धान्यं सुभिक्षमतुलं धनिनां नराणां क्षेमं सदैव फलपुष्पभरो द्रुमाणाम् ॥
वर्षंति मेघनिकराः प्रचुरांबुधाराः सिद्धार्थिनाम्नि धरणीपतयो विवैराः॥५३॥
रा० प्रशांतवैराः क्षितिपाः प्रजानां क्षेमं सुभिक्षं प्रचुरांबुवृष्टिः ॥
द्रुमाः प्रपूर्णाः फलपुष्पसंघैः सिद्धार्थिवर्षे धनिनां प्रवृद्धिः ५३ ॥

अर्थ—सिद्धार्थिनामक वर्षांत धान्य अतिशय सवंग होईल. लोकांचें कल्याण होईल. झाडें नेहमीं फुलें व फळें यानीं भरून जातील. पाऊस पुष्कळ पडेल. राजे लोकांत परस्परामधील द्वेषभाव नाहींसा होईल.

क० धान्यनाशनमतीव तस्कराः स्वल्पवर्षणकराः पयोधराः ॥
राजवृंदमखिलं रणोन्मुखं रौद्रनाम्नि जगतोऽल्पकं सुखम् ॥ ५४ ॥
रा० परस्परं विग्रहिणो नृपाः स्युः शार्दूलचोरादिभयं जनानाम् ॥
वार्यल्पमास्मिन्सति रौद्रवर्षे सौख्यं नृपाणामिह गुर्जराणाम् ॥ ५४ ॥

अर्थ—रौद्रनामक संवत्सरांत धान्याची नासाडी होईल. चोरांचा ( व वाघांचा–रा० ) उपद्रव फार होईल. पाऊस थोडा पडेल (–पाणी आटेल–रा० ). सर्व राजे लोक युद्धाविषयीं उत्सुक होतील. लोकांना अगदीं थोडें सुख लागेल. ( –गुजराथेंतील राजे लोकांना सुख लागेल ).

क० मेदिनीपतिगणोऽतिदुर्मतिः संततं निहतशत्रुसंहतिः ॥
दुर्मतौ तु किल सर्वदेहिनः पुत्रपौत्रधनमित्रशोभिनः ॥ ५५ ॥

रा० सर्वे नृपा दुष्टधियो भवंति रिपून्विनिर्जित्य जवादुपेतान् ॥
तथापि लोकाः सुखसौख्ययुक्ताः संवत्सरे दुर्मतिनाम्नि जाते ॥ ५५ ॥

अर्थ—दुर्मति संवत्सरांत राजे लोक दुष्टबुद्धीचे होतील व ते नेहमीं आपल्या शत्रुगणाला जिंकतील. सर्व लोकांना मुलगे, नातू, द्रव्य आणि मित्र यांचें सुख मिळेल.

क० भूभृतां बहुसुखं न विग्रहः स्यात्क्षितौ सकलधान्यसंग्रहः ॥
पूर्वदेशविलयोऽपरे स्थिरा दुंदुभौ सुजलदाः पयोधराः ॥ ५६ ॥

रा० सस्यैः प्रपूर्णा जगती नृपाणां गृहेषु कल्याणविधिः प्रभूतः ॥
चोरक्षयः शांतधियो नृपाः स्युर्वर्षेऽतिवृष्टिः सति दुंदुभौ च ॥ ५६ ॥

अर्थ—दुंदुभिसंवत्सरांत राजे लोकांना फार सुख लागेल व त्यांच्यामध्यें कलह होणार नाहीं. पृथ्वीवर सर्व धान्यांचा संग्रह वाढेल. पूर्वेकडील देशाचा नाश होईल, पण बाकीच्या देशांना उपसर्ग लागणार नाहीं. पाऊस चांगला पडेल. (–चोरांचा नाश होईल. रा० )

क० धरणी रहिता कणादिना धरणीनाथगणो रणोन्मनाः ।
जगतो गदतोऽगशोषणं रुधिरोद्गारिणि नांबुवर्षणम् ॥ ५७ ॥

रा० यांचंतः सलिलं नृपाः प्रतिभटान्भूपान्विजित्याहवे ।
वापीमध्यकृताल्पकूपजनितः पंकोऽम्बुना वर्जितः ॥
सस्यं नैव मही ददाति रुधिरोद्गारिण्यनल्पामयो ।
लोकान्पीडयति प्रभूतमलकः संजायते क्वाऽपि च ॥ ५७ ॥

अर्थ—रुधिरोद्गारी संवत्सरांत पृथ्वीवर धान्य वगैरे पिकणार नाहीं. राजे लोकांचा समुदाय युद्धाविषयीं उत्सुक होईल. (–युद्धांत शत्रूला जिंकून त्या श्रमामुळें

पाणी पाणी करीत विहिरींत पाणी नसल्यामुळें झरे काढतील; पण त्यांतसुद्धां पाणी न येतां-चिखल लागेल-रा० ). रोगामुळें लोकांचीं शरीरें शुष्क होतील. ( कोठें कोठें दुष्कर्म फार वाढेल-रा० ). पाऊस पडणार नाहीं.

क० सस्यं प्रणश्यति भयं बहु तस्कराणां युद्धं परस्परमतीव नरेश्वराणाम् ।
रक्ताक्षिनाम्नि न जलं प्रबलो निदाघः स्यादीतिरोगविकलो निखिलो जनौघः॥५८॥

रा० प्रभूतसस्यं प्रचुरश्च रोगो नृपाः प्रजानामहितोद्यमाः स्युः ॥
रक्ताक्षिवर्षे जनता समस्ता चोरेतिभीत्याकुलिता महर्घा ॥ ५८ ॥

अर्थ—रक्ताक्षी नामक संवत्सरांत धान्याची नासाडी होईल. ( धान्य पुष्कळ होईल-रा० ). चोरांची भीति फार होईल. राजे लोक एकमेकाशीं फार झगडतील. ( प्रजेला पीडा देतील-रा० ). पाऊस पडणार नाहीं. उन्हाचा ताप अधिक होईल. उंदीर वगैरे उपद्रवामुळें व रोगामुळें लोक त्रस्त होऊन जातील.

क० आदिमधान्यलयोऽन्तिमपोषः स्यात्क्षितिपालगणोऽधिकरोषः ॥
मध्यममंबु ददाति सुरेशः क्रोधिनि नाम्नि धनादिकनाशः ॥ ५९ ॥

रा० पूर्वं च धान्यं प्रचुरं सुरेशः करोति वृष्टिं क्वचिदेव तुच्छाम् ॥
जना नृपाः क्रोधपरा नितांतं स्यात्क्रोधनाब्दे परसस्यवृद्धिः ॥ ५९ ॥

अर्थ—क्रोधीनामक संवत्सरांत पहिल्या पिकांची नासाडी होईल. ( पहिलीं पिकें उत्तम येतील. रा० ) मागचीं पिकें जोरांत येतील. राजे लोक ( व इतर लोक विशेष तापट होतील. पाऊस मध्यम पडेल. ( तुरळक पाऊस पडेल—रा० ) द्रव्य वगैरे नाहींसें होईल.

क० भूभृतः परमयुद्धकारकाश्चौरभीरजलदा बलाहकाः ॥
इक्षुतूलमधुधान्यनाशनं स्यात्क्षये तदपि लोकजीवनम् ॥ ६० ॥

रा० कार्पासतैलेक्षुमधूनि नूनं क्षीणंति लोकाः परितो रुजार्ताः ॥
तथापि जीवंति हि येन केन स्वल्पं च सस्यं क्षयनाम्नि वर्षे ॥ ६० ॥

अर्थ—क्षय संवत्सरांत—राजे लोक फार लढाया करतील. सर्वत्र चोरांची भीति पसरेल. मेघ पाऊस पाडणार नाहींत. ऊंस, कापूस, मध व धान्य हीं नाश पावतील; तरीपण लोकांची साधारण उपजीविका चालेल. ( लोक रोगग्रस्त होतील—रा० ).

## संवत्सरशरीरफलम्.

कृत्तिकाद्वितयं देहो वत्सरस्य प्रकीर्तितः ।
पूर्वाषाढाद्वयं नाभिः सार्पं हृत् कुसुमं मघा ॥ १ ॥ कृ.
निपीडिते पापखगेन देहे विनाशता चानलभीर्नृदेहे ।
नाभ्यां भयं क्षुज्जनितं न वन्यं फलादि पुष्पे हृदये न धान्यम् ॥ २ ॥ कृ.

अर्थ—कृत्तिका व रोहिणी हीं दोन महानक्षत्रें वर्षाचें शरीर होय; पूर्वाषाढा व उत्तराषाढा हीं बेंबी ( नाभि ), आश्लेषा हें हृदय व मघा हे डोळे होत.

देह ह्मणजे कृत्तिका व रोहिणी हीं दोन नक्षत्रें दुष्ट ग्रहांनीं युक्त किंवा विद्ध असतील तर मनुष्यांच्या शरीराचा नाश होईल व त्यांस विस्तवापासून भीति उत्पन्न होईल. त्याचप्रमाणें पूर्वाषाढा व उत्तराषाढा या नक्षत्रांची स्थिति असेल तर लोक भुकेनें व्याकूळ होतील; मघा नक्षत्राची असेल तर रानांत फळें वगैरे येणार नाहींत व आश्लेषा नक्षत्राची असेल तर धान्य येणार नाहीं.

## संवत्सरफलम्.

प्रभवाद्विगुणं कृत्वा त्रिभिर्न्यूनं च कारयेत् ।
सप्तभिस्तु हरेद्भागं शेषे ज्ञेयं शुभाशुभम् ॥ ३ ॥
एकं चत्वारि दुर्भिक्षं पंचद्वाभ्यां सुभिक्षकम् ।
त्रिषष्ठे तु समं ज्ञेयं शून्ये पीडा न संशयः ॥ ४ ॥ ज्यो. सा.

अर्थ—प्रभवादि संवत्सरापासून चालू संवत्सरापर्यंत मोजून त्या संख्येची दुप्पट करावी. दुपटींतून ३ वजा करावेत. वजाबाकीस ७ नीं भागावें. बाकी उरेल त्यावरून शुभाशुभ फल जाणावें. १ अथवा ४ उरले तर महर्घता, ५ किंवा २ उरले तर सुभिक्षता, ३ किंवा ६ उरले तर धारण सम राहील, आणि शून्य राहिलें तर लोकांस पीडा होईल.

## अयन.

भानोर्मकरसंक्रान्तेः षण्मासा उत्तरायणम् ।
कर्कादिस्तु तथैव स्यात्षण्मासा दक्षिणायनम् ॥ ५ ॥
सूर्यसिद्धान्त.

शिशिरपूर्वमृतुत्रयमुत्तरं ह्ययनमाहुरहश्च तदामरं ।
भवति दक्षिणमन्यऋतुत्रयं निगदिता रजनी मरुतां हि सा ॥ ज्यो. सा. ॥ ६ ॥

अर्थ—शिशिर, वसंत व ग्रीष्म या ३ ऋतूंत सूर्याची गति उत्तरेस असते ह्मणून या ३ ऋतूंस उत्तरायण ह्मणतात. उत्तरायण देवांचा दिवस होय. याचा आरंभ मकरसंक्रांतीपासून होतो.

वर्षाऋतु, शरदृतु व हेमंतऋतु या ३ ऋतूंत सूर्याची गति दक्षिणेस असते ह्मणून या ३ ऋतूंस दक्षिणायन ह्मणतात. दक्षिणायन देवांची रात्र होय. याचा आरंभ कर्कसंक्रांतीपासून होतो.

याप्रमाणें उत्तरायण व दक्षिणायन अशीं दोन अयनें मिळून १ वर्ष होतें.

नक्रात्कर्कात्षट् सूर्ये सौम्ययाम्यायने क्रमात् ।
सौम्यायने शुभं सर्वं कुर्याद्याम्यायने त्वसत् ॥ ७ ॥

अर्थ—मकरापासून व कर्कापासून सहा सहा राशींस सूर्य असतांना अनुक्रमें उत्तरायण व दक्षिणायन होतें. उत्तरायणांत सर्व शुभ कर्में करावींत. दक्षिणायनांत शुभकर्में वर्ज्य करावींत.

गृहप्रवेशत्रिदशप्रतिष्ठाविवाहचौलव्रतबंधपूर्वम् ।
सौम्यायने कर्म शुभं विधेयं यद्गर्हितं तत्खलु दाक्षिणे च ॥ ८ ॥

अर्थ—गृहप्रवेश, देवांची स्थापना, विवाह, चौल, उपनयन इत्यादि पुण्यकारक कर्में उत्तरायणांत करावींत. जारण मारण वगैरे निंद्यकर्में दक्षिणायनांत करावींत.

## ऋतुप्रकरणम्.

ऋतुर्द्विविधः सौरश्चान्द्रश्च ।

अर्थ—ऋतु दोन प्रकारचे आहेत. एक सौरमान व दुसरा चांद्रमान असे आहेत.

१ सौर—द्विराशिनाथा ऋतवस्ततोऽपि शिशिरादयः ।
मेषादयो द्वादशैते मासास्तैरेव वत्सरः ॥ ९ ॥ सू. सिं.
मृगादिराशिद्वयभानुभोगात्षडर्तवः स्यु शिशिरो वसंतः ॥
ग्रीष्मश्च वर्षा च शरच्च तद्वद्धेमंतनामा कथितः स षष्ठः ॥ १० ॥ ज्यो. सा.

अर्थ - मकरादि २ राशी सूर्यानें भोगिल्या ह्मणजे शिशिरऋतु होतो. याप्रमाणें दोन दोन राशी सूर्यानें भोगिल्या ह्मणजे एकेक ऋतु होतो. या मताप्रमाणें

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| १ मकर<br>२ कुंभ | शिशिरऋतु | १ | ७ कर्क<br>८ सिंह | वर्षाऋतु | ४ |
| ३ मीन<br>४ मेष | वसंतऋतु | २ | ९ कन्या<br>१० तूळ | शरदृतु | ५ |
| ५ वृषभ<br>६ मिथुन | ग्रीष्मऋतु | ३ | ११ वृश्चिक<br>१२ धन | हेमंतऋतु | ६ |

## मतांतरम्.

मेषादितो द्विद्विभभानुभोगाद्वसंतपूर्वा ऋतवः षडुक्ताः ॥ ११ ॥

अर्थ—मेषापासून दोन दोन राशी सूर्यानें भोगिल्या ह्मणजे क्रमानें वसंत आदिकरून ६ ऋतु होतात असेंही एक मत आहे. याप्रमाणें—

| | | | |
|---|---|---|---|
| १ मेष<br>२ वृषभ | = १ वसंतऋतु. | ७ तूळ<br>८ वृश्चिक | = ४ शरदृतु. |
| ३ मिथुन<br>४ कर्क | = २ ग्रीष्मऋतु. | ९ धनु<br>१० मकर | = ५ हेमंतऋतु. |
| ५ सिंह<br>६ कन्या | = ३ वर्षाऋतु. | ११ कुंभ<br>१२ मीन | = ६ शिशिरऋतु. |

२. चांद्रः—चांद्रमानानें = मासपरत्वेंऋतु.

चैत्रादिद्विद्विमासाभ्यां वसंताद्यृतवश्च षट् ।
दाक्षिणात्याः प्रगृह्णंति दैवे पित्र्ये च कर्मणि ॥ १२ ॥
वसंतश्चैत्रवैशाखौ ग्रीष्मः शुक्रशुची उभौ ।
वर्षर्तुः श्रावणो भाद्र आश्विनः कार्तिकः शरत् ॥ १३ ॥
मार्गपौषौ च हेमंतः शिशिरो माघफाल्गुनौ ॥
सौरचांद्रमसैर्मासैः सौरचांद्रर्तवः स्मृताः ॥ १४ ॥

अर्थ—चैत्र आदिकरून जे १२ मास त्यांपैकीं दोन दोन मासाचा एकेक याप्रमाणें क्रमानें वसंत आदिकरून ६ ऋतु होतात. दक्षिण देशांतील लोक सर्व हव्यकव्यांत हाच क्रम घेतात.

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| १ चैत्र<br>२ वैशाख | = १ वसंत | ५ श्रावण<br>६ भाद्रपद | = ३ वर्षा | ९ मार्गशीर्ष<br>१० पौष | = ५ हेमंत |
| ३ ज्येष्ठ<br>४ आषाढ | = २ ग्रीष्म | ७ आश्विन<br>८ कार्तिक | = ४ शरद् | ११ माघ<br>१२ फाल्गुन | = ६ शिशिर |

## कालतत्वविवेचनांत.

मासशब्दश्चांद्र एव मुख्यस्तत्राप्यमांतके ॥
सौरसावननाक्षत्रकृष्णादिषु यतः कुतः ॥ १५ ॥
त्रिंशत्तिथिसमूहे च गौणो मध्वादयोऽपि च ॥
चैत्रादयश्च तद्भेदवाचकत्वात्तथाविधाः ॥ १६ ॥ मु. सिं.

अर्थ— अमावास्येस संपणारा जो चांद्रमास त्याचेंच मास हें नांव मुख्यत्वेंकरून आहे. सौर, सावन, नाक्षत्र, वद्य प्रतिपदेपासून चालू होणारा जो चांद्र आणि ज्या कोणत्याही तिथीपासून तीस तिथीपर्यंत जो चांद्रमास ह्या पांचांस मास हें नांव गौणत्वेंकरून राहतें. याप्रमाणेंच ज्या वसंत, ग्रीष्म इत्यादिक ऋतूंच्या संज्ञा आणि ज्या चैत्र, वैशाख इत्यादिक मासांच्या संज्ञा त्याही अमावास्यांत चांद्रमासावर मुख्य व इतर पांचांवर गौण आहेत असें जाणावें.

## कालनिर्णयदीपिकानुसारी स्फुट.

चांद्रादिभिर्द्वादशभिर्मासैश्चांद्रादिवत्सराः ॥
पंच प्रकारा मुनिभिर्नाक्षत्रेण विनोदिताः ॥ १७ ॥ मु. सिं.

अर्थ—बारा चांद्रमासांनीं एक चांद्रसंवत्सर होतो. याप्रमाणेंच नाक्षत्रमानावांचून इतर चार मानांचे संवत्सरांचें स्वरूप समजावें असें हेमाद्रीचें मत आहे. नाक्षत्रमानाचे बारा मासांनींच संवत्सर होतो असें मतांतरही पूर्वीं संवत्सरप्रकरणांत लिहिलें आहे.

## चांद्रप्राधान्यम्.

श्रौतस्मार्तक्रियाः सर्वाः कुर्याच्चांद्रमसर्तुषु ।
तदभावे तु सौरर्तुष्विति ज्योतिर्विदां मतम् ॥ १८ ॥

अर्थ—सर्व श्रौतस्मार्त कर्में चांद्र ऋतूमध्यें करावींत. त्यांत न संभवेल तर सौर ऋतूंत करावींत असें ज्योतिषज्ञांचें मत आहे.

## अथ मासप्रकरणम्.

नाक्षत्रः सावनश्चांद्रः सौरोमासश्चतुर्विधः ।
नाक्षत्रो भूभ्रमादिंदोस्त्रिंशद्वारस्तु सावनः ॥ १९ ॥
चांद्रो दर्शावधिर्मासः सौरः स्यात्संक्रमाद्रवेः ।
चैत्रादि संज्ञा चांद्राणां सौराणां च झषार्कतः ॥ २० ॥ मुः मा.
रवींदोर्युतेः संयुतिर्यावदन्या विधोर्मास एतच्च पित्र्यं द्युरात्रं ॥ २१ ॥
दर्शावधिं मासमुशंति चांद्रं सौरं तथा भास्करराशिभोगात् ।
त्रिंशद्दिनं सावनसंज्ञमार्या नाक्षत्रमिंदोर्भगणाश्रयाच्च ॥ २२ ॥
पूर्वराशिं परित्यज्य उत्तरां याति भास्करः ।
सा राशिः संक्रमाख्या स्यान्मासर्त्वयनहायने ॥ २३ ॥ ज्यो. सा.

**अर्थः**—कालगणनेचे जरी ९ प्रकार आहेत तथापि सौर, चांद्र, सावन व आर्क्ष ( नाक्षत्र ) मानें हींच फक्त व्यवहारोपयोगी आहेत असें मागें सांगितलेंच आहे. त्याप्रमाणें मास ( महिने ) ही चार प्रकारचे आहेत.

**१ चांद्रमास**—रवि व चंद्र यांची युति एकदां झाल्यापासून पुनः त्यांची युति होण्यास लागणाऱ्या काळास एक चांद्रमास ह्मणतात. हा एक महिना ह्मणजे पितरांचें एक अहोरात्र होय. हा अमांत असतो ह्मणजे शुक्ल प्रतिपदेपासून अमावास्येपर्यंतचा जो काळ त्यास चांद्रमास ह्मणतात. एक चांद्रमास ३० तिथींचा किंवा २९ $\frac{1}{2}$ दिवसांचा ( सूक्ष्म रीत्या २९ दिवस ३१ घटिका ५० पळें ) आहे. ज्यो. प्र.

चांद्रोऽपि शुक्लपक्षादिः कृष्णादिर्वेति च द्विधा ।
दर्शांतो वैदिको मासो राकांतः स्मार्त उच्यते ॥ २४ ॥ नि. सिं.

**अर्थ**—चांद्रमासाचे पुनः दोन प्रकार आहेत. एक शुक्ल प्रतिपदेपासून अमावास्येपर्यंत व दुसरा कृष्ण प्रतिपदेपासून पौर्णिमेपर्यंत. पहिल्यास वैदिक मास व दुसऱ्यास स्मार्त मास असें ह्मणतात.

कृष्णपक्षादिकं मासं नांगीकुर्वंति केचन ।
येऽपीच्छंति न तेषामपीष्टो विंध्यस्य दक्षिणे ॥ २५ ॥

**अर्थ**—कृष्ण प्रतिपदेपासून आरंभलेला जो मास—ह्मणजे स्मार्त मास—त्याचा कांहीं पंडित मुळींच अंगिकार करीत नाहींत. जे कित्येक त्याचा स्वीकार करितात,

---

१ त्रिंशता तिथिभिर्मासश्चांद्रः पित्र्यमहः स्मृतं । निशा च मासपक्षांतौ तयोर्मध्ये विभागतः ॥ सू. सि.

त्यांचेंसुद्धां ह्मणणें विंध्याद्रीच्या ( सातपुडा डोंगराच्या ) दक्षिणेस तो घेऊं नये असें आहे. विंध्याद्रीच्या उत्तरेस पूर्णिमांत मास धरण्याचाच वहिवाट आहे.

२ सौरमास :—

मीनादिस्थो रविर्येषामारंभप्रथमक्षणे ।
भवेत्तेऽब्दे चांद्रमासाश्चैत्राद्या द्वादश स्मृताः ॥ २६ ॥
चैत्रादिसंज्ञाः सौराणां मासानां मीनसूर्यतः ।
मेषार्काद्वेति तु प्राह बौधायनमहामुनिः ॥ २७ ॥

अर्थ—सूर्यास १ राशि आक्रमण करण्यास जो काल लागतो त्यास सौरमास ह्मणतात. सूर्यास १ राशि भोगण्यास २९ १/२ दिवसांपेक्षां जास्त दिवस ( ३० दि. २६ घ. १७ प. ३१ वि. ५२ प्र. वि. ३० प्रति प्रति विपलें ) लागतात. ह्मणून चांद्रमासांत संक्रमण दर महिन्यास एक दोन तिथी पुढें जातें. सौरमानानेंही मास, ऋतु, अयन आणि वर्ष यांची गणना करतात. उदाहरणार्थ ज्या चांद्र मासांत मेष संक्रांति होईल त्यास चैत्र, वृषभ संक्रांति होईल त्यास वैशाख याप्रमाणें ह्मणण्याची पद्धति आहे. किंवा ज्या मुख्य चांद्रमासाच्या शुक्ल प्रतिपदेचा प्रारंभ मीनस्थ सूर्य असतां होतो त्यास चैत्रादि नांवें देतात.

३ सावनमास—हा ३० दिवसांचा ह्मणजे ३० सूर्योदयाचा आहे.

४ नाक्षत्रमास—चंद्राला २७ नक्षत्रें आक्रमण करण्यास जो काल लागतो त्यास नाक्षत्रमास ह्मणतात.

## मासांचीं नांवें, सूर्य, देवता वगैरे.

मधुस्तथा माधवसंज्ञकश्च शुक्रः शुचिश्चाथ नभो नभस्यः ।
तथेष उर्जश्च सहाः सहस्यस्तपस्तपस्यश्च यथाक्रमेण ॥ २८ ॥
अरुणो माघमासे तु सूर्यो वै फाल्गुने तथा ।
चैत्रमासे तु वेदांगो भानुर्वैशाख एव च ॥ २९ ॥
ज्येष्ठमासे तपेदिंद्र आषाढे तपते रविः ।
गभस्तिः श्रावणे मासे यमो भाद्रपदे तथा ॥ ३० ॥
सुवर्णरेताऽश्वयुजि कार्तिके च दिवाकरः ।
मार्गशीर्षे तपेन्मित्रः पौषे विष्णुः सनातनः ॥ ३१ ॥

इत्येते द्वादशादित्या मासनामान्यनुक्रमात् ।
केशवं मार्गशीर्षे तु पौषे नारायणं विदुः ॥ ३२ ॥
माधवं माघमासे तु गोविंदमथ फाल्गुने ।
चैत्रे विष्णुं तथा विंद्याद्वैशाखे मधुसूदनम् ॥ ३३ ॥
त्रिविक्रमं तथा ज्येष्ठे आषाढे वामनं विदुः ।
श्रावणे श्रीधरं विद्धि हृषीकेशं तु भाद्रके ॥ ३४ ॥
आश्विने पद्मनाभं च ऊर्जे दामोदरं विदुः ।
मार्गशीर्षे विशालाक्षी पौषे लक्ष्मीश्च देवता ॥ ३५ ॥
माघे तु रुक्मिणी प्रोक्ता फाल्गुने धात्रिनामिका ।
चैत्रे मासे रमा देवी वैशाखे मोहिनी तथा ॥ ३६ ॥
पद्माक्षी ज्येष्ठमासे तु आषाढे कमलेति च ।
कांतिमती श्रावणे च भाद्रे तु अपराजिता ॥ ३७ ॥
पद्मावती आश्विने तु राधादेवी तु कार्तिके ॥ ३८ ॥

अर्थ—कोष्टकरूपानें खालीं दिला आहे.

| अ. | मासनाम. | माससंज्ञा. | सूर्य. | पुंदेवता. | स्त्रीदेवता. |
|---|---|---|---|---|---|
| १ | चैत्र. | मधु. | वेदांग. | विष्णु. | रमा. |
| २ | वैशाख. | माधव. | भानु. | मधुसूदन. | मोहिनी. |
| ३ | ज्येष्ठ. | शुक्र. | इंद्र. | त्रिविक्रम. | पद्माक्षी. |
| ४ | आषाढ. | शुचि. | रवि. | वामन. | कमला. |
| ५ | श्रावण. | नभ. | गभस्ति. | श्रीधर. | कांतिमती. |
| ६ | भाद्रपद. | नभस्य. | यम. | हृषीकेश. | अपराजिता. |
| ७ | आश्विन. | इष. | सुवर्णरेता. | पद्मनाभ. | पद्मावती. |
| ८ | कार्तिक. | ऊर्ज. | दिवाकर. | दामोदर. | राधा. |
| ९ | मार्गशीर्ष. | सह. | मित्र. | केशव. | विशालाक्षी. |
| १० | पौष. | सहस्य. | विष्णु. | नारायण. | लक्ष्मी. |
| ११ | माघ. | तप. | अरुण. | माधव. | रुक्मिणी. |
| १२ | फाल्गुन. | तपस्य. | सूर्य. | गोविंद. | धात्री. |

अर्थ—माघ मासांत नवमी तिथीस चंद्राला खळें पडेल तर आषाढ मासीं अति मोठा पाऊस पडून सर्व धान्यें महाग होतील.

शुक्लपक्षस्य सप्तम्यां माघे व्योमान्वितं घनैः ।
परो वातोऽथ कौबेरो वारुणी चंचला यदि ॥ २१८ ॥
हिमं पतति वा तत्र वांति वातास्तथोद्धताः ।
तदा सुभिक्षमादेश्यं तस्मिन्देशे विचक्षणैः ॥ २१९ ॥

अर्थ—माघ शुद्ध सप्तमीस आकाशांत जर ढग येतील, पश्चिमेकडील किंवा उत्तरेकडील वारा सुटेल, पश्चिमेस वीज होईल व त्या दिवशीं दहिंवर पडेल किंवा वावटळ येईल तर ज्या देशांत असें होईल त्या ठिकाणीं सुबत्ता होईल असें सूज्ञांनीं सांगावें.

माघमासे तपस्ये वा चैत्राषाढे च माधवे ।
सप्तमी स्वातिसंयुक्ता लक्षणं च शुभप्रदम् ॥ २२० ॥

अर्थ—माघ, फाल्गुन, चैत्र, आषाढ व वैशाख या महिन्यांत सप्तमीला जर स्वाती नक्षत्र येईल तर तें कल्याणदायक समजावें.

माघस्य नवमी कृष्णा दशम्येकादशी यदा ।
विद्युद्वातसमायुक्ता तदा बहुजलप्रदा ॥ २२१ ॥

अर्थ—माघ कृष्ण नवमी, दशमी, एकादशी या दिवशीं जर वीज होऊन वारा सुटेल तर पाऊस पुष्कळ पडेल.

कृष्णायां वा चतुर्दश्यां त्रयोदश्यामथापि वा ।
पूर्वस्यां चपला मेघास्तदाषाढे च वर्षणम् ॥ २२२ ॥

अर्थ—माघ कृष्ण चतुर्दशी किंवा त्रयोदशी या तिथीला पूर्वेस वीज होईल, आकाशांत ढग येतील तर आषाढमासीं पाऊस पडेल.

पंचमी कृष्णपक्षस्य माघमासस्य वृष्टिका ।
सप्तमी शुक्रमंदेंदुयुक्ता सस्यार्घदा मता ॥ २२३ ॥

अर्थ—माघ कृष्ण पंचमी शुक्र, शनि व सोम या वारीं येईल तर वृष्टि होईल व सप्तमी या वारीं येईल तर धान्य महाग होईल.

एते योगा यदा माघे न भवंति यदा तदा ।
गोधूमाः शालयो मुद्गा भाद्रे यांति महर्घतां ॥ २२४ ॥

अर्थ – माघ मासीं वर निर्दिष्ट केलेले योग जर येणार नाहींत, तर गहूं, साळी आणि मूग हीं धान्यें भाद्रपद मासीं महाग होतील.

माघमासे त्रयोदश्यां हिमैराच्छादितं नभः ।
यदा तदा समर्घंति व्रीहयो नात्र संशयः ॥ २२५ ॥

अर्थ—माघ त्रयोदशीला आकाश धुक्यानें भरून जाईल तर तांदूळ खात्रीनें सवंग होतील.

आमावास्या यदा छन्ना तदा भाद्रे जलं भवेत् ।

अर्थ —माघी अमावास्येला ढग येतील तर भाद्रपदांत पाऊस पडेल.

पौर्णमासी घनैश्छन्ना षष्टे मासे महर्घता ॥ २२६ ॥

अर्थ—माघी पौर्णिमेला आकाशांत ढग येतील तर सहावे महिन्यांत महागाई होईल.

माघस्य शुक्लसप्तम्यां यदि स्याद्वारिवर्षणं ।
सविद्युन्मेघसंयुक्तं तदा पृथ्वी जलाकुला ॥ २२७ ॥

अर्थ - माघ शुद्ध सप्तमीला पाऊस पडेल किंवा आकाशांत ढग येतील व त्यांतच वीज चमकेल तर सर्व पृथ्वीवर पाऊस पडेल.

## अथ फाल्गुनमासफलम्.

यदा वक्रगतौ स्यातां शनिभौमौ तपस्यके ।
माघे चाद्यासु तिथिषु त्रिषु सस्यस्य संग्रहः ॥ २२८ ॥
कार्यो विपश्चिता तत्र पक्षांते स्याच्चतुर्गुणम् ।

अर्थ—फाल्गुन मासांत शनि व मंगळ वक्री होतील तर माघमासांतील पहिल्या तीन तिथींवर धान्य खरेदी करून ठेवावें. पंधरा दिवसांत चौपट किंमत येईल.

फाल्गुने च गुरोरस्तं वक्रं वा यदि जायते ॥ २२९ ॥
तदा सस्यमहर्घत्वं शनिर्वा वक्रतां व्रजेत् ।

अर्थ—फाल्गुन मासांत जर गुरूचा अस्त होईल किंवा तो वक्री होईल किंवा शनि वक्री होईल तर धान्य महाग होईल.

यदा फाल्गुनके मासे प्रयात्यस्तं भृगोः सुतः ॥ २३० ॥
धान्यादि सर्वसस्यानां तदा वाच्या महर्घता ।

काविरस्तं यदा याति फाल्गुने मासि निश्चितं ॥ २३१ ॥
तदा दुर्भिक्षमादेश्यं षण्मासं दैवचिंतकैः ।

अर्थ--फाल्गुन मासांत शुक्राचा अस्त होईल तर धणे वगैरे सर्व धान्यें महाग होतील व सहा महिने दुष्काळ पडेल.

सप्तमी कृत्तिकायुक्ता फाल्गुनस्यासिता यदा ॥ २३२ ॥
तदा भाद्रपदे मासि कुहामेघः प्रवर्षति ।

अर्थ--फाल्गुन वद्य सप्तमीस कृत्तिका नक्षत्र येईल तर भाद्रपदांत कुहू ( घनवृष्टि ) सारखा पाऊस पडेल.

विना वातं घनैच्छन्नं वियत्तस्यां तिथौ यदा ॥ २३३ ॥
विद्युद्वा दृश्यते तत्र तदा सस्यावृता मही ।

अर्थ--फाल्गुन वद्य सप्तमी तिथीस वारा न सुटतां आकाश ढगांनीं आच्छादिलें जाऊन त्यांत वीज चमकेल तर पृथ्वीवर धान्य विपुल होईल.

फाल्गुनस्य त्रयोदश्यां अष्टम्यां वृष्टिरुत्तमा ॥ २३४ ॥
यदि स्याच्च सितायां वै तदा लोका निरामयाः ।

अर्थ—फाल्गुन महिन्यांतील शुक्ल त्रयोदशी, अष्टमी या तिथींस पाऊस पडेल तर लोकांतील रोगराई नाहींशी होईल.

प्रतिपच्छुक्लपक्षस्य वृद्धिं याति शुभं यदा ॥ २३५ ॥
त्रुटिता दुःखदा प्रोक्ता चतुर्दश्यष्टमी तथा ।

अर्थ—फाल्गुन शुद्ध प्रतिपदा, अष्टमी व चतुर्दशी या तिथींची वृद्धि होईल तर त्या कल्याणावह आहेत, क्षय होईल तर त्या दुःख देणाऱ्या होतील.

फाल्गुने मीनसंक्रांतिर्भानुवारे नृपक्षयः ॥ २३६ ॥
भौमशन्योश्च दुर्भिक्षं शुभं जीवे कवौ विधौ ।

अर्थ—फाल्गुन मासीं मीन संक्रमण रविवारीं होईल तर राजाचा नाश होईल, मंगळवारीं व शनिवारीं होईल तर दुष्काळ पडेल आणि गुरु, शुक्र व चंद्र यांचे वारीं होईल तर तें कल्याणावह आहे.

माघे हिमं न पतितं वाता वांति न फाल्गुने ॥ २३७ ॥
न च व्योमान्वितं चैत्रे घनैर्न पतितं खलु ।

करकाणां च वैशाखे शुक्रे चंडातपो न हि ॥ २३८ ॥
दाहातितुच्छदृष्टिः स्यात्प्रावृट्काले न संशयः ।

**अर्थ**—माघमासीं दहिंवर पडणार नाहीं, फाल्गुनमासांत धारा बंद पडेल, चैत्रमासीं आकाशांत ढग उठणार नाहींत व पाऊसही पडणार नाहीं, वैशाखांत गारांची वृष्टि होणार नाहीं व ज्येष्ठमासीं उन्ह तापणार नाहीं, तर पावसाळ्यांत कडक उन्हाळा पडेल ( डोळ्यांतून ठिणग्या बाहेर पडतील. )

## अथ पक्षप्रकरणम्.

पूर्वापरं मासदले हि पक्षौ पूर्वापरौ तौ सितनीलसंज्ञौ ।
पूर्वस्तु दैवस्त्वपरश्च पैत्र्यः केचित्तु कृष्णे सितपंचमीतः ॥
आदौ शुक्लः प्रवक्तव्यः केचित्कृष्णोऽपि मासके ॥ १ ॥

**अर्थ**—एका महिन्याचे दोन भाग केले असतां प्रत्येक भागास पक्ष ( पंध्रवडा ) अशी संज्ञा आहे. या दोन भागांपैकीं पूर्वार्धास सितपक्ष किंवा शुक्लपक्ष ( शुद्धपक्ष ) ह्मणतात व द्वितीयार्धास नीलपक्ष अथवा कृष्णपक्ष किंवा बहुलपक्ष असें ह्मणतात. सित किंवा शुक्ल ह्मणजे पांढरा व नील किंवा कृष्ण ह्मणजे काळसर. चांदण्याचा प्रकाश पांढरा स्वच्छ असून तें शुक्लपक्षांत वाढत्या प्रमाणावर असतें, ह्मणून पूर्वार्धास शुक्लपक्ष किंवा सितपक्ष असें ह्मणतात. काळोखाचा रंग काळसर असून तो द्वितीयार्धांत वाढत्या प्रमाणावर असतो, ह्मणून द्वितीयार्धास नीलपक्ष किंवा कृष्णपक्ष असें ह्मणतात. शुक्लपक्ष देवांचा व कृष्णपक्ष पितराचा आहे. कित्येक शुक्ल पंचमीपासून कृष्ण पंचमी-पर्यंत शुक्लपक्ष व पुढें कृष्ण पंचमीपासून शुक्ल पंचमीपर्यंत कृष्णपक्ष मानतात. कोणी अमांतमास मानतात व कित्येक पूर्णिमांत मास मानतात. पूर्णिमांत मास मानण्याची वहिवाट नर्मदेच्या उत्तरेस आहे.

एक पक्ष ( पंध्रवडा ) जरी साधारणपणें १५ दिवसांचा असतो, तरी तो तिथींच्या क्षयवृद्धीमुळें केव्हां केव्हां १४ किंवा १६ दिवसांचाही येण्याचा संभव असतो. इतकेंच नव्हे तर तो १३ दिवसांचाही येण्याचा संभव क्वचित् प्रसंगीं असतो.

१३ दिवसांचा पंध्रवडा जेव्हां येतो तेव्हां त्यास विश्वघस्रपक्ष ह्मणतात व तो उत्पातांत गणला आहे.

असा विश्वघस्रपक्ष येण्याचा संभव प्रतिपदा, द्वितीया किंवा तृतीया यापैकीं एखाद्या तिथीचा क्षय होऊन पुढेंही तशाच तिथी कमी कमीच होत जाऊन,

शुक्लपक्षांत असेल तर चतुर्दशी किंवा पौर्णिमा यापैकीं एका तिथीचा, कृष्णपक्षांत असेल तर चतुर्दशी किंवा अमावास्या यापैकीं एका तिथीचा, क्षय होईल तरच असतो.

गुरु शुक्रांचे अस्तांत जशीं सर्व मंगल कृत्यें वर्ज्य आहेत, तशींच या विश्वघस्र-पक्षांतही तीं वर्ज्य आहेत. ( पहा मुहूर्तचिंतामणि श्लोक ४८. )

त्रयोदशदिने पक्षे विवाहादि न कारयेत् ।
गर्गादिमुनयः प्राहुः कृते मृत्युस्तदा भवेत् ॥ २ ॥ व्यवहारचंडेश्वरः
उपनयनं परिणयनं वेश्मारंभादि कर्माणि ।
यात्रां द्विक्षयपक्षे कुर्यान्न जिजीविषुः पुरुषः ॥ ३ ॥ ज्योतिर्निबंधः

अर्थ—- तेरा दिवसांचा पक्ष येईल तेव्हां मौंजीबंधन, विवाह, वास्तु इत्यादि कृत्यें आयुष्येच्छु पुरुषानें करूं नयेत, केलीं असतां तीं मृत्युप्रद होतात.

विश्वघस्रपक्ष हा फार अनिष्टसूचक उत्पात आहे. याविषयीं प्रमाणः —-

यदा च जायते पक्षस्त्रयोदशदिनात्मकः ।
तदा कालोऽतिघोरः स्यान्मुंडमाला च मेदिनी ॥ ४ ॥ मयूरचित्रक.
पक्षस्य मध्ये द्वितिथी पतेतां तदा भवेद्रौरवकालयोगः ।
पक्षे विनष्टे सकलं विनष्टमित्याहुराचार्यवराः समस्ताः ॥ ५ ॥
त्रयोदशदिने पक्षे तदा संहरते जगत् ।
अपि वर्षसहस्रेण कालयोगः प्रकीर्तितः ॥ ६ ॥ ज्योतिर्निबंध.

तात्पर्य—विश्वघस्रपक्ष हा सर्व जगाला संहारकारक आहे. असा पक्ष पूर्वी कौरवपांडवांचे युद्धप्रसंगीं आला होता. भारतांत भीष्मपर्वांत भीष्माचार्य दुर्योधनास ह्मणतात.

चतुर्दशीं पंचदशीं भूतपूर्वां च षोडशीं ।
इमां त्वनभिजानेऽहममावास्यां त्रयोदशीं ॥ इत्यादि ॥ ७ ॥

अर्थ—प्रतिपदेपासून १४ वे, १५ वे व १६ वे दिवशीं अमावास्या आलेली मला माहित आहे; परंतु तेराव्या दिवशीं आलेली आठवत नाहीं. ( ती प्रस्तुत आलेली आहे. हा मोठा उत्पात आहे. सैन्याचा फार नाश होणार आहे. सबब युद्धापासून माघार घे. )

पूर्वी विश्वघस्रपक्ष क्वचित् प्रसंगीं येत असे; परंतु अलीकडे तो वारंवार येऊं लागला आहे. उदाहरणार्थ-शके १८१४ आषाढ कृष्ण, शके १८२८ भाद्रपद

शुद्ध, शके १८३१ ज्येष्ठ कृष्ण, याप्रमाणें येऊन शके १८३६ तहीं तो श्रावण शुद्धांत आला. याप्रमाणें थोड्या थोड्या अंतरानें तो येऊं लागला आहे. याचें कारण रविचंद्राच्या गतीमध्यें आमच्या गणितानें विशेष अंतर पडूं लागलें आहे. विश्वघस्र-पक्ष कृष्णपक्षांतील फार वाईट. शुक्लपक्षांत आलेला त्याच्यापेक्षां कांहीं बरा असें आर्य ह्मणतात.

पक्षफल वराहमिहिराचार्यांनीं सांगितलें आहे तें:—

शुक्ले पक्षे मासमध्ये प्रवृद्धे ब्रह्मक्षत्रं याति वृद्धिं प्रजाश्च ।
हीने हानिस्तुल्यता तुल्यतायां कृष्णे सर्वं तत्फलं व्यत्ययेन ॥ ८ ॥ *

अर्थ—कोणत्याही महिन्यांत शुक्लपक्षाची वाढ झाली असतां ब्राह्मण, क्षत्रिय आणि प्रजा यांचा उत्कर्ष होतो, व तो कमी झाल्यास त्यांची हानि होते व तो कमीजास्त न झाल्यास समता राहते. कृष्णपक्षांत याच्या उलट फळें येतात.

तुल्यकलाधरकलयोर्न विशेषः शुक्लकृष्णयोः कोऽपि ।
तदपि कलोपचयत्वाच्छुक्लः श्रेयान्न तादृशः कृष्णः ॥ ९ ॥ मु. मा.

अर्थ—शुक्लपक्षांत ज्या क्रमानें चंद्राच्या कला वाढत जातात त्याच क्रमानें कृष्णपक्षांत त्या कमी कमी होत जातात; ह्मणून शुक्लपक्ष व कृष्णपक्ष यामध्यें अमुक चांगला व अमुक वाईट असा जरी भेद नाहीं, तरी शुक्लपक्षांत चंद्राच्या कला वाढत असतात ह्मणून तोच श्रेष्ठ आहे. कृष्णपक्षांत चंद्राच्या कला क्षीण होत जाऊन त्याचें तेज कमी होत जातें व तो आपलें फल देण्यास असमर्थ होत होत जातो. ह्मणून कृष्णपक्ष गौण आहे.

आपूर्यमाणो मुख्यः स्यात्सर्वस्मिन्शुभकर्मणि ।
कृष्णो गौणो दशांतः स्यान्नागांतो व्रतबंधने ॥ १० ॥

अर्थ—ज्यांत चंद्राच्या कलांस भर पडते ह्मणजे त्या वाढत जातात असा शुक्लपक्ष सर्व मंगलकृत्यें करण्यास प्रशस्त आहे. कृष्णपक्ष व्रतबंधास पंचमीपर्यंत गौण आहे व पुढें निषिद्ध आहे. व्रतबंधाखेरीज इतर शुभ कार्यास दशमीपर्यंत कृष्णपक्ष गौण आहे व पुढें निषिद्ध आहे.

---

* पाठांतर—यदा याति वृद्धिं सिताख्यश्च पक्षस्तदा याति वृद्धिं नृपा लोकसंघाः
समः सौम्यदो हीनको हानिकारी च कृष्णे फलं व्यत्ययेन प्रचिंत्यम् ॥ मयूरचित्रक.

## तिथिप्रकरणम्.

आतांपर्यंत सनातन कालाचे घटक जे संवत्सर अयन, ऋतु, मास व पक्ष यांचा विचार सांगितला. आतां चांद्र मासाच्या घटक ज्या प्रतिपदादि अमांत ३० तिथि त्यांचें विवेचन करावयाचें आहे.

या पुस्तकाचें नांव "बृहत् पंचांग फलादर्श सार्थ" असें आहे. तेव्हां प्रथम पंचांग ह्मणजे काय?

## मुहूर्तमाला.

तिथिवासरनक्षत्रयोगानां करणस्य च ।
शुद्धिः पंचांगशुद्धिस्तां सर्वत्रादौ विचिंतयेत् ॥ १ ॥

तात्पर्य—पंचांग शब्दानें संवत्सर, अयन, ऋतु, मास व पक्ष हीं घ्यावयाचीं नाहींत, तर १ तिथि, २ वार, ३ नक्षत्र, ४ योग आणि ५ वें करण. या पांचांस पंचांग ह्मणतात. या पंचकांत प्रथम तिथीचें परिगणन असल्यामुळें तिलाच मुख्यत्व आहे. ह्मणून प्रथम विचार केला पाहिजे. अर्थात् तिथि हें पंचागाचें पहिलें अंग होय. पंचांगशुद्धीचा सर्व कार्यारंभीं विचार केला पाहिजे.

तिथि ह्मणजे काय? अर्काद्विनिसृतः प्राचीं यद्यात्यहरहः शशी ।
तच्चांद्रमानमंशैस्तु ज्ञेया द्वादशभिस्तिथिः ॥ २ ॥

चंद्रसूर्यामध्यें १२ अंशांचें अंतर पडण्यास जो काळ लागतो त्यास तिथि ह्मणतात. अमावास्येला चंद्रसूर्य एके ठिकाणीं येतात ह्मणजे त्यांचा संगम होतो. चंद्रसूर्यांचें पूर्व पश्चिम अंतर शून्य झालें ह्मणजे अमावास्या तिथि संपते. चंद्र, सूर्यापेक्षां फारच जलद चालतो. तो सूर्यास सोडून पूर्वेस पुढें जाऊं लागला ह्मणजे प्रतिपदेस आरंभ होतो. १२ अंश अंतर पडलें ह्मणजे प्रतिपदा संपून द्वितीयेस आरंभ होतो व याप्रमाणें १२।१२ अंशांनीं एकेक तिथि होते. तिथीचा संबंध आरंभस्थानाशीं नाहीं ह्मणून सायन व निरयणतिथि बरोबर येतात. (आमचें पंचांग ह्मणजे काय? हें पुस्तक पहा.)

## ज्योतिर्निबंधांत संहिताप्रदीप.

सर्वेषु कार्येषु शुभेषु चैव पृच्छंति लोकास्तिथिमेव पूर्वं ।
न कापि योगं करणं ग्रहान्वा तस्मात्तिथेर्मुख्यतरत्वमिष्टं ॥ ३ ॥

अर्थ--लोक सर्व मंगल कार्यांत पूर्वी तिथीचाच प्रश्न करतात आणि योग, करण व ग्रह यांस कोठेंही प्रथम विचारीत नाहींत. यास्तव तिथीला विशेषेंकरून मुख्यता आहे.

स्फुट.

प्रतिपच्च द्वितीया च तृतीया च ततः परं ।
चतुर्थी पंचमी षष्ठी सप्तमी चाष्टमी ततः ॥ ४ ॥
नवमी च दशम्येकादशी च द्वादशी ततः ।
त्रयोदशीचतुर्दश्यौ तिथयः पक्षयोः समाः ॥ ५ ॥
शुक्ला पंचदशी पूर्णा पौर्णमासी च पूर्णिमा ।
कृष्णा साऽमा त्वमावास्या दर्शः सूर्येंदुसंगमः ॥ ६ ॥

अर्थ— प्रतिपदा, द्वितीया, तृतीया, चतुर्थी, पंचमी, षष्ठी, सप्तमी, अष्टमी, नवमी, दशमी, एकादशी, द्वादशी, त्रयोदशी, चतुर्दशी अशा चवदा तिथी शुक्लपक्षांत आणि कृष्णपक्षांत सारख्या असतात. शुक्लपक्षांतील पंधराव्या तिथीला पंचदशी, पूर्णा, पौर्णमासी व पूर्णिमा हीं नांवें आहेत. कृष्णपक्षांतील पंधरावे तिथीस अमा, अमावास्या, दर्श आणि सूर्येंदुसंगम अशा संज्ञा आहेत.

रत्नमाला.

राकानुमत्याविति पौर्णमास्यौ रात्रिद्युदृष्टेंदुवशाद्भवेतां ।
कुहूः सिनीवाल्यपि नष्टदृष्टचंद्रे स्मृते चासितपंचदश्यौ ॥ ७ ॥

अर्थ-- ज्या पौर्णिमेस रात्रीं चंद्रोदय होतो तिला राका हें नांव आणि ज्या पूर्णिमेस दिवसास चंद्रोदय होतो तिला अनुमति असें नांव असतें. तसेंच ज्या अमावास्येंत चंद्रदर्शन होत नाहीं तिला कुहू अशी संज्ञा व ज्या अमावास्येंत चंद्रदर्शन होतें तिला सिनीवाली अशी संज्ञा आहे.

क्रमात्तिथीशा ब्रह्माग्नी विरिंचिर्विष्णुशैलजे ।
विनायकयमौ नागचंद्रौ स्कंदोऽर्कवासवौ ॥ ८ ॥
महेशवसवो नागदुर्गे दंडधराह्वयः ।
शिवविश्वे हरिरवी कामः शर्वकली ततः ॥ ९ ॥
शशिविश्वे दर्शसंज्ञतिथीशाः पितरः स्मृताः ।
त्रयोदश्यास्तृतीयायाः केचिदूचुर्धनाधिपः ॥ १० ॥

अर्थ--प्रतिपदेचा स्वामी ब्रह्मा किंवा अग्नी, द्वितीयेचा ब्रह्मा, तृतीयेचा विष्णु किंवा पार्वती, चतुर्थीचा गणपति किंवा यम, पंचमीचा नाग किंवा चंद्र, षष्ठीचा स्कंद, सप्तमीचा सूर्य किंवा इंद्र, अष्टमीचा शिव किंवा अष्टवसु, नवमीचा नाग किंवा दुर्गा, दशमीचा यम, एकादशीचा शिव किंवा विश्वेदेव, द्वादशीचा विष्णु किंवा सूर्य, त्रयोदशीचा काम, चतुर्दशीचा शिव किंवा कली, याप्रमाणे स्वामी दोन्ही पक्षांत तुल्य जाणावे. पूर्णिमेचा चंद्र किंवा विश्वेदेव, अमावास्येचे पितर असे स्वामी समजावे. कोण्पी ऋषी ह्मणतात कीं, त्रयोदशी आणि तृतीया यांचा स्वामी कुबेर आहे.

## तिथिसंज्ञा व मतांतरे स्वामिविचारः

### रत्नमाला.

नंदा भद्रा जया रिक्ता पूर्णाचावर्तिता तिथिः ॥
शुक्लेधमाः समाः श्रेष्ठाः कृष्णे श्रेष्ठसमाधमाः ॥ ११ ॥
वन्हिर्विरिंचो गिरिजा गणेशः फणिर्विशाखो दिनकृन्महेशः ॥
दुर्गांतको विश्वहरी स्मरश्च शर्वः शशीचेति पुराणदृष्टिः ॥
अमायाः पितरः प्रोक्तास्तिथीनामधिपाः क्रमात् ॥ १२ ॥

| अ | तिथि. | संज्ञा | स्वामी | शुक्ल प. ति | कृष्ण प. ति. | अ | तिथि. | संज्ञा | स्वामी. | शुक्ल प. तिथि | कृष्ण पक्षतिथि |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | प्रतिपदा. | नंदा | अग्नि | अशुभ | शुभ | ९ | नवमी | रिक्ता | दुर्गा | मध्यम | मध्यम |
| २ | द्वितीया | भद्रा | ब्रह्मा | ,, | ,, | १० | दशमी | पूर्णा | यम | ,, | ,, |
| ३ | तृतीया | जया | गौरी | ,, | ,, | ११ | एकादशी | नंदा | विश्वेदेव | शुभ | अशुभ |
| ४ | चतुर्थी | रिक्ता | गण० | ,, | ,, | १२ | द्वादशी | भद्रा | हरी | ,, | ,, |
| ५ | पंचमी | पूर्णा | अहि | ,, | ,, | १३ | त्रयोदशी | जया | मदन | ,, | ,, |
| ६ | षष्ठी | नंदा | स्कंद | मध्यम | मध्यम | १४ | चतुर्दशी | रिक्ता | शिव | ,, | ,, |
| ७ | सप्तमी | भद्रा | सूर्य | ,, | ,, | १५ | पौर्णिमा | पूर्णा | चंद्र | ,, | • |
| ८ | अष्टमी | जया | शिव | ,, | ,, | ३० | अमावा. | ,, | पितर | ० | अशुभ |

नंदा च भद्रा च जया च रिक्ता पूर्णेति सर्वास्तिथयः क्रमात्स्युः ।
कनिष्टमध्येष्टफलास्तु शुक्ले कृष्णे भवंत्युत्तममध्यहीनाः ॥ १३ ॥

**अर्थ**—प्रतिपदेस नंदा, द्वितीयेस भद्रा, तृतीयेस जया, चतुर्थीस रिक्ता आणि पंचमीस पूर्णा अशीं पांच नांवें क्रमानें आहेत. याप्रमाणेंच क्रमानें षष्ठीपासून व एकादशीपासून हींच नांवें जाणावीं. ह्मणजे षष्ठी आणि एकादशी ह्यांस नंदा असें नांव आहे. सप्तमी व द्वादशी ह्यांस भद्रा अशी संज्ञा आहे. इत्यादि क्रमानें समजावें. शुक्लपक्षांतील प्रतिपदेपासून पांच तिथी कनिष्ठ फल देणाऱ्या, षष्ठीपासून पांच मध्यम, एकादशीपासून पांच उत्तम, कृष्णपक्षांत प्रतिपदेपासून पांच उत्तम, षष्ठीपासून पांच मध्यम आणि एकादशीपासून पांच कनिष्ठ अशा प्रकारें सर्व मासांत समजावें.

## मुहूर्तकल्पद्रुम.

आवश्यके प्रथमजा घटिकास्तिथीषु वेदांगहस्तिनवसूर्यमनून्मितासु ।
वस्वंकशक्रशरवर्गदिशः शराश्च वर्ज्याः परैर्दशमिता अपराः शुभाः स्युः ॥ १४ ॥

**अर्थ**—शुक्ल आणि कृष्ण ह्या दोन्ही पक्षांत चतुर्थी, षष्ठी, अष्टमी, नवमी, द्वादशी आणि चतुर्दशी ह्या सहा तिथींला पक्षरंध्र असें नांव आहे. यास्तव ह्या मंगल कार्यास वर्ज्य कराव्या. अडचणीमुळें सर्व तिथींचा त्याग न घडेल तर ह्या तिथींच्या प्रारंभीं कांहीं घटिका टाकाव्या त्याः—चतुर्थीच्या आठ, षष्ठीच्या नऊ, अष्टमीच्या चवदा, नवमीच्या पंचवीस, द्वादशीच्या दहा, आणि चतुर्दशीच्या पांच. यांच्या पुढील घटिका दुष्ट नाहींत. कोणी ऋषी ह्मणतात कीं सर्वच पक्षरंध्र तिथींच्या प्रारंभीं दहा घटिका टाकाव्या. अधिक टाकण्याचें कारण नाहीं.

## पीयूषधारेंत वसिष्ठ.

स्युस्तिस्रस्तिथयो वारे एकस्मिन्नवमा तिथिः ।
तिथिर्वारत्रये चैका त्रिद्युस्पृग्वेति निंदिते ॥ १५ ॥

**अर्थ**—एका अहोरात्रांत तीन तिथी शिरल्या ह्मणजे तिला अवम तिथि असें नांव आहे. एक तिथी तीन अहोरात्रांत शिरली ह्मणजे तिला त्रिद्युस्पृक् असें नांव आहे. ह्या दोन्ही फार निंदित आहेत. तात्पर्य असें कीं, जी तिथी सूर्याच्या उदयकालीं नसते ती, आणि ज्या तिथींत दोन सूर्योदय होतात त्या दोन्ही तिथी शुभ कार्यास वर्ज्य कराव्या. दोन वाईट आहेत असें ह्मटल्यामुळें त्या दोहोंच्या पूर्व तिथीस व उत्तर तिथीस दोष नाहीं हें अर्थसिद्धच होतें. अवम तिथीला क्षयतिथि आणि त्रिद्युस्पृक् तिथीला वृद्धितिथि अशीं नांवें दुसऱ्या वचनांत आहेत.

## ज्योतिर्निबंधांत गर्ग.

सूर्योदये यथा तारा विलयं यांति खस्थिताः ।
तथा शुभानि कर्माणि क्षयवृद्धितिथौ ध्रुवं ॥ १६ ॥
दोषद्वयमिदं जातु गुणैरन्यैर्न हन्यते ।
तथापि सबले भानौ लाभस्थे वा तथा विधौ ॥ १७ ॥

अर्थ—सूर्याचा उदय झाल्यावर जशीं आकाशांतील नक्षत्रें नष्ट होतात, त्याप्रमाणें क्षयतिथींत आणि वृद्धितिथींत केलेलीं शुभ कर्में नष्ट होतात हें निश्चित आहे. क्षयतिथि आणि वृद्धितिथि हे दोन्ही दोष, पुढें सांगावयाचे जे गुण त्यांशिवाय इतर गुणांनीं कधींही बाधित होत नाहींत, तर बलवान् सूर्य किंवा बलिष्ठ चंद्र एकादश स्थानीं असेल तर क्षयतिथीचा आणि वृद्धितिथीचा दोष नष्ट होतो.

## पीयूषधारेंत वसिष्ठ.

अमावास्यातिथेर्दोषं केंद्रगो देवपूजितः ।
त्रिद्युस्पृगाव्हयं दोषं सौम्यः केंद्रगतो जयेत् ॥ १८ ॥

अर्थ--जर बृहस्पति केंद्रांत म्हणजे लग्नापासून प्रथम, चतुर्थ, सप्तम आणि दशम ह्यांतील कोणत्या तरी स्थानांत असेल, तर अमावास्या तिथीचा दोष नष्ट होतो. तसाच बुध केंद्रांत असेल तर त्रिद्युस्पृक् तिथीचा दोष नष्ट होतो.

## ज्योतिर्निबंधांत नारद.

तिथेः पंचदशा भागाः क्रमात्प्रतिपदादयः ॥
क्षणसंज्ञास्तदर्धानि तासामर्धं प्रमाणतः ॥ १९ ॥

अर्थ--तिथीच्या ज्या एकंदर घटका असतील त्यांस पंधरांनीं भागून जो भाग येईल, तितक्या प्रमाणानें तिथींच्या प्रारंभापासून प्रतिपदा, द्वितीया इत्यादि नांवाचे क्षण जाणावे आणि त्या क्षणांच्या अर्धें प्रमाणानें बव, बालव इत्यादि पुढें सांगण्याचीं जीं करणें आहेत तीं समजावीं. हें सांगण्याचें कारण इतकेंच आहे कीं, ज्या कर्मास जी तिथि आणि करणें सांगितलीं आहेत तीं अडचणींमुळें न सांपडतील तर याप्रमाणें घेऊन कार्य करावें.

## मुहूर्तमाला.

पर्वाणि सूर्यसंक्रांतिरमावास्या च पूर्णिमा ।

चतुर्दश्यष्टमी कृष्णा पंचैतानि त्यजेच्छुभे ॥ २० ॥

अर्थ--सूर्यसंक्रांतीचा दिवस किंवा पुढें संक्रांतिप्रकरणांत सांगितलेला पर्वकाळ, अमावास्या, पूर्णिमा, कृष्णपक्षांतील चतुर्दशी आणि अष्टमी ह्या पांचांस पर्व अशी संज्ञा आहे. यास्तव हीं पांच शुभ कार्यास वर्ज्य करावीं.

## मूलानुसारी स्फुट.

कृष्णे एकादशीषट्कं निंद्यं निंद्यतरं तु यत् ।
द्वादश्यादि चतुष्कं तत्भूतान्निंद्यतमं द्वयं ॥ २१ ॥

अर्थ--कृष्णपक्षांत एकादशीपासून शुक्ल प्रतिपदेपर्यंत सहा तिथि शुभ कर्मास निंद्य आहेत. द्वादशीपासून चार तिथि फार निंद्य आहेत. चतुर्दशीपासून दोन तिथि तर अतिशय निंद्य आहेत.

## अथ गमनास तिथिचक्रं--तत्फलम्.

### ( पंचांगांत असलेले गोरक्षमतें गमनास मुहूर्त. )

पौषे पक्षस्यादिका द्वादशैवं तिथ्यो माघादौ द्वितीयादिकास्ताः ।
कामात्तिस्रः स्युस्तृतीयादिवच्च याने प्राच्यादौ फलं तत्र वक्ष्ये ॥ १ ॥
सौख्यं क्लेशो भीतिरर्थागमश्च शून्यं नैःस्वं निःस्वता मिश्रता च ।
द्रव्यक्लेशौ दुःखमिष्टाप्तिरर्थो लाभः सौख्यं मंगलं वित्तलाभः ॥ २ ॥
लाभो द्रव्याप्तिर्धनं सौख्यमुक्तं भीतिर्लाभो मृत्युरर्थागमश्च ।
लाभः कष्टं द्रव्यलाभौ सुखं च कष्टं सौख्यं क्लेशलाभौ सुखं च ॥ ३ ॥
सौख्यं लाभः कार्यसिद्धिश्च कष्टं क्लेशः कष्टात्सिद्धिरर्थो धनं च ।
मृत्युर्लाभो द्रव्यलाभश्च शून्यं शून्यं सौख्यं मृत्युरत्यंतकष्टम् ॥ ४॥ मु. चिंता.

अर्थ — पौष मासांत प्रतिपदेपासून द्वादशीपर्यंत क्रमानें तिथि लिहाव्या. त्याच-क्रमाणें माघादिकांच्या द्वितीया, तृतीया इत्यादि अनुक्रमानें १२ महिन्यांच्या कोष्टकांत तिथि लिहाव्या. त्रयोदशीचें फल तृतीयेप्रमाणें, चतुर्दशीचें चतुर्थीप्रमाणें आणि पूर्णिमेचें पंचमीप्रमाणें फलें जाणावीं. अमावास्येचें फल शून्य समजावें. ह्या सर्व तिथींचीं फलें पूर्वादि दिशेला प्रयाण केल्यानें निरनिराळीं आहेत. तीं पुढील कोष्टकावरून स्पष्ट समजावीं. जसें पौष शुद्ध प्रतिपदेवर पूर्व दिशेला गमन केलें असतां त्याचें फल सौख्य; दक्षिणेस गमन केलें असतां त्याचें फल क्लेश; पश्चिमेस

भीति; आणि उत्तरेस अर्थागम म्हणजे द्रव्यप्राप्ति इ० फलें समजावींत. हीं पाहून ज्या महिन्यांत ज्या तिथीचें ज्या दिशेला गमनाचें शुभफल सांगितलें असेल त्या दिशेला गमन करावें. हें तिथिचक्र कोणी म्हणतात गोरक्ष मताचें, कोणी म्हणतात मुहूर्तादि ग्रंथांतलें. आम्ही हें मुहूर्तचिंतामणीवरून घेतलें आहे.

## पंचांगांत नेहमीं असलेलें गमनास तिथिचक्र-तत्फलं.

| पौष. | माघ. | फाल्गुन. | चैत्र. | वैशाख. | ज्येष्ठ. | आषाढ. | श्रावण. | भाद्रपद. | आश्विन. | कार्तिक. | मार्गशीर्ष. | पूर्व. | दक्षिण. | पश्चिम. | उत्तर. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ति. | ति. | ति. | ति. | ति | ति | ति. | ति. | ति. | ति. | ति. | ति. | | | | |
| १ | २ | ३ १३ | ४ १४ | ५ १५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ | १२ | सौख्यं | क्लेशः | भीतिः | अर्थागमः |
| २ | ३ १३ | ४ १४ | ५ १५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ | १२ | १ | शून्यं | नै. स्वं | नै. स्वं | मिश्रता |
| ३ १३ | ४ १४ | ५ १५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ | १२ | १ | २ | द्रव्यक्ले. | दुःखं | इष्टाप्तिः | अर्थः |
| ४ १४ | ५ १५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ | १२ | १ | २ | ३ १३ | लाभः | सौख्यं | मंगलम् | वित्तलाभः |
| ५ १५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ | १२ | १ | २ | ३ १३ | ४ १४ | लाभः | द्रव्याप्ति | धनम् | सौख्यं |
| ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ | १२ | १ | २ | ३ १३ | ४ १४ | ५ १५ | भीतिः | लाभः | मृत्युः | अर्थागमः |
| ७ | ८ | ९ | १० | ११ | १२ | १ | २ | ३ १३ | ४ १४ | ५ १५ | ६ | लाभः | कष्टम् | द्रव्य-लाभः | सुखं |
| ८ | ९ | १० | ११ | १२ | १ | २ | ३ १३ | ४ १४ | ५ १५ | ६ | ७ | कष्टम् | सौख्यं | क्लेशा-लाभः | सुखं |
| ९ | १० | ११ | १२ | १ | २ | ३ १३ | ४ १४ | ५ १५ | ६ | ७ | ८ | सौख्यं | लाभः | कार्य-सिद्धिः | कष्टं |
| १० | ११ | १२ | १ | २ | ३ १३ | ४ १४ | ५ १५ | ६ | ७ | ८ | ९ | क्लेशः | कष्टात्-सिद्धिः | अर्थः | धनं |
| ११ | १२ | १ | २ | ३ १३ | ४ १४ | ५ १५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | मृत्युः | लाभः | द्रव्य-लाभः | शून्यं |
| १२ | १ | २ | ३ १३ | ४ १४ | ५ १५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ | शून्यं | सौख्यं | मृत्युः | अत्यंतः कष्टम् |

# अथ वारप्रकरणं.

## मूळानुसारी स्फुट.

पंचांगाचें दुसरें अंग वार हें होय. याची उपपत्ति पुढें दिली आहे.

## वारांचीं नांवें.

रविश्चंद्रो भौमबुधौ गुरुशुक्रशनैश्चराः ।
वाराधीशाः सप्त राहुकेतुभ्यां ते नवग्रहाः ॥ १ ॥

अर्थ—रवि, चंद्र, मंगळ, बुध, बृहस्पति, शुक्र आणि शनि हे सातच ग्रह क्रमानें वारांचे स्वामी आहेत आणि राहु व केतु यांसहवर्तमान ते नऊ ग्रह आहेत.

## रत्नमाला.

वारे ग्रहस्योपचयान्वितस्य कार्यं यथोद्दिष्टमुपैति सिद्धिं ।
भवेत्तदेवापचयावहस्य प्रयत्नतो निर्मितमप्यसाध्यं ॥ २ ॥

अर्थ—ज्या काळीं जो ग्रह आपल्यास बलिष्ठ असेल त्या ग्रहाच्या वारीं केलेलें कार्य आपल्या इच्छेप्रमाणें सिद्ध होतें, आणि जो ग्रह निर्बल आहे त्याच्या वारीं प्रयत्नानेंही केलेलें कार्य सिद्ध होत नाहीं.

सोमसौम्यगुरुशुक्रवासराः सर्वकर्मसु भवंति सिद्धिदाः ।
भानुभौमशनिवासरेषु च प्रोक्तमेव खलुकर्म सिध्यति ॥ ३ ॥

अर्थ—चंद्र, बुध, गुरु आणि शुक्र यांचे वार प्रायशः सर्व कर्मांची सिद्धि देणारे आहेत. सूर्य, मंगळ व शनि यांच्या वारीं तर जें कर्म अवश्यकर्तव्यंकरून करण्यास सांगितलें आहे तेंच कर्म सिद्ध होतें.

## मुहूर्तकल्पद्रुम.

भृगुः शशी सिते हितोऽरुणेऽरुणः कुजस्तथा ।
समेचके शनिर्हितः परौ परत्र कीर्तितौ ॥ ४ ॥

अर्थ—पांढऱ्या रंगाच्यासंबंधाचें जें कार्य असेल त्याविषयीं शुक्र आणि चंद्र हे दोन वार प्रशस्त आहेत. तांबड्या रंगाच्यासंबंधाचें जें कार्य त्याविषयीं रवि व मंगळ हे दोन वार प्रशस्त जाणावे. काळ्या रंगाच्यासंबंधाचें जें कार्य त्याविषयीं शनिवार प्रशस्त आहे. या तीन रंगाहून इतर रंगांच्यासंबंधाचे कार्याविषयीं बुध आणि गुरु दोन वार प्रशस्त समजावे.

## मूलानुसारी स्फुट.

गर्गमांडव्यवचनाज्ज्ञेयौ कांचनभूषणे ।
प्रशस्तौ भौममार्तंडौ शनिर्लोहाश्मनोर्मतः ॥ ५ ॥

अर्थ – गर्ग आणि मांडव्य यांच्या मतानें सुवर्णाचे अलंकार धारण करण्या-विषयीं मंगळवार आणि रविवार हे प्रशस्त आहेत. लोखंडाच्या कार्यास आणि दगडी कामास शनिवार प्रशस्त आहे असें समजावें.

## मुहूर्तमाला.

वारोक्तं कालहोरायां कार्यमावश्यकेऽथवा ।
वारांशगेऽर्के चंद्रे वा कार्यमित्यृषयोजगुः ॥ ६ ॥

अर्थ—ज्या वारीं जें कर्म करण्यास सांगितलें आहे तो वार अडचणीमुळें त्या कर्मास जर न सांपडेल तर त्या वाराच्या * कालहोऱ्यामध्यें तें कर्म करावें किंवा त्या वाराच्या ÷ अंशांत सूर्य अथवा चंद्र असेल तेव्हां तें कर्म करावें असें ऋषींनीं सांगितलें आहे.

## रत्नमाला.

रविः स्थिरः शीतकरश्चरश्च महीज उग्रः शशिजश्च मिश्रः ।
लघुः सुरेज्यो भृगुजो मृदुश्च शनिश्च तीक्ष्णः कथितो मुनींद्रैः ॥ ७ ॥

अर्थ – सूर्य स्वभावानें स्थिर, चंद्र चंचल, मंगळ उग्र, बुध मिश्र, बृहस्पति क्षिप्र, शुक्र मृदु आणि शनि दारुण याप्रमाणें ग्रहांचे स्वभाव मुनींद्रांनीं सांगितले आहेत.

## ग्रहांच्या जाती.

ब्राह्मणौ जीवशुक्रौ च क्षत्रियौ भौमभास्करौ ।
सोमसौम्यौ विशौ प्रोक्तौ राहुमंदौ तथांत्यजौ ॥ ८ ॥ मु. मा.

अर्थ--गुरु, शुक्र हे ब्राह्मण; मंगळ, रवि हे क्षत्रिय; बुध, चंद्र हे वैश्य; शनि, राहु, केतु हे क्रमानें शूद्र, मिश्रशूद्र, आणि अंत्यज होत.

## मतांतरे होरामकरंदांत.

वागीशशुक्रावथभानुभौमौ शीतद्युतिः श्चांद्रमसायनिश्च ।
द्विजादिकानामधिपाभवंतिशनैश्चरःसंकरसंभवानां ॥ ९ ॥

---

* पुढें होराप्रकरणांत पहा. ÷ पुढें लग्नप्रकरण पहा.

अर्थ—ब्राम्हणांचे स्वामी गुरु आणि शुक्र आहेत. क्षत्रियांचे स्वामी सूर्य व मंगळ आहेत. वैश्यांचा स्वामी चंद्र आहे. शूद्रांचा स्वामी बुध आहे. संकर जातीचा स्वामी शनि आहे.

साम्नां महीजो यजुषां सितः स्यादृचां च जीवो विदथर्वणां च ।
नपुंसकौ सौरबुधौ सितेंदू योषिद्ग्रहौ स्युस्त्वपरे नराख्याः ॥ १० ॥

अर्थ—सामवेदाचा स्वामी मंगळ, यजुर्वेदाचा स्वामी शुक्र, ऋग्वेदाचा स्वामी गुरु, आणि अथर्वण वेदाचा स्वामी बुध याप्रमाणें वेदाधिपती जाणावे. शनि व बुध हे नपुंसकसंज्ञक, शुक्र आणि चंद्र हे स्त्रीसंज्ञक व शेष राहिले जे रवि, मंगळ आणि गुरु हे तीन पुरुषसंज्ञक होत.

## ग्रंथांतरांतील.

तमस्विनीगंधमुपेत्य वारदोषास्तथाशक्तिमनाप्नुवंतः ।
अंधं समासाद्य विलासिनीनां कटाक्षबाणा इव निष्फलाः स्युः ॥ ११ ॥

अर्थ – रात्रीची प्रवृत्ति झाल्यावर वारांच्या दोषांचें सामर्थ्य दिवसाप्रमाणें असत नाहीं. यास दृष्टांत—जसे विलासिनी स्त्रियांचे कटाक्षरूप बाण आंधळ्याजवळ आले असतां निष्फळ होतात तद्वत्.

## वारदेवता व अधिदेवता.

सूर्यादितः शिवशिवागुहविष्णुकेंद्रकालाः क्रमेण पतयः कथिता ग्रहाणाम् ।
वन्ह्यंबुभूमिहरिशक्रशचीविरिंचिस्तेषां पुनर्मुनिवरैरधिदेवताश्च ॥ १२ ॥

## विचार करण्यास काल.

पतंगसूने र्दिवसाधिपत्यं निशाप्यहश्चैव तु तिग्मभानोः ।
रात्रिद्वयं चैकदिनं च सोमे शेषग्रहाणामुदयप्रवृत्तिः ॥ १३ ॥

## कृत्यें.

सोमसौम्यगुरुशुक्रवासराः सर्वकर्मसु भवंति सिद्धिदाः ।
भानुभौमशनिवासरेषु च प्रोक्तमेव खलु कर्म सिध्यति ॥ १४ ॥

## तैलाभ्यंगास शुभाशुभ वार.

रविस्तापं कांतिं वितरति शशी भूमितनयो ।
मृतिं लक्ष्मीं सौम्यः सुरपतिगुरुर्वित्तहरणम् ।
विपत्तिं दैत्यानां गुरुरखिलभोगानुगमनं ।
नृणां तैलाभ्यंगात्सपदि कुरुते सूर्यतनयः ॥ १५ ॥

## वस्त्रपरिधानफल.

जीर्णं रवौ सततमंबुभिरार्द्रमिंदौ भौमे शुचे बुधदिने च भवेद्धनाय ।
ज्ञानाय मंत्रिणि भृगौ प्रियसंगमाय मंदे मलाय च नवांबरधारणं स्यात् ॥ १६ ॥

## श्मश्रुकर्मास शुभाशुभवार.

भानुर्मासं क्षपयति तथा सप्त मार्तंडसूनुर्भौमश्चाष्टौ वितरति शुभं बोधनः पंचमासान् ।
सप्तैवेंदुर्दश सुरगुरुः शुक्र एकादशेति प्राहुर्गर्गप्रभृतिमुनयः क्षौरकार्येषु नूनम् ॥ १७ ॥

## विद्यारंभास शुभाशुभ.

विद्यारंभः सुरगुरुसितज्ञेष्वभीष्टार्थदायी कर्तुश्चायुश्चिरमपि करोत्यंशुमान्मध्यमोऽत्र ।
नीहारांशौ भवति जडता पंचता भूमिपुत्रे छायासूनावपि च मुनयः कीर्तयंत्येवमाद्याः ॥ १८ ॥

## वरील श्लोकांचा अर्थ कोष्टकरूपानें.

| वारांची नांवें. | रवि. | सोम. | मंगळ. | बुध. | गुरु. | शुक्र. | शनि. |
|---|---|---|---|---|---|---|---|
| वारांच्या देवता | शिव. | पार्वती. | स्कंद. | विष्णु | ब्रह्मा. | इंद्र. | काल. |
| अधिदेवता. | अग्नि. | उदक. | भूमि. | हरि. | इंद्र. | इंद्राणी. | ब्रह्मा. |
| विचार करण्यास काल. | ८ प्रहर | २ रात्रि ४ प्रहर. | ८ प्रहर. | ८ प्रहर. | ८ प्रहर | ८ प्रहर. | ८ प्रहर |
| दोषादोष. | दिनदोष. | रात्रिदोष. | रात्रिदोष | सदादोष | दिनदोष. | दिनदोष | रात्रिदो. |
| उक्तानुक्त कृत्यें. | उक्तकर्म-सिद्धि. | सर्व कर्म-सिद्धि. | उक्तकर्म-सिद्धि. | कर्म-सिद्धि. | कर्म-सिद्धि. | कर्म-सिद्धि | उक्त क. सिद्धि. |
| तैलाभ्यंगफल. | ज्वरप्रद. | कांतिप्रद | मृत्युप्रद. | लक्ष्मीप्रद | वित्तनाश. | विपत्तिप्र | संपत्तिप्र |
| वस्त्रपरिधानफल | जीर्ण हो. | ओलें रा. | शोकप्रा. | धनप्राप्ति. | ज्ञानप्राप्ति | इष्टप्राप्ति. | मळ. रा. |
| श्मश्रुकर्मास शुभाशुभ. | १ महिना आयुष्य कमी हो | ७ महिने आयुष्य-वृद्धि. | ८ महिने आयुष्य-नाश. | ५ महिने आयुष्य-वृद्धि. | १० म. आयुष्य-वृद्धि. | ११ म. आयुष्य-वृद्धि. | ७महिने आयुष्य नाश. |
| विद्यारंभास शुभाशुभ. | मध्यम. | जडत्व. | मृत्यु. | या तीन वारीं आयुष्य-वृद्धि व अभीष्टार्थसिद्धि. | | | मृत्यु. |

## मतांतर.

न वारदोषाः प्रभवंति रात्रौ देवेज्यदैत्येज्यदिवाकराणां ।
दिवा शशांकार्कजभूसुतानां सर्वत्र निंद्यो बुधवारदोषः ॥ १९ ॥

अर्थ—गुरु, शुक्र आणि सूर्य यांच्या वारदोषाचें सामर्थ्य रात्रीं नसतें. चंद्र, शनि व मंगळ यांच्या वारदोषाचें सामर्थ्य दिवसा नसतें. बुधवाराचा दोष दिवसा आणि रात्रीं सारखाच असतो.

## मुहूर्तदर्पण.

प्रकाशकौ द्वौ प्रथमौ ग्रहाणां
ताराग्रहाः पंच परे ततो द्वौ ॥
तमोग्रहौ केतुविधुंतुदाख्यौ
फलं तयोर्ज्ञैः शनिवत् प्रदिष्टं ॥ २० ॥

अर्थ—ग्रहांमध्यें जे प्रथम दोन ह्मणजे सूर्य आणि चंद्र हे प्रकाश करणारे आहेत. मंगळापासून पांच ग्रह तारकारूप आहेत. ह्मणजे त्यांचा प्रकाश पडत नाहीं. केतू आणि राहू हे दोन ग्रह अंधकारस्वरूप असून त्यांचें फळ शनीप्रमाणें होतें असें ऋषींनीं सांगितलें आहे.

## ग्रहभुक्तिकालः

मासं शुक्रबुधादित्याश्चंद्रः पाददिनद्वयम् ।
भौमस्त्रिपक्षं जीवोऽब्दं सार्धवर्षद्वयं शनिः ॥ २१ ॥
राहुः केतुः सदा भुंक्ते सार्धमेकं तु वत्सरम् ।

अर्थ—साधारण मानानें एका राशीस शुक्र, बुध व रवि १ महिना राहतात, चंद्र २ ¼ सव्वा दोन दिवस राहतो, मंगळ दीड महिना राहतो, गुरु एक वर्ष राहतो, शनि अडीच वर्षें राहतो, राहु दीड वर्ष आणि केतु दीड वर्ष. याप्रमाणें प्रत्येक ग्रह प्रत्येक राशीचा क्रमानें उपभोग घेतो.

## मुहूर्तमाला.

वर्षेण सूर्यज्ञसिताः सितांशुर्मासेन मासैस्त्रियमैर्महीजः ।
वर्षैर्गुरुर्द्वादशभिर्भचक्रं वर्षैः खरामैर्भ्रमतीनसूनुः ॥ २२ ॥

अर्थ—सूर्य, बुध व शुक्र हे तीन ग्रह एक वर्षानें बारा राशी भोगून पूर्व स्थानावर येतात. चंद्र एक मासानें बारा राशी भोगतो. मंगळ तेवीस महिन्यांनीं भोगतो. गुरु बारा वर्षांनीं संपूर्ण राशिचक्रास भोगतो. शनि तीस वर्षांनीं बारा राशींवर भ्रमण करितो.

मेषादिषु स्थितवतोऽष्टशरा नगाक्षाः सप्तेषवो नगशरा गजपंच गोक्षाः ।
षष्टिः कुषट् शशिरसाः कुरसाश्च षष्टिर्गोक्षाः स्फुटा गतिरिनस्य कलास्वरूपा ॥ २३ ॥

अर्थ—मेषादि बारा राशींवर सूर्य क्रमानें एकेक मासपर्यंत असतो. तेव्हां प्रत्येक राशीवर त्याची स्पष्ट नित्यगति पुढें दिलेल्या कलांइतकी असते. ती अशी कीं, मेष राशीस असतां ५८ कला; वृषभ, मिथुन आणि कर्क यांस असतां ५७; सिंहास असतां ५८; कन्येस असतां ५९; तुळास असतां ६०; वृश्चिक, धन व मकर यांस असतां ६१; कुंभास असतां ६० व मीनास असतां ५९ अशा जाणाव्या.

## रत्नमाला.

वारप्रवृत्तिं मुनयो वदंति सूर्योदयाद्रावणराजधान्यां ।
ऊर्ध्वं तथाधोऽप्यपरत्र तस्माच्चरार्धदेशांतरनाडिकाभिः ॥ २४ ॥

अर्थ—लंकेमध्यें सर्व काळ सूर्योदयापासून वाराची प्रवृत्ति होते. लंकेशिवाय अन्य देशांत कदाचित् सूर्योदयानंतर आणि कदाचित् सूर्योदयाच्या पूर्वीं, पुढें सांगितलेल्या प्रकारानें चरखंडें व देशांतर यांपासून उत्पन्न झालेलीं जीं पळें तितक्या पलांनीं वारप्रवृत्ति होते असें मुनी ह्मणतात.

वर सांगितलेलीं पळें उत्पन्न होण्याचा प्रकार सांगण्यासाठीं सिद्धांतांत कल्पिलेली भूमीची मध्यरेषा येणेंप्रमाणें.

## सिद्धांतशिरोमणी.

पुरी रक्षसां देवकन्याथ कांची सितः पर्वतः पर्यली वत्सगुल्मं ।
पुरी चोज्जयिन्याव्हया गर्गराटं कुरुक्षेत्रमेरू भूवोमध्यरेखा ॥ २५ ॥

अर्थ—राक्षसांची नगरी (लंका), देवकन्या नगरी (दक्षिण समुद्राजवळ असावी), कांची प्रसिद्धच आहे. श्वेत पर्वत (हा वाशीम आणि उज्जनी यांच्यामध्यें आहे), पर्यली (परळी), वत्स गुल्म (वाशीम), उज्जनी नगरी, गर्गराट (हें

उज्जनी व कुरुक्षेत्र यांच्यामध्यें आहे. ), कुरुक्षेत्र आणि मेरूपर्वत या स्थानांस अनुलक्षून भूमीच्या मध्यभागीं रेखा कल्पिली आहे.

### वारप्रवृत्तीचीं पळें समजण्याचा प्रकार.

## मुहूर्तचिंतामणी.

पादोनरेखा परपूर्वयोजनैः पलैर्युतोनास्तिथयो दिनार्धतः ।
हीनाधिकास्तद्विवरोद्भवैः पलैरूर्ध्वं तथाधो दिनपप्रवेशनं ॥ २६ ॥

**अर्थ**--वर सांगितलेल्या रेखेच्या पश्चिमेस किंवा पूर्वेस जेथें आपण आहों त्या स्थानापासून रेषेपर्यंत जितकीं योजनें ( चार कोस लांबीचें क्षेत्र ) असतील त्यांच्या संख्येंत चतुर्थांश कमी करून जी संख्या राहील तितकीं पळें आपण रेखेच्या पश्चिम भागीं असल्यास पंधरा घटिकेवर चढवावीं आणि पूर्वभागांत असल्यास पंधरा घटिकेंत कमी करावीं. मग जितक्या घटका व पळें होतील त्यांची दिनमानाच्या अर्धाचीं जीं घटका व पळें असतील त्यांची वजावाकी करून जीं घटका आणि पळें शिल्लक राहतील तितक्या घटका व पलांनीं रेखेच्या पश्चिमेस सूर्योदयानंतर व रेखेच्या पूर्वेस सूर्योदयाच्या पूर्वीं वाराची प्रवृत्ति होते.

वर लिहिलेला वारप्रवृत्तिज्ञानाचा प्रकार स्पष्ट समजण्यासाठीं एक उदाहरण देतों.

पूर्वीं सांगितलेल्या भूमीच्या मध्यरेखेंतील परळी हें स्थान पुणें शहरापासून पूर्वेस अठ्ठावीस योजनांवर आहे. त्या योजनांच्या संख्येंत एकचतुर्थांश कमी केला ह्मणजे २१ शेष राहतात. इतकीं पळें ( २१ ) पुणें शहर भूमध्य रेखेच्या पश्चिमेस आहे. यास्तव पंधरा घटिकेंत तीं मिळविलीं ह्मणजे १५।२१ इतकीं घटिका पळें होतात. शके १८३७ कार्तिक शुद्ध १२ गुरुवार तारीख १८ नवंबर सन १९१५ या दिवशीं स्पष्टक्रांती कोष्टकांत दिली आहे ती १९।१७ आहे व पुण्याचे अक्षांश १८।२९ आहेत. ह्यावरून चर कोष्टकांत आलेले चर घ० १ प० ६ ऋण आहे. त्यावरून दिनमान काढतों. ३० घ० उणे चराची दुप्पट घ० २ प० १२ = घ० २७ प० ४८ + १० पळें = २७ - ५८ हें त्या दिवशींचें दिनमान आलें. त्याचा अर्ध घ० १३ प० ५९ आहे. वरील भूमध्य रेखेची अधिक करून आलेली संख्या यापेक्षां अधिक आहे. ह्मणून घ० १५ प० २१—घ० १३ प० ५९ = घ० १ प० २२ हें

3110

उभयतांचें अंतर तारीख १८ नबंबर सन १९१५ या दिवशींचें आहे. ह्मणून वारप्रवृत्ति सूर्योदयापूर्वी घ० १ प० २२ आहे असें समजावें.

## पीयूषधारेंत वसिष्ठ.

वारप्रवृत्तिविज्ञानं क्षणवारार्थमेव हि ।
अखिलेष्वन्यकार्येषु दिनादिरुदयाद्भवेत् ॥ २७ ॥

अर्थ—वर लिहिलेप्रमाणें वारप्रवृत्ति, होऱ्याची प्रवृत्ति पाहण्यासाठीं मात्र घ्यावी. याखेरीज सर्व कार्याविषयीं सूर्योदयापासून वाराची प्रवृत्ति जाणावी.

## रत्नमाला.

वारप्रवृतेर्घटिका द्विनिघ्नाः कालाख्यहोरापतयः शराप्ताः ।
दिनाधिपाद्या रविशुक्रसौम्यशशांकसौरेज्यकुजाः क्रमेण ॥ २८ ॥

अर्थ - होऱ्याच्या वारप्रवृत्तीपासून जितक्या घटका आणि पळें गेलीं असतील त्यांच्या संख्येला दोहोंनीं गुणून पांचांनीं भागावें, जो भाग येईल तितक्या ग्रहांचे कालहोरे गेल्यावर पुढील ग्रहाचा कालहोरा चालू आहे असें जाणावें. त्याचा क्रम असा कीं, जो वाराचा स्वामी तोच प्रथम कालहोऱ्याचा स्वामी असतो. दुसऱ्या कालहोऱ्यापासून क्रमानें रवि, शुक्र, बुध, चंद्र, शनि, गुरु आणि मंगळ हे कालहोरापति असतात. याप्रमाणेंच पुनः पुनः आवृत्ति करीत जावी.

## गणिताशिवाय होरापति समजण्याचा प्रकार.

## स्फुट.

वारप्रवृत्तेर्घुरि सार्धनाडिद्वयं तु तद्वासरकालहोरा ।
षष्ठस्य षष्ठस्य ततः क्रमेण स्यात्कालहोरा गणितं विनैव ॥ २९ ॥[1]

अर्थ—होऱ्याच्या वारप्रवृत्तीपुढें अडीच घटकांपर्यंत वारप्रवृत्तीचा कालहोरा असतो. नंतर त्यापासून दुसरा सहाव्या ग्रहाचा कालहोरा येतो. तिसरा कालहोरा त्यापासून सहाव्याचा असतो. या क्रमानेंच पुढेंही जाणावें. त्यांचा क्रम

---

1 उदयादुदयं वारः ॥

आणि पुनरावृत्ति वर लिहिलेप्रमाणेंच जाणावी. याप्रमाणें गणितावांचून कालहोऱ्याचें ज्ञान होतें.

## होऱ्याची उपपत्ति.

वर सांगितलेप्रमाणें सहावा सहावा ग्रह क्रमानें घ्यावा असें सांगण्याचें कारण सोपपत्तिक दाखवितों. आमच्या प्राचीन ज्योतिषांच्यामतें सर्व ग्रह पृथ्वीसभोंवतीं फिरतात. त्यांचा क्रम शेवटाकडून घेतला तर शनि, गुरु, मंगळ, रवि, शुक्र, बुध आणि चंद्र असा क्रम भुवनसंस्थेंतला आहे. आतां आपण अशी कल्पना करूं कीं, रवि ग्रह, दाखविलेल्या ग्रहांच्या मध्यभागीं आहे. तेव्हां आपण रवीपासूनच कालहोऱ्यास आरंभ केला ह्मणजे वर दाखविलेल्या ग्रहाप्रमाणें दुसरा कालहोरा शुक्राचा येईल, तिसरा बुधाचा, चवथा चंद्राचा, पांचवा शनीचा, सहावा गुरूचा आणि सातवा मंगळाचा या क्रमानें ग्रह मोजीत गेलें ह्मणजे वर दाखविलेल्या कालहोऱ्यांतील ग्रह बरोबर येतात. आपण आतां रवीपासून सरळ क्रमानें ग्रह मोजीत गेलों ह्मणजे सहावा ग्रह शुक्र येतो, शुक्रापासून सहावा बुध येतो, बुधापासून सहावा चंद्र येतो, चंद्रापासून सहावा शनि येतो, शनीपासून सहावा गुरु येतो, आणि गुरूपासून सहावा ग्रह मंगळ येतो. यावरून असें सिद्ध झालें कीं कालहोऱ्यांत सहावा सहावा ग्रह घेण्यास सांगितलेला क्रम बरोबर आहे.

## ज्योतिर्निबंधांत गर्ग.

क्रूरवारे क्रूरहोरा न शस्ता इति मंगले ।
नातिदुष्टा शुभे वारे रात्रौ स्वल्पफला मता ॥ ३० ॥

अर्थ--पापग्रहाच्या वारीं पापग्रहाचा होरा मंगलकार्यास वर्ज्य करावा, शुभ ग्रहाच्या वारीं पापग्रहाचा होरा फार दुष्ट नाहीं, यास्तव तो मध्यम होय. कालहोऱ्याचें फल रात्रौ फार अल्प असतें.

## वारोपपत्ति.

वर दाखविलेल्या कालहोऱ्यांतील ग्रहांचा क्रम रवि, शुक्र, बुध, चंद्र, शनि,

---

१ श्लोक—शनिर्जीवः कुजश्चैव रविः शुक्रबुधेन्दवः ।
एवं क्रमेण विज्ञेयाः कालहोरेश्वरा ग्रहाः ॥ १ ॥

गुरु आणि मंगळ असा आहे. या कालहोऱ्यांतील ग्रहांवरून वारोपपत्ति कशी येते हें दाखवितों. भुवनसंस्थेंतील ग्रहांचा क्रम विश्वाच्या मध्यभागीं पृथ्वी आहे, तिच्या भोंवतीं चंद्रादि ग्रह फिरतात. त्यांचा क्रम चंद्र, बुध, शुक्र, रवि, मंगळ, गुरु आणि शनि असा आहे. बाहेरील गोलाप्रमाणें रवीपासून मंगळ, गुरु आणि शनि असे वरवर चढते ग्रह आहेत. तेव्हां आपण वरून खालीं क्रमानें येत गेलों म्हणजे बाहेरील गोलांतील ग्रहांचा क्रम शनि, गुरु, आणि मंगळ असा उतरत उतरत येतो; आणि आंतील गोलांतील उतरते ग्रहांचा क्रम रवि, शुक्र, बुध आणि चंद्र असा आहे. याप्रमाणें सर्व ग्रह वरून खालीं मांडित गेलों म्हणजे शनि, गुरु, मंगळ, रवि, शुक्र, बुध व चंद्र असा क्रम झाला. म्हणजे कालहोऱ्याप्रमाणें वर मंगळापासून शनीपर्यंत चढते व रवीपासून चंद्रापर्यंत खालीं उतरते असे ग्रह होत गेले. या आलेल्या ग्रहावरूनच आपणांस वारोपपत्ति काढावयाची आहे. आपण अशी कल्पना करूं कीं, कालहोऱ्यांतील आलेले ग्रह सात आणि अहोरात्र (दिवसा) चे तास २४ चोवीस. प्रत्येक तासाला एकेक ग्रह याप्रमाणें सात ग्रहांच्या पुनः पुनः तीन तीन आवृत्त्या एकेक ग्रहाच्या होऊन जाऊन बाकी तीन तास शिल्लक राहिले. या तीन तासांचें काम पुन्हा तीन ग्रहांनीं केलें. नंतर प्रातःकालीं पुढील चौथ्या ग्रहानें आपल्या कामास सुरवात केली. यावरून असें अनुमान सिद्ध झालें कीं, वरून खालीं व खालून वर चौथा चौथा ग्रह आपण मोजून घेत गेलों म्हणजे सर्व वार क्रमानें येतील. अर्थात् वर दाखविलेल्या ग्रहावरून, म्हणजे शनीपासून उतरता चौथा ग्रह रवि, रवीपासून चौथा ग्रह चंद्र, चंद्रापासून उलट वर मोजलें म्हणजे चौथा ग्रह मंगळ, मंगळापासून चौथा बुध, बुधापासून चौथा गुरु, गुरूपासून चौथा शुक्र, शुक्रापासून चौथा शनि याप्रमाणें क्रमानें मोजीत गेलों म्हणजे सर्व वार बरोबर येतात.

## नक्षत्रप्रकरणं.

नक्षत्र हें पंचांगाचें तिसरें अंग होय. नक्षत्राच्या तारा सर्व सारख्या अंतरावर नाहींत; म्हणून क्रांतिवृत्ताचे २७ भाग मानून त्यांतल्या प्रत्येक भागास नक्षत्र असें म्हणतात. प्रत्येक नक्षत्रामध्यें १३ अंश २० कला होतात. इतकें अंतर चालण्यास चंद्रास जो काल लागतो, त्यास नक्षत्र असें म्हणतात. नक्षत्रांचा संबंध आरंभस्थानाशीं आहे, म्हणून सायन व निरयण नक्षत्रें भिन्न येतात.

## ज्योतिर्निबंधांत संहिताप्रदीप.

सर्वेषु कार्येषु हि शोभनेषु नक्षत्रशुद्धिं मृगयंति पूर्वं ।
यत्कर्म यस्मिन्करणीयमुक्तं तत्तत्र देयं विदुषा विदित्वा ॥ १ ॥

अर्थ--लोक सर्व मंगलकार्यांविषयीं प्रथम नक्षत्राची शुद्धि पाहतात. यास्तव जें कर्म ज्या नक्षत्रावर करण्यास सांगितलें आहे तें नक्षत्र निर्दोष आहे किंवा नाहीं याचा विचार करून निर्दोष असल्यास तें विद्वानानें त्या कर्मास द्यावें.

## मूलानुसारी स्फुट.

अश्विनी भरणी चैव कृत्तिका रोहिणी तथा ।
मृगशीर्षमथार्द्रा च पुनर्वसुरतः परं ॥ २ ॥
पुष्य आश्लेषा च मघा पूर्वाफल्गुन्य उत्तरा- ।
फल्गुन्यो हस्तचित्रे च ततः स्वाती विशाखिका ॥ ३ ॥
अनुराधा ततो ज्येष्ठा मूलं पूर्वाअषाढकाः ।
उत्तराख्या अषाढाश्च श्रवणं च धनिष्ठिका ॥ ४ ॥
ततस्तु शततारा स्यात्पूर्वाभाद्रपदास्ततः ।
उत्तराख्या भाद्रपदा रेवतीमानि भानि हि ॥ ५ ॥

अर्थ--१ अश्विनी, २ भरणी, ३ कृत्तिका, ४ रोहिणी, ५ मृगशीर्ष, ६ आर्द्रा, ७ पुनर्वसु, ८ पुष्य, ९ आश्लेषा, १० मघा, ११ पूर्वाफाल्गुनी, १२ उत्तराफाल्गुनी, १३ हस्त, १४ चित्रा, १५ स्वाती, १६ विशाखा, १७ अनुराधा, १८ ज्येष्ठा, १९ मूळ, २० पूर्वाषाढा, २१ उत्तराषाढा, २२ श्रवण, २३ धनिष्ठा, २४ शततारका, २५ पूर्वाभाद्रपदा, २६ उत्तराभाद्रपदा, २७ रेवती अशीं हीं नक्षत्रें सत्तावीस आहेत.

## मुहूर्तमाला.

वैश्वांत्यपादः श्रुत्याद्यतिथ्यंशश्चाभिजिद्भवेत् ।
यत्राष्टाविंशतिर्भानां गण्योयं तत्र नान्यथा ॥ ६ ॥

अर्थ--वैश्व ह्मणजे उत्तराषाढा ह्यांचा शेवटचा चतुर्थांश आणि श्रवणाचा प्रथम

पंधरावा भाग, इतकें अभिजित् नक्षत्राचें स्वरूप आहे; परंतु जेथें अठ्ठावीस नक्षत्रें घ्यावीं लागतात, तेथेंच ह्याचें ग्रहण करावें. अन्यथा करूं नये.

## रत्नमाला.

भेशा दस्रयमाग्निधातृशशिनः शर्वोऽदितिर्वाक्पतिः ।
कद्रूजाः पितरो भगोर्यमरवी त्वष्टा समीरः क्रमात् ॥
इंद्राग्नी अथ मित्र इंद्रनिर्ऋती नीरं च विश्वे विधि-
र्गोविंदो वसवोंबुपाजरणाहिर्बुध्न्यपूषाभिधाः ॥ ७ ॥

अर्थ—१ अश्विनीकुमार, २ यम, ३ अग्नि, ४ ब्रह्मा, ५ चंद्र, ६ शिव, ७ आदिति, ८ बृहस्पति, ९ सर्प, १० पितर, ११ भग, १२ अर्यमा, १३ सूर्य, १४ त्वष्टा, १५ वायु, १६ इंद्राग्नी, १७ मित्र, १८ इंद्र, १९ निर्ऋति, २० उदक, २१ विश्वेदेव, २२ विधि, २३ विष्णु, २४ वसु, २५ वरुण, २६ अजैकपात्, २७ अहिर्बुध्न्य, २८ पूषा, ह्या अठ्ठावीस क्रमानें नक्षत्रांच्या देवता आहेत. येथें अठ्ठावीस संख्या आहे, यास्तव बेविसावी विधि ही देवता अभिजित् नक्षत्राची आहे असें जाणावें. ह्या देवता सांगण्याचा उपयोग असा आहे कीं, जेथें जेथें नक्षत्र सांगण्याचे वेळेस देवतेचें नांव सांगितलें असेल, तेथें तेथें देवतांच्या नांवानें त्या त्या देवतेचें नक्षत्र घेत जावें.

वन्हित्रिऋत्विषुगुणेंदुकृताग्निभूतबाणाश्विनेत्रशरभूकुयुगाब्धिरामाः ॥
रुद्राब्धिरामगुणवेदशतद्वियुग्मा दंता बुधैर्निगदिताः क्रमशो भताराः ॥ ८ ॥

अर्थ–३।३।६।५।३।१।४।३।५।५।२।२।५।१।१।४।४।३।११।४।३।३।३।४।१०० ।२।२।३२ याप्रमाणें क्रमानें अश्विन्यादिक नक्षत्रांच्या तारांची संख्या समजावी. येथेंही अठ्ठावीस संख्या आहे, यास्तव बेविसावी ३ ही संख्या अभिजित् नक्षत्राच्या तारांची आहे असें जाणावें.

## मूलानुसारी स्फुट.

नक्षत्ररूपाण्यधुना वदामि तारात्रयेणाश्वमुखं भमाद्यं ।
त्रिभिर्भगं याम्यमथो खुराभं षड्भिः शरैः स्याच्छकटं विधेर्भं ॥ ९ ॥

त्रिभिर्मृगास्यं मणिरूपमेकं हर्म्यं चतुर्भिस्त्रितयेन बाणः ।
चक्रं शरैः पंचमितैस्तु शाला द्वंद्वद्वयेनोत्तरयोस्तु शय्या ॥ १० ॥

हस्तः शरैर्मौक्तिकमेकमेकं प्रवालवत्तोरणमब्धिसंख्यैः ।
वेदैर्बलिः कुंडलवत्त्रयं स्यात् सिंहोथ रुद्रैः श्रुतिभिस्तुमंचः ॥ ११ ॥

ऋक्षैस्त्रिप्रमितैरिभस्य रदनः शृंगाटकं स्यात्त्रिभि ।
स्ताराभिस्तिसृभिस्त्रिविक्रमनिभं स्यान्मर्दलाभं कृतैः ।

वृत्तं स्याच्छतसंमितैः शतभिषक् द्वंद्वद्वयेनोभयोः ।
खट्वाथो रदनोन्मितर्क्षनिचयेनांत्यंमृदंगाकृति ॥ १२ ॥

**अर्थ**—आतां नक्षत्रांचीं स्वरूपें सांगतों. १ अश्विनी नक्षत्र तीन तारांनीं घोड्याच्या तोंडासारखें आहे. २ भरणी तीन तारांनीं योनिसारखी आहे. ३ कृत्तिका सहा तारांनीं घोड्याच्या खुरासारखी आहे. ४ रोहिणी पांचांनीं गाड्यासारखी आहे. ५ मृगशीर्ष तिहींनीं हरणाच्या तोंडाप्रमाणें आहे. ६ आर्द्रा एक तारा मण्यासारखी आहे. ७ पुनर्वसु चार तारांनीं गृहाकार आहे. ८ पुष्य तिहींनीं बाणाकार आहे. ९ आश्लेषा पांचांनीं चक्राकार आहे. १० मघा पांचांनीं शाळेसारखी आहे. ११।१२ पूर्वाफल्गुनी आणि उत्तराफल्गुनी ह्या दोहोंच्या दोन दोन तारा मिळून चार तारांनीं पलंगासारखा आकार आहे. त्यांत पश्चिमेकडील दोन पूर्वाफल्गुनी व पूर्वेकडील दोन उत्तराफल्गुनी असा विभाग समजावा. १३ हस्त पांचांनीं पंजासारखा आहे. १४ चित्रा एक तारा मोत्यासारखी ठळक आहे. १५ स्वाती एक तारा पोंवळ्यासारखी किंचित् तांबडी आहे. १६ विशाखा चार तारांनीं तोरणाकार आहे. १७ अनुराधा चार तारांनीं राशीसारखी आहे. १८ ज्येष्ठा तीन तारांनीं कुंडलाकार आहे. १९ मूळ अकरा तारांनीं सिंहासारखें आहे. २० पूर्वाषाढा चार तारांनीं पलंगासारखी आहे. २१ उत्तराषाढा तीन तारांनीं गजदंताकार आहे. २२ अभिजित् तीन तारांनीं शिंगाड्यासारखें आहे. २३ श्रवण तीन तारांनीं त्रिविक्रमाकार आहे. २४ धनिष्ठा चहूंनीं ढोलक्यासारखी आहे. २५ शततारका शंभरांनीं वर्तुळाकार आहे. २६।२७ पूर्वाभाद्रपदा आणि उत्तराभाद्रपदा ह्या दोहोंच्या दोन दोन तारा मिळून चार तारांनीं मंचकाकार आहे. त्यात पश्चिमेकडील दोन तारा पूर्वाभाद्रपदा व पूर्वेकडील दोन तारा उत्तराभाद्रपदा असा विशेष समजावा. २८ रेवती बत्तीस तारांनीं मृदंगाकार आहे.

## नक्षत्रांचीं नांवें, शुभाशुभ संज्ञा, स्वामी वगैरेचें कोष्टक. मागील श्लोकांच्या अर्थाप्रमाणें जाणावें.

| संख्या. | नक्षत्रांचीं नांवें. | शुभाशुभ. संज्ञा. | स्वामींचीं न.वें. | रूप-नांवें. | मुख्य संज्ञा. | संज्ञा नांवें. | लोचन-संज्ञा. | स्वरूपांची आकृति. | ताऱ्यांची संख्या. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | अश्विनी. | शुभ. | अश्वि. कु. | तिर्य. मुख. | लघु. | क्षिप्र. | मंदलोच. | अश्वमुख | ३ |
| २ | भरणी. | नाशक. | यम. | अधोमुख. | उग्र. | क्रूर. | मध्यलो. | योनिरूप. | ३ |
| ३ | कृत्तिका. | कार्यनाश. | अग्नि. | अधोमुख. | मिश्र. | साधारण. | सुलोचन. | वस्तरा. | ६ |
| ४ | रोहिणी. | सिद्धि. | ब्रह्मा. | ऊर्ध्वमुख. | ध्रुव. | स्थिर. | अंधलो. | शकटाकार. | ५ |
| ५ | मृगशीर्ष. | शुभ. | चंद्र. | तिर्य. मुख. | मृदु. | मैत्र. | मंदलोच. | मृगासम. | ३ |
| ६ | आर्द्रा. | शुभ. | शिव. | ऊर्ध्वमुख. | तीक्ष्ण. | दारुण. | मध्यलो. | मणिसम. | १ |
| ७ | पुनर्वसु. | मध्यम. | देवमाता. | तिर्यङ् मु. | चर. | चल. | सुलोचन. | गृहासम. | ४ |
| ८ | पुष्य. | शुभ. | गुरु. | ऊर्ध्वमुख. | लघु. | क्षिप्र. | अंधलो. | शरासम. | ३ |
| ९ | आश्लेषा. | शोक. | सर्प. | अधोमुख. | तीक्ष्ण. | दारुण. | मंदलो. | चक्रासम. | ५ |
| १० | मघा. | नाशक. | पितर. | अधोमुख. | उग्र. | क्रूर. | मध्यलो. | शालासम. | ५ |
| ११ | पूर्वा. | मृत्युप्रद. | भग: | अधोमुख. | उग्र. | क्रूर. | सुलोचन. | शय्यासम. | २ |
| १२ | उत्तरा. | विद्या. | अर्यमा. | ऊर्ध्वमुख. | ध्रुव. | स्थिर. | अंधलोच. | पर्यंकासम. | २ |
| १३ | हस्त. | लक्ष्मी | रवि. | तिर्य. मु. | लघु. | क्षिप्र. | मंदलोचन. | हस्तासम. | ५ |
| १४ | चित्रा. | शुभदा. | त्वष्टा. | तिर्य. मु. | मृदु. | मैत्र. | मध्यलो. | मौक्तिक. | १ |

| | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १५ | स्वाती. | अशुभदा. | वायु. | तिर्य मु. | चर. | चल. | सुलोचन. | पेंवळ्या. | १ |
| १६ | विशाखा. | अशुभ. | इंद्राग्नी. | अधोमुख. | मिश्र. | साधार. | अंधलो. | तोरणास. | ४ |
| १७ | अनुराधा. | सर्वसिद्धि. | मित्र. | तिर्य. मु. | मृदु. | मैत्र. | मंदलोचन. | बलीसम. | ४ |
| १८ | ज्येष्ठा. | क्षय. | इंद्र. | तिर्य मु. | तीक्ष्ण. | दारुण. | मध्यलोचन. | कुंडलास. | ३ |
| १९ | मूळ. | नाशप्रद. | राक्षस. | अधोमुख. | तीक्ष्ण. | दारुण. | सुलोचन. | सिंहपु. | ११ |
| २० | पूर्वाषाढा. | अर्थहानि. | उदक. | अधोमुख. | उग्र. | क्रूर. | अंधलोचन. | शय्यास. | ४ |
| २१ | उत्तराषाढा. | बुद्धिदा. | विश्वदेव. | ऊर्ध्वमुख. | ध्रुव | स्थिर. | मंदलोचन. | हत्तीदंतासम. | ३ |
| २२ | अभिजित्. | बुद्धिदा. | ब्रह्मा. | सर्वतोमु. | लघु. | क्षिप्र. | मध्यलोचन. | कोल्हास. | ३ |
| २३ | श्रवण. | सुखदा. | विष्णु. | ऊर्ध्वमुख. | चर. | चल. | सुलोचन. | वामनास. | ३ |
| २४ | धनिष्ठा. | शुभदा. | वसु. | ऊर्ध्वमुख | चर. | चल. | अंधलोचन. | ढोलक्यासम. | ४ |
| २५ | शततारका. | कल्याणी. | वरुण. | ऊर्ध्वमुख. | चर. | चल. | मंदलोचन. | वर्तुलाकार. | १०० |
| २६ | पूर्वाभाद्र. | मृत्युदा. | अजैकपात्. | अधोमुख | उग्र. | क्रूर. | मध्यलोचन. | यमला. | २ |
| २७ | उत्तराभाद्र. | लक्ष्मी. | अहिर्बुं. | ऊर्ध्वमुख. | ध्रुव. | स्थिर. | सुलोचन. | पर्यंकास. | २ |
| २८ | रेवती. | कामदा. | पूषा. | तिर्य. मु. | मृदु. | मैत्र. | अंधलोचन. | मृदंग. | ३२ |

## दैवज्ञवल्लभ ग्रंथांत.

संख्याकृतिश्चाभिजिता युतानां भानां निरुक्ताश्विनिपूर्वकाणां ।
तारोक्तसंख्यैर्दिनमासवर्षैर्यातैरमीषां फलपाकमाहुः ॥ १३ ॥

अर्थ—अभिजितासहवर्तमान अश्विन्यादि अठ्ठावीस नक्षत्रांची संख्या आणि आकार सांगितले आहेत. ज्या नक्षत्राच्यासंबंधानें जें फल सांगितलें आहे तें फल त्या नक्षत्राच्या जितक्या तारा असतील तितके दिवस किंवा महिने अथवा वर्षें गेल्यानंतर होतें असें ऋषी ह्मणतात.

## वराहसंहिता.

नक्षत्रजमुद्वाहे फलमब्दैस्तारकामितैः सदसत् ।
दिवसैर्ज्वरस्य नाशो व्याधेरन्यस्य वा वाच्यः ॥ १४ ॥

अर्थ— विवाहकालच्या नक्षत्राचें जें फल चांगलें किंवा वाईट सांगितलें आहे तें त्या नक्षत्राच्या जितक्या तारा असतील तितक्या वर्षांनीं होतें, आणि ज्या नक्षत्रावर ज्वर अथवा दुसरा रोग उत्पन्न झाला असेल त्याचा नाश त्या नक्षत्राच्या तारांइतक्या दिवसांनीं होईल असें सांगावें.

## मुहूर्तमाला.

ब्रह्माहिमूलादितिभस्य पूर्वे याम्यांत्यपित्र्यानलभस्य याम्ये ।
हस्तश्रविष्ठाख्यभयोस्तु पश्चाद्धस्तस्य तत्रोत्तरगा च किंचित् ॥ १५ ॥
पूर्वोत्तरार्थेंदुविशाखिकानां स्फुटोत्तरस्यां दिशि योगतारा ।
मित्रेज्यशक्रश्रवसां तु मध्ये स्थूला परेषां प्रकटैकिकैव ॥ १६ ॥

अर्थ—रोहिणी, आश्लेषा, मूळ आणि पुनर्वसु या नक्षत्रांची योगतारा (विशेषेंकरून प्रकाशमान तारा) पूर्वेस आहे. भरणी, रेवती, मघा व कृत्तिका यांची योगतारा दक्षिणेस आहे. हस्त आणि धनिष्ठा ह्या दोन नक्षत्रांची योगतारा पश्चिमेस आहे. त्यांतही हस्ताची योगतारा किंचित् उत्तरेस आहे. पूर्वाफल्गुनी, पूर्वाषाढा आणि पूर्वाभाद्रपदा अशा तीन पूर्वा, उत्तराफल्गुनी, उत्तराषाढा व उत्तराभाद्रपदा अशा तीन उत्तरा याप्रमाणेंच जेथें जेथें सामान्य रूपानें पूर्वा किंवा उत्तरा असा शब्द येईल तेथें तेथें वर लिहिल्याप्रमाणें तिहींचें ग्रहण करावें. पूर्वा, तीन उत्तरा, अश्विनी, मृगशीर्ष आणि विशाखा ह्या पांचांची योगतारा उत्तरेस स्पष्ट आहे.

अनुराधा, पुष्य, ज्येष्ठा व श्रवण ह्या चहूंची योगतारा मध्यें आहे. शेष राहिलीं जीं पांच नक्षत्रें त्यांत शततारका आणि अभिजित् या दोहोंची जी मोठी तारा ती योगतारा जाणावी. आर्द्रा, चित्रा व स्वाती ह्या तिहींची तर एकेकच तारा आहे. योगतारेच्या ज्ञानाचा उपयोग असा कीं, ती आकाशाच्या मध्यमार्गीं आली ह्मणजे तें नक्षत्र मध्यमार्गीं आलें असें जाणावें.

## मुहूर्तमाला, मुहूर्ततत्वानुसारी स्फुट.

सूर्यक्षतोऽस्तर्क्षमथोदयर्क्षं खमध्यगर्क्षं गणयेत्क्रमेण ।
हीनं महीतिथ्यहिभिः खपक्षनिघ्नं नवाप्तं निशि मुक्तनाड्यः ॥ १७ ॥

अर्थ—सूर्यनक्षत्रापासून अस्तास जाणारें नक्षत्र मोजलें तर त्यांत एक कमी करावा, उदयास येणारें नक्षत्र मोजलें तर त्यांत पंधरा कमी करावे, आकाशमध्यस्थ नक्षत्र मोजलें तर त्यांत आठ कमी करावे. याप्रमाणें कमी केल्यावर जें शेष राहील तें विसांनीं गुणून नवांनीं भागलें असतां जो भाग येईल तितक्या घटका रात्र त्या वेळेस झाली असें समजावें. विपरीत गणना करून ह्याप्रमाणेंच कृति केली ह्मणजे रात्रीच्या शेष घटका समजतील हें अर्थसिद्धच आहे. ह्मणजे असें कीं, अस्तनक्षत्र, उदयनक्षत्र आणि मध्यनक्षत्र ह्यांपासून सूर्यनक्षत्रापर्यंत मोजून पूर्ववत् सर्व प्रकार केला असतां रात्रीच्या शेष घटका समजतात.

रात्रौ गेलेल्या किंवा शेष राहिलेल्या घटकांचें सूक्ष्म रीतीनें ज्ञान होण्यासाठीं कोणतें लग्न किती भाग उदयास आलें आहे हें मध्यस्थ नक्षत्रावरून समजण्याचा प्रकार.

## गणेशदैवज्ञ.

प्राग्लग्नस्य लवाः खमध्यमगते दास्रे द्विदिग्भिर्मिता ।
याम्येसूर्यभुवोग्निभेऽष्टमिहिरा ब्राह्मे खशक्रोन्मिताः ।
चांद्रेत्र्यक्षभुवोभवेंऽगतिथयःस्त्र्यष्टेंदवःसप्तमे ।
पुष्येंऽगांकभुवोऽहिभेऽद्रिगाविलाः पित्र्येऽद्रिभूवाहवः ॥ १८ ॥
भाग्ये दंतदशोऽर्यमोडुनि नभःसिद्धाः करे कक्षदक् ।
त्वाष्ट्रे त्र्यंगदशोऽनिलेऽष्टगदशो द्वीशे कुनंदाश्विनः ।
मित्रेऽक्षाभ्रगुणाः परे रविगुणा मूलेऽद्रिदंता जले ।
पंचाब्ध्यग्नय उत्तरे किषुगुणा ब्राह्मेऽब्धिबाणाग्नयः ॥ १९ ॥

श्रीपेऽर्का वसुभे गजाश्विन इहांब्धीशोडुनीलर्तवोऽ ।
जांघ्रौपट्पड्डुपांतिमेऽब्धितुरगाः पौष्णेऽब्धिनंदा इमे ।
प्रोक्ताः केशवदैवविरत्तनुभुवा श्रीमद्गणेशेन वै ।
यद्देशे पलभा युगांगुलमिताऽन्यत्रत्विमेऽल्पांतराः ॥ २० ॥

अर्थ—अश्विनी नक्षत्र आकाशाच्या दक्षिणोत्तर रेषेच्या मध्यभागीं आलें असतां पूर्वेस स्वदेशक्षितिजाच्या उदयस्थानीं राशिचक्राचे एक्शेंदोन भाग उदय पावले असें समजावें. ह्मणजे प्रत्येक राशीचे तीस भाग याप्रमाणें मेष, वृषभ आणि मिथुन ह्या तीन राशींचे नव्वद भाग भुक्त होऊन कर्क राशीचे बारा भाग भुक्त झाले असें जाणावें. याप्रमाणेंच पुढेंही राशी व अंश भुक्त झालेले समजावे. ते असे कीं, भरणी मध्यभागीं आली ह्मणजे ११२ भाग उदय पावले असें समजावें. कृत्तिका आल्या असतां १२८, रोहिणी आली असतां १४०, मृगशीर्ष आलें असतां १५२, आर्द्रा १६६, पुनर्वसु १८३, पुष्य १९६, आश्लेषा १९७, मघा २१७, पूर्वाफल्गुनी २३२, उत्तराफल्गुनी २४०, हस्त २५१, चित्रा २६३, स्वाती २७७, विशाखा २९१, अनुराधा ३०५, ज्येष्ठा ३१२, मूळ ३२७, पूर्वाषाढा ३४५, उत्तराषाढा ३५१, अभिजित् ३५४, श्रवण १२, धनिष्ठा २८, शततारका ६१, पूर्वाभाद्रपदा ६६, उत्तराभाद्रपदा ७४, रेवती ९४ याप्रमाणें राशिचक्राचे अंश उदयास येतात. ही अंशांची संख्या केशव जोशी यांचा पुत्र जो महाविद्वान् गणेश जोशी यानें सांगितली आहे; परंतु ज्या देशांत वर लिहिलेली पलभा (शंकुछाया) चार अंगुलें आहे त्या देशांत ही संख्या बरोबर अनुभवास येईल. अन्यत्र ठिकाणीं किंचित् अंतर पडेल असें समजावें.

## स्फुट.

पादप्रभा नगयुता रहिता च मेषात्-
षट्स्विंदुना त्रियुगबाणशराब्धिरामैः ॥
स्याद्भाजको दिनदलस्य नगाहतस्य
पूर्वे गताः स्युरपरे दिनशेषनाड्यः ॥ २१ ॥

अर्थ—उष्णा (उन्हा) मध्यें जी आपली छाया पडली असेल ती आपल्या पाउलांनीं मोजून जी संख्या येईल त्यांत सात मिळवावे. नंतर जी संख्या होईल त्यांत मेष, वृषभ, मिथुन, कर्क, सिंह आणि कन्या ह्या संक्रांतींत एक उणा करावा. तूळ

संक्रांतींत तीन, वृश्चिकांत चार, धनूस पांच, मकरास पांच, कुंभास चार आणि मीन संक्रांतींत तीन याप्रमाणें क्रमानें संख्या कमी करावी. मग सिद्ध झालेला जो अंक त्यानें दिनमानाचें जें अर्ध त्याला सातांनीं गुणून जो अंक सिद्ध होईल त्यास भागावें. जो भागाकार येईल तितक्या घटका दिवसाचें ( पूर्वार्ध असल्यास ) गेल्या आहेत, आणि दिवसाचें ( उत्तरार्ध असेल तर ) शेष राहिल्या आहेत असें समजावें.

## रत्नमाला.

परकृतमखिलं निहंति पुष्यो न खलु परस्तु निहंति पुष्यदोषं ।
ध्रुवममृतकरेऽष्टमेऽपि पुष्ये विहितमुपैति सदैव कर्म सिद्धिं ॥ २२ ॥

अर्थ — तिथ्यादिकांचे दोष असतील तर त्या सर्वांचा नाश पुष्य नक्षत्र करितें; परंतु पुष्यापासून जर दोषोत्पत्ति असेल तर त्या दोषाचें निवारण अन्य गुणानें होत नाहीं. तें असें कीं, जर चंद्र आठवा असला तरी सर्व काळीं पुष्य नक्षत्रावर केलेलें कार्य सिद्धीस जातें हें निश्चित आहे.

सिंहो यथा सर्वचतुष्पदानां तथैव पुष्यो बलवानुडूनां ।
चंद्रे विरुद्धेप्यथ गोचरेपि सिध्यंति कार्याणि कृतानि पुष्ये ॥ २३ ॥

अर्थ — जसा सिंह सर्व चतुष्पादांमध्यें बलवान् आहे, तसाच सर्व नक्षत्रांमध्यें पुष्य बलिष्ठ आहे. यास्तव तत्काल लग्नापासून अथवा जन्मराशीपासून चंद्र प्रतिकूल असला तरी जीं कार्यें पुष्य नक्षत्रावर केलीं तीं सर्व सिद्धीस जातात.

ग्रहेण विद्धोप्यशुभान्वितोपि विरुद्धतारोपि विलोमगोपि ।
करोत्यवश्यं सकलार्थसिद्धिं विहाय पाणिग्रहमेव पुष्यः ॥ २४ ॥

अर्थ—पुष्य, ग्रहानें विद्ध झाला किंवा पापग्रहानेंयुक्त असला अथवा ताराबल जरी नाहीं, यद्वा जन्मनक्षत्रादि रूपानें वर्ज्य असला तरी विवाहावांचून इतर सर्व कार्यांविषयीं सर्व फळांची सिद्धि देतो. ग्रहानें वेध कसा होतो तो नक्षत्र-प्रकरणीं समजेल.

रोहिण्युत्तरभं स्थिरं गिरिशमूलेंद्रोरगा दारुणं ।
क्षिप्रं दस्रदिनेशपुष्यमनलेंद्राग्नी तु साधारणं ।
उग्रं पूर्वमघांतकं मृदु मृगत्वाष्ट्रांत्यमित्रं चरं ।
विष्णुस्वातिशतोडुवस्वदितयः कुर्युः स्वसंज्ञाफलं ॥ २५ ॥

अर्थ—रोहिणी आणि तीन उत्तरा अशा चार नक्षत्रांस स्थिर अशी संज्ञा आहे. आर्द्रा, मूळ, ज्येष्ठा व आश्लेषा ह्या चहूंला दारुण असें नांव आहे. अश्विनी, हस्त आणि पुष्य या तिहींला क्षिप्र असें ह्मणतात. कृत्तिका व विशाखा ह्या दोहोंस साधारण असें नांव आहे. तीन पूर्वा, मघा आणि भरणी हीं पांच उग्रसंज्ञक आहेत. मृगशीर्ष, चित्रा, रेवती व अनुराधा हीं चार मृदुसंज्ञक आहेत. श्रवण, स्वाती, शततारका, धनिष्ठा आणि पुनर्वसु ह्या पांचांस चर असें नांव आहे. अशीं हीं सर्व नक्षत्रें आपापल्या संज्ञेसारखें फल देतात.

## रत्नमाला.

चरं चलं क्रूरमुशंति चोग्रं ध्रुवं स्थिरं दारुणभं च तीक्ष्णं ।
क्षिप्रं लघूक्तं मृदु मैत्रसंज्ञं साधारणं मिश्रमिति ब्रुवंति ॥ २६ ॥

अर्थ—चरास चल, उग्रास क्रूर, स्थिरास ध्रुव, दारुणास तीक्ष्ण, क्षिप्रास लघु, मृदूस मैत्र, आणि साधारणास मिश्र याप्रमाणें दुसरीं नांवें त्या नक्षत्रांस आहेत असें ऋषी ह्मणतात.

## रत्नमाला.

अधकं तदनु मंदलोचनं मध्यलोचनमतः सुलोचनं ।
रोहिणीप्रभृतिभं चतुर्विधं साभिजिच्च गणयेत्पुनःपुनः ॥ २७ ॥

अर्थ—रोहिणी नक्षत्रापासून आरंभ करून अनुक्रमानें अभिजितासहवर्तमान अठ्ठावीस नक्षत्रें प्रथम अंधक, दुसरें मंदलोचन, तिसरें मध्यलोचन आणि चवथें सुलोचन याप्रमाणें चार नांवानें पुनः पुनः सात वेळ मोजावें. ह्मणजे रोहिणी अंधक, मृग मंदलोचन, आर्द्रा मध्यलोचन व पुनर्वसु सुलोचन याचप्रमाणें पुढेंही सहा पर्याय मोजावे.

## मुहूर्तमाला.

अंधेषु नष्टं धनमाशु लभ्यं प्रयत्नतः केकरसंज्ञकेषु ॥
दूराच्छ्रुतिः स्याच्चिपटेषु भेषु स्वक्षेषु नैव श्रवणं न लाभः ॥ २८ ॥

अर्थ—अंध नक्षत्रावर नष्ट ( हरवलेलें ) द्रव्य लवकर प्राप्त होतें. मंदलोचनावर नष्ट झालेलें द्रव्य प्रयत्नानें मिळतें. मध्यलोचनावर नष्ट झालेल्या द्रव्याची दुरून वार्ता मात्र ऐकण्यांत येते, परंतु हस्तगत होत नाहीं; आणि सुलोचनावर नष्ट झालेल्या द्रव्याचा लाभ होत नाहीं व त्याची वार्ताही ऐकण्यांत येत नाहीं.

प्रयाति पूर्वां दिशमंधकर्क्षैस्तद्दक्षिणां केकरसंज्ञकैर्भैः ॥
दिशं प्रतीचीं चिपिटैश्च धिष्ण्यैः स्वक्षैरुदक्तत्र गवेषणीयं ॥ २९ ॥

**अर्थ**--अंध नक्षत्रावर नष्ट झालेलें द्रव्य पूर्वेस जातें. मंदलोचनावर नष्ट झालेलें द्रव्य दक्षिणेस जातें. मध्यलोचनावर नष्ट झालेलें द्रव्य पश्चिमेस जातें व सुलोचनावर नष्ट झालेलें द्रव्य उत्तरेस जातें. यास्तव नक्षत्रावरून त्या त्या दिशेस शोध करावा.

## लल्ल.

याम्यं चित्रोत्तराषाढाधनिष्ठोत्तरफाल्गुनी ॥
ज्येष्ठा च रेवती चैव जन्मर्क्षं भानुतः क्रमात् ॥ ३० ॥
जन्मर्क्षग्रहसंयोगे न कुर्याच्छोभनं नरः ॥
पाणिग्रहणयात्रादि विनाशमुपयात्यतः ॥ ३१ ॥

**अर्थ**—भरणी, चित्रा, उत्तराषाढा, धनिष्ठा, उत्तराफल्गुनी, ज्येष्ठा आणि रेवती हीं सात नक्षत्रें अनुक्रमानें सूर्यादि ग्रहांचीं जन्मनक्षत्रें होत. यास्तव ज्या कालीं ग्रहांचा आपआपल्या जन्मनक्षत्राशीं समागम असतो, त्या कालीं विवाहादि मंगळ कार्यें व विजययात्रादि शुभ कृत्यें केलीं तर सिद्धीस जात नाहींत. यास्तव तीं त्या कालीं करूं नयेत.

## मुहूर्तमालेच्या टीकेंत दीपिका.

जन्मर्क्षमाद्यं दशमं च कर्मभं सांघातिकं षोडशभं च मानसं ॥
स्यात्पंचविंशं समुदायमष्टादशं त्रयोविंशतिभं विनाशकं ॥ ३२ ॥
एवं षड्भो जनः सर्वो देशजात्यभिषेकभैः ॥
नवभो नृपतिर्ज्ञेयो नाडीताराः स्मृता अमूः ॥ ३३ ॥
एतासु नवसु प्राप्तैः क्रूरैरशुभसंभवः ।
सौम्यग्रहेण युक्तिश्चेद्विपरीतं फलं भवेत् ॥ ३४ ॥

**अर्थ**--ज्या नक्षत्रावर प्राणी उत्पन्न होतो तें जन्मनक्षत्र, त्यापासून दहावें कर्मनक्षत्र, सोळावें संघातनक्षत्र, अठरावें समुदायनक्षत्र, तेविसावें विनाशनक्षत्र, पंचविसावें मानसनक्षत्र. याप्रमाणें सहा नक्षत्रांवरून शुभ किंवा अशुभ सर्व लोकांनीं पहावें; आणि राजानें देशनक्षत्र, जातिनक्षत्र व अभिषेकनक्षत्र हीं तीन आणि पूर्वोक्त सहा नक्षत्रें अशा नऊ नक्षत्रांवरून शुभ किंवा अशुभ पहावें. कारण हीं नऊ

नाडीनक्षत्रें आहेत. यास्तव या नऊ नक्षत्रांवर पापग्रह आला ह्मणजे दुःख प्राप्त होतें व शुभग्रह आला ह्मणजे सुख प्राप्त होतें.

### वरील नऊ नक्षत्रें मंगल कृत्यास वर्ज्य करावीं यास प्रमाण.

### मुहूर्तकल्पद्रुम.

आद्यदिक्नृपधृतितित्रिविंशकं तत्वसंख्यमपि भं तु मंगले ।
निंदितं जनिभतस्तु भूपतेर्देशजात्यभिषवोडु चाहितं ॥ ३५ ॥

अर्थ—जन्मनक्षत्र, त्यापासून १० वें १६ वें १८ वें २३ वें २५ वें हीं सहा नक्षत्रें सर्व लोकांनीं मंगल कार्यास वर्ज्य करावीं आणि देशनक्षत्र, जातिनक्षत्र, अभिषेकनक्षत्र व पूर्वोक्त सहा नक्षत्रें अशीं नऊ नक्षत्रें राजानें मंगल कार्यास वर्ज्य करावीं.

### जातिभेदानें नक्षत्रविभाग.

### मुहूर्तमालेच्या टीकेंत वराह.

पूर्वात्रयं सानलमग्रजानां राज्ञां च पुष्येण सहोत्तराणि ।
सपौष्णमित्रं पितृदैवतं च प्रजापतेर्भं च कृषीवलानां ॥ ३६ ॥
आदित्यहस्ताभिजिदाश्विनानि वणिग्जनस्वाम्यमुपागतानि ।
मूलाग्निनेत्रानिलवारुणानि भान्युग्रजातेः प्रभविष्णुतायाः ॥ ३७ ॥
सौम्येंद्रचित्रावसुदैवतानि सेवानरस्वाम्यमुपागतानि ।
सार्पं विशाखा श्रवणो भरण्यश्चंडालजातेरभिनिर्दिशंति ॥ ३८ ॥

अर्थ—पूर्वाफल्गुनी, पूर्वाषाढा, पूर्वाभाद्रपदा, कृत्तिका ह्या चार नक्षत्रांस ब्राह्मणाचें स्वामित्व आहे. उत्तराफल्गुनी, उत्तराषाढा, उत्तराभाद्रपदा व पुष्य ह्या चार नक्षत्रांस क्षत्रियाचें; रेवती, अनुराधा, मघा, आणि रोहिणी ह्या चार नक्षत्रांस कृषिकर्म करणारांचें; पुनर्वसु, हस्त, अभिजित् व अश्विनी ह्या चार नक्षत्रांस वाणी लोकांचें; मूळ, आर्द्रा, स्वाती आणि शततारका ह्या चार नक्षत्रांस यवन आदिकरून क्रूर जातीचें; मृगशिर, ज्येष्ठा, चित्रा व धनिष्ठा ह्या चार नक्षत्रांस चाकर लोकांचें; आश्लेषा, विशाखा, श्रवण आणि भरणी ह्या चार नक्षत्रांस चांडाळ जातीचें स्वामित्व आहे. तेव्हां ह्या नक्षत्रांवर शुभ ग्रह आला असतां त्या त्या जातीस शुभकारक व पापग्रह आल्यास अशुभसूचक असें पूर्ववत्प्रमाणें समजावें.

## त्रिपुष्करद्विपुष्करदोष मूलानसारी स्फुट.

भद्रातिथौरविकुजार्कजजीववारे ।
त्रैपुष्करो भवति वै विषमांघ्रिधिष्ण्यैः ॥
त्रैगुण्यदोषमुदितो मृतिनाशवृद्धौ ॥
द्वैपुष्करो द्विगुणकृद्वसुतक्षचांद्रे ॥ ३९ ॥

अर्थ—द्वितीया, सप्तमी आणि द्वादशी या तीन तिथि; रवि, मंगळ, शनि व गुरु हे चार वार; विषम चरण नक्षत्रें ह्मणजे कृत्तिका, पुनर्वसु, उत्तराफल्गुनी, विशाखा, उत्तराषाढा आणि पूर्वाभाद्रपदा हीं सहा नक्षत्रें ह्यांतून तिहींचा संयोग झाला ह्मणजे त्यास त्रिपुष्कर योग असें नांव आहे. या योगावर मरण, पदार्थ हरवणें किंवा वृद्धि झाल्यास तीं तिप्पट होतात. वर लिहिलेल्या तिथि आणि वार ह्यांचा संयोग असून त्यावेळेस जर मृगशीर्ष, चित्रा व धनिष्ठा ह्या तीन नक्षत्रांतील नक्षत्राचा योग असेल तर त्यास द्विपुष्कर योग असें नांव आहे. ह्या योगावर मरणादिक झाल्यास तीं दुप्पट होतात.

## पीयूषधारेंत नारद.

दद्यात्तद्दोषनाशाय गोत्रयं मूल्यमेव वा ।
द्विपुष्करे द्वयं दद्यान्नदोषस्त्वृक्षमात्रतः ॥ ४० ॥

अर्थ—त्रिपुष्कर योगावर मरण झालें किंवा पदार्थ हरवला तर त्याचा दोष जाण्यासाठीं तीन गाई किंवा त्यांचें मूल्य द्यावें. द्विपुष्करावर तीं झाल्यास दोन गाई किंवा मूल्य द्यावें. वर लिहिलेलीं नक्षत्रेंच केवळ असल्यास दोष नाहीं.

रात्रौ यामद्वयादर्वाक् सप्तमी वा त्रयोदशी ।
तथैव नवनाडीषु चतुर्थी यदि दृश्यते ।
प्रदोषः सतु विज्ञेयः सर्वविद्या विगर्हितः ॥ ४१ ॥

अर्थ—षष्ठी तिथीदिवशीं मध्यरात्रीच्यापूर्वीं सप्तमी, द्वादशी दिवशीं मध्यारात्रीपूर्वीं त्रयोदशी, किंवा तृतीये दिवशीं नऊ घटिका रात्रीपूर्वीं चतुर्थी येईल तर तो प्रदोष होतो. हा सर्व विद्याध्ययनास निंद्य आहे, तो वर्ज्य करावा.

### अथ नामनक्षत्रज्ञानायावकहडाचक्रोपपत्तिः

शुंठीकोष्टे २५ पु तिर्यक् त्ववकहड लिखाधःस्थितालीन्विदाद्यै ।

स्तान्युक्तांस्तैःस्वरैश्च क्रमत इहकुयुक्घङछा मध्यकोष्ठे ।
धैर्धैरूर्ध्वाधरालीष्वनलभत इहासार्पमर्णैर्भपादाः ।
एवं चान्येषु दद्यान्मटपरतपुयुक्षणठा मध्यकोष्ठे ॥ ४२ ॥ समरसार.

**टीका**—शुंठीकोष्ठेषु पंचविंशतिसंख्येषु तिर्यक्स्थितोपरिपंक्तौ अ, व, क, ह, ड, इति पंचाक्षराणि पंचसु कोष्ठेषु उपरितनेषु लिख तदनु अधःस्थितालीषु चतसृषु तदाद्यैरेतैः पूर्वोक्तैः ह्रस्वैः इ, उ, ए, ओ एवंरूपैश्चतुर्भिर्युक्तास्तान व, क, ह, ड, युतान् भेदान् विंशतिसंख्यान् इविकिहिडि इत्येवंप्रकारेण क्रमतो लिख अत्र विशेषः कुयुक् घङछा मध्यकोष्ठे कुशब्दस्तत्र घकारङकारछकारयुक्त एवलेख्यः एवं पंचविंशतिकोष्ठेषु अष्टाविंशतिवर्णपूर्णेषु धैर्धैश्चतुर्भिरूर्ध्वाधरालीषु ऊर्ध्वाधःपंक्तिषु अ, इ, उ आदि चतुःकोष्ठेषु अनलभतः कृत्तिकादिनक्षत्रादिचक्रे आसार्पमाश्लेषानक्षत्रपर्यंतं अर्णैश्चतुर्भि र्भस्य नक्षत्रस्य पादाः स्युः यथा अ, इ, उ, ए इतिकृत्तिका पादाः ॥ ओ, व, वि, वु इति रोहिणीपादाः एवमन्येषामपि नक्षत्राणां पादाश्चतुर्भिर्वर्णैर्ज्ञेयाः

पितृभत इह भानि चाद्विदैवं नयभजखाश्च तथा भुयुक्धफाढः ।
हरिभमवधितश्च मैत्रतः स्युर्गसदचलावसुभाद्दुयुक्थझञः ॥ ४३ ॥ समरसार.

**टीका**—अथ मघादिभपादवर्णानयनमाह ॥ एवमिति ॥ एवं प्रागुक्तरीत्या अन्येषु पंचविंशतिकोष्ठेषु मटपरतवर्णान् अइउएओइति स्वरभेदेन पंचविंशति संख्याकान् वर्णान्दद्यात् लिखेदित्यर्थः ॥ अत्र विशेषः मध्यकोष्ठेषु पुयुक्पुकारयुक्तान् षणठान् षकारणकारठकारान्लिखेत् ॥ अथ मघादिवर्णानाह ॥ पितृभतो मघानक्षत्रात् ॥ इह मटपरतवर्णेषु आद्विदैवं विशाखानक्षत्रपर्यंतं सप्तनक्षत्राणां चत्वारः पादा ज्ञेयाः नयभजखाश्च पंचविंशतिकोष्ठकेषु लेख्याः भुशब्दकोष्ठे धफढलेख्याः तत्र मैत्रतोनुराधानक्षत्राद्धरिभं श्रवणनक्षत्रावधिकृत्य चत्वारश्चत्वारो भपादा ज्ञेयाः ततः पंचविंशतिकोष्ठेषु गसदचल इति पंचवर्णान्स्वरभेदेन पंचविंशति संख्यान् लिखेत् दुशब्दकोष्ठे च थझञ इति–क्रमेणलिखेदत्रवसुभाद्धनिष्ठानक्षत्रात् भरणीयावत्सप्तनक्षत्रपादाः प्राग्वज्ज्ञेया इति नामनक्षत्रज्ञानम् ॥ २ ॥

**अर्थ ( टीकेसह )**—पंचवीस पंचवीस घरांचीं चार कोष्टकें तयार करून तीं एकत्र करावीं, ह्मणजे एक शंभर घरांचें चौकोनाकृति कोष्टक तयार होतें. प्रथमचें पंचवीस घरांचें कोष्टक घेऊन त्यांत डाव्या हाताकडून उजव्या हाताकडे नीट सरळ

रेषेनें अ, व, क, ह, ड अशीं पांच अक्षरें प्रथम सूत्राचीं लिहावीं आणि पहिल्या (अ) अक्षराखालीं इ, उ, ए, ओ अशीं अक्षरें लिहावीं. ह्मणजे (अ) सुद्धां पांच अक्षरें एकाखालीं एक येतील. वेदकालीन जें कृत्तिका नक्षत्र त्यावरूनच वरील सूत्राची उपपत्ति झाली आहे ती अशी:—अ, इ, उ, ए कृत्तिका; ओ, व, वि, वु रोहिणी. याप्रमाणें कृत्तिकादि आश्लेषापर्यंत सात नक्षत्रें या कोष्टकांत लिहावयाचीं आहेत तीं अशीं कीं, कृत्तिकापासून चवथें नक्षत्र आर्द्रा त्याचा ह्या कोष्टकाचे मध्यभागीं स्तंभ होतो. त्या स्तंभांत कु हें अक्षर मागील पूर्वचालीप्रमाणें घेऊन आणखी त्यांत घ, ङ, छ हीं तीन अक्षरें सूत्राशिवाय जास्त लिहावीं, ह्मणजे प्रथम स्तंभ पुरा होतो. नंतर ह्या स्तंभापैकीं पहिलें अक्षर (कु) ह्याच्या पुढील चालीप्रमाणें येणारें अक्षर (के) को, ह, ही पुनर्वसू. याप्रमाणें पुढें आश्लेषांतापर्यंत नक्षत्रांचीं अक्षरें लिहून पहिलें कोष्टक पुरें करावें. दुसरे पंचवीस घरांचे कोष्टकांत दुसरें सूत्र म, ट, प, र, त हें वर सांगितल्याप्रमाणें लिहून (म) अक्षराच्या खालीं मि, मु, मे, मो अशीं अक्षरें लिहावीं, ह्मणजे (म) सुद्धां पांच अक्षरें एकाखालीं एक येतील. त्या अक्षरावरून म, मि, मु, मे मघा; मो, ट, टि, टु पूर्वा; याप्रमाणें मघापासून सात नक्षत्रें विशाखांतापर्यंत लिहावीं. मघापासून चवथें नक्षत्र हस्त आहे. त्याचा स्तंभ ह्या कोष्टकाच्या मध्यभागीं होतो; आणि हस्त नक्षत्रांत क्रमानें येणारें पहिलें अक्षर (पु) हें आहे. त्यांत आणखी सूत्राखेरीज ष, ण, ठ अशीं तीन अक्षरें घालून दुसरा स्तंभ पुरा करावा; आणि त्यांत प्रथमचें (पु) हें अक्षर आहे त्या पुढील क्रमानें येणारें (पे,) पो, र, रि चित्रा. ह्याप्रमाणें पुढें विशाखांतापर्यंत सात नक्षत्रांचीं अक्षरें लिहून हें कोष्टक पुरें करावें. तिसरे पंचवीस घरांचे कोष्टकांत तिसरें सूत्र न, य, भ, ज, ख हीं अक्षरें वर सांगितल्याप्रमाणें लिहावीं आणि (न) अक्षराखालीं नि, नु, ने, नो हीं अक्षरें घालावीं. ह्मणजे न, ते नो पर्यंत पांच अक्षरें होतात. त्यावरून न, नि, नु, ने, अनुराधा; नो, य, यि, यु, ज्येष्ठा याप्रमाणें नक्षत्रांचीं अक्षरें येतील. अनुराधा नक्षत्रापासून चवथें नक्षत्र पूर्वाषाढा याचा स्तंभ या कोष्टकांत मध्यभागीं होतो. ह्मणून क्रमानें येणारें त्याचें पहिलें अक्षर भु, हें आहे. यांत सूत्राशिवाय ध, फ, ढ, अशीं तीन अक्षरें जास्त घालावीं. ह्मणजे तिसरा स्तंभ पुरा होईल. या स्तंभांतील (भु) हें अक्षर पहिलें आहे. त्यापुढें क्रमानें येणारें (भे) भो, ज, जी, उत्तराषाढा या क्रमानें अभिजित्सह श्रवणांतापर्यंत सात नक्षत्रें या कोष्टकांत लिहिलीं ह्मणजे हें कोष्टक पुरें होतें. चवथे

कोष्टकांत चवथें सूत्र ग, स, द, च, ल, हीं अक्षरें वर सांगितल्याप्रमाणें लिहावीं आणि (ग) अक्षराखालीं गि, ते गो पर्यंत अक्षरें लिहावीं. ह्मणजे ग, ते गो पर्यंत पांच अक्षरें होतील. त्यावरून ग, गि, गु, गे, धनिष्ठा; गो, स, सि, सु, शततारका याप्रमाणें नक्षत्रांचीं अक्षरें येतात. धनिष्ठेपासून चवथें नक्षत्र उत्तराभाद्रपदा, याचा स्तंभ या कोष्टकाच्या मध्यभागीं होतो. या नक्षत्राचें क्रमानें येणारें पहिलें अक्षर (दु) हें आहे. यांत आणखी सूत्राखेरीज थ, झ, ञ, अशीं तीन अक्षरें घालून हा चवथा स्तंभ पुरा करावा; आणि स्तंभांतील पहिलें अक्षर (दु) या अक्षरापुढें क्रमानें येणारें (दे) दो, च, चि रेवती, या क्रमानें भरणीअंतापर्यंत सात नक्षत्रांचीं अक्षरें लिहून हें चवथें कोष्टक पुरें करावें.

आतांपर्यंत चार कोष्टकें कशीं तयार करावीं याबद्दलची माहिती क्रमानें देऊन चारी कोष्टकें एकत्र करून सबंध एक कोष्टक तयार केलें. त्यांत चार स्तंभ आहेत. स्तंभांत तीन तीन अक्षरें इतर घरापेक्षां जास्त कां? असा प्रश्न उत्पन्न होतो, ह्मणून त्याचा खुलासा करणें जरूर आहे. नक्षत्रें २८, प्रत्येक नक्षत्राचे चरण चार, या क्रमानें २८ नक्षत्रांचे ११२ चरण झाले व तितकींच अक्षरें होतात. सबंध कोष्टकांतील घरें १००, प्रत्येकांत एकेक अक्षर घातलें ह्मणजे १०० घरें भरून बाकी १२ अक्षरें शिल्लक राहिलीं. ह्याकरितांच ग्रंथकारानें चार स्तंभांची योजना करून त्या प्रत्येकांत तीन तीन अक्षरें जास्त घालून चारी स्तंभ १२ अक्षरांनीं भरून काढले. आतां प्रथम स्तंभांत पहिल्या सूत्रापैकीं (क) वर्गांतील घ, ङ आणि चवथ्या सूत्रांतील याजवळचा जो (च) वर्ग यांतील छ हें अक्षर घेऊन पहिल्या स्तंभांत तीन अक्षरें घालून तो स्तंभ भरून पुरा केला; आणि दुसरा स्तंभ यांत चवथ्या सूत्रापैकीं (स) वर्गांतील (ष) आणि दुसरें सूत्र यांतील (ट) वर्गापैकीं ण, ठ, हीं अक्षरें घेऊन दुसरा स्तंभ तयार झाला; आणि तिसरा स्तंभ यांत दुसरें सूत्र यांतील (त) वर्गापैकीं ध, (प) वर्गांतील फ, (ट) वर्गांतील ढ, अशीं अक्षरें घेऊन तिसरा स्तंभ पुरा केला; आणि चवथा स्तंभ यांत दुसरे सूत्रांतील (त) वर्गापैकीं (थ) आणि चवथे सूत्रापैकीं (च) वर्गांतील झ, ञ अशीं अक्षरें घालून चवथा स्तंभ पुरा केला आहे. सारांश चार सूत्रांतील व चार स्तंभांतील स्वर आणि व्यंजनें अशीं सर्व अक्षरें घेऊन ग्रंथकारानें हें सबंध कोष्टक तयार केलें आहे. पुढील कोष्टकावरून ही सर्व रचना ध्यानांत येईल.

## शतपद अवकहडा चक्रोपपत्ति कोष्टकम्. शतपद चक्रम्.

| | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| कृत्तिका. अ सूत्र. | व | क | ह | ड १ | मघा म सूत्र. | ट | प | र | त २ | १ |
| इ | वि | कि | हि | डि | मि | टि | पि | रि | ति | २ |
| उ | वु | कु घ स्तंभ. ङ छ | हु | डु | मु | टु | पु. ष. स्तंभ. ण. ठ. | रु | तु | ३ |
| ए | वे | के | हे | डे | मे | टे | पे | रे | ते | ४ |
| ओ | वो | को | हो | डो आश्लेषां. | मो | टो | पो | रो | तो विशाखा | ५ |
| अनुरां. न सूत्रं | य | भ | ज | ख ३ | धनिष्ठा ग सूत्र | स | द | च | ल ४ | ६ |
| नि | यि | भि | जि | खि | गि | सि | दि | चि | लि | ७ |
| नु | यु | भु ध स्तंभ फ ढ | जु | खु | गु | सु | दु थ स्तंभ. झ ञ | चु | लु | ८ |
| ने | ये | भे | जे | खे | गे | से | दे | चे | ले | ९ |
| नो | यो | भो | जो | खो श्रवण. | गो | सो | दो | चो | लो भरणी | १० |

प्राणिमात्रांचें नक्षत्रनांव किंवा नक्षत्रनांवावरून नक्षत्र समजण्यासाठीं अ, व, क, ह, डा चक्र लिहितों. याची उपपत्ति मागें सांगितली आहे.

## मुहूर्तमाला.

चुचेचोलाऽश्विनी प्रोक्ता लीलूलेलो भरण्यथ ।

आईऊए कृत्तिकास्यादोवावीवू तु रोहिणी ॥ ४४ ॥
वेवोककी मृगशिरः कुवङछार्द्रिका तथा ।
केकोहही पुनर्वसु हुहेहोडा तु पुष्यभं ॥ ४५ ॥
डीडूडेडो तथाश्लेषा मामीमूमे मघा स्मृता ।
मोटाटीटू तु पूर्वास्यात् टेढोपाप्युत्तराफभं ॥ ४६ ॥
पूषाणाठा हस्ततारा पेपोरारी तु चित्रिका ।
रूरेरोता स्मृता स्वाती तीतूतेतो विशाखिका ॥ ४७ ॥
नानीनूनेऽनुराधा च ज्येष्ठा नोयायीयू स्मृता ।
येयोभोभी मूळतारा पूर्वाषाढा भूधाफढा ॥ ४८ ॥
भेभोजाज्युत्तराषाढा जूजेजोखाऽभिजिद्भवेत् ।
खीखूखेखो श्रवणभं गागीगूगे धनिष्ठिका ॥ ४९ ॥
गोसासीसू शतभिषा सेसोदादी तु पूर्वभा ।
दूथझञोत्तराभाद्रा देदोचाची तु रेवती ॥ ५० ॥

अर्थ--अश्विनी नक्षत्राच्या प्रथम चरणास चु हें अक्षर, द्वितीय चरणास चे, तृतीय चरणास चो आणि चतुर्थ चरणास ल अशीं चार चरणांस चार अक्षरें आहेत. याप्रमाणेंच भरणी आदिकरून नक्षत्रांच्या चरणास चार चार अक्षरें आहेत. तीं श्लोकांत सांगितल्याप्रमाणें क्रमेंकरून समजावीं. श्लोकांचे अर्थ स्पष्ट आहेत यास्तव ते लिहिले नाहींत.

नक्षत्रमित्थं चतुरंघ्रिकं भवेन्नामाक्षरं जन्मनि तस्य युज्यते ।
राशिस्तथैको नवभिस्तदंघ्रिभिर्नवांशसंज्ञैरजतो विनाभिजित् ॥ ५१ ॥

अर्थ--वर लिहिल्याप्रमाणें चार चरणांचें एक नक्षत्र जाणावें. जो प्राणी ज्या नक्षत्राच्या ज्या चरणावर उत्पन्न होईल त्याला त्या चरणाचें जें अक्षर असेल तें अक्षर प्रथम लावून नांव ठेवावें. ह्मणजे अश्विनीच्या प्रथम चरणावर जन्मलेला जो प्राणी त्याचें चूडामणि असें नांव ठेवावें. याप्रमाणें पुढेंही चेदीश, चोलपति, लटपति इत्यादि नांवें जाणावीं. नक्षत्राच्या चरणास नवांश असें नांव असून त्या नवांश नांवाच्या नऊ चरणांनी एक राशि होतो. त्या राशीस क्रमानें मेष, वृषभ इत्यादिक बारा नांवें आहेत. त्यांत अभिजित् नक्षत्राची मात्र गणना करावयाची नाहीं.

## वर्गकूट मुहूर्तमाला.

अकौ चटतपा य:शौ वर्गाः पंचमवैरिणाम् ।
तार्क्ष्यो तु सिंहश्वाह्याखुमृगावीनामनुक्रमात् ॥ ५२ ॥

**अर्थ**—अ आ इ ई उ ऊ ऋ ॠ ऌ ॡ ए ऐ ओ औ, हा अवर्ग गरुडाचा; क ख ग घ ङ, हा कवर्ग मांजराचा; च छ ज झ ञ, हा चवर्ग सिंहाचा; ट ठ ड ढ ण, हा टवर्ग श्वानाचा; त थ द ध न, हा तवर्ग सर्पाचा; प फ ब भ म, हा पवर्ग उंदराचा; य र ल व, हा यवर्ग हरणाचा; श ष स ह, हा शवर्ग मेंढ्याचा असे हे आठ वर्ग असून ह्यांत आपआपल्यापासून पांचव्याशीं वैर आहे.

वर्गैक्ये प्रेमदंपत्यौर्वैरे वैरं समे समम् ।
प्राचैर्नामादिवर्णाभ्यां वर्गकूटमितीरितम् ॥ ५३ ॥

**अर्थ**--वधूवरांच्या व्यावहारिक नांवांचीं प्रथम अक्षरें एका वर्गांत असल्यास त्यांचें परस्पर प्रेम असतें. तीं अक्षरें वैर वर्गांत म्हणजे परस्पर पंचम वर्गांत असलीं तर त्यांचा परस्पर वैरभाव असतो. तींच अक्षरें स्ववर्ग आणि पंचमवर्ग यांहून इतर वर्गांत असतील तर त्यांची परस्पर समता असते. असें हें वर्गकूट प्राचीन विद्वान् लोकांनीं सांगितलें आहे. हें वर्गकूट शूद्रादि जातीस पहावें असेंही सांगितलें आहे.

## घाततिथ्यादिप्रकरणम्.

घाततिथ्यो नपूभाभाजपुरीनजरीजपु ।
घातवारा रशाचंबुशशगूशुशुमंगुशु ॥ ५४ ॥
घातर्क्षाणि मघाहस्तस्वातीमित्रास्त्रपाच्युताः ।
शतांत्यभरणीब्राह्मशैवाश्लेपाश्च मेषतः ॥ ५५ ॥
भूमिंद्वय्ब्ध्यग्निदिक्सूर्यांकाष्टांगेशाद्रिसायकाः ।
मेषादेर्घातलग्नानि यात्रायां वर्जयेत्सदा ॥ ५६ ॥

**अर्थ**—नंदा १, पूर्णा ५, भद्रा २, भद्रा २, जया ३, पूर्णा ५, रिक्ता ४, नंदा १, जया ३, रिक्ता ४, जया ३ आणि पूर्णा ५ अशा बारा क्रमानें मेषादि राशींच्या घाततिथि आहेत. रवि, शनि, चंद्र, बुध, शनि, शनि, गुरु, शुक्र, शुक्र, मंगळ, गुरु, आणि शुक्र हे वार अनुक्रमानें मेषादि राशींचे घातवार आहेत. मघा, हस्त, स्वाती, अनुराधा, मूळ, श्रवण, शततारका, रेवती, भरणी, रोहिणी, आर्द्रा आणि आश्लेषा हीं बारा नक्षत्रें क्रमानें मेषादि राशींचीं घात नक्षत्रें

आहेत. मेष, मिथुन, कन्या, कन्या, वृषभ, सिंह, मिथुन, मिथुन, वृषभ, वृश्चिक, सिंह आणि कर्क हीं बारा लग्नें क्रमानें मेषादि राशींचीं घात लग्नें आहेत. हीं प्रयाणास वर्ज्य करावीं.

## मुहूर्तमालेच्या टीकेंत.

अजाजन्मधीधर्मवित्तारिखत्रिस्मरांब्वष्टलाभांत्यगो घातचंद्रः ।
नृपद्वारयात्राविरोधामयादौ विचिंत्यो विवाहादिके नैव चिंत्यः ॥ ५७ ॥

अर्थ—मेष, कन्या, कुंभ, सिंह, मकर, मिथुन, धनु, वृषभ, मीन, सिंह, धनु आणि कुंभ ह्या बारा राशींचे चंद्र अनुक्रमानें मेषादि राशींचे घातचंद्र जाणावे. हे घातचंद्र राजद्वारीं जाण्यास, प्रयाणास, विरोध करण्यास व रोगपरिहारार्थ उपाय करण्यास वर्ज्य करावे. विवाहादि मंगल कार्यांस वर्ज्य नाहीं.

युद्धे चैव विवादे च कुमारीपूजने तथा ।
राजसेवावाहनादौ घातचंद्रं विवर्जयेत् ॥ ५८ ॥

अर्थ—युद्ध, विवाद, विवाहाच्या पूर्वींचें कुमारीपूजन, राजसेवा, वाहन व शस्त्रसंबंधीं जें कार्य याविषयीं घातचंद्र वर्ज्य करावा.

## मुहूर्तमालटीकास्थवचनानुसारी स्फुट.

अध्वरे तीर्थयात्रायां राज्ञां पट्टाभिषेचने ।
मांगल्यसर्वकार्येषु घातचंद्रं न चिंतयेत् ॥ ५९ ॥

अर्थ—यज्ञ, तीर्थयात्रा, राजांचा पट्टाभिषेक आणि सर्व मंगल कर्में याविषयीं घातचंद्राचा विचार करूं नये.

## मुहूर्तमाला.

यद्यप्यार्षं वचनं न लभ्यते घातचंद्रादौ ।
लुप्ता श्रुतिरनुमेया शिष्टाचारेण किं पुनर्मुनिवाक् ॥ ६० ॥

अर्थ—घातचंद्र, घाततिथि, घातवार, घातनक्षत्र आणि घातलग्न यांविषयीं प्रमाणभूत ऋषिवाक्य जरी आढळत नाहीं, तरीही वर सांगितल्याप्रमाणें वर्ज्य केलींच पाहिजेत. कारण शिष्ट ज्योतिषी लोक हीं वर्ज्य करितात. तेव्हां या शिष्टाचारास कांहीं तरी ऋषिवाक्य प्रमाण आहे असें अनुमान होऊं शकतें.

## घात तिथ्यादिकांचें कोष्टक.

| राशि | मेष. | वृषभ. | मिथुन | कर्क. | सिंह | कन्या | तूळ. | वृश्चि. | धन. | मकर | कुंभ. | मीन. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| तिथि | १।६।११ | ५।१०।१५ | २।७।१२ | २।७।१२ | ३।८।१३ | ५।१०।१५ | ४।९।१४ | १।६।११ | ३।८।१३ | ४।९।१४ | ३।८।१३ | ५।१०।१५ |
| वार. | रवि. | शनि | चंद्र | बुध. | शनि | शनि | गुरु. | शुक्र. | शुक्र | मंगळ | गुरु. | शुक्र. |
| नक्षत्र | मघा. | हस्त | स्वाती | अनु. | मूळ | श्रवण | शत. | रेवती. | भरणी | रोहि. | आर्द्रा | आश्ले. |
| लग्नें. | मेष. | मिथुन | कन्या. | कन्या | वृषभ. | सिंह | मिथुन | मिथुन | वृषभ. | वृश्चि. | सिंह. | कर्क. |
| चं रा | मेष. | कन्या. | कुंभ. | सिंह. | मकर. | मिथुन | धनु | वृषभ | मीन. | सिंह. | धनु | कुंभ. |

## अथ योगप्रकरणं.

पंचांगाचें चौथें अंग योग हें होय. योग ह्मणजे सूर्यचंद्राच्या गतीची बेरीज १३ अंश २० कला होण्यास जो काल लागतो तितक्या कालांत एक योग होतो. योगाचा संबंध नक्षत्राप्रमाणें आकाशांत दिसणारा नाहीं.

### स्फुट श्लोक.

विष्कंभः प्रीतिरायुष्मान्सौभाग्यं शोभनं तथा ।
अतिगंडः सुकर्मा च धृतिः शूलं तथैव च ॥ १ ॥
गंडो वृद्धिर्ध्रुवश्चैव व्याघातो हर्षणस्तथा ।
वज्रः सिद्धिर्व्यतीपातो वरीयान्परिघः शिवः ॥ २ ॥
सिद्धिः साध्यः शुभः शुक्लो ब्रह्मैंद्रौ वैधृतिस्तथा ।
संज्ञासदृक्फला चैषां योगानां सप्तविंशतिः ॥ ३ ॥

अर्थ—विष्कंभ, प्रीति, आयुष्मान्, सौभाग्य, शोभन, अतिगंड, सुकर्मा, धृति, शूल, गंड, वृद्धि, ध्रुव, व्याघात, हर्षण, वज्र, सिद्धि, व्यतीपात, वरीयान्, परिघ, शिव, सिद्धि, साध्य, शुभ, शुक्ल, ब्रह्मा, ऐंद्र व वैधृति हे सत्तावीस योग आपापल्या नांवाच्या अर्थासारखें फल देणारे आहेत.

# योगांची शुभाशुभ व्यवस्था.

## संस्कारकौस्तुभांत वृद्धवसिष्ठ.

विरुद्धयोगेषु य आद्यपादः सर्वेषु कार्येषु विवर्जनीयः ।
सवैधृतो यो व्यतिपातयोगः सर्वोपि नेष्टः परिघार्धमाद्यं ॥ ४ ॥
तिस्रस्तु नाड्यः प्रथमे च वज्रे गंडेऽतिगंडेपि च षट् च षट् च ।
व्याघातयोगे नव पंच शूले शुभेषु कार्येषु विवर्जनीयाः ॥ ५ ॥

**अर्थ** — विरुद्ध योग ह्मणजे विष्कंभ, अतिगंड, शूल, गंड, व्याघात आणि वज्र ह्या सहा योगांचा प्रथम चरण; वैधृति व व्यतीपात हे दोन संपूर्ण; तसेंच परिघाचें पूर्वार्ध इतकीं सर्व कार्यांस वर्ज्य करावीं. अडचण असेल तर विष्कंभाच्या तीन, वज्राच्या नऊ किंवा तीन, गंड आणि अतिगंड ह्या दोहोंच्या सहा सहा, व्याघाताच्या नऊ व शूलाच्या पांच अशा घटका मंगल कार्यास वर्ज्य कराव्या. वज्राच्या नऊ घटिका टाकण्यास प्रमाण अग्निपुराणांत आहे.

## मुहूर्तकल्पद्रुमाच्या टीकेंत वसिष्ठ.

सूर्याचंद्रमसोर्धिष्ण्ययोगाज्जाता यतस्ततः ।
ऋक्षेशा एव योगेशा ज्ञातव्याः सर्वकर्मसु ॥ ६ ॥

**अर्थ**—योग हे सूर्यचंद्रसंबंधीं नक्षत्रांच्या संयोगानें उत्पन्न होतात. यास्तव जे नक्षत्रांचे स्वामी पूर्वी सांगितले आहेत तेच योगांचे स्वामी आहेत. याप्रमाणें सर्व कर्मांत जाणावें.

## करणप्रकरणम्.

पंचांगाचें पांचवें अंग करण हें होय. करण ह्मणजे तिथीचें अर्ध. चांद्रमासांत तीस तिथि व साठ करणें असतात. चंद्रसूर्यामध्यें ६ अंश अंतर झालें ह्मणजे एक करण होतें. करणें ११ आहेत. त्यांचीं नांवें.

## मुहूर्तमाला.

अथ ववबालवकौलवतैतिलगरवणिजविष्टयः सप्त ।
शुक्लप्रथमोर्ध्वदलादष्टावृत्त्या चलानि करणानि ॥ १ ॥
शकुनिचतुष्पदनागाः किंस्तुघ्नाख्यं च चत्वारि ।
वदि भूतोर्ध्वदलात्सितप्रथमाद्यदलावधि स्थिराणि स्युः ॥ २ ॥

**अर्थ**—बव, बालव, कौलव, तैतिल, गर, वणिज आणि विष्टि हीं सात करणें शुद्ध प्रतिपदेच्या उत्तरार्धापासून वद्य चतुर्दशीच्या पूर्वार्धाची समाप्ति होईतोंपर्यंत आठ वेळ पुनः पुनः येतात. ह्या सातांस चल करणें असें नांव आहे. शकुनि, चतुष्पद, नाग आणि किंस्तुघ्न हीं चार करणें वद्य चतुर्दशीच्या उत्तरार्धापासून शुद्ध प्रतिपदेच्या पूर्वार्धाची समाप्ति होईतोंपर्यंत असतात. ह्या चार करणांस स्थिर करणें असें नांव आहे.

## रत्नमाला.

इंद्रो ब्रह्मा मित्रनामार्यमा भूः श्रीः कीनाशश्चेति तिथ्यर्धनाथाः ।
कल्युक्षाख्यौ सर्पवायू तथा च ये चत्वारस्ते स्थिराणां चतुर्णां ॥ ३ ॥

**अर्थ**—इंद्र, ब्रह्मा, मित्र, अर्यमा, भूमि, लक्ष्मी व यम हे सात अनुक्रमानें बव, बालव इत्यादि सात चल करणांचे स्वामी जाणावे आणि कली, बैल, सर्प व वायु हे चार क्रमानें शकुनि, चतुष्पद इत्यादि चार स्थिर करणांचे स्वामी जाणावे.

## करणस्वामी चरस्थिर संज्ञा वगैरे.

| शुक्लतिथि. | | | | | कृष्णतिथि. | | | | नांवें. | स्वामी. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| पूर्वदळ. | | उत्तरदळ. | | | पूर्वदळ. | | उत्तरदळ. | | | |
| १ | १ | स्थिर. | | ० | ० | ० | ० | ० | किंस्तुघ्न. | वायु. |
| २ | ५ | १२ | १ | १५ | ४ | ११ | ७ | ० | बव. | इंद्र. |
| ३ | २ | ९ | ५ | १२ | १ | ८ | ४ | ११ | बालव. | ब्रह्मा. |
| ४ | ६ | १३ | २ | ९ | ५ | १२ | १ | ८ | कौलव. | मित्र. |
| ५ | ३ | १० | ६ | १३ | २ | ९ | ५ | १२ | तैतिल. | सूर्य. |
| ६ | ७ | १४ | ३ | १० | ६ | १३ | ९ | २ | गरज. | भूमि. |
| ७ | ४ | ११ | ७ | १४ | ३ | १० | ६ | १३ | वणिज. | लक्ष्मी. |
| ८ | ८ | १५ | ४ | ११ | ७ | १४ | ३ | १० | विष्टि. | यम. |
| ९ | स्थिर. | | ० | ० | ० | ० | ० | १४ | शकुनि. | कलि. |
| १० | स्थिर. | | ० | ० | ३० | ० | ० | ० | चतुष्पद. | बैल. |
| ११ | स्थिर. | | ० | ० | ० | ० | ० | ३० | नाग. | सर्प. |

# कल्याणी.

## तिथिमान.

कृष्णे अग्निदिशोरूर्ध्वं सप्तमीभूतयोरधः ।
शुक्ले वेदेशयोरूर्ध्वं भद्रा प्राग्वसुपूर्णयो ॥ ४ ॥
मनुवसुमुनितिथिषु युगदशशिवगुणसंख्यासु तिथिषु पूर्वार्त्याः ।
आयाति विष्टिरेषा पृष्ठे शुभदा पुरस्त्वशुभा ॥ ५ ॥

## शास्त्रार्थ.

दिवा सर्पमुखीभद्रा रात्रौ भद्रा तु वृश्चिकी ।
सर्पस्य च मुखं त्याज्यं वृश्चिक्याः पुच्छमेव च ॥ ६ ॥
रात्रिभद्रा यदान्हिस्याद्दिवाभद्रा यदा निशि ।
न तत्र भद्रादोषः स्यात्सर्वकार्याणि साधयेत् ॥ ७ ॥

## शरीरभागः

नाड्यस्तु पंच वदनेऽथगले तथैका
वक्षोदशैकसहिता नियतं चतस्रः ।
नाभिः कटी षडथ पुच्छलवाश्च तिस्रो
विष्टेर्बुधैरभिहितोंगविभाग एषः ॥ ८ ॥

## स्थानफलं.

मुखे कार्यध्वस्तिर्भवति मरणं चाथगलके
धने हानिर्वक्षस्यथ कटितटे बुद्धिविलयः ।
कलिर्नाभौ देशे विजयमथ पुच्छे च जगदुः
शरीरे भद्रायाः पृथगिति फलं पूर्वमुनयः ॥ ९ ॥

## फलें.

स्वर्गे भद्रा भवेत्सौख्यं पाताले च धनागमः ।
मृत्युलोके यदा भद्रा कार्यसिद्धिस्तदा न हि ॥ १० ॥

## वारपरत्वें नांवें.

सोमे शुक्रे च कल्याणी शनौ चैव तु वृश्चिकी ।
गुरौ पुण्यवती ज्ञेया चान्यवारेषु भद्रिका ॥ ११ ॥

अर्थ —वरील श्लोकांचा अर्थ कोष्टकरूपानें देत आहे. चंद्राबद्दल श्लोक झाला आहे ह्मणून तो यांत दिला नाहीं. तो श्लोक पहावा.

| तिथि. | शास्त्रार्थ. | घटी संख्या | स्थानें. | फलें. | चंद्र. | स्थानें. | फलें. | वार. | नांवें. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| २ | या तिथींची ३० घटिका उत्तरार्धाची | ३ | पुच्छ. | विजय. | मीन. | स्वर्गी. | सौख्य. | सोमवार. | कल्याणी. |
| कृष्ण | भद्रा तिचें नांव वृश्चिकी | | | | मेष. | | | | |
| १० | हीं दिवसास. | ६ | कटी. | बुद्धि-नाश. | वृश्चिक. | | | शुक्रवार. | |
| | | | | | कर्क. | | | | |
| ४ | आली तर तीन घटिका पुच्छ | | | | | | | | |
| शुक्ल | वर्जावें. मुख शुद्ध होय. उत्तरार्ध | ४ | नाभी. | कलह. | कन्या. | पाताळीं. | धनप्राप्ति. | शनिवार. | वृश्चिकी. |
| १५ | ह्मणजे रात्री. | | | | तूळ. | | | | |
| ७ | या तिथींचा ३० घटिका पूर्वार्धाची | ११ | हृदय. | धननाश. | धनु. | | | गुरुवार. | पुण्यवती. |
| कृष्ण | भद्रा नांव सर्पिणी हीं | | | | मिथुन. | | | | |
| १४ | रात्रीस आली तर. | १ | गळा. | मरण. | कुंभ. | मृत्युलोक. | अशुभ. ह्म. कार्यनाश. | रविवार. | भद्रा. |
| ८ | ५ घटिका विध्वंसक मुख वर्जावें. पुढें | | | | सिंह. | | | | |
| शुक्ल | पुच्छ शुभ होय. | ५ | मुख. | विध्वंस. | वृषभ. | | | बुधवार. | भद्रा. |
| १५ | पूर्वार्ध ह्मणजे दिवस होय. | ३० | | | मकर. | | | भौमवार. | भद्रा. |

## विष्टीचें स्वरूप.

दैत्येंद्रैः समरेऽमरेषु विजितेष्वीशः क्रुधा दृष्टवान् ।
स्वात्कायात्किल निर्गता खरमुखी लांगूलिनी चक्रपात् ।
विष्टिः सप्तभुजा मृगेंद्रगलकक्षामोदरी प्रेतगा ।
दैत्यघ्नी मुदितैः सुरैस्तु श्रवणप्रांते नियुक्ता तु सा ॥ १२ ॥

अर्थ—दैत्य आणि देव या उभयतांच्या युद्धांत देवांचा पराभव होतो असें शंकरानीं जाणून क्रोधातें पावून आपले शरीरापासून काढली ती अशी कीं गर्दभमुखी, पुच्छवती, नांव विष्टि, सप्तभुजा, गळा सिंहासारखा, उदर कृश, प्रेतावर बसलेली, आणि दैत्यांस मारणारी अशी देवांनीं कर्णप्रांतीं ठेविली जी कल्याणी ती प्रसिद्ध आहे, ती जाणावी.

पौष्टिकस्थिरशुभानि बवाख्ये बालवे द्विजहितान्यपि धर्मान् ।
कौलवे प्रमदमित्रविधानं तैतिले शुभगृहाश्रयकर्म ॥ १३ ॥

अर्थ—पुष्टिकारक, बहुतकाळपर्यंत राहणारें व कल्याणकारक अशीं तीन प्रकारचीं कर्में बव करणावर करावीं, ब्राह्मणांचें पूजन किंवा त्यांस दान देणें अथवा भोजन घालणें व साधारण धर्मकृत्यें हीं बालव करणावर करावीं, स्त्रीसंबंधीं कर्में व मित्रसंबंधीं कार्यें तीं कौलव करणावर करावीं; आणि कल्याणकारक कर्में व गृहसंबंधीं कार्यें हीं तैतिल करणावर करावीं.

गरे च बीजाश्रयकर्षणानि वणिज्यपि स्थैर्यवणिक्क्रियाश्च ।
न सिद्धिमायाति कृतं च विष्ट्यां विषारिघातादि च याति सिद्धिं ॥ १४ ॥

अर्थ--धान्यासंबंधीं कार्यें व भूमी नांगरणें वगैरे गर करणावर करावीं. बहुकाळपर्यंत राहणारीं व व्यापारसंबंधीं कार्यें वणिज करणावर करावीं. बव करणापासून सहा करणांवर जीं कर्तव्य कार्यें तीं विष्टि करणावर केलीं असतां सिद्धीस जात नाहींत; तर विषप्रयोग किंवा शत्रूचा घात करणें इत्यादि क्रूर कर्में विष्टीवर सिद्धीस जातात.

## पीयूषधारेंत वसिष्ठ.

वधबंधविषाग्न्यस्त्रछेदनोच्चाटनादि यत् ।
तुरंगमहिषोष्ट्रादि कर्म विष्ट्यां तु सिध्यंति ॥ १५ ॥

अर्थ—प्राणघात, बंधन, विषप्रयोग, अग्निप्रयोग, शस्त्रकार्य, तोडणें, घालविणें आणि घोडे, रेडे, उंट, शेळ्या व मेंढ्या इत्यादिकांचें जें कार्य तें विष्टीवर केलें असतां सिद्धीस जातें.

### विष्टींवर चांगलीं कार्यें करण्यास सवड.

## ज्योतिर्निबंधांत भृगु.

पृथिव्यां यानि कर्माणि शोभनान्यशुभान्यपि ।
तानि सर्वाणि सिध्यंति विष्टिपुच्छे न संशयः ॥ १६ ॥

अर्थ--पृथ्वीमध्यें जीं शुभ किंवा अशुभ कार्यें आहेत तीं सर्व विष्टीच्या पुच्छ भागांत केलीं असतां सिद्धीस जातात, तो पुच्छभाग पुढें स्पष्ट होईल.

## रत्नमाला.

मंत्रौषधानि शकुनौ च सपौष्टिकानि गोविप्रराज्यपितृकर्म चतुष्पदे तु ।
सौभाग्यदारुणहृतिध्रुवकर्म नागे किंस्तुघ्ननाम्नि शुभपौष्टिकमंगलानि ॥ १७ ॥

अर्थ--मंत्राचें ग्रहण, दुसऱ्यास उपदेश, सिद्धि करणें व प्रयोग करणें, औषधाची सिद्धि करणें, देणें किंवा घेणें, पुष्टिकारक कर्में हीं शकुनि करणावर करावीं. गाई, बैल, ब्राह्मण, राज्य व पितर यांचीं कर्में चतुष्पद करणांवर करावीं. सौभाग्यदायक, क्रूरकर्म, चोरी व बहुकाळ सहण्याजोगें हीं कर्में नाग करणावर करावीं. चांगलीं कर्में, पुष्टिदायक कार्यें व मंगल कार्यें हीं किंस्तुघ्न करणावर करावीं.

### विष्टीचीं स्थानें.

## मुहूर्तचिंतामणि.

शुक्ले पूर्वार्धेऽष्टमीपंचदश्योर्भद्रैकादश्यां चतुर्थ्यां परार्धे ।
कृष्णेऽत्यार्धे स्यात्तृतीयादशम्योः पूर्वे भागे सप्तमीशंभुतिथ्योः ॥ १८ ॥

अर्थ--शुक्लपक्षीं अष्टमी व पूर्णिमा यांच्या पूर्वार्धांत आणि चतुर्थी व एकादशी यांच्या उत्तरार्धांत, तसेंच कृष्णपक्षीं तृतीया व दशमी यांच्या उत्तरार्धांत आणि सप्तमी व चतुर्दशी यांच्या पूर्वार्धांत याप्रमाणें विष्टीची स्थिति असते.

### विष्टीचें पुच्छ निर्दोष असून त्याखेरीज भाग संकटीं घेण्यास सवड.

## कालमाधवांत.

विष्टिर्यदाहनि तिथेरपरार्धजाता पूर्वार्धजा निशि तथा शुभदा च पुच्छे ।
तत्कालभूपिनिजोदययामगा वा ग्राह्या शुभे बलिनि लग्नपतौ निजांशे ॥ १९ ॥

अर्थ--जेव्हां तिथीच्या उत्तरार्धांतील विष्टी दिवसास येईल ती आणि तिथीच्या पूर्वार्धांतील विष्टि रात्रीं येईल ती, अशा दोन्ही विष्टि व सर्व विष्टींचा पुच्छ-भाग हे शुभप्रद आहेत. असें नसेल तरी कर्मकाळीं जें लग्न असेल त्याचा स्वामी, शुभग्रह बलवान् असून तो आपल्या नवांशांत असेल तर विष्टि घेण्यास बाध नाहीं.

विष्टीच्या पुच्छाचें लक्षण.

## मुहूर्तमाला.

एकाद्विरामकृतवेदगुणाद्विभूमिपादाद्विपंचघटिका न सदास्यमस्याः ।
वेदेंदुदस्रगुणरामयमेंदुवेदपादांतिमंत्रिघटिकाः शुभकारि पुच्छं ॥ २० ॥

अर्थ—विष्टीच्या घटिका एकंदर ज्या असतील त्यांचे चार चरण करून पुढें सांगितल्याप्रमाणें पहावें. तें असें कीं शुक्लपक्षीं चतुर्थीच्या विष्टीस प्रथम, अष्टमीच्या द्वितीय, एकादशीच्या तृतीय, पूर्णिमेच्या चतुर्थ, कृष्णपक्षीं तृतीयेच्या चतुर्थ, सप्तमीच्या तृतीय, दशमीच्या द्वितीय आणि चतुर्दशीच्या प्रथम ह्या चरणीं प्रथम पांच घटका विष्टीचें मुख असतें. हें शुभप्रद नव्हे. तसेंच शुक्लपक्षीं चतुर्थीच्या विष्टीस चतुर्थ याप्रमाणें अंकावरून पुढेंही समजावें. ८, ११, १५, ३, ७, १०, १४
१, २, ३, ३, २, १, ४
ह्या चरणांच्या अंतीं तीन घटिका विष्टीचें पुच्छ असतें, तें शुभप्रद आहे.

दुसरा प्रकार.

## मुहूर्तमालेच्या टीकेंत.

असिते सर्पिणी ज्ञेया सिते चैव तु वृश्चिकी ।
सर्पिण्यास्तु मुखं त्याज्यं वृश्चिक्याः पुच्छमेव च ॥ २१ ॥

अर्थ—कृष्णपक्षांतील विष्टि सर्पिणी आणि शुक्लपक्षांतील वृश्चिकी आहे. यास्तव कृष्ण पक्षांतील विष्टीचें पूर्वार्ध व शुक्ल पक्षांतील विष्टीचें उत्तरार्ध वर्ज्य करावें. अन्य-भागांत कार्य करण्यास बाध नाहीं. हीं मुखपुच्छें पुढील श्लोकांत स्पष्ट आहेत.

तिसरा प्रकार.

## मुहूर्तमाला.

रात्रावह्निर्दिवा सार्पी त्यजेत्पुच्छमुखे तयोः ।
मानार्धेन मुखं पुच्छं पक्षयोर्ज्ञेयमत्र च ॥ २२ ॥

अर्थ — तिथीच्या उत्तरार्धांतील जी विष्टि ती वृश्चिकी आणि पूर्वार्धांतील जी विष्टि ती सर्पिणी आहे. यास्तव वृश्चिकीचें पुच्छ व सर्पिणीचें मुख मात्र वर्ज्य करावें अन्य भाग दूषित नाहीं. पूर्व श्लोकांत आणि ह्या श्लोकांत मुख व पुच्छ ज्ञात्यांनी बरोबर विष्टीचें अर्थ ध्यावें.

चौथा प्रकार.

## पीयूषधारेंत.

मेषोक्षकौर्प्यमिथुने घटसिंहमीनकर्केषु चापमृगतौलिवधूषु चंद्रे ।
स्वर्मर्त्यनागनगरीः क्रमशः प्रयाति विष्टिः फलान्यपि ददाति हि तत्र देशे ॥ २३ ॥

अर्थ—मेष, वृषभ, मिथुन व वृश्चिक ह्या राशींस चंद्र असतां विष्टि स्वर्गांत असते. कर्क, सिंह, कुंभ व मीन ह्या राशींस चंद्र असेल तर विष्टि मनुष्यलोकांत असते. कन्या, तूळ, धनु आणि मकर ह्या राशींस चंद्र असल्यास विष्टि पाताळांत असते. तेव्हां जेथें विष्टि असेल तेथेंच तिचा दोष आहे. यास्तव अन्य लोकांत ती विष्टि घेतली असतां चिंता नाहीं.

अथ राशिप्रकरणं.

## मुहूर्तसिंधु.

मेषो वृषो मिथुनकर्कटसिंहकन्या ।
स्तौलिश्च वृश्चिकधनुर्मकराख्यकुंभाः ।
मीनश्च राशय इमे द्व्यधिका दशैषां ॥
चक्रं भचक्रमिति गोलविदो वदंति ॥ १ ॥

अर्थ—मेष, वृषभ, मिथुन, कर्क, सिंह, कन्या, तूळ, वृश्चिक, धनु, मकर, कुंभ आणि मीन हे बारा राशी आहेत. ह्यांच्या समुदायाला राशिचक्र असें गोलज्ञ ह्मणतात.

## मुहूर्तकल्पद्रुम.

दस्रद्वयं चाग्निभपाद आद्यो मेषोऽग्निभांघ्रित्रयमब्जभूभं ।
मृगार्धमाद्यर्धवृषभं मृगार्धमार्द्रादितित्र्यंशकमेषजितमः ॥ २ ॥
पादो दितेः पुष्यभुजंगभे च कर्को मघायुग्ममथार्यमांघ्रिः ।
सिंहो भवेदर्यमभात्रिपादी हस्तश्च चित्रादलमेत्र कन्या ॥ ३ ॥
चित्रार्धवायुत्रिपदा विशाखा तुला विशाखांघ्रयनुशाक्रमालिः ।

मूलद्वयं विश्वभवोंघ्रिरेकश्चापो हृयुषांघ्रित्रयविष्णुभे च ॥ ४ ॥
अर्धा धनिष्ठा मकरो धनिष्ठादलं जलेशोजपदत्रिपादी ।
कुंभोजपादांघ्रिरतस्तु बुध्न्ययुक्पूष्णभं मीनइतीरयंति ॥ ५ ॥

**अर्थ**—अश्विनी, भरणी, कृत्तिकेचा प्रथमपाद यांस मेष राशि ह्मणतात, आणि कृत्तिकांचे अंत्य तीन पाद, रोहिणी व मृगाचें अर्ध ही वृषभ राशि; तसेंच मृगाचें उत्तरार्ध, आर्द्रा व पुनर्वसूचे तीन पाद ही मिथुन राशि; पुनर्वसूचा चतुर्थ पाद, पुष्य व आश्लेषा ही कर्क राशि; मघा, पूर्वा व उत्तरेचा प्रथम चरण ही सिंह राशि; उत्तरेचे अंत्य तीन पाद, हस्त व चित्राचें पूर्वार्ध ही कन्या राशि; चित्राचें उत्तरार्ध, स्वाती व विशाखाचे तीन चरण ही तुला राशि; विशाखाचा चतुर्थ चरण, अनुराधा व ज्येष्ठा ही वृश्चिक राशि; मूळ, पूर्वाषाढा व उत्तराषाढेचा प्रथम पाद ही धनु राशि; उत्तराषाढेचे अंत्य तीन चरण, श्रवण व धनिष्ठेचें पूर्वार्ध ही मकर राशि; धनिष्ठेचें उत्तरार्ध, शततारका व पूर्वाभाद्रपदाचे तीन पाद ही कुंभ राशि; पूर्वाभाद्रपदाचा चतुर्थ पाद, उत्तराभाद्रपदा व रेवती ही मीन राशि असें जाणावें.

## मुहूर्तमाला.

त्रिंशदंशो भवेद्राशिरंशः षष्टिकलात्मकः ।
कला स्याद्विकला षष्ठीरंशभागलवाः समाः ॥ ६ ॥

**अर्थ**—एका राशीचे तीस अंश, एका अंशाच्या साठ कला, आणि एका कलेच्या साठ विकला असतात. अंश, भाग व लव हे तीन पर्याय शब्द आहेत.

## होरा मकरंदांत.

सिंहादिचक्रार्धविभुर्विवस्वान्कर्क्यादितः शीतरुचिर्विलोमात् ।
ओजस्विनः सूर्यगृहेषु खेटाश्चांद्रेषु जाता मृदवो भवेयुः ॥ ७ ॥

**अर्थ**—सिंहापासून सहा राशींचा स्वामी सूर्य, आणि कुंभापासून सहा राशींचा स्वामी चंद्र याप्रमाणें प्रथम कांहीं काळपर्यंत स्थिति होती. यास्तव सिंहापासून सहा राशींवर जे ग्रह येतात ते तेजस्वी व कुंभापासून सहा राशींवर जे ग्रह येतात ते मृदु असें जाणावें.

## मुहूर्त होरा मकरंद.

कंठीरवं विक्रमिणं विलोक्य स्वीयं पदं तत्र चकार सूर्यः ॥
शैत्यात्तदासन्नतया कुलीरे निजं बबंधालयमेणलक्ष्मा ॥ ८ ॥

अर्थ—सिंहादिक सहा राशींमध्यें सिंह महापराक्रमी आहे असें पाहून सूर्यानें आपलें स्थान तेथें केलें. तसेंच कुंभादिक सहा राशींमध्यें कर्क हा थंड प्रदेशांत राहणारा असल्यामुळें आपल्या शीतळ स्वरूपास योग्य आहे असें जाणून तेथें चंद्रानें आपलें स्थान केलें.

## राशिस्वामींची उपपत्ति.

अन्ये ग्रहा गृहयियाचिषया क्रमेण तिग्मांशुशीतमहसोः संनिधं समीयुः ॥
प्रातक्रमेण ददतुर्भवनानि तौ तु ताराग्रहा द्विभवनास्तत एव जाताः ॥ ९ ॥

अर्थ—पुढें कांहीं काळ गेल्यावर मंगळादि ग्रह स्थान मागण्याच्या इच्छेनें सूर्य व चंद्र यांजवळ अनुक्रमानें आले. त्यांत प्रथम बुध आला. तो सूर्याकडे आपल्याला स्थान मागूं लागला. तेव्हां सूर्यानें आपल्या पुढील जी कन्या राशि ती दिली. तेथून तसाच तो चंद्राकडे स्थान मागण्यास आला. तेव्हां चंद्रानें आपल्या मागील स्थान जी मिथुन राशि ती त्यास दिली. पुढें शुक्र आला. तेव्हां रवीनें कन्येपुढील राशी तूळ व चंद्रानें मिथुनाचे पाठीमागील राशि वृषभ हीं त्यांस दिलीं. नंतर मंगळ आला. तेव्हां सूर्यानें तुळेपुढील जी वृश्चिक राशि ती त्यास दिली व चंद्रानें वृषभाचे मागील राशि जी मेष ती दिली. नंतर गुरु आला. तेव्हां रवीनें वृश्चिकापुढील जी धनु राशि ती त्यास दिली व चंद्रानें मेषेच्या पाठीमागील जी मीन राशि ती त्यास दिली. शेवटीं शनि आला. तेव्हां सूर्यानें धनुपुढील जी मकर राशि ती त्यास दिली, आणि चंद्रानें मीने पाठीमागील जी कुंभ राशि ती त्यास दिली. याप्रमाणें राशी दिल्यावर मंगळादि पांच ग्रहांस दोन दोन राशी मिळाल्या आणि सूर्य व चंद्रास एकेकच राशि राहिली. याप्रमाणें व्यवस्थेनें सात ग्रह राशींचे स्वामी झाले.

### अथ लग्नप्रकरणम्.

## मुहूर्तमाला.

उदयहरिजलग्नं राशिमाहुर्विलग्नं ।
चरमहरिजगं तत्सप्तमं चास्तसंज्ञं ।
दशममिति खमध्ये संस्थितं स्वोर्ध्वदेशे ।
समधिगतमधस्तात्तच्चतुर्थं वदंति ॥ १ ॥

मूलद्वयं विश्वभवांघ्रिरेकश्चापो हृयुषांघ्रित्रयविष्णुभे च ॥ ४ ॥
अर्धा धनिष्ठा मकरो धनिष्टादलं जलेशोजपदत्रिपादी ।
कुंभोजपादांघ्रिरतस्तु बुध्न्ययुक्पूष्णभं मीनइतीरयंति ॥ ५ ॥

**अर्थ**—अश्विनी, भरणी, कृत्तिकेचा प्रथमपाद यांस मेष राशि म्हणतात, आणि कृत्तिकांचे अंत्य तीन पाद, रोहिणी व मृगाचें अर्ध हीं वृषभ राशि; तसेंच मृगाचें उत्तरार्ध, आर्द्रा व पुनर्वसूचे तीन पाद हीं मिथुन राशि; पुनर्वसूचा चतुर्थ पाद, पुष्य व आश्लेषा ही कर्क राशि; मघा, पूर्वा व उत्तरेचा प्रथम चरण ही सिंह राशि; उत्तरेचे अंत्य तीन पाद, हस्त व चित्राचें पूर्वार्ध ही कन्या राशि; चित्राचें उत्तरार्ध, स्वाती व विशाखाचे तीन चरण ही तुला राशि; विशाखाचा चतुर्थ चरण, अनुराधा व ज्येष्ठा ही वृश्चिक राशि; मूळ, पूर्वाषाढा व उत्तराषाढेचा प्रथम पाद ही धनु राशि; उत्तराषाढेचे अंत्य तीन चरण, श्रवण व धनिष्ठेचें पूर्वार्ध ही मकर राशि; धनिष्ठेचें उत्तरार्ध, शततारका व पूर्वाभाद्रपदाचे तीन पाद ही कुंभ राशि; पूर्वाभाद्रपदाचा चतुर्थ पाद, उत्तराभाद्रपदा व रेवती ही मीन राशि असें जाणावें.

## मुहूर्तमाला.

त्रिंशदंशो भवेद्राशिरंशः षष्टिकलात्मकः ।
कला स्याद्विकला षष्ठीरंशभागलवाः समाः ॥ ६ ॥

**अर्थ**—एका राशीचे तीस अंश, एका अंशाच्या साठ कला, आणि एका कलेच्या साठ विकला असतात. अंश, भाग व लव हे तीन पर्याय शब्द आहेत.

## होरा मकरंदांत.

सिंहादिचक्रार्धविभुर्विवस्वान्कर्क्यादितः शीतरुचिर्विलोमात् ।
ओजस्विनः सूर्यगृहेषु खेटाश्चांद्रेषु जाता मृदवो भवेयुः ॥ ७ ॥

**अर्थ**—सिंहापासून सहा राशींचा स्वामी सूर्य, आणि कुंभापासून सहा राशींचा स्वामी चंद्र याप्रमाणें प्रथम कांहीं काळपर्यंत स्थिति होती. यास्तव सिंहापासून सहा राशींवर जे ग्रह येतात ते तेजस्वी व कुंभापासून सहा राशींवर जे ग्रह येतात तें मृदु असें जाणावें.

## मुहूर्त होरा मकरंद.

कंठीरवं विक्रमिणं विलोक्य स्वीयं पदं तत्र चकार सूर्यः ॥
शैलात्तदासन्नतया कुलीरे निजं बबंधालयमेणलक्ष्मा ॥ ८ ॥

## शुभ ग्रहांचे बहुत वर्ग येणाऱ्या अंशांचा संग्रह.

### स्फुट.

मेषे षष्ठघटौ वृषे त्रिदगिना द्वंद्वेऽद्रिगोर्काग्नयः ।
कीटेऽब्ध्यंगनवाद्रयोऽर्कभवनेऽगाश्वाः स्त्रियां त्र्यर्कषट् ।
जूकेऽर्काद्रिखगा अलौ गर्भगषट् चापे त्रिषड्गोद्रयो ।
नक्रेंशाव्ध्रयरुणा घटे झषवृषौ मीनेऽद्रिगोषट् शुभाः ॥ ५ ॥

अर्थ – १ मेष लग्नांत कन्या आणि तूळ हे दोन अंश ग्राह्य आहेत. २ वृषभांत मिथुन, वृषभ व मीन हे तीन. ३ मिथुनांत तूळ, धनु, मीन व मिथुन हे चार. ४ कर्कांत कर्क, कन्या, धनु व तूळ हे चार. ५ सिंहांत कन्या आणि तूळ हे दोन. ६ कन्येमध्यें मिथुन, मीन व कन्या हे तीन. ७ तुळांत मीन, तूळ आणि धनु हे तीन. ८ वृश्चिकांत धनु, तूळ व कन्या हे तीन. ९ धनुमध्यें मिथुन, कन्या, धनु आणि तूळ हे चार. १० मकरांत मिथुन व मीन हे दोन. ११ कुंभामध्यें मीन आणि वृषभ हे दोन १२ मीनांत तूळ, धनु व कन्या हे तीन ग्राह्य आहेत. तात्पर्य असें कीं ह्या अंशास शुभ ग्रहांचे वर्ग बहुत येतात.

### रत्नमाला.

शुद्धेषु मेषाद्युदयेषु कर्माण्येतानि सिध्यंति यथोदितानि ।
क्रूरग्रहालोकनयोगदुष्टेष्वेतेषु कर्मोदितमुग्रमेव ॥ ६ ॥

अर्थ – ज्या लग्नीं ग्रह मुळींच नाहीं किंवा शुभ ग्रह अथवा त्याची दृष्टी आहे त्या लग्नावर शुभकार्यें केलीं असतां ज्याप्रमाणें फल सांगितलें आहे त्याप्रमाणें तीं सिद्धीस जातात. ज्या लग्नीं पापग्रह किंवा पापग्रहाची दृष्टी असेल त्या लग्नावर शुभ कार्य केलें असतां त्याची सिद्धि होत नाहीं. तर क्रूरकर्म केल्यास त्याची मात्र सिद्धि होते.

अदौ हि संपूर्णफलप्रदं स्यान्मध्ये पुनर्मध्यफलं विलग्नं ।
अतीव तुच्छं फलमस्य चांते विनिश्चयोऽयं विदुषामभीष्टः ॥ ७ ॥

अर्थ—लग्नाच्या आरंभीं कार्य केलें असतां कर्माचें फल संपूर्ण होतें, लग्नाच्या मध्यभागीं कार्य केल्यास मध्यम फल जाणावें; आणि लग्नाच्या शेवटीं कार्य केलें तर कनिष्ठ फल समजावें. याप्रमाणें ऋषींनीं निश्चय सांगितला आहे.

### ज्योतिर्निबंधांत दैवज्ञवल्लभ.

लग्ने शुभेऽपि यद्यंशः क्रूरः स्यान्नेष्टसिद्धिदः ।

लग्ने क्रूरेपि सौम्योंशः शुभदोंशोबली यतः ।। ८ ।।

**अर्थ—**लग्न उत्तम असतांही अंश जर पापग्रहाचा असेल तर त्यावर केलेल्या कार्याची सिद्धि होत नाहीं. कदाचित् लग्न क्रूर असूनही अंश जर शुभ ग्रहाचा आहे तर त्यावर केलेलें कार्य सिद्धीस जातें. कारण लग्नशुद्धीपेक्षां अंशशुद्धि बलिष्ट आहे.

## रत्नमाला.

सर्वत्र लग्ने प्रथमं प्रदिष्टं कर्तुर्बलं चांद्रमसं ततोन्यत् ।
बलोपपन्ने सति शीतरश्मौ भवंति सर्वे बलिनो ग्रहेंद्राः ।। ९ ।।

**अर्थ—**सर्व कार्याविषयीं लग्नास चंद्रबल मुख्य असें ऋषींनीं सांगितलें आहे. तें असल्यानें अन्य ग्रहाचें बल प्राप्त होतें. कारण चंद्र बलिष्ठ असला ह्मणजे सर्व ग्रह बलिष्ठ होतात.

## ज्योतिर्निबंधांत विवाहपटल.

सचंद्रपापस्य नवांशकं यल्लग्नं हरत्यायुरिति ब्रुवंति ।
धीधर्मकेंद्रे भृगुजेऽथवेज्ये लग्नं तदेवायुरतीव दत्ते ।। १० ।।

**अर्थ—**चंद्र आणि पापग्रह यांनीं युक्त जें लग्न किंवा नवांश हीं दोन्हीं, त्यांवर कार्य केल्यास आयुष्य हरण करणारीं आहेत; परंतु जर लग्नापासून ५।९।१।४।७।१० ह्या स्थानीं शुक्र किंवा गुरु असेल तर तेंच लग्न अथवा अंश हीं दोन्हीं आयुष्याची अतिशय वृद्धि करितात.

## अथ एकादशयोगाः

**१ चरयोगः—** रवौ पूभा गुरौ पुष्यः शनौ मूलं भृगौ मघा ।।
सौम्ये ब्राह्मं विशा भौमे चंद्रेर्द्रा चरयोगकः ।। १ ।।

**२ क्रकचयोगः**—रवौ तु द्वादशी प्रोक्ता भौमे च दशमी तथा ।
चंद्रे चैकादशी प्रोक्ता नवमी बुधवासरे ।। २ ।।
शुक्रे च सप्तमी ज्ञेया शनौ चैव तु षष्ठिका ।
गुरौ चाष्टमिका ज्ञेया योगस्तु क्रकचो बुधैः ।। ३ ।।

**३ दग्धयोगः—** बुधतृतीया कुजपंचमी च षष्ठ्यां गुरोरष्टमि शुक्रवारे ।
एकादशी सोमशनिर्नवम्यां द्वादश्यमर्का इति दग्धयोगः ।। ४ ।।

४ मृत्युदाः—रवौ भौमे भवेन्नंदा भद्रा जीवशशांकयोः
जया शुक्रे बुधे रिक्ता शनौ पूर्णा च मृत्युदा ॥ ५ ॥

५ सिद्धियोगः-शुक्रे नंदा बुधे भद्रा जया भौमे प्रकीर्तिता ।
शनौ रिक्ता गुरौ पूर्णा सिद्धियोगा उदाहृताः ॥ ६ ॥

६ उत्पातयोगः -विशाखादिचतुष्कं तु भास्करादिक्रमेण तु ।
उत्पातमृत्युकाणाख्यसिद्धियोगाः प्रकीर्तिताः ॥ ७ ॥

७ मृत्युयोगः— मृत्युयोगो रवौ मित्रं चंद्रे वैश्वं कुजे शतं ।
बुधे दास्रं गुरौ चांद्रं भृगौ सार्पं शनौ करः ॥ ८ ॥

८ यमदंष्ट्रयोगः—मघाधनिष्टासूर्ये तु चंद्रे मूलविशाखके ।
कृत्तिकाभरणीभौमे सौम्ये[1] पूषापुनर्वसुः ॥ ९ ॥
गुरौ ऊषाश्विनी शुक्रे रोहिणी चानुराधका ।
शनौ विष्णुः शतभिषक् यमदंष्ट्रः प्रकीर्तितः ॥ १० ॥

९ यमघंटयोगः-रवौ मघा बुधे मूलं गुरौ चैव च कृत्तिका ।
भौमे चार्द्रा शनौ हस्तः शुक्रे चैव तु रोहिणी ॥ ११ ॥
चंद्रे विशाखायोगोऽयं यमघंटः प्रकीर्तितः ।

१० मुसलवज्रयोगः—चंद्रे चित्रा भृगौ ज्येष्ठा शनौ चैव तु रेवती ।
चांद्रजे तु धनिष्टोक्ता रवौ तु भरणी तथा ॥ १२ ॥
उषाश्चैव तु भौमे च गुरौ चैवोत्तरा तथा ।
अयं मुसलवज्राख्ययोगो वर्ज्यः शुभे बुधैः ॥ १३ ॥

११ अमृतसिद्धियोगः—आदित्यहस्ते गुरुपुष्ययोगे बुधानुराधा शनिरोहिणी च ।
सोमे च विष्णुर्भृगुरेवती च भौमाश्विनी चामृतसिद्धियोगः ॥ १४ ॥

**अर्थ**—चर योगादि एकादश योग आणि वार सात असे कोष्टकांत आहेत. त्यांत ज्या वारीं नक्षत्र किंवा तिथि येईल तो योग त्या दिवशीं जाणावा. उत्पात योगांत मृत्यु, काणाख्य आणि सिद्धियोग असे तीन योग सांगितले; परंतु ते ज्योतिषांवांचून इतरांस समजणार नाहींत म्हणून मृत्युयोगाचा श्लोक निराळा दिला आहे; आणि पुढील कोष्टकांत काणाख्य व सिद्धियोग गाळून बाकीचे योग लिहिले आहेत पुढील २८ योगांत काण व सिद्धि योग आले आहेत, म्हणून येथें दिले नाहींत.

---

१ सौम्यं.

## कोष्टक एकादश योगांचें.

| | योगांचीं नांवें. | रविवार. | सोमवार. | मंगळवार. | बुधवार. | गुरुवार. | शुक्रवार. | शनिवार. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | चरयोगः | पूर्वाभाद्रपदा | आर्द्रा. | विशाखा. | रोहिणी. | पुष्य. | मघा. | मूळ. |
| २ | क्रकचयोगः | १२ तिथि. | ११ तिथि. | १० तिथि. | ९ तिथि. | ८ तिथि. | ७ तिथि. | ६ तिथि. |
| ३ | दग्धयोगः | १२ तिथि. | ११ तिथि. | ५ तिथि. | ३ तिथि. | ६ तिथि. | ८ तिथि. | ९ तिथि |
| ४ | मृत्युदायोगः | १।६।११तिथि | २।७।१२ तिथि | १।६।११ तिथि | ४।९।१४ तिथि | २।७।१२ तिथि | ३।८।१३ति. | ५।१०।१५ ति |
| ५ | सिद्धियोगः | ० तिथि. | ० तिथि. | ३।८।१३ तिथि | २।७।१२ तिथि | ५।१०।१५ ति | १।६।११ति | ४।९।१४ति |
| ६ | उत्पातयोगः | विशाखा. | पूर्वा. | धनिष्ठा. | रेवती. | रोहिणी. | पुष्य. | उत्तरा. |
| ७ | मृत्युयोगः | अनुराधा. | उत्तरा. | शततारका. | अश्विनी. | मृग. | आश्लेषा. | हस्त. |
| ८ | यमदंष्ट्रयोगः | मघा.<br>धनिष्ठा. | मूळ.<br>विशाखा. | कृत्तिका.<br>भरणी. | रेवती.<br>पुनर्वसु. | उत्तराषाढा.<br>अश्विनी. | रोहिणी.<br>अनुराधा. | श्रवण.<br>शततारका |
| ९ | यमघंटयोगः | मघा. | विशाखा. | आर्द्रा. | मूळ. | कृत्तिका. | रोहिणी. | हस्त. |
| १० | मुसलवज्रयोगः | भरणी. | चित्रा. | उत्तराषाढा. | धनिष्ठा. | उत्तरा. | ज्येष्ठा. | रेवती. |
| ११ | अमृतसिद्धि-योगः | हस्त. | श्रवण.<br>मृग. | अश्विनी. | अनुराधा. | पुष्य. | रेवती. | रोहिणी. |

## २८ योगांचीं नांवें व २८ योग कसे होतात त्याबद्दल मुहुर्तचिंतामणीवरून.

आनंदाख्यः कालदंडश्च धूम्रो धाता सौम्यो ध्वांक्षकेतू क्रमेण ।
श्रीवत्साख्यो वज्रकं मुद्गरश्च छत्रं मित्रं मानसं पद्मलुंबौ ॥ १४ ॥
उत्पातमृत्यू किल काणसिद्धी शुभामृताख्यौ मुसलं गदश्च ।
मातंगरक्षश्चरसुस्थिराख्याः प्रवर्धमानः फलदाः स्वनाम्ना ॥ १५ ॥

अर्थ—१ आनंद, २ कालदंड, ३ धूम्र, ४ धाता, ५ सौम्य, ६ ध्वांक्ष, ७ ध्वज, ८ श्रीवत्स, ९ वज्र, १० मुद्गर, ११ छत्र, १२ मित्र, १३ मानस, १४ पद्म, १५ लुंब, १६ उत्पात, १७ मृत्यु, १८ काण, १९ सिद्धि, २० शुभ, २१ अमृत, २२ मुसल, २३ गद, २४ मातंग (कुंजर), २५ राक्षस, २६ चर. २७ स्थिर, २८ वर्धमान असे हे अठ्ठावीस योग आपआपल्या नांवासारखें चांगलें वाईट फळ देणारे आहेत.

### हे योग कसे उत्पन्न होतात, तो प्रकार दाखवितों.

### रत्नमाला.

सूर्येऽश्विभात्तुहिनरोचिषि सौम्यधिष्ण्यात्सार्पाच्च भूमितनये च बुधे च हस्तात् ।
मैत्राद्गुरौ भृगुसुते खलु वैश्वदेवाच्छायासुते वरुणभात्क्रमशः स्युरेते ॥ १६ ॥

अर्थ—रविवारीं अश्विनीपासून अभिजितसह क्रमानें २८ नक्षत्रें लिहावीं. सोमवारीं मृगापासून क्रमानें रोहिणीपर्यंत २८ नक्षत्रें लिहावीं. मंगळवारीं आश्लेषापासून क्रमानें पुष्यापर्यंत २८ नक्षत्रें लिहावीं, बुधवारीं हस्तापासून उत्तरापर्यंत लिहावीं, गुरुवारीं अनुराधेपासून विशाखापर्यंत लिहावीं, शुक्रवारीं उत्तराषाढांपासून पूर्वाषाढांपर्यंत लिहावीं, आणि शनिवारीं शततारकेपासून धनिष्ठापर्यंत घ्यावीं. याप्रमाणें २८ नक्षत्रांनीं क्रमानें आनंदादिक अठ्ठावीस योग उत्पन्न होतात. त्यांचीं नांवें वर दिलीं आहेत.

ह्या २८ योगांमध्यें १ शुभ, २ कुंजर, ३ मित्र, ४ ध्वज, ५ मुद्गर, ६ अमृत, ७ सौम्य, ८ सिद्धि, ९ श्रीवत्स, १० स्थिरमानस, ११ धाता, १२ आनंद, १३ छत्र, १४ वर्धमान हे चवदा योग शुभ फल देणारे आहेत. याहून इतर जे १४ ते अशुभ असें अर्थसिद्धच झालें.

### संक्रांतिप्रकरणम्.

पूर्वं परित्यज्य यदा ग्रहाणां राशिं परं प्रत्ययनं स कालः ।
संक्रांतिवाच्योऽयमतिप्रशस्तः स्नाने च दाने च रवेर्विशेषात् ॥ १ ॥ मु. मा.

अर्थ – * क्रांतिवृत्ताचे १२ भाग केले असून त्या प्रत्येक भागास राशि ह्मणतात. या १२ राशींपैकीं कोणत्याही एका राशींतून दुसऱ्या राशींत कोणत्याहीं ग्रहाचे गमनक्रियेस संक्रांति ह्मणतात. याप्रमाणें ग्रहाचा राश्यंतर होण्याचा जो काल त्या कालास संक्रांत (तत्कालाभिमानी देवी) असें ह्मणतात. या संक्रांतिकालाचे विशेषेंकरून सूर्यसंक्रमणकालाचे वेळीं सूर्यास भेटण्यास संक्रांति नांवाची देवी येते. ह्मणून तिच्या व सूर्याप्रीत्यर्थ स्नानदानादि पुण्यकर्में करण्याविषयीं धर्मशास्त्र ग्रंथांत मोठें महात्म्य सांगितलें आहे. याप्रमाणें केलें ह्मणजे जगतास पीडा होणार नाहीं असेंही सांगितलें आहे. दक्षिणायन व उत्तरायण (कर्क व मकर) या संक्रमणाच्या वेळीं विशेष पुण्यकाल धर्मशास्त्रानें सांगितला आहे; परंतु कर्क संक्रमणाविषयीं मकर संक्रांतिइतका पर्वकाळ समजून स्नानदानादि धर्मकृत्यें लोक करीत नाहींत; पण कांहीं लोक सदरप्रमाणें कृत्यें करितात. इतर संक्रांतिविषयीं पर्व समजून कांहीं लोक पुण्यकर्में करितात; परंतु त्या दिवशीं मंगल कृत्यें मात्र करूं नये असें सांगितलें आहे.

## संक्रांतिस्वरूपम्. सं. फ. दे.

षष्टियोजनविस्तीर्णा संक्रांतिः पुरुषाकृतिः ।
एकवक्त्रा नवभुजा लंबोष्ठी दीर्घनासिका ॥ २ ॥
पृष्ठालोका भ्रमत्यत्र गृहीत्वा खर्परं करे ।
एवं संक्रमणे यस्याः फलं प्रोक्तं मनीषिभिः ॥ ३ ॥

अर्थ--वर जी संक्रांति देवी सांगितली तिचें वर्णनः — ती २४० कोस उंच असून तितकीच रुंद आहे. तिचा आकार पुरुषाप्रमाणें असून तिला एक तोंड आणि ९ हात आहेत. तिचे ओंठ लांब असून नाकही मोठें आहे. तिची दृष्टि पाठीकडे असून ती हातांत खापर घेऊन सारखी फिरत असते. विद्वानांनीं याप्रमाणें संक्रांतिकालाचे वेळीं तिचें फल सांगितलें आहे.

## वारपरत्वेन सामान्यतः संक्रांतिफलम्.

शुभवारे नृपक्षेम सुभिक्षं दुष्टसंक्षयः ।
क्रूरवारेऽर्कसंक्रातावनृष्ट्यामयसंगराः ॥ ४ ॥ मु. मा.

अर्थ--शुभवारीं सूर्यसंक्रमण झालें असतां राजाला सुख, सुभिक्ष व दुष्टांचा नाश हीं फलें होतात. पापवारीं झालें असतां अवर्षण, रोग व युद्ध हीं फलें होतात.

---

* पुढें गणिताध्यायांत याची व्याख्या सांगितली आहे.

## मेषसंक्रांतिफलम्.

दिवा चेन्मेषसंक्रांतिरनर्थकलहप्रदा ।
रात्रौ सुभिक्षमतुलं संध्ययोर्वृष्टिनाशनम् ॥ ५ ॥ पं. सा. सा.

**अर्थ**—दिवसा मेषसंक्रमण झालें असतां भांडणतंटे फार होतील व नानातऱ्हेचीं संकटें ओढवतील; रात्री झालें असतां सर्वत्र सुबत्ता होईल, आणि सूर्योदयाचे अथवा सूर्यास्ताचे वेळेस झालें असतां पाऊस नाहींसा होईल.

## संक्रांतिनामानि.

**वारतः**—रव्यादिवारतः संज्ञा घोरा ध्वांक्षी महोदरी ।
मंदाकिनी च नंदा च मिश्रा राक्षसिका क्रमात् ॥ ६ ॥ सं. फ. दे.

**नक्षत्रतः**-उग्रे क्षिप्रे चरे मैत्रे स्थिरे मिश्रे च दारुणे ।
ता एव संज्ञा गदिता नारदादिमुनीश्वरैः ॥ ७ ॥ सं. फ. दे.

| वार. | नांवें. | नक्षत्रें. |
|---|---|---|
| रवि. | घोरा. | उग्र. |
| सोम. | ध्वांक्षी. | क्षिप्र. |
| मंगळ. | महोदरी. | चर. |
| बुध. | मंदाकिनी. | मैत्र. |
| गुरु. | नंदा. | स्थिर. |
| शुक्र. | मिश्रा. | मिश्र. |
| शनि. | राक्षसिका | दारुण. |

**अर्थ**—आदित्यवारापासून क्रमानें १ घोरा, २ ध्वांक्षी, ३ महोदरी, ४ मंदाकिनी, ५ नंदा, ६ मिश्रा व ७ राक्षसिका अशीं वारपरत्वें संक्रांतीचीं नांवें आहेत. नक्षत्रपरत्वें हीं १ उग्र, २ क्षिप्र, ३ चर, ४ मैत्र, ५ स्थिर, ६ मिश्र व ७ दारुण नक्षत्रीं तींच नांवें क्रमानें समजणेचीं असें नारद वगैरे ऋषींनीं सांगितलें आहे.

## नामफलानि. सं फ. दे.

सुखं बहुतरं शूद्रा यांति धान्यादिकर्षणैः ।
पीडा तद्व्यतिरिक्तानां घोराख्यः संक्रमो यदा ॥ ८ ॥
वैश्यानां सुखदा प्रोक्ता विशेषेण वणिग्जनाः ।
धनं बहुविधं यांति संक्रांतिर्ध्वांक्षिका यदा ॥ ९ ॥

यदा महोदरीसंज्ञा संक्रांतिस्तु तदा भवेत् ।
चौराणां सुखसंपत्तिवस्त्रधान्यधनप्रदा ॥ १० ॥
राज्ञां सुखकरी प्रोक्ता द्रव्यलाभप्रदा ध्रुवम् ।
संक्रांतिर्जायते नूनं यदि **मंदाकिनी** रवेः ॥ ११ ॥
**नंदा**भिधा च संक्रांतिर्वेदपारंगतान्द्विजान् ।
मीमांसातर्कभाष्यज्ञान्सुखयेच्च विशेषतः ॥ १२ ॥
महिषीवृषगोमेषच्छलायाजादयः सुखं ।
तृणं लभंते बहुलं **मिश्राख्यः** संक्रमो यदा ॥ १३ ॥
चांडालरजकादीनां तथा वैणवकारिणाम् ।
सुखं बहुतरं कुर्याद्राक्षसा[१]ख्यस्तु संक्रमः ॥ १४ ॥
ध्वांक्षी वैश्यान्सुखयति महोदर्यलं चोरसार्थान् ।
घोरा शूद्रानथ नरपतीनेव मंदाकिनी च ।
नंदाख्या च द्विजवरगणान्मिश्रिकाख्या पशूंश्च ।
चांडालानां प्रकृतिमखिलां राक्षसीसंज्ञिता च ॥ १५ ॥ ज्यो. सा.
शूद्रविट्चोरभूपालविप्रपश्वंत्यजान् क्रमात् सुखयति । मु. मा.

**अर्थ**—१ **घोरा**—धान्य वगैरे मळून शूद्रांना अतिशय सुख होईल व शूद्रेतरांना पीडा होईल.

२ **ध्वांक्षी**—वैश्यजातीला व विशेषेंकरून वाणी लोकांना नानाप्रकारांनीं द्रव्य मिळेल.

३ **महोदरी**—चोरांना सुख होईल व त्यांना वस्त्र, धान्य आणि द्रव्य पुष्कळ मिळेल.

४ **मंदाकिनी**—राजे लोकांना पुष्कळ द्रव्य मिळून सुख होईल.

५ **नंदा**—वैदिक ब्राह्मण, मीमांसा, तर्क आणि भाष्य जाणणारे शास्त्री लोक यांना सुख होईल.

६ **मिश्रा**—म्हशी, बैल, गाई, बकरीं, रेडे, शेळ्या व बोकड यांना पुष्कळ चारा मिळून सुख होईल.

७ **राक्षसी**—म्हार, मांग, परीट व बुरूड यांना अत्यंत सुख होईल.

ज्योतिषसार व मुहूर्तमाला यांचाही अभिप्राय सदरप्रमाणेंच आहे.

---

१ "तीक्ष्णसंज्ञ" असा पाठभेद आहे.

## संक्रांतिगमनम्.

गुरौ गच्छति पूर्वस्यां याम्यां भास्करशुक्रयोः ।
प्रतीच्यां भौमबुधयोरुदक् च शनिचंद्रयोः ॥ १ ॥ सं. फ. दे.

## संक्रांत्यवलोकनम्.

आग्नेयीं पश्यति गुरौ नैरृतिं रविशुक्रयोः ।
वायवीं भौमबुधयोरैशानीं शनिचंद्रयोः ॥ १ ॥ सं. फ. दे.

## संक्रांतिमुखदिशः

अर्के शुक्रे मुखं पूर्वे सौम्ये भौमे च दक्षिणे ।
शनौ चंद्रे मुखं पश्चात् गुरौ चैवोत्तरामुखी ॥ १ ॥ ज्यो. सा.

अर्थ—कोष्टकरूपानें दाखवितों.

| वाराचें नांव. | गमन कोणत्या दिशेस. | दृष्टि कोणत्या दिशेस. | तोंड कोणत्या दिशेस. |
|---|---|---|---|
| रवि. | दक्षिण. | नैर्ऋत्य. | पूर्व. |
| चंद्र. | उत्तर. | ईशान्य. | पश्चिम. |
| मंगळ | पश्चिम. | वायव्य. | दक्षिण. |
| बुध. | पश्चिम. | वायव्य. | दक्षिण. |
| गुरु. | पूर्व. | आग्नेयी. | उत्तर. |
| शुक्र. | दक्षिण. | नैर्ऋत्य. | पूर्व. |
| शनि | उत्तर. | ईशान्य. | पश्चिम. |

या क्रिया संक्रमण ज्या वारीं होईल त्या क्रियांवरून समजावयाच्या आहेत. यांचीं फळें बाजूचे कोष्टकांत दिलीं आहेत.

## गमनदिक्फलानि.

पूर्वदिशं यदि याति दिनेशः शूरखसागकलिंगसुवंगाः ।

यांति मृतिं मगधा अपि नित्यं पश्चिमदिग्यवनाः सुखभाजः ॥ १ ॥
याम्यदिशं प्रविशेन्नलिनीशो मालवदर्दुरपांड्यनृपालाः ।
उत्तरदेशनिवासिनृपालैरात्तमहीधनधान्यसुमुक्ताः ॥ २ ॥
भानुरियादिशमंबुपतेश्चेन्मृत्युभयं यवना उपयांति ।
अन्यनृपास्त्रपरिक्षतगात्रा रक्तजलौघनदीकृतभूम्यः ॥ ३ ॥
उत्तरतो गमनं यदि भानोर्दक्षिणदिक्प्रभवा जगतीशाः ।
यांति सुखं खलु सस्यविवृद्धिः कौरवदेशविनाशनता स्यात् ॥ ४ ॥

**अर्थ**—खालीं लिहिलेल्या दिशेला ( संक्रांति देवी ) जाईल तर त्यापुढें दिलेलीं फळें होतील.

१ **पूर्व**—शूर, खस, अंग, कलिंग, वंग व मगध या देशांतील लोक फार मरतील व पश्चिमेकडील यवन लोकांना सुख होईल.

२ **दक्षिण**—मालव, दर्दुर व पांड्य या देशांतील राजांवर उत्तरेकडील राजे हल्ले करून त्यांचें धन, धान्य, जमिनी व चांगलें मोतीं हरण करतील.

३ **पश्चिम**—म्लेंछ राजांना मरणाची भीति उत्पन्न होईल. इतर राजांच्या शस्त्रप्रहारांनीं त्यांच्या अंगांतून रक्त वाहून त्या रक्तांच्या नद्या जमिनीवर पसरतील.

४ **उत्तर**—दाक्षिणात्य राजांना सुख होईल. धान्य पुष्कळ पिकेल. कुरु देशाचा नाश होईल.

## अवलोकन ( दृष्टि ) फलानि. सं. फ. दे.

ईशदिशं प्रविलोकयितार्कस्तूत्तरपूर्वनृपा युधि भंगम् ।
अन्यनृपादुपयांति समंतात्तंडुलपूर्वकधान्यविमूल्यम् ॥ १ ॥
पश्यतिचेद्धुतभुग्दिशमर्कः पूर्वदिशि प्रभवेद्रिपुपीडा ।
दक्षिणदिङ्नृपतीनपि नित्यं घ्नंति नृपा युधि पश्चिमजाताः ॥ २ ॥
लोचनगोचरतामुपयाता नैर्ऋतिदिग्यदि भानुमतः स्यात् ।
कोंकणदेशनिवासिजनाः स्युः पीडनदुःखयुता नरपालात् ॥ ३ ॥

दर्शनमार्गगता यदि भानोर्वायुदिशा यवना मृतिभाजः ।
अन्यनृपास्त्रशराहतगात्रा रोदननिर्गतकज्जलरागाः ॥ ४ ॥

**अर्थ**—खालीं दिलेल्या दिशांकडे जर ( संक्रांति देवी ) पाहील तर त्यापुढें दिलेलीं फळें होतील.

१ ईशान्यः—उत्तर आणि पूर्व या दिशांकडील राजांचा युद्धांत इतर राजाकडून पराभव होईल. तांदूळ वगैरे धान्य महाग होईल.

२ आग्नेयी—पूर्व देशांतील लोकांना शत्रूपासून त्रास होईल. युद्धांत पश्चिमेकडील राजे दक्षिणेकडील राजांचा पराभव करतील.

३ नैर्ऋति—कोंकणांत राहणाऱ्या लोकांना राजापासून त्रास व दुःख होईल.

४ वायव्य—यवन लोकांत मृत्यु फार होतील. इतर राजांचे त्यांच्या शरीरावर शस्त्रप्रहार होतील व रडण्यानें त्यांचे डोळ्यांतील सुर्म्याचा ( काळा ) रंग निघून जाईल.

## समयफलानि. सं. फ. दे.

दिवसप्रथमत्र्यंशे संक्रांतिर्यदि तु जायते हन्यात् ।
उन्मत्तद्विपसहितान् तुरंगमैरावृतान् नृपतीन् ॥ १ ॥

मध्ये दिवसत्र्यंशे प्रभवति यदि संक्रमो भानोः ।
मीमांसान्यायविदो भाष्यज्ञान्वैदिकान्हंति ॥ २ ॥

अन्हस्तृतीयकेंऽशे दिनपतिरिह संक्रमेत्तदा नियतम् ।
धान्यधनैरुपयुक्तान्वैश्यजनान्पीडयेद्बहुलम् ॥ ३ ॥

अस्तेऽर्कसंक्रमश्चेत्प्रभवंति शूद्रास्तु कृषिवशतः ।
राज्ञा हता मृता वा परदेशरताः ससुतजायाः ॥ ४ ॥

रात्रेः प्रथमे प्रहरे संक्रांतिर्यदि तु जायतेऽर्कस्य ।
पिप्पलवटादिसंश्रितपिशाचकान्नाशयेन्नियतम् ॥ ५ ॥

नैशे द्वितीययामे दिनमणिरिह संक्रमं कुरुते ।
मायाविनस्तथान्यान्निशाचरान्नाशयति विविधान् ॥ ६ ॥

तस्यास्तृतीययामे चेत्संक्रमते दिवाकरस्तर्हि ।
नानाविधवेषधरान्नटान्नयाति यमसदनम् ॥ ७ ॥
रात्रेश्चतुर्थप्रहरे यदि राश्यंतश्चरो दिवसपतिः ।
महिषीवृषगोमेषान् रक्षंतो मृत्युमायांति ॥ ८ ॥
सूर्योदये दिनेशः संक्रमते यदि तदा नियतम् ।
नानाविधलिंगिजनान्गमयति शीघ्रं तु यमसदनम् ॥ ९ ॥
पूर्वाण्हकाले नृपतिं द्विजेंद्रान्मध्यंदिने चाथ विशोऽपराण्हे ।
शूद्रान् रवावस्तमिते प्रदोषे पिशाचकान् रात्रिचरान्निशीथे ॥ १० ॥
नटादिकांश्चापररात्रिकाले प्रत्यूषकाले पशुपालकांश्च ।
संक्रांतिरर्कस्य समस्तलिंगान्प्रभातसंध्यासमये निहंति ॥ ११ ॥

ज्यो. सा.

अर्थ—दिवसाच्या व रात्रीच्या खालीं लिहिलेल्या वेळीं जर सूर्यसंक्रमण होईल तर त्या त्या पुढें लिहिलेलीं फळें होतील.

| | |
|---|---|
| १ दिवसाचे ३ भाग करून त्यांतील पहिल्या भागांत (ह्मणजे पूर्वाण्हीं) | मदोन्मत्त हत्ती, घोडे यांसहित राजे लोकांचा नाश. |

२ दिवसाचे दुसरे भागांत (मध्यान्हीं)—मीमांसा, न्याय, भाष्य जाणणारे शास्त्री लोक व वैदिक लोक यांचा नाश.

३ दिवसाचे तिसरे भागांत (अपराण्हीं)—ज्यांच्याजवळ धान्य व द्रव्य पुष्कळ आहे अशा वाणी उदमी लोकांस पीडा.

४ सूर्यास्ताचे वेळीं—शेतकरी लोकांना राजा मारील किंवा ते आपोआप मरतील किंवा बायकामुलें घेऊन देशांतरास जातील.

५ रात्रीचा पहिला प्रहर—पिंपळ, वड वगैरे वृक्षांचा आश्रय धरून राहिलेल्या पिशांचाचा खात्रीनें नाश होईल.

६ रात्रीचा दुसरा प्रहर—माया उत्पन्न करून चेष्टा करणारे व इतर नाना प्रकारचे राक्षस यांचा नाश होईल.

७ रात्रीचा तिसरा प्रहर—निरनिराळीं सोंगें घेणाऱ्या नटवर्गास मृत्यु प्राप्त होईल.

८ रात्रीचा चवथा प्रहर—गवळी व धनगर हे मरतील.

९ सूर्योदयाचे वेळीं—निरनिराळ्या प्रकारचीं चिन्हें धारण करणारे ह्मणजे बहुरूपी, वासुदेव वगैरे लोक मरतील.

संक्रांतिफलादेश व ज्योतिषसार यांचें मतैक्य आहे.

## १ संक्रांतिस्थितिः

तैतिले नागसंज्ञे च चतुष्पादे च निद्रितः
गरादिपंचके भानुर्निविष्टोऽथ सकौलवे ।
किंस्तुघ्ने शकुनावूर्ध्वोत्तिष्ठो नेष्टः समो महान् ॥ १ ॥ सं. फ. दे.
सुप्तः संक्रमतेऽर्कश्चतुष्पदे तैतिले नागे ।
गरपंचके निविष्टस्तिष्ठन् किंस्तुघ्नकौलवे शकुनौ ॥ २ ॥ मु. म.

## २ सं० वाहनानि.

सिंहो व्याघ्रो वराहश्च गर्दभः कुंजरस्तथा ।
महिषो घोटकः श्वा च छागो वृषभकुक्कुटौ ॥ ३ ॥ ज्यो. सा.

## ३ सं० उपवाहनानि.

गजो वाजी वृषो मेषः खरोष्ट्रहरयः क्रमात् ।
बवादौ वाहनं प्रोक्तं स्थिरेषु वृषभो रवेः ॥ ४ ॥ सं फ. दे.

## ४ सं० वस्त्रम्.

श्वेतपीतहरितं च पांडुरं रक्तश्याममसितं बहुवर्णम् ।
कंबलो विवसनं घनवर्णान्यंशुकानि च बवादिषु क्रमात् ॥ ५ ॥ ज्यो. सा.

## ५ सं० लेपनम् ( गंध. )

कस्तूरी कुंकुमं चैव चंदनं मृत्तिका तथा ।
गोरोचनमलक्तश्च हरिद्रा च तथांजनम् ।
सिंदूरमगरुश्चैव कर्पूरश्च बवादितः ॥ ६ ॥ ज्यो. सा.

## ६ सं० पुष्पाणि.

पुन्नागजाती बकुलश्च केतकी बिल्वस्तथार्कः कमलं च दूर्वा ।

---

१ " शार्दूलमहिषव्याघ्रा वराहश्च बवादितः " असा पाठभेद आहे.

मल्ली तथा पाटलिका जपा च बवादिपुष्पाणि च योजयेत् ॥ ७ ॥ ज्यो. सा.

### ७ सं० भक्षणम्.

अन्नं च पायसं भैक्ष्यं पक्वान्नं च पयो दधि ।
चित्रान्नं गुडमध्वाज्यं शर्करा तु बवादितः ॥ ८ ॥ ज्यो. सा.

### ८ सं० आयुधानि.

भुशुंडी च गदा खड्गं दंड-कोदंड-तोमरान् ।
कुंतपाशांकुशास्त्रं च बाणश्चैवायुधं बवात् । ॥ ९ ॥ ज्यो. सा.

### ९ सं० जातिः

देवभूताहिविहगपशवो मृग एव च ।
ब्रह्मक्षत्रियविट्शूद्रमिश्रजातिर्बवादितः । ॥ १० ॥ ज्यो. सा.

### १० सं. वयः

शिशुः कुमारी च गतालका युवा ।
प्रौढा प्रगल्भाऽथ ततश्च वृद्धा ।
वंध्यातिवंध्या च सुतार्थिनी च ।
प्रव्राजिका चैव फलं शुभं बवात् ॥ ११ ॥ ज्यो. सा.

### ११ सं० भूषणानि.

नूपुरं कंकणं मुक्ता विद्रुमं मुकुटं मणिः ।
गुंजा वराटकं नीलं गरुत्मं रुक्मकं बवात् ॥ १२ ॥ ज्यो. सा.

### १२ सं० भोजनपात्रम्.

सौवर्णं राजतं ताम्रं कांस्यं लोहं च खर्परं ।
पत्रं वस्त्रं करो भूमिः कांस्यपात्रं बवादितः ॥ १३ ॥ ज्यो. सा.

### १३ सं० कंचुकी.

विचित्रपर्णांशुकभूर्जपत्रिका सिता तथा पाटलनीलवर्णा ।

---

१ सुवर्णं राजतं ताम्रं आयासीसं त्रपूद्भवम् । कांस्यपाषाणदारुं च मात्स्यं वेणुं बवादिकात् ॥ असा पाठभेद आहे. ( मु. मा. )

कृष्णाजिनं चर्म च वल्कपांडुरा ववादितश्चैत्र तु कंचुकी स्यात् ॥ १२ ॥
ज्यो. म.

## संक्रांतिवाहनादिकम्. पै. क. दे.

### ववादिकरणेषु.

ववे सिंहगा श्वेतवस्त्रा च वाला भुशुंडीधरा चान्नभुक् चंपकाढ्या ।
सकस्तूरिकालेपना देवजातिः प्रवालोत्थभूषार्कसंक्रांतिरुक्ता ॥ १ ॥
कुमारी सुपीतांवरा व्याघ्रगा च गदाढ्या च जातीप्रसूनाहिजातिः ।
सुमुक्ताफलालंकृता कुंकुमाढ्या समुत्पायसा सा भवेद्वालवाख्ये ॥ २ ॥
वराहादिरूढा सखड्गा सुमुग्धा सुनीलांवरा चंदनालिप्तभाला ।
तथा रौप्यभूषावृता भूतजातिर्भवेत्कौलवे भैक्ष्यभुग्वाकुलाढ्या ॥ ३ ॥
खराधिष्ठिनी पांडुवस्त्रा सुहीरा सुदंडायुधा गोपिकाचंदनाढ्या ।
अपूपाशिनी केतकीपुष्पयुक्ता सुतारुण्ययुक् पक्षिणी तैतिलाख्ये ॥ ४ ॥
गरे हस्तिगा रक्तवस्त्रा प्रगल्भा पयःप्राशिनी रोचनालिप्तभाला ॥
धनुर्धारिणी विल्वगोमेदभूषा पशोर्जातियुक्तार्कसंक्रांतिरुक्ता ॥ ५ ॥
लुलायाधिरूढा मषीश्यामवस्त्रा दधिप्राशिनी तोमराढ्यातिवृद्धा ।
सुलीलार्कपुष्पा कुरंगीयजातिरलक्तालिका सा भवेद्वाणिजाख्ये ॥ ६ ॥
तुरंगाधिरूढातिवृद्धा सुकुंताऽसितं चांवरं संदधानाग्न्यजातिः ।
विडालोन्मदा चित्रितान्नप्रभोक्त्री सदूर्वा सहेमा च विष्टौ भवेत्सा ॥ ७ ॥
विचित्रांवरा पद्मपुष्पाश्वगा च सुपाशा निशाढ्या च वंध्या ससीता ।
गुडं भक्षयंती तथा क्षत्रिया च भवेच्छाकुने याऽर्कसंक्रांतिरेवम् ॥ ८ ॥
अजाधिष्ठिनी मल्लिकाढ्यातिवंध्यांजनालिप्तभाला च वैश्यांकुशाढ्या ।
तथा कंवलावेष्टिता कांस्यभूषा मधुप्राशिनी स्याचतुष्पादसंज्ञे ॥ ९ ॥
वृषाधिष्ठिनी नग्नदेहास्त्रयुक्ता सुतेच्छावती ताम्रभूषाज्यभोक्त्री ।
तथा चागरून्लेपयंती च शूद्रा भवेत्पाटलापुष्पयुक्ता च नागे ॥ १० ॥
घनाभांवरा योगिनी शर्कराभुक् जपापुष्पकर्पूरलेपा सवाणा ।
तथा कुक्कुटाधिष्ठिनी संकरास्यादयोभूषणा सा तु किंस्तुघ्नसंज्ञे ॥ ११ ॥

## वरील श्लोकांचा कोष्टकरूपानें अर्थ.

| नंबर. | वर्णन-प्रकार. | करण. १ बव | २ बालव. | ३ कौलव. | ४ तैतिल. | ५ गर. | ६ वणिज. | ७ विष्टि. | ८ शकुनि. | ९ चतुष्पाद. | १० नाग. | ११ किंस्तुघ्न |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | स्थिति. | बसलेली. | बसलेली. | उभी. | निजलेली. | बसलेली. | बसलेली. | बसलेली | उभी. | निजलेली. | निजलेली | उभी. |
| २ | वाहन. | सिंह. | व्याघ्र. | वराह. | गर्दभ. | हत्ती. | महिष. | घोडा. | श्वान. | मेंढा. | बैल. | कोंबडा. |
| ३ | उपवाहन. | हत्ती. | घोडा. | बैल. | मेंढा. | गाढव. | उंट. | सिंह. | वृषभ. शार्दूल. | वृषभ. महिष. | वृषभ. व्याघ्र. | वृषभ. वराह. |
| ४ | वस्त्र. | पांढरें. | पिवळें. | हिरवें. निळें. | पांडुर. | तांबडें. | श्याम निळें. | काळें. | विचित्र. | कंबल. घोंगडें. | नग्न. | मेघवर्ण. |
| ५ | लेपन. | कस्तुरी. | केशर. | चंदन. | गोपीचंदन. | गोरोचन. | अळता. | हळद. | काजळ. | शेंदूर. | अगरु. | कापूर. |
| ६ | पुष्प. | चाफा. | जाई. | बकुल. | केवडा. | बेल. | रुई. | दूर्वा. | कमळ. | मोगरा. | पाटला. | जास्वंद. |
| ७ | भक्षण. | अन्न. | पायस. | भैक्ष्य. | अपूप. पक्वान्न. | दूध. | दहीं. | चित्रान्न. | गूळ. | मध. | घृत. | साखर. |
| ८ | आयुध. | भुशुंडी. | गदा. | खड्ग. | दंड. | धनु. | तोमर. | कुंत(भाला) | पाश. | अंकुश. | अस्त्र. | बाण. |
| ९ | जाति. | देव. | भूत (सर्प) | सर्प. (भूत.) | पक्षी. | पशु. | हरिण. | ब्राह्मण. | क्षत्रिय. | वैश्य. | शूद्र. | संकर. |
| १० | वय. | बाला. | कुमारी. | गतालका. (मुग्धा) | तरुणी. | प्रौढा. | प्रगल्भा. (अतिवृद्धा). | वृद्धा. | बंध्या. | अति वंध्या. | पुत्रेच्छु. | योगिनी. संन्यासी. |
| ११ | भूषण. | पोंवळें. नूपुर. | मोतीं. कांकण. | रुपें. मोतीं. | हिरे. पोंवळें. | गोमेद. मुकुट. | नीळ. मणी. | सोनें. गुंजा. | सिसें. कवडी. | कांसें. नीळ. | तांबें. पाच. | लोखंड. सोनें. |
| १२ | भोजनपा. | सोनें. | रुपें. | तांबें. | कांसें. लोखंड. | लोखंड. सिसें. | खापर. कथील. | पानें. कांसें. | वस्त्र. दगडी. | हात लाकडी. | जमीन. मृन्मय. | कांस्यपात्र. वेळूचें. |
| १३ | कंचुकी. | विचित्र. | पानें. | वस्त्र. | भूर्जपत्र. | पांढरी. | श्वेत, रक्त. | निळी. | कृष्णाजिन. | कातडें. | वल्कल. | पांडुर. |

## सुप्तादिफलानि. सं. फ. दे.

यदि निद्रितो रविरुदीर्यते बुधैः सूतिका भजति पंचतां तदा ।
अथ रोगिणां विविधदुःखसंभवो जगदप्रभूतजलवृष्टिसंकुलम् ॥ १ ॥
अरुणो निषीदति यदा तदा सदा वणिजां निपीडनमथोऽभिजायते ।
मरणं प्रयांति दलनादिकुर्वतो समता च वृष्टिनिचयस्य जायते ॥ २ ॥
नलिनीपतेः खलु यदोर्ध्वसंक्रमो मृतिमाप्नुवंति किल वेत्रधारिणः ।
जलदा जलानि बहुलं तु वर्षिणो जगतीतले न तु भवंति नित्यशः ॥ ३ ॥

अर्थ—अवस्थेचीं फलें—' नेष्टः समो महान् ' ह्मणजे अनुक्रमानें वाईट, मध्यम व चांगलीं अशीं मूळस्थिति दर्शविणाऱ्या श्लोकांतच दिलीं आहेत. आतां विशेष फलें आहेत तीं खालीं लिहिल्याप्रमाणें:—

१ निद्रित असेल तर—बाळंतिणी मरतील. रोग्यांना नानाप्रकारचीं दुःखें होतील. पृथ्वीवर थोडा पाऊस पडेल.

२ बसलेली असेल तर—वाणी उदमी लोकांना पीडा होईल. दळण वगैरे करणारे लोक मरतील. पाऊस मध्यम पडेल.

३ उभी असेल तर—राजांच्या भालदार लोकांत फार मृत्यु होतील. मेघ पृथ्वीवर पुष्कळ पाऊस पाडणार नाहींत.

## २ वाहनफलानि. सं. फ. दे.

श्रीमत्पंकजिनीपतिर्यदि भवेत्पंचाननाधिश्रितः ।
पीडा पर्वतचारिदुर्गवनभूसंग्रामभाजां नृणाम् ॥
सिंहा यांति विनाशमाशु हिमभृद्देशाधिपा युद्धतो ।
भंगं राज्यविनाशमन्यनृपतित्रातक्षतक्ष्मातलाः ॥ १ ॥
व्याघ्रः स्याद्यदि वाहनं दिनकृतश्चंडप्रचंडस्फुर–
द्दंष्ट्रा विंध्यवनस्थलीषु विलयं यांति प्रयाणोद्यमाः ॥
आरण्याः खलु जीविनोऽतिविपुलं सौख्यं जयं पुष्टतां ।
सद्यो वागुरिका मृगादिबहुलं लाभं लभंतेऽतुलम् ॥ २ ॥
कोलं चेन्नलिनीपतिः कलयति क्रोधारुणाक्षिस्फुर–

दंष्ट्रादंशितमौक्तिकेयकवलव्यासक्तचित्ताः क्षणात् ॥
नानायावनबाणसंघघटनाप्रोतोदराः पंचतां ।
ग्राम्याश्चापि भजंति कुंभकृतिनः पीडां महीपालतः ॥ ३ ॥

भानोर्वाहनतां गतो यदि खरः कुंभेष्टकाकारकाः ।
कारागारनिवासदीनतनवः क्षोणीपतिक्षीणिताः ॥
पीडां यांति खराः खुराभिहतभूपृष्ठा विघृष्टानना ।
नानानोदननुन्ननूतनगतिव्रातव्रतैरन्विताः ॥ ४ ॥

उन्मत्तद्विपगामिपंकजवनाधीशे कलिंगा युधि ।
क्रूरारातिशरप्रपातपतिता वैवस्वतं त्वालयम् ॥
लोलच्चामरघंटिकातिविलसत्पिंडा मतंगा मृतिं ।
वैंध्या हैमभृता नृपा अतिनिजस्थानच्युतिं प्राप्नुयुः ॥ ५ ॥

कालीं कालयिता कलं कलयति भ्राजल्लुलाया मृतिं ।
यास्यंति त्वरिता महाबलिविधिवंद्यैर्जनैराहताः ॥
दुग्धं स्वल्पतरं तथा दधि घृतं वा माहिषं मूल्यतां ।
पीडा तत्क्रयकारिणां बहुविधा स्वल्पं तृणं स्याद्भुवि ॥ ६ ॥

अश्वं श्रीसविताकलय्य विनयेच्चेदश्ववाहा युधि ।
प्राणांतप्रतिपातनं रिपुकृतं नाशं व्रजंत्यश्वकाः ॥
स्याद्दूर्वांकुरनाशनं च विपुलं युद्धं महद्भूभुजां ।
नानासैन्यसमाजसंभ्रमवतामौदीच्यभूमीभुजाम् ॥ ७ ॥

चेच्छ्वानं सविताकलय्य निनयेन्नाशं व्रजंति क्षणात् ।
श्वानः सौख्यभुजो मृगादिपशवः कुंजेषु तिष्ठंति च ॥
व्याधा विंध्यवनस्थलीषु च महाव्याघ्रादिभिस्ताडिताः ।
पादोद्घृष्टमहीतला यमपुरं यांति क्षणान्निश्चितम् ॥ ८ ॥

चेन्मेषं सविताधिरुह्य गमनासक्तस्तदा मूल्यतां ।
पामर्यः किल यांति लाभपुरके काश्मीरदेशे तथा ॥
क्रेतारः खलु कंबलस्य विलयं यांति प्रभोः पीडना- ।

---

१ 'नानाभूपति बाणसंघघटना' असाही पाठ आहे.

न्मेषाजादिमुखा महानवमिकातिथ्यादिषु ध्वंसनम् ॥ ९ ॥
भास्वान्गामधिसंश्रितो यदि तदा पीडा वृषाणां भवे- ।
द्वंधाकर्षणपीडनानि कृषिकृद्याति प्रभोः कोपनात् ॥
धान्याद्यल्पफला मता वसुमती देशे विदर्भे तथा ।
राजा तद्विषये भवेदिह तनुद्रव्यप्रभूताधिमान् ॥ १० ॥
भानुश्चेच्चरणायुधं त्वधिरुहेत्तज्जातिमृत्युर्भवेत् ।
तद्युद्धैरुपजीविनो गतधना जायंत एवाधिपात् ॥
पीडां यात्रनभिक्षुका अतितरां यांति क्षुधार्पीडिताः
दुःखं स्तावकवंदिनां बहुविधं क्लेशं पदप्रच्युतिम् ॥ ११ ॥

अर्थ—ववादि करणें असतांना सूर्यसंक्रमण होईल तर संक्रांति देवी सिंहादि वाहनें वगैरे अनुक्रमानें धारण करिते असें मागें दाखविलें आहेच. आतां तीं तीं वाहनें वगैरे वापरल्यामुळें जीं फळें होतात तीं त्या त्या वाहनादिकांपुढें खालीं अनुक्रमानें लिहिलीं आहेत.

## २ वाहनांचीं फळें.

१. सिंह--डोंगर, किल्ले व अरण्यें यांत राहणाऱ्या लोकांस व जमिनीवर लढाई करणाऱ्या लोकांस पीडा होईल. सिंहांचा नाश होईल. ज्या ठिकाणीं बर्फ पडतें अशा देशांतील राजांवर इतर राजे हल्ले करतील व उभयतांमध्यें युद्ध होऊन वरील देशांतील राजे लोकांचा नाश होईल व त्यांचें राज्य जाईल.

२. व्याघ्र--विंध्य प्रदेशांतून प्रवास करणाऱ्या लोकांचा नाश होईल. भिल्ल वगैरे अरण्यांत राहून उपजीविका करणाऱ्या लोकांचा उत्कर्ष होऊन ते सशक्त बनतील व त्यांना अतिशय सुख होईल. फांसेपारध्यांच्या जाळ्यांत पुष्कळ हरणें वगैरे सांपडून त्यांना मोठा फायदा होईल.

३. वराह—रागानें डोळे लाल होऊन फुरफुरणाऱ्या दाढांनीं नागरमोथ्याचें घांस घेण्यांत गुंग झालेले रानडुकर अनेक राजांचे बाणसमुदाय लागून पोट फुटून मरतील. गांवठी डुकरेंही फार मरतील. कुंभार लोकांना राजापासून त्रास होईल.

४. गर्दभ—कुंभार लोकांना राजापासून त्रास होऊन त्यांना तुरुंगांत रहावें लागेल व त्यामुळें ते कृश होतील. गाढवांना पीडा होईल. ते आपल्या खुरांनीं जमिनी उकरतील व त्यांत तोंडें घासतील. त्यांच्यावर अनेक प्रहारांचे आघात झाल्यामुळें ते निरनिराळ्या गतींनीं पळत सुटतील.

५. हत्ती—भयंकर शत्रूचे बाण लागून कलिंग देशांतील लोक युद्धांत पडतील व मरतील. चवऱ्या ढळत असल्यामुळें व घाटी बांधल्या असल्यामुळें सुशोभित शरीराचे हत्ती मरतील. विंध्याचल व हिमालय पर्वतांतील राजेलोक पदभ्रष्ट होतील.

६. महिष—देवीच्या जत्रेंत महारमांगांकडून सुंदर रेडे मारले जातील. म्हशी दूध कमी देतील. म्हशीचें दहीं, तूप महाग होईल व त्याचा व्यापार करणाऱ्या लोकांना त्रास होईल. पृथ्वीवर गवत थोडें निपजेल.

७. घोडा—युद्धांत शत्रूपासून घोडेस्वारांच्या प्राणावर येऊन बेतेल व घोडे मरतील. दूर्वा नाहींशा होतील. उत्तरेकडील राजे लोक अनेक सैन्यभार घेऊन तुमुल युद्ध करतील.

८. कुत्रा—कुत्रीं आपोआप पटापट मरतील. हरण वगैरे जनावरांना सुख होऊन तीं आपापल्या जाळींत सुखानें राहतील. विंध्याचलांतील पारधी लोकांना मोठमोठ्या वाघांपासून इजा होऊन ते टांचा घासून मरतील.

९. मेष—काश्मीर देशांत उत्पन्न होणारें लोकरीचें कापड महाग होईल. घोंगडीं विकणाऱ्या लोकांना राजांपासून पीडा होईल. देवीच्या नवरात्रांत वगैरे बकरीं, बोकड यांचा फन्ना उडेल.

१०. वृषभ—बैलांना पीडा होईल. शेतकऱ्यांवर राजाचा राग होऊन त्यांना तुरुंगांत जाण्याची पाळी येईल. विदर्भ देशांत धान्य वगैरे पिकें थोडीं येतील व त्या देशांतील राजा शरीरसंपत्ति व द्रव्यसंपत्ति यानीं संपन्न होईल.

११. कोंबडा—कोंबड्यांचा नाश होईल. कोंबड्यांच्या झुजा लावून त्यावर पोट भरणाऱ्या लोकाचें द्रव्य राजा हरण करील. फकीर लोक भुकेनें व्याकुळ होऊन त्यांना इजा होईल. भाट वगैरे स्तुतिपाठ करणाऱ्या लोकांना नाना प्रकारचे त्रास होतील व ते आपापल्या कामावरून दूर होतील.

## मतांतरेण वाहनफलम्.

गजे लक्ष्मीर्वृषे स्थैर्यं घोटके वाहने तथा ।
सिंहे व्याघ्रे भयं प्रोक्तं सुभिक्षं गर्दभे शुनि ॥ १ ॥
वराहे वामनी पीडा जायते मेषवाहने ।
महिषे च भवेत्क्लेशः कुक्कुटे मृत्युरेव च ॥ २ ॥

**अर्थ**—हत्ती वाहन असेल तर लक्ष्मीप्राप्ति होईल; घोडा किंवा बैल वाहन असेल तर संपत्ति अचळ राहील; सिंह किंवा व्याघ्र वाहन असेल तर जनाला भीति उत्पन्न होईल; गाढव किंवा कुत्रा वाहन असेल तर सुभिक्ष होईल; डुकर किंवा मेंढा वाहन असेल तर वांतीचा विकार उत्पन्न होईल; रेडा वाहन असेल तर मनुष्यांना क्लेश होतील; आणि कोंबडा वाहन असेल तर लोकांत मृत्यु फार होताल.

## संक्रांतिवाहनादि सामान्यफलम्.

वाहनादि बुधैर्ज्ञेयमथो क्रांतिविशेषतः ।
वाहनादिकवस्तूनां संक्रमात्तु विनाशता ॥ १ ॥

**अर्थ**—ज्या वेळेस संक्रमण होईल त्या वेळेवरून संक्रांतीदेवीचें वाहनादिक जाणावें, आणि ज्या वाहनावर संक्रांति बसेल व ज्या ज्या वस्तु धारण करील त्यांचा नाश होईल असें जाणावें.

## ३ उपवाहनफलानि. सं. फ. दे.

सुभिक्षं सर्वदेशेषु पश्चिमे राजविग्रहः
धनधान्यं च लोकानां गजस्थे च दिवाकरे ॥ १ ॥
सुभिक्षं सर्वदेशेषु राजविग्रह एव च ।
गृहे गृहे च मांगल्यं वाजिस्थे च दिवाकरे ॥ २ ॥
सुभिक्षं दक्षिणे देशे उत्तरे राजविग्रहः ।
अग्निचोराकुला पृथ्वी वृषभस्थे दिवाकरे ॥ ३ ॥
विग्रहश्च महाघोरः क्षोणिशोषश्च मंडले ।
प्रजापीडा महर्घं च मेषस्थे च दिवाकरे ॥ ४ ॥

वायव्ये चोत्तरे चैव महाव्याधिप्रपीडनं ।
गृहे परतरं वैरं खरस्थे च दिवाकरे ॥ ५ ॥
अवंतिपश्चिमे देशे पीडनं सागरे तटे ।
पूर्वे बुभुक्षिताः सर्वे उष्ट्रस्थे च दिवाकरे ॥ ६ ॥
शुभवृष्टिः सुभिक्षं च नारीप्रसववेदनाः ।
पर्वतावासिपीडा च केसरिस्थे दिवाकरे ॥ ७ ॥
नीचकर्मकृतिर्लोके शिरोव्याधिप्रपीडनं ।
कुंभकारा विनश्यंति शार्दूलस्थे दिवाकरे ॥ ८ ॥
अग्निचोराकुला पृथ्वी महारोगप्रपीडनं ।
दुष्टरोगैर्जना मृत्युं महिषस्थे दिवाकरे ॥ ९ ॥
महाव्याधिभयं घोरं शुभवृष्टिः सुशोभना ।
सर्वधान्यसमर्घत्वं व्याघ्रस्थे च दिवाकरे ॥ १० ॥
सर्वधान्यमहर्घत्वमल्पवृष्टिश्च दक्षिणे ।
उत्तरे राजपीडा च वराहस्थे दिवाकरे ॥ ११ ॥

## उपवाहनांचीं फळें.

१. हत्ती—सर्व देशांत स्वंगाई होईल. पश्चिम दिशेला राजे लोकांत तंटे होतील. लोकांजवळ धनधान्याचा संग्रह पुष्कळ होईल.

२. घोडा—सर्व देशांत स्वंगाई होईल. राजे लोकांत कलह होईल. घरोघरीं मंगल कार्यें होतील.

३. बैल—दक्षिणेकडे स्वंगाई होईल. उत्तरेकडे राजे लोकांत तंटा होईल. पृथ्वीवर आगीची व चोराची भीति फार होईल.

४. बकरा—लोकांत मोठा तंटा माजेल. सर्व पृथ्वीसभोंवतीं पाण्याचें शोषण होईल. प्रजेला त्रास होईल व महागाई होईल.

५. गाढव—वायव्य आणि उत्तर या दिशेकडे मोठमोठे रोग उद्भवतील. घरोघरीं भयंकर कलह होतील.

६. उंट—उज्जयनीच्या पश्चिमेकडील व समुद्रकिनाऱ्यावरील लोकांस त्रास होईल. पूर्वेकडे सर्व लोक अन्न अन्न करतील.

७. सिंह—पाऊस चांगला पडेल. सर्वंगाई होईल. बायकांना बाळंत होतांना त्रास होईल. पर्वतावर राहणाऱ्या लोकांस पीडा होईल.

८. शार्दूल—लोक निंद्य कृत्यें करतील. डोकें दुखण्याचा आजार फार होईल.

९. रेडा—पृथ्वीवर आगीचा प्रळय होईल व चोरांचा सुळसुळाट होईल. वाईट रोग उद्भवून लोक मरतील.

१०. वाघ—नाना तऱ्हेचे महामारीसारखे भयंकर रोग उद्भवतील. पाऊस चांगला वेळेवर पडेल. सर्व धान्यें सवंग होतील.

११. डुक्कर—सर्व धान्यें महाग होतील. दक्षिण दिशेला थोडा पाऊस पडेल. उत्तरेला राजे लोकांपासून प्रजेला त्रास होईल.

## ४ वस्त्रफलानि. सं. फ. दे.

धवलं वसनं दिवाकरो यदि धर्ता खलु तन्महर्घता ।
न तु तूल्युता वसुंधरा मरणं तत्क्रयकारिणां भवेत् ॥ १ ॥
सुभगावनितानिपीडनं बहुमूल्यं खलु पीतमंबरम् ।
व्रजतीह महर्घतां निशा यदि पीतांबरधारको रविः ॥ २ ॥
यदि हारितकांबरावृतो नलिनीशः खलु तन्महर्घता ।
असुखी क्रयकारकस्ततः खलु नीली विलयं प्रयाति च ॥ ३ ॥
यदि पांडुरमंबरं रविः परिधत्ते प्रकरोति मूल्यताम् ।
लभतेऽतिनिपीडनं जना क्रयतो विक्रयतश्च तस्य च ॥ ४ ॥
यदि कोकनदाभमंबरं हरिणाऽधार्यत रक्तरंजितम् ।
वसनं च महामहर्घतां खलु लाक्षादिरियात्कुसुंभकम् ॥ ५ ॥
रविरंबरमंजनप्रभं परिधत्ते यदि चेह भिल्लकाः ।
मृतिमाशु वियंति युद्धतोऽसितवस्त्रस्य महर्घता भवेत् ॥ ६ ॥
असितं वसनं यदारुणः परिधानीकुरुते तु तत्तनु ॥
बहुपीडनबंधनादिभिर्व्रणभाजः खलु तत्क्रयैषिणः ॥ ७ ॥
यदिचित्रितचीवरान्वितो नलिनीबंधुरतस्तदुद्यमाः ।
विगतोत्सवतां व्रजंति वाऽतुलमूल्यं विलयं च याति तत् ॥ ८ ॥
तरणिः किल कंबलावृतः पशुपाला मृतिप्राप्नुयुस्तदा ।

अजमेषनिपीडनं भवेद्बहुमूल्यत्वमुपैति कंबलः ॥ ९ ॥
यदि दिग्वसनावृतो रविर्विलयं यांति पिशाचसंगताः
तनुपीडनमेव बालका मृतिमायांति दिगंबराः किल ॥ १० ॥
घनसन्निभमंबरं हरिर्यदि धर्ता हि निशाचरीभयम् ।
न भवेदभिसारिका नृपाद्भयमाप्नोति महर्घतां हि तत् ॥ ११ ॥

## वस्त्रांचीं फळें.

१. पांढरें--पांढरें कापड महाग होईल. पृथ्वीवर कापसाचें पीक येणार नाहीं. कापसाचा व्यापार करणाऱ्या लोकांत मृत्यु फार होतील.

२. पिंवळें-सुंदर स्त्रियांना पीडा होईल. पिंवळ्या रंगाच्या कापडाची किंमत वाढेल. हळद महाग होईल.

३. हिरवें-हिरव्या रंगाचें कापड महाग होईल. तें विकणाऱ्यांची नुकसानी होईल. निळी नांवाची वनस्पति नाहींशी होईल.

४. पांडुर ( श्वेतपीत )—पांढऱ्या–पिंवळ्या रंगाचें कापड महाग होईल. तें विकत घेणाऱ्यांची व विकणाऱ्यांची नुकसान होईल.

५. तांबडें--तांबड्या रंगाचें कापड महाग होईल. लाख व करडें महाग होतील.

६. निळें–निळ्या रंगाचें कापड महाग होईल. भिल्ल लोक युद्धांत मरतील.

७. काळें--काळ्या रंगाचें कापड बाजारांत फार येणार नाहीं व तें विकणाऱ्या लोकांस कारागृहापासून किंवा व्रणापासून वगैरे पीडा होईल.

८. विचित्र--रंगीबेरंगी कापड फार महाग होईल किंवा त्याचा नाश होईल व त्याचा व्यापार करणारे लोक नाउमेद होतील.

९. कांबळें—गुराखी मरतील. शेळ्यामेंढ्यांना इजा होईल व घोंगडीं महाग होतील.

१०. नग्न—ज्या लोकांना पिशाचांनीं वगैरे झपाटलें आहे असे लोक नाहींसे होतील. लहान मुलांना शारीरिक पीडा होईल. नंगे गोसावी फार मरतील.

११. मेघवर्ण—मेघवर्ण कापड महाग होईल. व्यभिचारिणी स्त्रिया निःशंक होतील. उपपतीकडे जाणाऱ्या स्त्रियांना राजापासून भीति उत्पन्न होईल.

## ५ विलेपनफलानि. सं. फ. दे.

कस्तूरिकाचर्चितभालदेशो भानुर्यदा याति महर्घतां सा ।
पीडा भवेत्तत्क्रयकारिणां च विलासिनीनां प्रमदाजनानाम् ॥ १ ॥
सत्केशरालंविललाटभानुर्वक्रप्रदेशोत्थनृपा विभंगम् ।
समाप्नुयुर्माथुरभामिनीनां तद्व्ययमानामपि पीडनं स्यात् ॥ २ ॥
पाटीरपंकांकितभालदेशो दिवाकरो मालवदौर्गुणाम् ।
पीडाकरश्चंदनजीविनां च तन्मूल्यता स्यादथवाल्पता च ॥ ३ ॥
चेद्गोपिकाचंदनवारकोऽर्कः स्याद्वैष्णवानां प्रबला च पीडा ।
मृदः प्रसंगाच्च कृषीवलानां तद्व्ययमानामपि तन्महर्घम् ॥ ४ ॥
गोरोचनं चेद्रविणा ललाटे संधार्यते स्वल्पतरं तदा तत् ।
स्यान्नागरीणां किल सुंदरीणां तल्लेखनत्वात्प्रियविप्रयोगः ॥ ५ ॥
अलक्तकालंकृतभालदेशः प्रभाकरश्चेज्जतुमूल्यता स्यात् ।
पलाशनाशस्तु विलासिनीनां पीडा च तद्रक्तपदांबुजानाम् ॥ ६ ॥
स्रोतोर्मदः पंकजिनीप्रियेण संधार्यते कामिजनस्य पीडा ।
नाशं प्रयांति त्वरितं बिडालास्तद्गुणनाश्चापि तदल्पता स्यात् ॥ ७ ॥
निशाविशालयंबुजिनीशभालं सुवासिनीनां बहुवा विरक्तिः ।
तदल्पता चाथ तद्व्ययमानां पीडा विशेषेण वणिग्जनानाम् ॥ ८ ॥
चेदंजनालिप्तललाटदेशो दिवामणिः स्त्रीपुरुषैर्वियोगम् ।
मंत्रीक्रियाभिज्ञतनुप्रपीडा षड्रोगभाजां च नृणां हि मृत्युः ॥ ९ ॥
भानुश्च कृष्णागरुलितभालस्तद्व्यापारास्तु विनाशमाशु ।
प्रयांति हैमाचलभूभुजश्च कालागरुः स्वल्पतरश्च तत्र ॥ १० ॥
कर्पूरलीलाललितालिकश्चेद्दिवामणिस्तस्य महर्घता स्यात् ।
चित्रोद्भवा वृष्टिरपीह न स्यात्तद्व्ययमाद्द्रव्यविनाशनं च ॥ ११ ॥

## गंधाचीं फळें.

१. कस्तुरी—कस्तुरी महाग होईल. कस्तुरी विकणाऱ्यांना व रसिक स्त्रियांना त्रास होईल.

२. केशर—नदीच्या वक्र तीरावर असणाऱ्या राजांचा पराभव होईल. मथुरेकडील बायकांना व केशर विकणाऱ्या लोकांना त्रास होईल.

३. **चंदन**--मालव व दुर्दुर देशांतील लोकांस व चंदन विकणाऱ्या लोकांस पीडा होईल. चंदन महाग होईल किंवा विक्रीकरितां बाजारांत थोडा येईल.

४. **गोपीचंदन**--वैष्णव लोकांना, शेतकऱ्यांना व गोपीचंदन विकणाऱ्या लोकांना फार पीडा होईल. गोपीचंदन महाग होईल.

५. **गोरोचन**--बाजारांत विक्रीकरितां गोरोचन थोडें येईल. गोरोचन लावणाऱ्या नागर लोकांच्या बायकांची त्यांच्या पतिपासून ताटातूट होईल.

६. **अळता**—लाख महाग होईल. अळता पायला लावणाऱ्या स्त्रियांना पीडा होईल. पळसाचीं झाडें नाश पावतील.

७. **जबादी मांजराच्या वृषणांतील कस्तुरी**--विलासी जनांना लाभ होईल. जबादी मांजरें व जबादी मांजरांच्या वृषणातील कस्तुरी विकणारे लोक फार मरतील. जबादी मांजरांच्या वृषणापासून कस्तुरी थोडी निघेल.

८. **हळद**—सुवासिनी स्त्रियांना अनेक प्रकारचा त्रास होईल. हळद कमी पिकेल. हळदीचा व्यापार करणाऱ्यांना व गिरगेंकरून अशा वाणी लोकांना पीडा होईल.

९. **काजळ**—नवराबायकोची ताटतूट होईल रक्तवानांच्या ( शाई करणाऱ्या लोकांच्या ) शरीराला पीडा होईल. पडूगांनीं ग्रस्त झालेले लोक फार मरतील.

१०. **कृष्णागरु**--कृष्णागरु चंदन काढून आणणाऱ्या व त्याच्या वस्तू बनविणाऱ्या लोकांचा नाश होईल. हिमालयांत राहणारे राजे लोकांत मृत्यु फार होतील. कृष्णागरु विक्रीकरितां बाजारांत थोडा येईल.

११. **कापूर**--कापूर महाग होईल. चित्रा नक्षत्राचा पाऊस पडणार नाहीं. कापराचा व्यापार करणाऱ्यांचें द्रव्य नाहींसें होईल.

## ६ पुष्पफलानि. सं. फ. दे.

दिनमणिरपि चंपकप्रवर्ता प्रभवति चंपकपादपप्रणाशः ।
अथ बहुतनुपीडनं वसंते भजति विलासिजनो विलासिनीभिः ॥ १ ॥
यदि कमलवनप्रकाशकारी भजति च जातिलतासुगंधिपुष्पम् ।
भवति हि खलु तन्महर्घनाशं शरदि च तत्कुसुमोद्यमाः प्रयांति ॥ २ ॥

यदि ह बकुलमाल्यधारकोऽर्कः किल बकुला विलयं लगंति लूनाः ।
अतिललितलुलल्ललामभाजामुपवनवासिविलासिनामनिष्टम् ॥ ३ ॥
खरतरकिरणस्तु केतकं चेत्कलयति संप्रति तद्विनाशनं स्यात् ।
शिवभजनरतो नरोऽतिसौख्यं भजति जनो मुरलातटस्थ एणिः ॥ ४ ॥
दिनकर इह बिल्वपत्रधारी जनयति देवलकस्य मृत्युभावम् ।
जगति च यदि तत्फलं तनु स्याद्भयमपि तत्क्रयकारिणां नृपालात् ॥ ५ ॥
सरसिरुहसखोऽर्कपुष्पधारी भवति यदा च विभावसुर्दहेत्तत् ।
मृतिमपि गुटिकाभिघातिनः क्ष्मासुरशरभिन्नशिरोधरा भजंति ॥ ६ ॥
यदि दिवसपतिर्दधाति दूर्वां तुरगवराः क्षुधया प्रयांति मृत्युम् ।
अतिसुखविभवं भजंति शाक्ता गणपतिभक्तिपरायणास्तु विघ्नम् ॥ ७ ॥
कमलमुकुलमालयांकितोऽर्को जगति सरांसि तनूदकानि नूनम् ।
शरदि च तनुशालयो भवंति भ्रमरयुतांबुजपंक्तिनाशनं स्यात् ॥ ८ ॥
हरिरपि यदि मल्लिकाविलासस्तपसि नरस्तु सुगंधितैलकर्ता ।
व्रजति हि मृतिमत्र पुष्पनाशः किल समजायत एव मालतीनाम् ॥ ९ ॥
दिनकर इह पाटलाप्रभूतं कुसुममलं समलंकरोति यर्हि ।
प्रभवति किल पीडनं तदीयोद्यमकरणादरणीयचित्तभाजाम् ॥ १० ॥
रविरिह कुसुमं जपाप्रभूतं कलयति तत्प्रभवेद्गतलेऽल्पम् ।
प्रभवति परिपीडनं जनानां बत कुसुमक्रयकारिणां विशेषात् ॥ ११ ॥

## फुलांचीं फळें.

१. चंपक—चाफ्याचीं झाडें मरतील. जैनी स्त्रीपुरुषांच्या शरीराला वसंत ऋतूंत पीडा होईल.

२. जाई—जाईचीं फुलें दुर्मिळ होतील. तीं फुलें विकणारे लोक शरदृतूंत फार मरतील.

३. बकुळ--बकुळीचीं झाडें नाश पावतील. बागांत वगैरे राहणाऱ्या व गमतीनें हलणारे अलंकार धारण करणाऱ्या लोकांचें कल्याण होणार नाहीं.

४. केवडा--केवडे नाहींसे होतील. शैवांना व नर्मदेच्या तीरावर राहून हरणाची पारध करणाऱ्या लोकांना फार सुख होईल.

५. बेल—पुजारी लोक मरतील. बेलफळें बारीक निपजतील व बेल विकणाऱ्यांना राजापासून भय उत्पन्न होईल.

६. रुई--सूर्याच्या तापानें रुईचीं फुलें जळून जातील. ब्राह्मणांच्या बाणांनीं माना तुटल्या जाऊन गोळीबार झाडणारे लोक मरतील.

७ दूर्वा—घोड्यांना वैरण न मिळाल्याकारणानें त उपाशीं मरतील देवी-उपासकांना फार सुख होईल. गणपतीची उपासना करणाऱ्या लोकांना फार विघ्नें येतील.

८. कमळ पृथ्वीवरील सरोवरांचें पाणी आटेल. शरदृतूंत बारीक भात थोडें निपजेल. ज्यांच्यावर भुंगे बसले आहेत अशीं काळांवीं फुलें नाश पावतील.

९. मोगरा—माघमासीं सुवासिक अत्तरें काढणारे लोक फार मरतील व मालतीला फुलें लागणार नाहींत.

१०. पाटला—पाटलीचीं फुलें आणून तत्संबंधीं उद्योग करण्यास प्रवृत्त झालेल्या लोकांना त्रास होईल.

११. जास्वंदी—जास्वंदीचीं फुलें कमी लागतील. तीं फुलें विकणाऱ्या लोकांना फार पीडा होईल.

## ७ भोजनफलानि. सं. फ. दे.

भुज्यतेऽन्नमरुणेन चेत्तदा शालयः किल भजंति मूल्यताम् ।
पीडनं बहुतरं च कोंकणाः स्वल्पतोयसरसीरुहं सरः ॥ १ ॥
भास्करश्च परमान्नभोजनो दुग्धशालिघृतशर्करादयः ।
यांति मूल्यमतुलं त्वभीरभूसंभवा अपि जना विनाशनम् ॥ २ ॥
भैक्ष्यमन्नमरुणो प्रसत्यतो मुंडिताश्च यतयो विरागिणः ।
यांति मृत्युमनिशं क्षुधार्दिताः स्वल्पधान्यधनसंकुला मही ॥ ३ ॥
यद्यपूपमलमत्ति भास्करो मालवोद्भवनृपा विनाशनम् ।
यांति तज्जनकधान्यमूल्यता पीडनं भवति तत्क्रयैषिणाम् ॥ ४ ॥
भुज्यते तु रविणा यदा पयो बल्लवाश्च बहुधा निपीडनम् ।
प्राप्नुवंति महिषीमृतिस्तदा जायते हि पयसो महर्घता ॥ ५ ॥
भास्करश्च दधिभक्षको यदा पीडनं व्रजबधूर्व्रजेत्तदा ।
माहिषं दधि महर्घतामियाद्गोकुलं किल भजेत पंचताम् ॥ ६ ॥

ऐक्षवं यदि भुनक्त्यहस्करः स्वल्पमैक्षवमिलातले भवेत् ।
दक्षिणां दिशमधिश्रितो जनस्तत्क्रयेच्छुरयते निपीडनम् ॥ ७ ॥
चित्रितान्नभुजि उष्णदीधितौ पीडनं भवति तत्क्रियावताम् ।
तंडुलादि बहुमूल्यतामियान्मुद्गदालिरपि तादृशी मता ॥ ८ ॥
भानुमांश्च मधुभोजनादरो विंध्यभूमिनिलया जना मृतिम् ।
यांति वै यवनताडिता भृशं क्षौद्रमूल्यमतुलं भवेदिह ॥ ९ ॥
आज्यभोजनकरो दिवाकरोऽरण्यवासिजनतानिपीडनम् ।
स्यादजादिमृतिराज्यमूल्यता पूर्वदेशविषये विशेषतः ॥ १० ॥
शर्कराभुजिकरो दिवाकरो ह्युत्तरादिशमितास्तदुद्यमाः ।
यांति राजभयतामहर्निशं जायते हि सितया स्वनाशनम् ॥ ११ ॥

## भक्ष्य पदार्थांचीं फळें.

१. **अन्न**—तांदूळ महाग होतील. कोंकणस्थ लोकांना फार त्रास होईल. सरोवरांतील पाणी आटेल व कमळें थोडीं निपजतील.

२. **पायस** - दूध, तांदूळ, तूप, साखर वगैरे जिन्नस फार महाग होतील. गौळवाड्यांतील लोक नाश पावतील.

३. **भिक्षान्न**—संन्यासी, तापसी व बैरागी लोक भुकेनें व्याकुळ होऊन फार मरतील. पृथ्वीवर द्रव्य व धान्य कमी होईल.

४. **अपूप**—माळव देशांतील राजेलोकांचा नाश होईल. त्या देशांत उत्पन्न होणारें धान्य महाग होईल व त्या धान्याचा व्यापार करणाऱ्या लोकांना व्यापार न झाल्यामुळें त्रास होईल.

५. **दूध**—गौळी लोकांना फार पीडा होईल. म्हशी मरतील. दूध महाग होईल.

६. **दहीं**—गवळणींना त्रास होईल. म्हशींचें दूध महाग होईल. गाईचीं खिल्लारें मरतील.

७. **ऊंस**—पृथ्वीतलावर गूळ वगैरे कमी होईल. त्याचा व्यापार करणाऱ्या दक्षिणेकडील लोकांना फार पीडा होईल

८. **चित्रान्न**—साखरभात वगैरे पक्वान्नें करणाऱ्या आचारी लोकांना फार त्रास होईल. तांदूळ वगैरे जिन्नस व मुगाची डाळ हीं फार महाग होईल.

९. मध – विंध्याचलांत राहणाऱ्या लोकांचा यवन लोकांकडून पराभव होऊन ते मरतील व मध अतिशय महाग होईल.

१०. तूप अरण्यांत राहणाऱ्या लोकांना फार पीडा होईल. शेळ्या वगैरे फार मरतील चहूंकडे व विशेषेंकरून पूर्वेकडे तूप महाग होईल.

११. साखर – उत्तरेकडील साखरेच्या व्यापाऱ्यांना रात्रंदिवस राजापासून फार भीति राहील व साखरेच्या व्यापारामुळें धनक्षय होईल.

## ८ शस्त्रफलानि. सं. फ दे.

भृशुंडिकायुधं यदा रवेर्भवेत्तु पीडनम् ।
तदीयकर्तृतावतां मृतिश्च शस्त्ररक्षिणाम् ॥ १ ॥
गदायुधं यदा हरेर्विशिष्टयुद्धसंभवः ।
कलिंगवंगदेशयोर्जयस्तुरुष्कभूभुजाम् ॥ २ ॥
यदीह दंडधारको दिवामणिश्च मुंडितान् ।
यतीन्निपीडयत्यतस्तथा च पालकान्पशोः ॥ ३ ॥
असिं रविर्बिभर्ति चेद्व्रजंति दाक्षिणात्यकाः ।
गृहीतनैजदेशिनो रिपोः पुरे निबंधनम् ॥ ४ ॥
बिभर्ति भास्करो यदा शरासनं तदा भवेत् ।
धनुर्धरस्य पीडनं कृपाणपाणिशोभनम् ॥ ५ ॥
यदायुधं च तोमरं बिभर्ति भास्करस्तदा ।
भवेद्धि भिल्लचारिणः प्रपीडनं च युद्धतः ॥ ६ ॥
यदीह कुंतधारको दिवाकरस्तदा भवेत् ।
मरुद्भवैर्नृपैर्महान् विरोधयुद्धसंभवः ॥ ७ ॥
दिवाकरस्तु पाशवान् सकामरूपसंभवाः ।
नृपा विनाशमाशु च प्रयांति शत्रुपीडिताः ॥ ८ ॥
करेऽकुशं यदा रविर्बिभर्ति हस्तिरक्षकाः ।
मृतिं प्रयांति युद्धतः कलिंगसंभवा नृपाः ॥ ९ ॥
सदस्त्रधारके रवौ प्रयांति मांत्रिका मृतिम् ।
भजंति गौडसंभवाः परैर्हृता भयं महत् ॥ १० ॥

विशिष्टबाणधारको रविश्च दाक्षिणात्यकाः ।
तुरुष्कयुद्धसंभवं भयं भजंति नित्यशः ॥ ११ ॥

## शस्त्रांचीं फळें.

१. भुशुंडी ( अग्न्यस्त्र )—तोफा, बंदुका वगैरे हत्यारें तयार करणारे व त्यांचें संरक्षण करणारे लोक फार मरतील.

२. गदा—कलिंग व वंग या देशांचें तुमुल रण माजेल. तुर्कस्थानांतील राजे यशस्वी होतील.

३. दंड—जती, संन्यासी लोकांना व गुराख्यांना फार पीडा होईल.

४. खड्ग ( तलवार )—दक्षिणेकडील लोकांना त्यांचा देश शत्रूंनीं काबीज केल्यामुळें शत्रूच्या नगरांत कारागृहवास प्राप्त होईल.

५. धनुष्य—धनुर्धारी ( तिरंदाज ) लोकांना त्रास होईल व तरवार-बहादुरांचें कल्याण होईल.

६. तोमर—( गुरगुंज आयुध ; याचा आकार मुसळण्याच्या रवीसारखा असतो. ) भिल्ल लोकांना लढाईमुळें फार पीडा होईल.

७. भल्ल ( भाला )—मारवाडांत राजे लोकांत मोठी लढाई उपस्थित होण्याचा संभव येईल.

८. पाश—असाम प्रांतांतील कामरूपनामक गांवच्या राजाला शत्रूपासून पीडा होऊन तो मरेल.

९. अंकुश—गडकरी ( हत्तीचे रक्षक ) लोकांत फार मृत्यु होतील. कलिंग देशांतील राजे लढाईमुळें नाश पावतील.

१०. अस्त्र ( समंत्रक शस्त्र ) मांत्रिक लोक फार मरतील. गौड देशांतील लोकांचा शत्रूकडून पराभव होऊन ते गांगरून जातील.

११. बाण—दक्षिणेकडील लोक तुर्की लोकांबरोबर संग्राम होण्याच्या भीतीनें गर्भगळित होऊन जातील.

## ९ जातिफलानि. सं. फ दे.

यदि रवेः सुरजातिरुदीरिता सुरगणोद्भवमानुषपीडनम् ।
अतिसुखं लभते खलु नास्तिकः खलजनाः प्रभवंति मदोद्धताः ॥ १ ॥

द्विनमणेर्हिजातिरतो भृशं जगति सर्पभयं न भवेत्क्वचित् ।
सुखमतीव भजंति च गारुडा बहुविधां मृतिमत्र फणाभृतः ॥ २ ॥
यदि ह भूतजजातिरशीतगुर्भवति खेचरभूतविनाशनम् ॥
अपिच जारणमारणमोहनादिकक्कादिष्टविनाशनभाङ् नरः ॥ ३ ॥
विहगजातिभृतोऽशुमतो मता पिकमरालविहंगमपंचता ॥
असकृदेव विहंगमघातकाः खगसमुद्भवलाभमवाप्नुयुः ॥ ४ ॥
दिनमणिस्तु पशूद्भवजातिमान्पशुनिपीडनमाशु विजायते ॥
सुखमतीव च हिंसकजीविनां श्वपचतो वसुलाभयुतो नृपः ॥ ५ ॥
हरिणजातियुतो यदि भानुमान्मृतिमवाप्नुयुराशु मृगा वने ॥
अतिसुखप्रभवं खलु कुक्कुराः समुपयांति च वागुरिकास्तथा ॥ ६ ॥
यदि रविर्द्विजजातिविभूतिमान् समुपयाति च वेदरता द्विजाः ॥
खलजनप्रभवं च भयं महद्विटजनो बहुसौख्ययुतो भवेत् ॥ ७ ॥
दिनकरो यदि बाहुजजातिमान् युधि नृपाः किल यांति च पंचताम् ॥
मगधकोसलकैकयसंभवाः परनृपैर्विहता विगतप्रभाः ॥ ८ ॥
दिनमणिर्यदि वैश्यसुजातिमान् नृपभयं विभजेत्तु सुवर्णकृत् ॥
अपि सदंबरधान्यधनान्विता वसुमतीतलगालयगामिता ॥ ९ ॥
दिनपतिर्यदि शूद्रजजातियुक् भवति राजभयं पदभूभुजाम् ॥
क्षितिरपीह भवेदपकर्षणाद्विरलधान्ययुता सुजलापि च ॥ १० ॥
यदि च संकरजातियुतो रविर्भवति वर्णचतुष्टयतः पृथक् ॥
सकलदुःखयुतोऽवनिपालतो ननु नरो न नरोत्तमतां व्रजेत् ॥ ११ ॥

## जातीचीं फळें.

१. देव—देवांपासून मनुष्यांना पीडा होईल. नास्तिक लोकांना सुख होईल. दुष्टलोक मदोन्मत्त होतील.

२. सर्प—पृथ्वीवर सापाची भीति मुळींच होणार नाहीं. गारुडी लोकांना अत्यंत सुख होईल. साप अनेक प्रकारांनीं मरतील.

३. भूत—भुताखेतांचा नायनाट होईल. जारणमारणादि करणाऱ्या मांत्रिकांची कार्यसिद्धि होणार नाहीं.

४. पक्षी—कोकिल व राजहंस हे पक्षी फार मरतील. पांखरें मारणाऱ्यांना वरचेवर पांखरांची शिकार सांपडेल.

५. पशु—जनावरांना फार पीडा होईल. जनावरें मारणाऱ्या लोकांना अतिशय सुख होईल. चांडालापासून राजाला पुष्कळ द्रव्य मिळेल.

६. हरण—अरण्यांत हरणें फार मरतील. कुत्र्यांना व फांसेपारध्यांना अत्यंत सुख होईल.

७. ब्राह्मण—दुष्ट लोकांपासून वैदिक लोकांना बहुत त्रास होईल. लबाड लोकांस फार सुख होईल.

८. क्षत्रिय—युद्धांत राजे मरण पावतील. मगध, कोसल व कैकय देशांतील राजांचें इतर राजे तेज हरण करतील.

९. वैश्य—सोनारांना राजापासून भीति उत्पन्न होईल. पृथ्वीवर वस्त्र, धान्य व द्रव्य विपुल होईल. पृथ्वीच्या पोटांतील द्रव्यें नाश पावतील.

१०. शूद्र—शूद्रांना राजापासून भय उत्पन्न होईल. जमिनीची नांगरणी चांगली न झाल्यामुळें, पाऊस जरी पुष्कळ पडला तरी, धान्य तुरळक होईल.

११. संकर—सर्व जातींना परस्परांपासून व राजापासून फार कष्ट होतील. मनुष्याला उत्तम स्थिति केव्हांही प्राप्त होणार नाहीं.

## १० वयोऽवस्था फलानि. सं. फ. दे.

यदि बालविधामुपयाति रविः स्तनपानकराः शिशवः सकलाः ॥
ग्रहभूतपिशाचभयं बहुलं जननीसहिता विभजंति सदा ॥ १ ॥
दिनमणिस्तु कुमारशरीरयुतः कृतचौलविधीन्व्रतबंधयुतान् ॥
बहुलेखनकक्रियमाणशिशून् परिपीडयतीह विवाह्यसुतान् ॥ २ ॥
यदि मुग्धतमोऽहिमभानुरतोंऽकुरितातुलयौवनशीलवधूः ॥
रमणः करजैरददंशनकैरभिहंति कुचेष्वधरेषु सुखात् ॥ ३ ॥
तरुणस्तरणिर्यदि भाति तदा तरुणी रमणी रमणैर्न रतिम् ॥
समुपैति वियोगवती नियतं सुखहासविलासकलानिपुणा ॥ ४ ॥
तरुणातिगकांतिशरीरयुतो दिनकृद्विदधाति रतातुरताः ॥
हृदयेशसमागमचित्तयुता युवतीर्विरहानलदग्धतनूः ॥ ५ ॥

अरुणो जरठो जरतीरनिशं नतनाभिविलंबिपयोधरकाः ॥
धृतगल्लकगर्तविरूपमुखा बहुदुःखयुताः प्रकरोति कृशाः ॥ ६ ॥

यदि वृद्धतमो दिननाथ इह प्रकरोति तदा पलितालकता ॥
भजतामतुला परिपीडनता न नताऽपि कदा दयिता च नृणाम् ॥ ७ ॥

यदि वंध्यपदं समुपेत इनः कुशलं समुपैति सुसंततिमान् ॥
सकलं विकलं बहुशोकयुतं भजते त्वनपत्यवती गृहिणी ॥ ८ ॥

अतिवंध्यसमाव्हयतामयते दिनपो रजसा रहिता युवतीः ॥
अथ धातुविहीननरानपि वा परिपीडयति प्रबलैरसुखैः ॥ ९ ॥

सुतलाभविलासयुतो द्युमणिः समुपैति मृतिं सुतकांक्षिणिका ॥
हरिवंशमुखान्सुविधीनपि वा शृणुयान्न सुतेच्छुरतो नियतम् ॥ १० ॥

यदि योगयुतोंऽबुजिनीदयितः प्रतिभाति तदा गिरिकंदरके ॥
निवसंति यथातथसंवृतृणैरुपजीविन ऐणिगृहाश्रयिणः ॥ ११ ॥

## वयाचीं फळें.

१. बाल—थानचीं सर्व मुलें व त्यांच्या आया यांना भुताखेतांचें भय फार होईल.

२. कुमार—ज्यांची शेंडी राखली आहे किंवा ज्यांची मुंज झाली आहे अशा मुलांना, फार लिहिणाऱ्या मुलांना व नवऱ्या मुलांना त्रास होईल.

३. मुग्ध—ज्यांच्यावर तारुण्याची झाक मारूं लागली आहे अशा स्त्रियांना त्यांचे नवरे, नखांनीं व दांतांनीं, स्तनावर व ओंठावर आनंदानें प्रहार करतील.

४. तरुण—आनंदानें बोलून हसून मनोरंजन करण्यांत कुशल अशा स्त्रीची तिच्या नवऱ्यापासून ताटातूट होऊन तिला नवऱ्याचें सुख मिळणार नाहीं

५. प्रौढ—आपल्या नवऱ्याशीं प्रेमपाशांनीं बद्ध होऊन त्याच्या भेटीविषयीं उत्कंठित झालेल्या व ज्यांच्या तारुण्यास उतरती कळा लागली आहे अशा स्त्रिया वियोगदुःखानें होरपळून जातील.

६. जरठ—ज्यांचे स्तन शिथिल पडून खोल बेंबीवर लोळत आहेत अशा व ज्यांच्या गालाला खळगे पडल्यामुळें बेरूप दिसणाऱ्या स्त्रियांना फार दुःखें होऊन त्या कृश होतील.

७. वृद्ध--ज्यांचे केस पांढरे झाले आहेत अशा लोकांना फार त्रास होईल. त्यांच्या बायका त्यांना केव्हांही नमून वागणार नाहींत.

८. वंध्य—ज्यांना मुलेंबाळें आहेत अशा लोकांना सुख होईल. ज्यांना मुलें नाहींत अशा स्त्रियांना फार दुःख होऊन सर्व जग उदासवाणें होईल.

९. अतिवंध्य--ज्यांचा विटाळ गेला आहे अशा बायकांना व ज्यांची शक्ति क्षीण झाली आहे अशा पुरुषांना मोठीं दुःखें होऊन फार पीडा होईल.

१०. सुतर्थी—मुलाची इच्छा करणाऱ्या बायका फार मरतील. याकरितां पुत्रार्थी लोकांनीं, हरिवंशश्रवणादि अनुष्ठानें जरी चांगलीं आहेत तरी तीं करूं नयेत.

११. योगी– झाडपाला खाऊन किंवा पाणी पिऊन निर्वाह करणारे, तसेंच हरणांच्या पारध्यांच्या झोंपडींत राहणारे लोक पर्वताच्या दरीखोरींत मोठ्या संकटानें राहतील.

## ११ अलंकारफलानि (भूषणफलानि). सं. फ. दे.

कलयतीह चेद्विद्रुमं रविर्जलधितीरभूवासिनो जनाः ॥
यत्नपीडिता यांति पंचतां भजति विद्रुमक्रयकृदेव हि ॥ १ ॥
यदि सुमौक्तिकं कंजबंधुना समवधार्यते प्राणनाशनम् ॥
भवति निश्चितं ताम्रपर्णिकातटनिवासिनां भूभुजामिह ॥ २ ॥
रजतमालिकालंकृतो रविर्दिशति पीडनं द्वीपवासिनाम् ॥
रजतविक्रयक्रयकृतां महद्रिपुभयं तथा चोरजं भयम् ॥ ३ ॥
यदि सुहीरकपीतिमान् रविः खलु तदाकरक्ष्माभृतां भयम् ॥
किल परीक्षका राजजं भयं जगति नित्यशः संभजंति च ॥ ४ ॥
यदि च मेदकं गोऽनुपूर्वकं कलयति प्रभादीपितांवरः ॥
भवति पीडनं तत्क्रयैषिणां किल तदाकरः स्वल्पसंचयः ॥ ५ ॥
अमलनीलभाक् भास्करो यदा किल तदुद्यमी पंचतामियात् ॥
बहुलमूल्यतानीलसंचयो हिमगिरेरुदग्भागतो भवेत् ॥ ६ ॥
कनकमुद्रिकामुद्रितांगुलिर्यदि दिवाकरः स्वर्णमूल्यता ॥
कुरुषु मानवा यांति पंचतां व्रजति पीडनं भाग्यभाग्जनः ॥ ७ ॥
यदि च सीसकालंकृतो रविर्भवति पीडनं द्वीपभूभुजाम् ॥
गुटिकया मृधे युद्धकारिणां भवति पीडनं शत्रुसंघतः ॥ ८ ॥

यदि भवेद्रविः कांस्यभूषितो बहुलमूल्यतां याति तद्‌ध्रुवम् ॥
तदुपजीविनां देहपीडनं बहुगदोद्भवं संभवेदिह ॥ ९ ॥
यदि दिवाकरस्ताम्रभूषितः किल तदाकरः स्वल्पतां व्रजेत् ॥
भवति पंचता पूर्ववासिनां विविधधातुना वित्तसंक्षयः ॥ १० ॥
अयसि चेद्रविः प्रीतिमान्भवेन्निगडशृंखला मूल्यमाप्नुयुः ॥
परशुपूर्वकान्यायुधानि ये दधति ते मृतिं यांति निश्चितम् ॥ ११ ॥

## भूषणांचीं फळें.

१. पोंवळें--समुद्रकिनाऱ्यावर राहणाऱ्या लोकांस यवनांपासून उपद्रव होऊन ते मरण पावतील. पोंवळीं विकणारे लोकही मरतील.

२. मोतीं--ताम्रपर्णी नदीच्या तीरावर राहणारे राजेलोक फार मरतील.

३. रुपें—बेटांत राहणाऱ्या लोकांना पीडा होईल. चांदी विकणाऱ्या व विकत घेणाऱ्या लोकांस चोरांपासून व शत्रूपासून फार त्रास होईल.

४. हिरा—ज्यांच्या राज्यांत हिऱ्याच्या खाणी आहेत अशा राजे लोकांना भीति उत्पन्न होईल. पृथ्वीवरील रत्नपारखी लोकांस राजापासून भय उद्भवेल.

५. गोमेद ( लसण्या )—गोमेद विकणाऱ्यांना त्रास होईल. गोमेदाच्या खाणींतून गोमेद थोडा निघेल.

६. नील--निळाचा व्यापार करणारे लोक फार मरतील. हिमालयाच्या उत्तरेस नीळ मण्याची किंमत फार वाढेल.

७. सोनें—सोनें महाग होईल. कुरु देशांतील लोकांत मृत्यु फार होतील. भाग्यशाली पुरुषांना पीडा होईल.

८. शिसें—बेटांतील राजे लोकांना त्रास होईल. लढाईंत गोळीबार झाडणाऱ्या लोकांना शत्रूपासून पीडा होईल.

९. कांसें—कांसें महाग होईल. कांशाचा व्यापार करून त्यावर निर्वाह करणाऱ्या लोकांस शारीरिक पीडा होईल व पुष्कळ आजार उद्भवतील.

१०. तांबें—खाणींतून तांबें थोडें निघेल. पूर्वेकडील लोकांत मृत्यु फार होतील. दुसऱ्या अनेक धातूंच्या व्यापारांत द्रव्याचा नाश होईल.

११. लोखंड—लोखंडी बेड्या व सांखळ्या महाग होतील. फरशी ( कुऱ्हाड ) वगैरे हत्यारें वापरणाऱ्या लोकांत मृत्यु फार होतील.

आतांपर्यंत संक्रमण ज्या वारीं व ज्या नक्षत्रीं होईल त्यांवरून संक्रांतीचीं नामें व त्या नामांचीं फळें, संक्रांतीच्या गमनदिशा व त्यामुळें होणारीं फळें, अवलोकन दिशा व त्यांचीं फळें याप्रमाणें प्रथम सांगून नंतर संक्रमण कालीं जें करण असतें त्यावरून संक्रांति देवी कोणतीं वाहनादिक धारण करिते व तीं धारण केलीं असतां कोणतीं फळें होतात हें विस्तारानें सांगण्यांत आलें. आतां संक्रमण कालीं असणाऱ्या योग, तिथि, पक्ष, संवत्सर वगैरेचीं फळें देतों.

## योगफलानि. सं. फ. दे.

सम्यक्फलेषु योगेषु निष्फलः संक्रमो रवेः ।
पुनस्तेष्वशुभेष्वेष शुभः शास्त्रविदां मतः ॥ १ ॥

अर्थ--संक्रमणकालीं शुभ योग असेल तर संक्रमणाचें कांहींच फळ नाहीं; पण अशुभ योग असेल तर संक्रमणाचें फळ चांगलें होईल असें शास्त्रज्ञांचें ह्मणणें आहे.

## तिथिफलानि. सं. फ. दे.

उद्वाहयात्राव्रतबंधदीक्षामहोत्सवादावतितत्पराणाम् ॥
सुखं भवेदल्पतरं नराणां नंदातिथौ चेद्रविसंक्रमः स्यात् ॥ १ ॥
क्षुधाभयं वन्हिभयं नराणां भद्रासु चेत्संक्रमणं खरांशोः ॥
यः स्वल्पसेनासहितो नृपालो रणे जयत्येव महामहीपम् ॥ २ ॥
परस्परं युद्धविधायिनः स्युर्नृपा विरोधादपनीतिभाजः ॥
बह्वन्नपूर्णा धरणी तदानीं यदा जयायां रविसंक्रमः स्यात् ॥ ३ ॥
गोधूमयावानलपूर्वकाणि भवंति धान्यानि बहूनि भूमौ ॥
महोत्सवानंदभरा जनास्तु रिक्तातिथौ चेद्रविसंक्रमः स्यात् ॥ ४ ॥
वारांगनानर्तकगीतविज्ञभूपालबालादिकसज्जनानाम् ॥
ज्वरक्षुधावन्हिमहीपभीतिः पूर्णातिथौ भास्करसंक्रमे स्यात् ॥ ५ ॥

## तिथींचीं फळें.

अर्थ – खालीं लिहिल्याप्रमाणें ज्या ज्या तिथींस संक्रमण झालें असतां त्या त्या तिथींपुढें लिहिल्याप्रमाणें फळें होतील.

१. नंदा ( १।६।११ ) – विवाह, यात्रा, मौंजीबंधन, दीक्षा वगैरे मंगळ कार्यें करण्यास अतिशय उद्युक्त झालेल्या लोकांना अगदीं थोडें सुख लागेल.

२. भद्रा ( २।७।१२ )––लोक भुकेनें व्याकुळ होतील. आगी फार लागतील. ज्याच्याजवळ थोडें सैन्य आहे असा राजा मोठ्या राजाला युद्धांत जिंकील.

३. जया ( ३।८।१३ )––राजे लोक आपआपसांत लढाई करतील व वांकडेपणामुळें अन्यायाच्या मार्गाचें अवलंबन करतील. पृथ्वीवर धान्य विपुल होईल.

४. रिक्ता ( ४।९।१४ )—गहूं, जोंधळे वगैरे धान्यें पृथ्वीवर पुष्कळ होतील. लोक मंगल कार्यें करण्याच्या आनंदांत गढून जातील.

५. पूर्णा ( ५।१०।१५।३० )––कलावंतिणी, नाचणारे व गाणारे लोक, राजे, लहान मुलें वगैरे चांगल्या लोकांना ताप, भूक, वित्तव व राजा यांपासून भय उत्पन्न होईल.

## पक्षफलम्. सं. फ. दे.

चोरपाखंडिदुर्बुद्धिव्याधपूर्वकदुर्जनान् ।
सदैव सुखयत्येषा संक्रांतिः कृष्णपक्षजा
सदैव पीडयत्येषा संक्रांतिः शुक्लपक्षजा ॥ १ ॥ पं. सा.

अर्थ––संक्रमण कृष्णपक्षांत होईल तर चोर, नास्तिक, दुष्ट वासनेचे लोक, पारधी, वगैरे नीच लोकांना निरंतर सुख होईल व शुक्लपक्षांत तें होईल तर वरील लोकांना निरंतर पीडा होईल.

## संवत्सरफलम्. सं. फ. दे.

अशुभे च शुभे चाब्दे संक्रांतिः स्याद्यदा रवेः ।।
असाधूनां च साधूनां तदातिसुखदा सदा ॥ १ ॥ पं. सा.

अर्थ – अशुभ संवत्सरांत संक्रमण झालें असतां दुष्टजनांना सर्वकाळ सुख होईल ( व सत्पुरुषांना त्रास होईल ); आणि शुभ संवत्सरांत संक्रमण झालें असतां सत्पुरुषांना सर्वकाळ फार सुख होईल ( व दुष्टजनांना त्रास होईल ).

## लग्नफलानि. सं. फ. दे.

विदेशवासं बहुदूरयानं वादं च भेदं परदारसेवाम् ॥
कुर्यात्सुखार्थी न कदाचिदेव चरे विलग्ने रविसंक्रमश्चेत् ॥ १ ॥

---

१ ' वित्तस्य ' असा पाठभेद आहे.

पूर्वापरश्लोकसमाहृता ये ये नित्ययात्रामतयः स्थिराश्च ॥
ते नातिदुःखा न च भूरिसौख्या द्विमूर्तिलग्ने रविसंक्रमश्चेत् ॥ २ ॥
ये क्षेत्रसंन्यासधरा मुनींद्रा ये भूमिवृत्त्यादिभुजः पृथिव्याम् ॥
सीदंति ते साकमनेकलोकैः स्थिरे विलग्ने रविसंक्रमश्चेत् ॥ ३ ॥

अर्थ — खालीं लिहिलेल्या लग्नीं संक्रमण झालें असतां त्या त्या पुढें लिहिलेलीं फलें जाणावीं.

१. चर ( मेष, कर्क, तूळ, मकर ) – परदेशांत राहणें, फार दूर जाणें, वादविवाद, फितुरी, दुसऱ्याच्या बायकोवर लक्ष ठेवणें या गोष्टी सुखाची इच्छा करणाऱ्या मनुष्यानें केव्हांही करूं नयेत.

२. द्विस्वभाव ( मिथुन, कन्या, धनु, मीन )--मागील व पुढील श्लोकांत सांगितलेले लोक ( सुखार्थी, क्षेत्रसंन्यास करणारे व स्थावर उत्पन्न असलेले लोक, ) व नेहमीं यात्रा करण्याची इच्छा करणारे लोक, व एकच ठिकाण धरून राहणारे लोक यांना अतिशय दुःख होणार नाहीं व फार सुखही होणार नाहीं.

३. स्थिर ( वृषभ, सिंह, वृश्चिक, कुंभ ) – क्षेत्रसंन्यास करून राहणारे ( एकच क्षेत्र धरून तेथें आमरण संन्यस्त वृत्तीनें राहणारे ), मुनींद्र ( श्रेष्ठर्षि ), अति मोठे लोक, ज्यांना पृथ्वीवर जमीनजुमला वगैरे स्थावर उत्पन्न आहे असे आपल्या अनेक परिवारासह दुःख पावतील.

## नक्षत्रफलानि.

## १ गोचरफलम्. सं. दे फ.

यस्मिन्दिने तु संक्रांतिस्तद्दिने सर्वखेटजम् ॥
गोचरं फलमालेख्यमेतद्राशिफलं स्मृतम् ॥ १ ॥

अर्थ— सूर्यसंक्रमणकालीं जें चांद्रनक्षत्र असेल त्यावरून कुंडली मांडून सर्व ग्रहांच्या स्थितीवरून फलाचा विचार करावा. यास राशीफल असें ह्मणतात.

## २ संक्रांतिहस्तस्थितफलविचारः

मेषालिकर्के च तथैव रक्तं चापे च मीने च तुले च पीतम् ॥
श्वेतं वृषे स्त्रीमिथुने च चंद्रे कृष्णं च नक्रे च घटे च सिंहे ॥ १ ॥

---

१ ' समुपस्थिताश्च ' असें पाठांतर आहे.

रक्ते फले भवेद्दुःखं श्वेते चैव सुखं शुभम् ॥
पीते श्रीस्तु तथा प्रोक्ता श्यामे मृत्युर्न संशयः ॥ २ ॥ मु. मा.

**अर्थ**—मेष, वृश्चिक, कर्क या राशींस संक्रमणकालीं चंद्र असेल तर संक्रांतिदेवी हातांत आरक्त (तांबुस) वर्णाचें फळ धरते, त्याचें फल प्रजेस दुःखप्राप्ति; धन, मीन, तूळ या राशींस पिवळ्या रंगाचें फळ धारण करिते, त्याचें फल लक्ष्मीप्राप्ति; वृषभ, कन्या, मिथुन या राशींस, शुभ्रवर्णाचें फल धारण करिते, त्याचें फल सुख, शुभप्राप्ति; मकर, कुंभ व सिंह या राशींस काळ्या रंगाचें फल असतें, त्याचें फळ मृत्यु. याप्रमाणें राशिपरत्वें फळें जाणावीं.

## चंद्रराशिफलम्.

यादृशेन हिमरश्मिमालिना संक्रमो भवति तिग्मरोचिषः ॥
तादृशं फलमवाप्नुयान्नरः साध्वसाध्वपि वशेन शीतगोः ॥ १ ॥ मु. मा.

**अर्थ** गोचरमध्यें स्थानपरत्वें चंद्राचीं जीं शुभाशुभ फलें सांगितलीं आहेत तीं शुभाशुभ फलें सूर्यसंक्रमणकालीन चंद्राच्या स्थितीवरून संक्रमणामुळें त्या राशीस सूर्य असेपर्यंत प्रत्येक मनुष्याला प्राप्त होतील. ह्मणजे तो चंद्र संक्रमणाच्यायोगानें मनुष्यास शुभाशुभ फल प्राप्त करून देईल.

## नक्षत्रवशान्मुहूर्तफलानि.

समं क्षिप्रकर्णत्रिपूर्वाधनिष्ठामघामित्रचित्रांत्यमूलाग्निचांद्रम् ॥
बृहद्धं विशाखाध्रुवादित्यमाहुर्जघन्यं शताहींद्रयाम्याशुगेशम् ॥ १ ॥
क्रमान्मुहूर्ताः खगुणाः ३० शराब्धय ४५ स्तिथ्यः १५ समादै रविसंक्रमे सति ।
समं समर्घं क्रमशोऽतिदुर्लभं । धान्यं वदेदित्थमपींदुदर्शने ॥ २ ॥ मु मा.

**अर्थ**—क्षिप्र नक्षत्रें ( = अश्विनी, पुष्य, हस्त, अभिजित् ), श्रवण, पूर्वात्रय (पूर्वा, पूर्वाषाढा, पूर्वाभाद्रपदा ), धनिष्ठा, मघा, अनुराधा, चित्रा, रेवती, मूळ, कृत्तिका आणि मृग यांस समसंज्ञा.

विशाखा, ध्रुवनक्षत्रें ( रोहिणी, उत्तरा, उत्तराषाढा, उत्तराभाद्रपदा ) व पुनर्वसु या नक्षत्रांस बृहत्संज्ञा.

शततारका, आश्लेषा, ज्येष्ठा, भरणी, स्वाती आणि आर्द्रा यांस जघन्यसंज्ञा.

याप्रमाणें १ सम ( समान ), २ बृहत् ( श्रेष्ठ ) व ३ जघन्य ( कनिष्ठ ) अशा ३ संज्ञा अहेत. यांचे ( सम, बृहत्, जघन्यसंज्ञक नक्षत्रांचे ) अनुक्रमें ३०,

४५,१५ असे मुहूर्त ( गुण ) आहेत, ते अनुक्रमानें वर निर्दिष्ट केलेल्या नक्षत्रीं संक्रमण झालें असतां धान्य, १ सम; २ स्वस्त व ३ महर्घ होतें. चंद्रदर्शनींही असेंच पाहून हींच फळें जाणावीं.

## नक्षत्रवशात्संक्रांतिफलम्. स. फ. दे.

पूर्वसंक्रांतिनक्षत्रात्परसंक्रांतिऋक्षकम् ।
द्वित्रिसंख्यं महर्घं स्याच्चतुःपंच महर्घता ॥ १ ॥ सं. सा. दे.
रवेः संक्रमर्क्षात्परसंक्रमर्क्षं द्वितीयं तृतीयं सुभिक्षं तदा स्यात् ।
महर्घं यदा पंचमं वा चतुर्थं भवेत्षष्ठमत्यंतदुर्भिक्षहेतुः ॥ २ ॥ मु. मा.

अर्थ--कोणतेंही सूर्यसंक्रमण ज्या नक्षत्रीं होईल त्यापासून दुसऱ्या किंवा तिसऱ्या नक्षत्रीं पुढचें संक्रमण होईल तर सुभिक्ष होईल; चवथ्या किंवा पांचव्या नक्षत्रीं होईल तर महर्घता ( महागाई ) होईल; व सहाव्या नक्षत्रीं होईल तर अत्यंत दुर्भिक्ष जाणावें.

## जन्मर्क्षवशात्संक्रांतिफलम्. सं. फ. दे.

संक्रांत्यधरनक्षत्राद्गणयेज्जन्मभावधि ।
त्रिकं षट्कं त्रिकं षट्कं त्रिकं षट्कं पुनः पुनः ।
पंथा भोगो व्यथा वस्त्रं हानिश्च विपुलं धनम् ॥ १ ॥

अर्थ—संक्रमणकालीं जें चांद्रनक्षत्र असेल त्याच्या पूर्वीच्या नक्षत्रापासून ३।६।३।६।३।६ असे भाग पाडून ज्या भागांत आपलें जन्मनक्षत्र असेल त्याप्रमाणें अनुक्रमानें १ पंथा ( गमन ), २ भोग ( सुख ), ३ व्यथा ( पीडा ), ४ वस्त्र ( वस्त्रप्राप्ति ); ५ हानि ( नाश ) व ६ विपुल धन ( बहुत द्रव्यप्राप्ति ) अशीं फलें जाणावीं.

## संक्रांतिकालीन जन्मर्क्षादिकफलानि. स. फ. दे.

यस्य जन्मभमासादौ रविसंक्रमणं भवेत् ।
तन्मासाभ्यंतरे तस्य वैरं क्लेशो धनक्षयः ॥ १ ॥

अर्थ--ज्याचे जन्मनक्षत्रीं संक्रमण होईल त्यास त्या महिन्यांत शत्रू पुष्कळ होतील. ज्याचे जन्ममहिन्यांत संक्रांति होईल त्यास त्या महिन्यांत क्लेश होतील. ज्याचे जन्मतिथीवर संक्रांति होईल त्याची त्या महिन्यांत द्रव्यहानि होईल.

## संक्रांतिवशाद्धान्यप्रमाणम्. सं. फ. दे.

संक्रांतिधिष्ण्यं तिथिवारमिश्रं धान्याक्षरैर्वन्हिविभाजितं च ।
रूपे समर्घं द्वितये समं च शून्ये महर्घं मुनयो वदंति ॥ १ ॥

**अर्थ**--संक्रमण ज्या चांद्रनक्षत्रीं होईल त्या नक्षत्राची संख्या, तिथि, वार व धान्याक्षरें यांनीं युक्त करून ३ नीं भागावें. बाकी १ उरेल तर तें धान्य सवंग होईल, बाकी २ राहील तर भाव समान राहील; आणि बाकी ० राहील तर तें धान्य महाग होईल.

## संक्रांतिपर्वकालाचा शास्त्रार्थ.

## मुहूर्तकल्पद्रुम.

संक्रांतौ वृषसिंहकौर्प्यकलशे घस्रेऽष्टिनाड्यः पुरा ।
द्वंद्वस्त्रीधनुरंडजेषु तु पराः पुण्यास्तथैवोदिताः ॥
मेषे तौलिनि दिङ्मिता उभयतस्त्रिंशत्तु पूर्वाः स्मृताः ।
कर्केत्यास्तु नखा मृगे द्विगुणिताः कैश्चित्स्मृताः सूरिभिः ॥

**अर्थ**—दिवसास वृषभ, सिंह, वृश्चिक आणि कुंभ ह्या चार राशींस सूर्यसंक्रांतिकालापासून पूर्वींच्या १६ घटका पुण्यकाल जाणावा. मिथुन, कन्या, धनु व मीन ह्या चार राशींस रविसंक्रांति झाल्यास संक्रांतिकालानंतर १६ घटका पुण्यकाल समजावा. मेष आणि तूळ या दोन राशींस संक्रांति झाली असतां संक्रांतिकालाच्या पूर्वीं पांच व नंतर पांच अशा १० घटका पुण्यकाल असतो. कर्क राशींस संक्रांति असल्यास पूर्वींच्या ३० घटका पुण्यकाल सांगितला आहे. मकर राशीस संक्रमण असेल तर संक्रांतिकालाच्यापुढें २० घटका पुण्यकाल जाणावा. ह्या संक्रांतीला ४० घटका पुण्यकाल असतो असें कांहीं पंडितांचें मत आहे.

## निर्णयसिंध्वनुसारी.

याप्युत्तरा पुण्यतमोदितेह सास्ताद्रवेः प्राग्यदि सापि पूर्वा ।
पूर्वा तु योक्ता यदि सोदयोर्ध्वं साप्युत्तरा रात्रिनिषेधतः स्यात् ॥

**अर्थ**—पूर्व श्लोकांत ज्या संक्रांतीचा पुण्यकाल नंतर सांगितला आहे ती संक्रांति जर सूर्याच्या अस्तकालापासून फार जवळ होईल, ह्मणजे संक्रांतिकालानंतर सूर्यास्ताच्यापूर्वीं संक्रांतिनिमित्तक कर्म करण्यापुरता काल नसेल, तर त्या संक्रांतीचा

पुण्यकाल पूर्वी धरावा. याप्रमाणेंच ज्या संक्रांतीचा पुण्यकाल पूर्वी सांगितला आहे ती संक्रांति जर सूर्याच्या उदयापासून फार जवळ होईल, ह्मणजे उदयाच्या आणि संक्रांतिकालाच्या मध्यें संक्रांतिनिमित्तक कर्म करण्यापुरता काल नसेल तर, त्या संक्रांतीचा पुण्यकाल पर धरावा. याचें कारण इतकेंच कीं, रात्रौ संक्रांतीचा पुण्यकाल करूं नये असा शास्त्रांत निषेध आहे. यास्तव दिवसासच पुण्यकाल धरला पाहिजे.

## मुहूर्तकल्पद्रुम.

अर्वाक्सा रजनीदलात्प्रथमकाऽन्होत्यं सुपुण्यं दलं ।
तस्माच्चेत्परतः परं दिनदलं पूर्णे निशीथे द्वयं ॥
अस्ताच्चेत्परतो मृगः परदलं सूर्योदयात्पूर्वतः ।
कर्कश्चेत्प्रथमोत्तरार्धमयने स्नानादि रात्रावपि ॥

अर्थ—जर सूर्यास्तानंतर अर्धरात्रीच्यापूर्वी संक्रांति होईल तर त्या दिवसाचें उत्तरार्ध पुण्यकाल जाणावा. अर्धरात्रीपुढें सूर्योदयाच्यापूर्वी संक्रांति झाल्यास उत्तर दिवसाचें पूर्वार्ध पुण्यकाल समजावा. बरोबर अर्धरात्री संक्रमण झालें असतां दोन्ही दिवस ह्मणजे पूर्व दिवसाचें उत्तरार्ध आणि उत्तर दिवसाचें पूर्वार्ध अशी दोन्ही पुण्यकाल असतो. मकरसंक्रांति सूर्यास्तानंतर सूर्योदयापर्यंत केव्हांही झाली तरी पर दिवसाचें पूर्वार्धच पुण्यकाल धरावा. याप्रमाणेंच कर्कसंक्रांत झाल्यास पूर्व दिवसाचें उत्तरार्धच पुण्यकाल जाणावा. कर्क आणि मकर ह्या दोन संक्रांति रात्रौ झाल्या असतां देशाचार असेल तर रात्रींही स्नानादिक करावें.

## स्फुट.

सिंधौ तु सर्वसंक्रांतौ देशाचारानुसारतः ।
रात्रावहनि वा कार्यं स्नानादीति निरूपितं ॥

अर्थ—निर्णयसिंधूमध्यें तर असें सांगितलें आहे कीं, देशाचाराच्या अनुसारें सर्व संक्रांतिकालीं, रात्रौ किंवा दिवसा स्नानादि कर्म करावें.

## रत्नमाला.

हरिपदं स्थिरभे रविसंक्रमो द्वितनुभे षडशीतिमुखं भवेत् ।
उदगपागयने मृगकर्किणोः क्रियतुलाधरयोर्विषुवं स्मृतं ॥

अर्थ – स्थिर राशीस ( वृषभ, सिंह, वृश्चिक आणि कुंभ ह्यांस ) जी सूर्याची संक्रांति, तिला विष्णुपद असें नांव आहे. द्विस्वभाव राशीस ( मिथुन, कन्या, धनु आणि मीन ह्यांस ) जी रविसंक्रांति तिला षडशीतिमुख असें नांव आहे. मकरास जी रविसंक्रांति तिला उत्तरायण, कर्कसंक्रांतीला दक्षिणायन, मेष आणि तुला या राशींस जी रविसंक्रांति तिला विषुव अशीं क्रमानें नावें आहेत.

## सायन संक्रांति पाहण्याचा प्रकार.

## मुहूर्तचिंतामणि.

तथायनांशाः खरसाहताश्च स्पष्टार्कगत्या विहृता दिनाद्यैः ।
मेषादितः प्राक्चलसंक्रमाः स्युर्दाने जपादौ बहुपुण्यदास्ते ॥

अर्थ--स्पष्टसंक्रांतिकालीं जे अयनांश असतील त्यांस साठांनीं गुणावें आणि स्पष्ट सूर्याच्या गतीनें तीन भाग घ्यावे. त्यांत जो प्रथम भाग ते दिवस, दुसरा भाग घटका, तिसरा भाग पळें असें जाणावें. स्पष्ट संक्रांतीच्या पूर्वीं तितके दिवस, घटका आणि पळें यांनीं ती ती सायन संक्रांति होते. त्या सायन संक्रांतीस चल संक्रांति असें नांव आहे. ती संक्रांति दान, जप, स्नान इत्यादि कर्म केल्यानें बहुत पुण्य देणारी आहे.

## सर्व संक्रांतीच्या पुण्यकालांत विशेष.

## रत्नमाला.

याम्यायने विष्णुपदे तथादौ दानायनंतं विषुवे तु मध्ये ।
वदंत्यतीते षडशीतिवक्त्रे महर्षयः खल्वयने च सौम्ये ॥

अर्थ – कर्क, वृषभ, सिंह, वृश्चिक आणि कुंभ ह्या पांच संक्रांतीच्या पुण्यकालांत जें कर्म करणें तें आरंभीं केलें असतां, मेष व तुळा ह्या दोन संक्रांतीच्या पुण्यकालांत जें कर्म करवयाचें तें मध्यभागीं केल्यास आणि मिथुन, कन्या, धनु, मीन व मकर या पांच संक्रांतींच्या पुण्यकालांत जें कर्म कर्तव्य असेल तें अंत्य भागीं केलें असतां अनंत फल प्राप्त होतें असें ऋषि ह्मणतात.

## मुहूर्तचिंतामणि.

संध्यात्रिनाडीप्रमितार्कबिंबादर्धोदितास्तादध ऊर्ध्वमत्र ।
चेद्याम्यसौम्ये अयने क्रमात्तः पुण्यौ तदानीं परपूर्वघस्रौ ॥

अर्थ—सूर्यबिंबाच्या अर्धोदयाहून पूर्वी ज्या तीन घटका त्यांस प्रातःसंध्या असें नांव आहे. त्या कालांत जर कर्कसंक्रांति होईल तर तिचा पुण्यकाल पर दिवशींच धरावा. सूर्यबिंबाच्या अर्धास्तानंतर ज्या तीन घटका त्यांस सायंसंध्या असें नांव आहे. त्या कालांत जर मकरसंक्रांति होईल तर तिचा पुण्यकाल पूर्व दिवशींच धरावा.

## निर्णयसिंधूमध्यें गर्ग.

यस्य जन्मर्क्षमासाद्य रविसंक्रमणं भवेत् ।
तन्मासाभ्यंतरे तस्य वैरक्लेशधनक्षयाः ॥
तगरसरोरुहपत्ररजनीसिद्धार्थलोध्रसंमिश्रैः ।
स्नानं जन्मर्क्षगते रविसंक्रमणे नृणां शुभदं ॥

अर्थ—ज्याच्या जन्मनक्षत्रावर रविसंक्रांति होईल त्या मनुष्यास त्या मासांमध्यें वैर, क्लेश आणि धनक्षय हे प्राप्त होतात. जन्मनक्षत्रावर संक्रांति झाली असतां तगर पुष्प, कमलपत्र, हळद, पांढऱ्या मोहऱ्या आणि लोध्र पुष्प ह्या पांच द्रव्यांनीं मिश्रित केलेल्या उदकानें स्नान केलें असतां शुभफळ प्राप्त होतें.

## हेमाद्रि आणि माधव यांत जैमिनी.

नक्षत्रराश्योरविसंक्रमे स्युरर्वाक्परत्रापि रसेंदुनाड्यः ।
पुण्यास्तथेंदोस्त्रिधरापलैर्युगेकैव नाडी मुनिभिः शुभोक्ता ॥ १ ॥
नाड्यश्चतस्रः सपलाः कुजस्य बुधस्य तिस्रो मनवः पलानि ।
सार्धाश्चतस्रः पलसप्तयुक्ता गुरोश्च शुक्रे सपलाश्चतस्रः ॥ २ ॥
द्विर्नागनाड्यः पलसप्तयुक्ताः शनैश्चरस्याभिहिताः सुपुण्याः ।
आद्यंतमध्ये जपहोमदानं कुर्वन्नवाप्नोति सुरेंद्रधाम ॥ ३ ॥

अर्थ—नक्षत्र आणि राशी यांवर रवीची संक्रांति झाली असतां पूर्वी १६ व पुढें १६ घटका पुण्यकाल असतो. तशीच चंद्राची संक्रांति झाल्यास १ घटका आणि १३ पळें पुण्यकाल मागें पुढें जाणावा. तद्वत् मंगळाच्या संक्रांतीपासून घ. ४ प. १ पुण्यकाल समजावा. त्याप्रमाणेंच बुधाच्या संक्रांतीपासून ३ घटका १४ पळें पुण्यकाल असतो. तसाच गुरूच्या संक्रांतीपासून ४ घटका ३७ पळें पुण्यकाल धरावा. तद्वत् शुक्राच्या संक्रांतीपासून ४ घटिका १ पल पुण्यकाल जाणावा. त्याप्रमाणेंच शनीच्या संक्रांतीपासून १६ घटका ७ पळें पुण्यकाल समजावा. हे

पुण्यकाल अगोदर आणि पुढें सर्वांचे समजावे. या पुण्यकालांत आदौ किंवा मध्यें अथवा अंतीं जप, होम आणि दान हीं कर्में करणारास इंद्रलोक प्राप्त होतो.

## मार्तंड.

ऊर्ध्वं द्व्यात्ममृगेऽर्कसंक्रमणतः पूर्वं स्थिरे कर्कटे ।
जूकाजोभयतः खरामघटिकाः पुण्या मृगे दिग्युताः ॥
कर्काजांत्यवृषैणसूर्यचलनं निश्यन्यभं सद्दिवा ।
सूर्यारार्किदिने तृतीयकरणे प्रांत्येष्टभे दुःखदं ॥ १ ॥

**अर्थ**—मिथुन, कन्या, धनु, मीन, मकर या संक्रांतींपासून पुढें ३० घटी पुण्यकाल. वृषभ, सिंह, वृश्चिक, कुंभ, कर्क या संक्रांतींपासून पूर्वी ३० घटी पुण्यकाल. तूळ, मेष या संक्रांतींपासून पूर्वीं १५ व पुढें १५ असा ३० घटी पुण्यकाल. मकर संक्रांतीपासून पूर्वोक्त ३० व अधीक १० अशा ४० घटी पुढें पुण्यकाल होय. कर्क, मीन, मेष, वृषभ, मकर या संक्रांती रात्रीस झाल्या असतां शुभ होत. अन्य संक्रांति दिवसास झाल्या असतां शुभ होत. रवि, भौम, शनि या वारीं; कौलव, किंस्तुघ्न, शकुनि या करणांवर संक्रांती झाल्या असतां दुःखद (अशुभ) होत.

## पीयूषधारास्थ नारदायनुसारी.

राश्यंतरोपप्लवभादिभात्रिभे स्वभे निरुक्तं गमनं ततोंगभे ।
सुखं त्रिभे पीडनमंगभेशुकं त्रिभेऽर्थहानी रसभे धनागमः ॥

**अर्थ**—संक्रांति आणि ग्रहण यांच्या नक्षत्राच्या पूर्वीचें जें नक्षत्र, त्यापासून तीन नक्षत्रांत ज्याचें जन्मनक्षत्र असेल त्याला, प्रवास. पुढें सहा नक्षत्रांत असल्यास सुखप्राप्ति. नंतर तीन नक्षत्रांत असतां पीडा. पुढें सहा नक्षत्रांत असेल तर वस्त्रप्राप्ति. नंतर तीन नक्षत्रांत असतां धननाश. पुढें सहा नक्षत्रांमध्यें असतां धनलाभ अशीं फळें क्रमानें होतात. रविप्रमाणें सर्व ग्रहांच्या संक्रांतिघटिका त्याज्य करणें.

## मुहूर्तमाला.

संक्रांतिघटिकास्त्याज्याः सूर्यादीनामनुक्रमात् ।
दंता द्वे नव षण्नागवसवो नव खाष्टयः ॥

अर्थ—सूर्याप्रमाणें इतर ग्रहांच्या संक्रांतीच्या घटका रवि ३२, चंद्र २, भौम ९, बुध ६, गुरु ८, शुक्र ८, शनि ९, राहू १६० आणि केतू १६० याप्रमाणें घटिका टाकाव्या.

## करीचे दिवस.

पंचकं ग्रहणहोलिकायनं प्रेतदाहविधिभाऊकादिनं ।
तत्परं च करिसंज्ञकं दिनं गर्हितं सकलकर्मसूभयं ॥

अर्थ—ग्रहण, होलिका, अयन, प्रेतदाहविधिदिन, भाऊकादिन, या पांच दिवसांच्या दुसरे दिवशीं करिसंज्ञा आहेत. सर्व कर्माविषयीं पूर्व दिवस आणि कर हे दोन दिवस निंद्य समजून वर्ज्य करावे.

## कर्कसंक्रांतीच्या विंशोपकावरून शुभाशुभ फल.

वृष्टेविंशोपकाः कर्कसंक्रमेर्कादिवारतः ।
दिङ्नखाष्टार्कधृत्यष्टा दशपंचाधिकाः शुभाः ॥

अर्थ--रविवारापासून ज्या वारीं कर्कसंक्रांति होते त्यावरून वृष्टिविषयीं शुभाशुभ जाणण्याचा प्रकार रवि १०, चंद्र २०, मंगळ ८, बुध १२, गुरु १८, शुक्र १९, शनि ५ असे क्रमानें विंशोपक जाणावे. विंशोपक १० पेक्षां अधिक असतील तर शुभ, १० पेक्षां न्यून असेल तर अशुभ जाणावे.

## दानविधि.

यः कांस्यपात्रे कनकार्कबिंबं तिलाज्यपूर्णे विधिवत्प्रपूज्य ।
सदक्षिणं वेदविदे प्रदद्यात्संक्रांतिकाले स लभेदभीष्टम् ॥ १ ॥

अर्थ--काशाचें भांडें तीळ व तूप यानीं भरून त्यावर सोन्याची सूर्यप्रतिमा ठेवून यथाशास्त्र तिची पूजा करून ती संक्रमणाचे पर्वकालांत विद्वान् ब्राह्मणाला दान द्यावी व वर दक्षणाही द्यावी. असें केलें असतां इष्टकामसिद्धि होते.

सुवर्णनिर्मितं नागं रौप्यबिंबोपरिस्थितम् ।
रवेः संक्रमणे दद्यादर्कत्रेधोपशांतये ॥ २ ॥

अर्थ--सूर्य एका राशींतून दुसऱ्या राशींत जातो त्या पुण्यकालीं चांदीचें वर्तुलाकार पीठ करून त्यावर सोन्याचा नाग करून बसवावा व तो दान द्यावा.

तिलोपरि लिखेच्चक्रं त्रिकोणं च त्रिशूलकम् ।
तत्र हेम विनिक्षिप्य दद्याद्दोषापनुत्तये ॥ ३ ॥

अर्थ--तिळावर एक वर्तुळ काढावें व त्यांत एक त्रिकोण बसवावा व त्या त्रिकोणांत एक त्रिशूळ काढून त्यावर सोनें ठेवून तें दान द्यावें म्हणजे सर्व दोष नाहींसे होतात.

सुवर्णं रतिकामात्रं मेरुतुल्यं च तद्भवेत् ।
यत्र दत्तं वेदविद्भ्यो मकरार्कप्रवेशने ॥ ४ ॥

अर्थ—मकरसंक्रमणपर्वकालीं वेद जाणणाऱ्या लोकांस फक्त एक रति (अडीच गुंजा) भार सोनें दिलें असतां अन्यकालीं मेरुपर्वताइतकें सोनें दिल्याचें पुण्य लागतें.

धेनुं तिलमयीं राजन् दद्याद्यश्चोत्तरायणे ।
सर्वान्कामानवाप्नोति विंदते परमं सुखम् ॥ ५ ॥ स्कांदे.

अर्थ--मकरसंक्रमणपर्वकालीं तिळाची गाय करून तें गोप्रदान करावें. म्हणजें सर्व इच्छा पूर्ण होऊन अतिशय सुख मिळेल असें स्कंदपुराणांत सांगितलें आहे.

उत्तरे त्वयने विप्रे वस्त्रदानं महाफलम् ।
तिलरूपमनड्वाहं दत्वा रोगैः प्रमुच्यते ॥ ६ ॥ विष्णुधर्मे.

अर्थ—उत्तरायण निघतें त्यावेळीं ब्राह्मणास वस्त्र दिलें असतां मोठें पुण्य लागतें व तिळांचा बैल करून तो दान दिला असतां रोगांपासून मुक्तता होते.

तस्यां कृष्णतिलैः स्नानं कार्यं चोद्वर्तनं सितैः ।
तिलोच्चयाश्च विप्रेभ्यः सर्वदैवोत्तरायणे ॥
तिलतैलेन दीपाश्च देया विप्रगृहे शुभाः ॥ ७ ॥ शिवरहस्ये.

अर्थ--मकरसंक्रमणपर्वकालीं आंघोळीच्या पाण्यांत काळे तीळ टाकून त्या पाण्यानें आंघोळ करावी, पांढरे तीळ वाटून अंगास लावावेत व तिळाचे ढीग ब्राह्मणास दान द्यावेत. तिळाच्या तेलाचे दिवे ब्राह्मणांच्या घरांत नेऊन द्यावेत म्हणजे कल्याणप्रद आहे.

## कालिकापुराणे.

होमं तिलैः प्रकुर्वीत सर्वदैवोत्तरायणे ।
तान्वै देवाय विप्रेभ्यो हाटकेन समं दिशेत् ॥
उत्तरायणमासाद्य नरस्तस्मान्न शोचति ॥ ८ ॥

अर्थ--उत्तरायण निघतें त्यावेळीं तिळांचा होम कराचा व सुवर्णासहित तीळ देवांस व ब्राह्मणांस समर्पण करावेत. असें केलें असतां मनुष्याला दुःख प्राप्त होत नाहीं.

तिलस्नायी तिलोद्वर्ती तिलहोमी तिलोदकी ॥
तिलभुक् तिलदाता च षट्तिलाः पापनाशनाः ॥ ९ ॥

अर्थ--वर सांगितल्याप्रमाणें १ तिळांनीं स्नान करावें. २ तीळ अंगास लावावेत. ३ तिळांचा होम करावा. ४ तिळांनीं पितृतर्पण करावें. ५ तीळ दान द्यावेत व ६ तीळ भक्षण करावेत. याप्रमाणें ६ प्रकारांनीं तिळांचा उपयोग केला असतां पापक्षय होतो.

यस्मिन् दिने तु दैवज्ञः श्रावयेत्पर्व पुण्यदम् ॥
तद्दिनं पर्व विज्ञेयं स्नानदानादिकर्मसु ॥ १० ॥

अर्थ--मकरसंक्रमणाचा पर्वकाल केव्हां आहे हें ज्योतिष्यांस विचारून घ्यावें व त्या पुण्यकालांत स्नान, दान वगैरे क्रिया कराव्यात.

दैवज्ञः पूजितो येन ग्रहास्तेन प्रपूजिताः ॥
विशेषाद्ग्रहराजोऽर्कस्तुष्टिं याति न संशयः ॥ ११ ॥

अर्थ--ज्योतिष्याची जो पूजा करितो त्यास सर्व ग्रहांची पूजा केल्याचें श्रेय प्राप्त होतें; विशेषेंकरून सर्व ग्रहांचा राजा सूर्य संतुष्ट होतो यांत संशय नाहीं.

इतीदं संक्रमफलं तस्मात्प्राक् परतोऽपि वा ॥
शृणुयात्पुत्रपौत्राढ्यो मोदते स चिरं भुवि ॥ १२ ॥

अर्थ--याप्रमाणें हें संक्रमणफल संक्रमणपर्वकालीं, त्यापूर्वीं किंवा त्यानंतर देखील जो मनुष्य श्रवण करील तो पुत्रपौत्रांनीं युक्त होऊन पृथ्वीवर चिरकाल आनंदानें राहील.

नागेशदैवज्ञसुतः शिवः समकरोदिदम् ॥
अकोटग्रामसंस्थेन दैवज्योतिर्विदार्थितः ॥ १३ ॥

अर्थ--अकोट नांवाच्या गांवांत राहणाऱ्या ज्योतिष्यांच्या विनंतीवरून नागेश दैवज्ञाच्या शिवनामक पुत्रानें हा ग्रंथ केला.

**१ संक्रांतिसंज्ञाः २ संक्रांतिकालीनवारतोऽधिपविचारः ॥**

विषुवं तौल्यजे विष्णु-पदं कुंभालिगे हरौ ॥
धनुःकन्यानृयुङ्मीने षडशीतिमुखं रवौ ॥ १ ॥ मु मा.
मेषप्रवेशः किल भास्करस्य यस्मिन्दिने स्यात्सतु राजमंत्री ॥
कर्कप्रवेशे दिनपः स उक्तः सस्याधिनाथो मुनिभिः पुराणैः ॥ २ ॥
आर्द्राप्रवेशे दिननाथ उक्तो मेघाधिपः प्राक्तनविप्रवर्यैः ॥
तुलाप्रवेशेऽहनि यस्य वारो रसाधिपोऽयं मुनिभिः प्रदिष्टः ॥
चापप्रवेशे दिवसाधिनाथो धान्याधिपो वै कथितो मुनींद्रैः ॥ ३ ॥
चैत्रादिमेषहरिकर्कटचापयुग्मरौद्रर्क्षतौलिमकरेषु च वासरेशाः ॥
वर्षेशमंत्रिभटनायकसस्यनाथधान्यार्घमेघरसनीरसपाः क्रमात्स्युः ॥ ४ ॥

मेषप्राप्ते रवौ मंत्री कोशपो वृषसंक्रमे ॥
मिथुने च भवेद्युद्धं कर्कटे पूर्वसस्यपः ॥ ५ ॥
सिंहे सेनाधिपश्चैव कन्या छत्रे प्रजायते ॥
तुलायां रसपश्चैव वृश्चिके परसस्यपः ॥ ६ ॥[1]
धनुर्धान्याधिपश्चैव मकरे नीरसाधिपः ॥
कुंभे व्यापारपश्चैव मीने च व्यवहारपः ॥ ७ ॥ रा०
किंस्तुघ्नकरणे राजा मेषे मंत्री तथैव च ॥
आर्द्रायामथ मेघेशो सस्यं कर्कोटके तथा ॥ ८ ॥
तुले रसाधिपो ज्ञेयो धनुर्धान्याधिपो भवेत् ॥
अर्यम्णर्क्षे फलाधीशो तृणाधीशः करे तथा ॥ ९ ॥
इंद्राग्न्यर्क्षे तु काष्ठेशः कन्यायां गणकस्तथा ॥
अलिःस्वर्णपरीक्ष्ये तु स्थूलग्रामे झषाधिपः ॥ १० ॥
सूक्ष्मग्रामो घटे चैव कृत्तिका त्वायसस्य च ॥
अंत्यसस्याधिपस्त्वाष्ट्रे अग्रधान्यं च कर्कटे ॥ ११ ॥
अंत्यधान्याधिपो मैत्रे द्वंद्वे त्वर्घाधिपो भवेत् ॥
महर्वे जलऋक्षेशः क्रमाद्वै ह्यधिपाः स्मृताः ॥ १२ ॥

---

१ प्रतापशश्च वृश्चिके । असा पाठभेद आहे.

अश्वो गजपशूदेवनरद्रव्याणि वस्त्रकम् ॥
रत्नस्त्रीवृक्षसर्पाश्च मृगमांगल्यमेव च ॥ १३ ॥
पूर्वाषाढादिनक्षत्रेष्वश्वाद्याः स्वामिनस्तथा ॥
प्रतिवर्षे तथाज्ञेयास्तेभ्यः साधुफलं त्वसत् ॥ १४ ॥ रा०
चैत्रादिमेषचापार्द्रातुलाकर्कटकेषु च ॥
नृपो मंत्री धान्यमेघरससस्याधिपाः क्रमात् ॥ १५ ॥ क०
अत्रोक्तो मंत्र्यादिक्रमो नर्मदोत्तरदेशस्थानां संमतः
तत्र केचिज्जगन्मोहनक्रममनुसरंति स यथा—
चैत्रादिमेषादिकुलीरतौलिमृगादिवाराधिपतिः क्रमेण ॥
राजा च मंत्री ह्यथ सस्यनाथो रसाधिपो नीरसनायकश्च ॥ १६ ॥
आर्द्रादिनाथो घननायकः स्याद्धान्याधिपश्चापदिनादिवारः ॥
दाक्षिणात्यानां तु ज्योतिःफलोदयादेव क्रमोऽभिमतः स यथा
चैत्रादिमेषकर्कार्द्रातुलाकार्मुकचसराः ॥
नृपो मंत्री धान्यमेघरससस्याधिपाः क्रमात् ॥ १७ ॥
एवं स्वदेशतो व्यवस्था ज्ञेया ॥ क०

## अत्र शास्त्रार्थः

यदा सूर्यस्य संक्रांतिरर्धरात्रात्परा भवेत् ॥
तदोर्ध्ववारपो ग्राह्यो मंत्रिसस्यरसाधिपाः ॥ १ ॥ रा०

खालील कोष्टकांत दिल्याप्रमाणें सूर्यसंक्रमणाच्या संज्ञा असून तें तें संक्रमण ज्या ज्या ग्रहाच्या वारीं होईल तो ग्रह चवथ्या कालमांत दिल्याप्रमाणें अधिप होतो. नक्षत्र-प्रवेशावरूनहीं कित्येक अधिप ठरतात ते सातव्या कालमांत दिले आहेत.

आतां हें रविसंक्रमण मध्यरात्रीचे पुढें होईल तर पुढील वाराचा अधिप घ्यावा असें राजावलींत सांगितलें आहे ; परंतु पंचांगांत याप्रमाणें लिहीत नाहींत.

चैत्र शुद्ध प्रतिपदेला ज्याचा वार तो ग्रह त्या वर्षाचा राजा असें मागें सांगि-तलेंच आहे.

खालील अधिपतींपैकीं बहुतेकांचीं फळें राजाच्या फलाबरोबर पुढें दिलीं आहेत.

अर्थ—कोष्टकरूपानें दिला आहे.

| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
|---|---|---|---|---|---|---|
| अ० नं० | राशी. | संक्रांतिसंज्ञा. | संक्रांतिवार परत्वें अधिप | मतभेद. | नक्षत्रें. | नक्षत्रप्रवेशावरून अधिप व मतभेदाचे अधिप. |
| १ | मेष. | विषुव. | मंत्री |  | अश्विनी, भरणी. | क्रोश (सर्वेश) मृगाधीश (वृक्षेश) मांगल्याधीश, [ अग्रसस्येश ] |
| २ | वृषभ | विष्णुपद. | कोशेश. | ( क्रोधेश. ) | कृत्तिका, रोहिणी. | मृगेश, [ लोहेश, सर्पेश. ] |
| ३ | मिथुन. | षडशीतिमुख. | युद्धेश | ( अर्घेश, अग्रधान्येश. ) | मृग, आर्द्रा. | मांगल्येश, मेघेश. |
| ४ | कर्क. | ( अयन ) दक्षिणायन. | सस्येश. | पूर्वधान्येश, अग्रधान्येश. ) |  |  |
| ५ | सिंह. | विष्णुपद. | सेनेश. | ( दुर्गेश. ) | उत्तरा, हस्त. | फलेश, तृणाधीश. |
| ६ | कन्या. | षडशीतिमुख. | छत्रेश. | ( गणकेश. ) | चित्रा, विशाखा. | अंत्यसस्याधिप काष्ठेश. |
| ७ | तूळ. | विषुव. | रसेश. |  | अनुराधा, ज्येष्ठा | अंत्यधान्याधिप काष्ठेश. |
| ८ | वृश्चिक. | विष्णुपद. | पश्चाद्धान्येश | (श्वतापेश, स्वर्णपरीक्षेश.) | पूर्वाषाढा, उत्तराषाढा. | महर्षेश ( अश्वेश ) गजेश. |
| ९ | धनु. | षडशीतिमुख. | धान्येश. | ( मध्यधान्येश. ) | श्रवण, धनिष्ठा. | पक्षेश, देवेश, ( व्याधीश) |
| १० | मकर. | ( अयन ) उदगयन. | नीरसेश. |  | शततारका. पूर्वाभाद्रपदा. | नरेश [ वस्त्रेश ] द्रव्येश [ रत्नेश ] |
| ११ | कुंभ | विष्णुपद. | व्यापारेश. | ( सूक्ष्मग्रामेश. ) | उत्तराभाद्रपदा. | वस्त्रेश ( स्त्र्याधीश. ) |
| १२ | मीन. | षडशीतिमुख. | व्यवहारेश. | ( स्थूलग्रामेश. ) | रेवती. | रत्नेश ( वृक्षेश. ) |

## वर्षप्रतिपद्दिनकृत्यम्.

तैलाभ्यंगं स्नानमादौ च कृत्वा पीयूषोत्थं पारिभद्रस्य पत्रम् ॥
भक्षेत्सौख्यं मानवो व्याधिनाशं विद्यायुःश्रीर्लभ्यते वर्षमूले ॥ १ ॥ क०

अर्थ--वर्षारंभीं अगोदर तेल लावून मंगलस्नान करावें. नंतर अमृतापासून उत्पन्न झालेला जो निंबवृक्ष त्याचीं पानें खावींत. असें केलें असतां मनुष्याचे सर्व रोग नाहींसे होऊन सुख, विद्या, आयुष्य व लक्ष्मी हीं प्राप्त होतात.

सरस्वतीं च दैवज्ञं पूजयित्वा विनायकम् ॥
दैवज्ञमुखतो भक्त्या शृणु वर्षफलं मुदा ॥ २ ॥

तात्पर्य—गणपति, सरस्वती व ज्योतिषी यांची पूजा करून ज्योतिष्याचें तोंडून आनंदानें वर्षफल ऐकावें.

नंदाया उदयेऽभ्यंगं नार्या नीराजनं ततः ॥
सुवेषसत्कथागीतैर्दानैश्च दिवसं नयेत् ॥ ३ ॥

अर्थ—प्रतिपदेदिवशीं प्रातःकालीं मंगलस्नान करावें. नंतर स्त्रियांकडून ओवाळून घ्यावें. चांगला पोषाख करावा. मनोरंजक गोष्टी व गाणें, बजावणें व दानें यांहींकरून हा दिवस घालवावा.

पंचागस्थं गणेशं द्विजगणकयुतं पूजयित्वाऽर्थिवृंदं ॥
संतोष्यानेकदानैः परमसुखयुतो भोजयित्वान्नमिष्टम् ॥
शृण्वन् गीतानि वाद्यानि च विविधकथास्तद्दिनं संक्रमेत ॥
क्रीडन् स्त्रीभिश्च सार्धं निशि रहसि नरो यावदब्दं सुखीस्यात् ॥ ४ ॥ क.

अर्थ---पंचांगावर काढलेल्या गणपतीची, ब्राह्मण व ज्योतिषी यांची पूजा करावी. याचकवर्गाला पुष्कळ दानें देऊन संतुष्ट करावें व मोठ्या आनंदानें त्यांना आवडते पदार्थ जेवूं घालावेत. गाणेंबजावणें ऐकत व निरनिराळ्या गोष्टी सांगत तो दिवस मोठ्या आनंदानें घालवावा. रात्रीं एकांतांत आपल्या बायकोबरोबर खेळून रात्र घालवावी. असें केलें असतां वर्षभर मनुष्यास सुख प्राप्त होतें.

प्राप्ते नूतनवत्सरे प्रतिगृहं कुर्यात् ध्वजारोपणं ॥
स्नानं मंगलमाचरेद्द्विजवरैः सार्धं सुपूजोत्सवम् ॥

---

१ निंबपत्र भक्षणाचा विधि पुढें दिला आहे.

२ 'परिगृहं' असा पाठभेद आहे. अर्थ—घराभोंवती.

३ कुर्यान्मनोवांछितं ॥ ग्राह्या रौप्यसुवर्णरत्नमणयो वृध्दादिभिः पूजये ॥

देवानां गुरुयोषितां च शिशवोऽलंकारवस्त्रादिभिः ।।
सम्पूज्यो गणकः फलं च श्रुणुयात्तस्माच्च लाभप्रदम् ।। ५ ।। क०

**अर्थ**--संवत्सरप्रतिपदेला नव्या वर्षास आरंभ होतो, म्हणून घरोघरीं गुढ्या उभ्या कराव्यात ब्राह्मणांना बरोबर घेऊन मंगलस्नान करावें. सोपस्कर देवतार्चन करावें. गुरु आणि वडील पुरुष व स्त्रिया यांचा सन्मान करावा. लहान मुलांना नवे दागिने व नवे कपडे घालावेत. ज्योतिष्याची पूजा करून त्याजपासून वर्षफल ऐकावें. असें केलें असतां आगामि वर्षांत पुष्कळ लाभ होतो.

यश्चैत्रशुक्लप्रतिपत्सु धीमान् श्रृणोति वार्षीयफलं पवित्रम् ।
भवेद्धनाढ्यो बहुसस्यभोगी जहाति पीडां तनुजां च वार्षिकीम् ।। ६ ।। क०

**अर्थ** -- जो बुद्धिमान् मनुष्य दर वर्षाच्या चैत्र शुद्ध प्रतिपदेस पुनीत करणारें वर्षफल ऐकतो तो द्रव्यवान् होतो व पुष्कळ धान्याचा उपभोग घेणारा असा होतो-- म्हणजे त्याला धनधान्यसमृद्धि प्राप्त होते व वर्षभर त्याला शरीरपीडा होत नाहीं.

चैत्रे पुण्यमये वसंतसमये रम्यां प्रतीं नूतनां ।।
नित्यं यः श्रृणुयादघौघशमनीमायुर्यशःश्रीकरीम् ।।
वेधा विष्णुहरौ रविः शशिकुजौ सौम्यो गुरुर्भार्गवः ।।
पंगू राहुरुमारमातनुभवो रक्षंति तं सर्वदा ।। ७ ।। क०

**अर्थ** -- वसंतकालांतला पवित्र असा जो चैत्रमहिना त्याचे ठिकाणीं आनंद देणारी व सर्व पापसमुच्चयाचा नाश करणारी व आयुष्य, कीर्ति व लक्ष्मी यातें देणारी जी नवीन प्रतिपदा -- म्ह० संवत्सरप्रतिपदा -- तिचें जो मनुष्य श्रवण करील -- म्हणजे ती प्राप्त झाली असतां पंचांगस्थ वर्षफल ऐकून तिथिश्रवण करील त्याचें ब्रह्मा, विष्णु शंकर, सूर्य, चंद्र, मंगळ, बुध, बृहस्पति, शुक्र, शनि, राहु, पार्वती, लक्ष्मी व कामदेव हे सर्वकाळ रक्षण करितात.

चैत्रे पुण्यमये वसंतसमये नव्यं फलं वार्षिकम् ।।
नित्यं यः श्रृणुयादघौघदलनं चायुर्यशःश्रीकरम् ।।

---

चक्रोतव्यं द्विजवर्य भाषितफलं श्रेयस्करं पुण्यदम् ।। क०

असा पाठभेद आहे. त्याचा **अर्थ**--आपणास आवडत्या गोष्टी कराव्यात. वडील मनुष्यांना सोनें, रुपें, रत्नें व मणि द्यावेत. सत्पात्र ब्राह्मणाची पूजा करून त्याजपासून पुण्यकारक व कल्याणदायक वर्षफल ऐकावें.

वेधा विष्णुहरौ रवींदुमहिजाः सौम्यो गुरुर्भार्गवो ॥
मंदोगुः सशिखिश्च शत्रुदलनं कुर्वंतु सर्वे ग्रहाः ॥ ८ ॥

अर्थ—वरील श्लोकाचाच समानार्थक हा श्लोक आहे. फक्त फल मात्र 'शत्रूंचें निर्दलन करतील' असें आहे.

ये चैत्रशुक्लप्रतिपत्तिथौ फलं शृण्वंति भक्त्या प्रतिवार्षिकं नराः ॥
ते दुःखरोगादिदरिद्रवर्जिता नंदंति लोका धनधान्यसंकुलाः ॥ ९ ॥

अर्थ—चैत्र शुद्ध प्रतिपदेचे दिवशीं भक्तियुक्त अंतःकरणानें जे लोक वर्षफल श्रवण करतील त्यांना दुःख, रोग, दारिद्र्य वगैरेची पीडा होणार नाहीं व त्यांच्या. जवळ धनधान्य विपुल होऊन ते आनंदानें राहतील.

यो यादृशेन भावेन तिष्ठत्यस्यां युधिष्ठिर ॥
हर्षदैन्यादिरूपेण तत्तद्वर्षे प्रयाति हि ॥ १० ॥

अर्थ - या दिवशीं आपली जी मनोवृत्ति ठेवावी तीच वर्षभर कायम टिकते. म्हणजे तो दिवस आपण खिन्नतेंत घालविला तर वर्षभर खिन्नताच प्राप्त होते व आनंदानें घालविला तर वर्षभर आनंदच प्राप्त होतो.

पारिभद्रस्य पत्राणि कोमलानि विशेषतः ॥
सपुष्पाणि समानीय चूर्णं कृत्वा विधानतः ॥ ११ ॥
मरीचिहिंगुलवणजीरकेण च संयुतम् ॥
अजमोदायुतं कृत्वा भक्षयेद्रोगशांतये ॥ १२ ॥
पिचुमंदस्य पुष्पाणि पत्राणि सुमृदूनि च ॥
निंबूरसयुतं कृत्वा मर्दयेदतिसूक्ष्मतः ॥ १३ ॥ क०
अजमोदायुतं कृत्वा भल्लातकफलं तथा ॥
दग्धहिंगुं क्षिपेत्तत्र मरीचं चार्द्रकं तथा ॥ १४ ॥
मिश्रीकृत्वा क्षिपेत्तत्तु दत्वादौ सुरभूसुरौ ॥
स्वयमेव ततः शुद्धं भक्षयेत्तु रसायनम् ॥ १५ ॥ रा०

तात्पर्य—बाळंतलिंबाचीं ( कडूलिंबाचीं ) कोंवळीं पानें--फुलांसह मिळाल्यास फारच उत्तम—आणून बारीक वाटावीत. त्यांत मिरे, हिंग ( भाजलेला ), मीठ ( किंवा सेंदेलोण ), जिरें, ओवा, यांचीही बारीक पूड करून मिश्रण करावें. त्यांतच बिब्बा, आलेंही घालावें. कित्येक चिंचगूळही घालतात. सारांश खातांना कंटाळा येणार नाहीं अशा रीतीनें मिश्रण तयार करून त्याचा देवास नैवेद्य दाखवावा, कांहीं

ब्राह्मणांस द्यावें. नंतर आपण तें पवित्र, अमृतमय भिश्रण खावें. असें केलें असतां सर्व रोगांचें निर्मूलन होतें.

## वर्षफलश्रवणसामान्यफलं. रा०

ये शृण्वंति नरा युगादिसमये संवत्सराधीश्वरा-
मात्यौ धान्यपमेघनीरसफलं सस्यादिकानां फलम् ॥
यावद्वत्सरमापदो नहि भवेत्पर्याप्तमिष्टं फलं ॥
लब्ध्वा पुत्रपशूननेक यशसस्ते यांति सौख्यं परम् ॥ १६ ॥ रा०

अर्थ—जे लोक वर्षप्रतिपदेदिवशीं वर्षेश, मंत्री, धान्येश, मेघेश, नीरसेश, सस्येश वगैरे अधिपतींचीं फलें श्रवण करतील त्यांना त्या वर्षांत संकटें न येतां मनोवांछित फल यथेच्छ प्राप्त होईल व त्यांना मुलेंबाळें होऊन त्यांच्याजवळ गोधन बहुत होऊन त्यांची कीर्ति वाढून त्यांना फार सुख होईल.

## विशेष फलानि.

श्रुत्वा राजफलं भवंति सुखिनः श्रुत्वा फलं मंत्रिणो ॥
बुध्युत्साहसुकीर्तयः पुनरहो सस्याधिनाथस्य च ॥
श्रुत्वार्घेशफलं रसाधिपफलं धान्याधिनाथस्य च ॥
श्रुत्वा नीरसनायकस्य च फलं ऐश्वर्यभाजः सदा ॥ १७ ॥ रा०
राज्यं स्यादचलं नृपश्रवणतो मंत्रिश्रवात्कौशलं ॥
धान्येशात्कमला स्थिरा च सुरसा वाणी भवेन्मेघपात् ॥
धर्मे बुद्धिरतिस्थिरा रसपतेर्दीर्घायुषत्वं भवेत् ॥
सस्येशाद्विमला ह्यतः शुभकरी राजावली श्रूयताम् ॥ १८ ॥ रा०
संवत्सरफलंश्रुत्वा तेषामायुष्यवर्धनम् ॥
धान्याधिपो धनं धान्यं मेघो गंगावगाहनम् ॥
रसेशो वर्धते गावो नीरसे वस्त्रकांचनम् ॥ १९ ॥ रा०
शाकस्य श्रवणात्सुपुण्यजननं संवत्सरस्याढ्यतां ॥
राज्ञो राजकुले जयो विजयते मंत्रीफलं बुद्धिदम् ॥
धान्यं धान्यपते रसं रसपतेः क्षेत्रेषु वृद्धिस्तथा ॥
सस्यं सर्वसुखं च वत्सरफलं संशृण्वतां सिद्धिदम् ॥ २० ॥ क०

अर्थ—कोष्टकरूपानें खालीं दिला आहे.

| अनुक्रमांक. | विषय. | फल. |
|---|---|---|
| १ | शककाल. | पुण्यवृद्धि. |
| २ | संवत्सरनांव. | संपत्ति. |
| ३ | राजा वर्षेश. | राजदरबारांत उत्कर्ष, सुख, अढळ राज्यपद. |
| ४ | मंत्री. | बुद्धि, उत्साह, कीर्ति व कुशलता. |
| ५ | अग्रधान्येश. | धान्यवृद्धि, ऐश्वर्य, स्थिर लक्ष्मी. |
| ६ | मेघेश. | वाङ्माधुर्य, गंगास्नान. |
| ७ | नीरसेश. | ऐश्वर्य, वस्त्र, सुवर्ण. |
| ८ | रसेश. | ऐश्वर्य, पुण्यकर्मेच्छा, गोधन. |
| ९ | अर्घेश. | ऐश्वर्य. |
| १० | सस्येश. | पिकें चांगलीं येतील, ऐश्वर्य, दीर्घायुष्य. |
| ११ | सर्व फळें. | सर्व सुख. |

## नित्यपंचांगश्रवणफलम्.

तिथेश्च श्रियमाप्नोति वारादायुष्यवर्धनम् ॥
नक्षत्राद्धरते पापं योगाद्रोगनिवारणम् ॥ २१ ॥
करणाच्चिंतितं कार्यं पंचांगं फलमुत्तमम् ॥
एतेषां श्रवणान्नित्यं गंगास्नानफलं लभेत् ॥ २२ ॥

अर्थ - नित्य तिथिश्रवण केल्यानें संपत्ति प्राप्त होते, वारश्रवणानें आयुष्य वाढतें, नक्षत्रश्रवणानें पापांचा क्षय होतो, योगश्रवणानें रोगराई नाहींशी होते. करणश्रवणानें इष्टकार्यसिद्धि होते, व हीं पांचही अंगें श्रवण केल्यानें भागीरथीचें स्नान केल्याचें श्रेय मिळतें.

## संवत्सरराजानिर्णयः

चैत्रसितादेरुदयाद्भानोर्दिनमासवर्षयुगकल्पाः ॥
सृष्ट्यादौ लंकायां समं प्रवृत्ता दिनेऽर्कस्य ॥ १ ॥ रा०
देवक्रियासमर्थायां प्रतिपद्यर्कदर्शने ॥
चैत्रारंभे तु यो वारः स राजा हायनस्य तु ॥ २ ॥ रा०
चैत्रशुक्लादिदिवसे यो वारः सोऽब्दपः स्मृतः ॥
शुभं वाप्यशुभं सर्वं तस्मादेव फलं स्मृतम् ॥ ३ ॥ क०
उदये प्रतिपच्छेत्रं मुहूर्तद्वयमेव चेत् ॥
तस्मिन्दिने तु यो वारः सतु संवत्सराधिपः ॥ ४ ॥ क०

इदं तु नर्मदोत्तरदेशस्थैरेवांगीक्रियते । केचित्तु चांद्रमानेन चैत्रशुक्लप्रतिपत् प्रथमक्षणे संवत्सरः प्रवर्तते तत्र यो वारस्तं संवत्सरेशं वदंति । तत्प्रायेण गुर्जरदेशे प्रसिद्धम् । दाक्षिणात्यास्तु कश्यपमतमंगीकृत्य सूर्योदयकालीनप्रातिपद्वासरं वत्सरेशमाहु स्तथा च कश्यपवचनम् ॥

चैत्रशुक्लाद्यदिवसे सर्किंस्तुघ्नेऽथवा ववे ॥
अर्कोदये तु यो वारः सोऽब्दपः परिकीर्तितः ॥ ५ ॥
अथवाववइत्युक्तेर्दिनद्वयेऽपि प्रतिपदादौ पूर्व एव वारो राजा ॥ क०
बहुभिः कीर्तितो राजा रवेरुदयकालिकः ॥
तत्र भूपद्वयं वृद्धौ भूपाभावस्तिथिक्षये ॥ ६ ॥ रा०
चैत्रसितप्रतिपदि यो वारोऽर्कोदये स वर्षेशः ॥
उदयद्वितये पूर्वो नोदययुगले तु पूर्वः स्यात् ॥ ७ ॥
चारप्रवृत्तिर्दिनपार्थमुक्ता स-वर्षपोऽथो गणकैः पुराणैः ॥
संधिर्निशीथं हि दिनद्वयस्य तस्मान्निशीथात्परमत्र घस्रः ॥ ८ ॥
एवं च नानामुनिवाक्यभेदैः प्रपश्य राजा बहुसंमतो यः ॥
वारस्तु दर्शप्रतिपद्दिनोत्थो निशीथतो वारमुखं युगादौ ॥ ९ ॥
यस्मिन्वारेऽपराह्ने स्यात्प्रतिपच्चैत्रशुक्लजा ॥
स एव नृपतिर्ज्ञेयो वराहाद्यवधारितः ॥ १० ॥
किंस्तुघ्नकरणं यत्र जायते वासरे ध्रुवम् ॥

---

१ लंकानगर्यामुदयाच्च भानोस्तस्यैववारे प्रथमं बभूव ॥
मधोःसितादेर्दिनमासवर्षयुगादिकानां युगपत् प्रवृत्तः ॥ १ ॥ सिद्धांतशिरोमणी.

स राजा विदितः पूर्वमुनिभिः परिकीर्तितः ॥ ११ ॥
यस्मिन्वारे दिवा करणं किंस्तुघ्नं सोऽब्दपो भवेत् ॥
किंस्तुघ्नकरणं नस्याद्दिवा तत्रोदयाधिपः ॥ १२ ॥
कांभोजखार्जूरकिरातसिंधुष्वाभीरदेशेष्वपि दर्दुरेषु ॥
किंस्तुघ्नकाख्येऽब्दपतिर्विधेयो परेषु सूर्योदयकालजः स्यात् ॥१३॥ रा०

अर्थ.—१ पूर्वी सृष्टीच्या आरंभी लंकेमध्यें चैत्र शुद्ध प्रतिपदेला, रविवारीं, सूर्योदय काली दिवस, महिना, वर्ष, युग, कल्प यांस एकदम प्रारंभ झाला. ह्मणून

२ चैत्र शुद्ध प्रतिपदेला सूर्योदयकाली ज्या ग्रहाचा वार असेल तो त्या वर्षाचा राजा होय.

३ आतां तिथिवृद्धींमुळें दोन्ही दिवशीं सूर्योदयकालीं प्रतिपदा असेल, अथवा तिथिक्षय मुळें दोन्ही दिवशीं सूर्योदयसमयीं प्रतिपदा नसेल, तर प्रथम दिवसाच्या वाराचा जो अधिप तो राजा होय.

मतांतरें—( १ ) कित्येकांचें मत असें आहे कीं, प्रतिपदेची वृद्धि झाली असतां दोन राजे होतात. प्रतिपदेचा क्षय झाला असतां राजाच असत नाहीं. मंत्रीच राजाचें काम करतो.

( २ ) कित्येक ह्मणतात कीं, मध्यरात्र ही दोन दिवसांची संधि आहे, ह्मणून मध्यरात्र उलटल्यापासून दुसऱ्या वारास आरंभ होतो. ही वारप्रवृत्ति सांगण्याचें कारण तरी हेंच कीं तेणेंकरून राजा कोण याचा निर्णय व्हावा.

( ३ ) कित्येक ह्मणतात कीं, युगाच्या आरंभीं मध्यरात्रीं वारप्रवृत्ति झाली. ह्मणून अमावास्या व प्रतिपदा यांच्या संधिकालीं ज्याचा वार असेल तो ग्रह राजा होय.

( ४ ) चैत्र शुद्ध प्रतिपदा ज्या वारीं अपराह्णकालीं असेल तो राजा होय असेंही एक मत आहे व हेंच वराहमिहिराचार्य वगैरेनीं घेतलें आहे.

( ५ ) ज्या दिवशीं किंस्तुघ्न करण असेल त्या दिवसाचा जो अधिप तो राजा होय असें पूर्वाचार्यांचें मत आहे.

( ६ ) कित्येक ह्मणतात कीं किंस्तुघ्न करण दिवसा असलें पाहिजे. तें दिवसा नसून रात्रीं असेल तर सूर्योदयकालीं ज्याचा वार तो राजा.

असे जरी अनेक मतभेद आहेत तरी त्यांची देशपरत्वें व्यवस्था लाविली आहे, ती अशी:—

[ १ ] किंस्तुघ्न करणावरून राजा ठरविणेंचा तो कांभोज, खार्जूर, किरात, सिंधु, आभीर, दर्दुर या देशांतच ठरवावा. इतर ठिकाणीं सूर्योदयकालीं ज्याचा वार तो राजा.

[ २ ] नर्मदेच्या उत्तरेस सूर्योदयापासून ४ घटिका ज्या दिवशीं प्रतिपदा असेल त्या वाराचा जो अधिप तो राजा मानला जातो.

[ ३ ] गुजराथेंत चैत्र शुद्ध प्रतिपदेचा पहिला क्षण ज्या वारीं असेल तो ग्रह राजा मानतात.

[ ४ ] दक्षिणेकडील लोक कश्यपाचें वचन प्रमाणभूत मानून सूर्योदयकालव्यापिनी प्रतिपदा ज्या ग्रहाच्या वारीं असेल त्यास राजा मानतात; मग त्या वेळीं किंस्तुघ्नकरण असो अथवा बव करण असो. बव करण असलें तरी चालेल असें झालें आहे ह्मणून दोन्ही दिवशीं प्रतिपदा असेल तर पहिला ज्याचा वार तो राजा होय.

संप्राप्ते चैत्रमासे शशिनि कृशतनौ वासरे शुक्लपूर्वे ॥
यो वारो वत्सरस्य प्रभवति स शिवोऽशोभनो वा फलेशः ॥
तद्वर्णं सर्वसस्यं फलति बलयुते क्षेत्रदेशे स्वकीये ॥
तस्मिन्यच्चान्हि वृष्टिः क्षपयति दुरितं सूर्यभौमार्कजानां ॥ १ ॥ संहिता.
वर्षे यद्यस्य फलं मासे च मुनिप्रणीतमालोक्य ॥
तद्वृत्तैर्वक्ष्येहं होरातंत्रोत्तरविधाने ॥ २ ॥ संहिता.

**संक्षिप्त अर्थ**—चैत्र शुद्ध प्रतिपदेस ज्या ग्रहाचा वार असेल तो ग्रह वर्षाधिपति होय. याचप्रमाणें कोणत्याही महिन्याचे शुक्ल प्रतिपदेस ज्याचा वार असेल तो मासाधिपति होय. असें भट्टोत्पलानें संहिता ग्रंथाचे आपले टीकेंत सांगितलें आहे.

## अधिक चैत्रराजनिर्णयः

यस्मिन्मधावश्विनि मेषराशौ प्रयाति सूर्यः सतु चैत्रमासः ॥
यस्मिन्मधौ संक्रमणं च नास्ति स एव मासस्त्वधिको मलीनः ॥ १ ॥ रा.
प्रवृत्तिरब्दस्य मधौ च शुद्धे जातास्ति सैव मलिम्लुचेऽपि ॥
ज्ञेया सदा नित्यककर्मकाले नैमित्तिके काम्यमखे च तद्वत् ॥ २ ॥
राज्ञः फलं शुद्धमधौ प्रयुक्तं तदेव सत्यं न मलिम्लुचस्थम् ॥
प्रागेव जातो यदिचेत्प्रधानो ह्यनंतरं भूपतिरेवजातः ॥ ३ ॥

---

१ या देशांतच 'खष व कोंकण' यांची गणना करावी असें कल्पलतेचें मत आहे. (स राजा विदितस्तत्र खषकोंकणकश्रितः ॥ ).

राज्ञः प्रधानो वचनं न मन्येत्तदा स्वबुध्यैव हि राजकृत्यम् ॥४॥ सि. शे.
श्रोतव्यं शुद्धचैत्रे च फाल्गुनेतरजं फलम् ।
वत्सरादौ न श्रोतव्यमधिमासे च सर्वदा ॥ ५ ॥
शृणोति यदि मूढात्मा महारिष्टं भवेत्ध्रुवम् ।
अभ्यंगं द्विजदानं च शुद्धे कुर्यान्न चाधिके ॥ ६ ॥
यस्मिन्वर्षे यदा चैत्रोह्यधिमासो भवेत्तदा ।
अधिमासं परित्यज्य शुद्धचैत्रादिवारपं ॥
अब्दनाथं प्रशंसंति गर्गकश्यपदेवलाः ॥ ७ ॥ राजावली.

तात्पर्यार्थ—१ ज्या महिन्यांत मेषसंक्रमण होईल तो चैत्रमास व ज्या चैत्र मासांत संक्रमण येणार नाहीं तो अधिक चैत्र होय.

२ वर्षाचा आरंभ शुद्ध चैत्रांत झाला आहे; तथापि चैत्र अधिक मास असला ह्मणजे वर्षाचा आरंभ अधिक चैत्रापासूनच होतो ह्मणून नित्यनैमित्तिक कर्मांग देश काल संकीर्तन करतांना अधिक चैत्रारंभापासूनच संवत्सरारंभ धरावा.

३ ज्या वर्षीं अधिक चैत्रमास येईल, त्या वर्षीं अधिकमास सोडून शुद्ध चैत्र शुक्ल प्रतिपदा ज्या वारीं येईल त्या वाराचा जो अधिपति तो राजा होय असें गर्ग, कश्यप आणि देवल या ऋषींनीं सांगितलें आहे. ह्मणून अधिक चैत्र शुक्ल प्रतिपदेचा वाराधिपति राजा होत नाहीं.

४ प्रधाननिर्णय—मेषसंक्रमण अगोदर ( उदाहरणार्थ फाल्गुन अमावास्येस ) होऊन मागाहून राजनिर्णय ( उदाहरणार्थ अधिक चैत्र संपल्यानंतर शुद्ध चैत्राचे शुक्ल प्रतिपदेवरून ) होईल तर प्रधान राजाची आज्ञा मानणार नाहीं व राजा आपल्याच मतानें प्रधानाबद्दलचें कामकाज स्वतःच चालवील.

५ चैत्र शुद्ध प्रतिपदेचे दिवशीं जें पंचांगश्रवण करणेंचें तें शुद्ध चैत्रांतच करावें. वर्ष बदलतें ह्मणून अधिक चैत्रांत करूं नये. जर कोणी अज्ञानानें श्रवण करील, तर त्याजवर मोठें संकट येईल.

पाडव्यानिमित्त मंगलस्नान व दान वगैरे करणें तें शुद्ध चैत्रांतच करावें.

## वर्षफल पाहण्याचा प्रकार.

अणुरपटुमयूखो नीचगोऽन्यैर्जितो वा ॥
न सकलफलदाता पुष्टिदोऽतोऽन्यथा यः ॥

यदशुभमशुभेऽब्देमासजं तत्प्रवृद्धिः ॥

शुभफलमपिचैवं याप्यमन्योन्यतायां ॥ १ ॥ बृहत्०

**अर्थ** - जो ग्रह वाधीक्र झालेला, अस्पष्टकिरण, नीचराशिगत आणि अन्य ग्रहांनीं युद्धांत जिंकलेला असा असतो त्याचें शुभ फल असलें तरी तो सर्व शुभ फल देणारा होत नाहीं. याहून अन्य प्रकारचा ग्रह असला म्हणजे शुभ फल देतो. अशुभ ग्रहाच्या वर्षामध्यें अशुभ ग्रहाचेंच मासफल येईल तर फारच अशुभ फल होतें. असेंच वर्षपति व मासपति या दोहोंचेंही शुभ फल असेल तर मासफल वृद्धिंगत होतें, आणि एकाचें शुभ व दुसऱ्याचें अशुभ असेल तर शुभ किंवा अशुभ फल स्वल्प होतें.

# अथ राजादिफलानि.

## १ राजफलम्.

**१ रवि—** धान्यपुष्पफलमूलविनाशश्चोरभीर्भवति नोदकलेशः ॥
भूमिपालकलहो गदकोपः प्राणिनां दिनकरो यदि भूपः ॥१॥ क०
सूर्यस्य राज्ये जलहीनता स्यात्पयोधराणां महती च पीडा ॥
जनस्य चौरा फलपुष्पमल्पं भवेत्तरूणां कलहो नृपाणाम् ॥१॥ रा०

**अर्थ** –धान्यें, फुलें, फळें व मुळें यांचा नाश होईल. चोरांची भीति फार होईल. पाणी आटेल ( ढगांत पाणी असणार नाहीं ). राजेलोकांत तंटे उत्पन्न होतील. लोकांत रोगराई फार होईल.

**२ चंद्र—** धेनवोऽतिपयसोऽधिकतोषः प्राणिनां जलवशात्कणपोषः ॥
भूभृतो विहितसद्विजपूजा जायते हिमकरो यदि राजा ॥ २ ॥ क०
सोमस्य राज्येऽखिललोकगेहे कल्याणकार्याणि गवां विवृद्धिः ॥
वृष्टिः प्रभूता फलपुष्पसंपत्सौख्यं जनो विंदाति रोगहीनः ॥ २ ॥ रा०

**अर्थ**— गाई पुष्कळ दूध देतील. ( गाईंची वाढ होईल– रा० ). लोकांना फार आनंद होईल. ( लोक निरोगी होऊन सुखी होतील–रा० ). पाऊस पुष्कळ पडून पिकें ( फुलें व फळें–रा० ) चांगलीं येतील. राजे लोक सत्पात्र ब्राह्मणाचा गौरव करतील.

**३ मंगळ—** मेदिनी धनकणादिवार्जिता मेदिनीपतय आहवे रताः ॥
वन्हिचौरगदभीः क्वचिज्जलं मंगले क्षितिपतौ न मंगलम् ॥३॥ क०

भौमस्य राज्येऽग्निभयं धरित्री सस्येन हीना क्वचिदेव वृष्टिः ॥
चोराः प्रभूता मनुजेश्वराणां स्याद्विग्रहोऽन्योन्यजयाय नूनम् ॥३॥ रा०

**अर्थ** – पृथ्वी द्रव्य व धान्य यांनीं विरहित होईल राजेलोक लढाईंत गुंग होतील आगी, चोर व रोगराई यांपासून फार भीति उत्पन्न होईल. पाऊस अगदीं तुरळक पडेल. शुभ कांहीं होणार नाहीं.

४ **बुध** — धान्यशालि सकलं महीतलं श्रीयुतं नृपकुलं निराकुलम् ॥
भूरि वारि शुभकार्यसाधनः स्याज्जनो यदि नृपोऽत्र बोधनः ॥४॥ क०
बुधस्य राज्ये धनधान्यसंकुलं महीतलं वृष्टिरनुत्तमा च ॥
जना विवाहोत्सवयज्ञकारिणः सुभिक्षमस्मिन्बहुवारिवृष्टिः ॥ ४ ॥ रा०

**अर्थ** – सर्व पृथ्वी धान्यानें ( व द्रव्यानें–रा० ) सुशोभित होईल. राजेलोक पीडा रहित होऊन संपत्तिमान् होतील. पाऊस पुष्कळ पडेल. लोकांत मंगल कार्यें (लग्नकार्यें यज्ञोत्सवारंभ वगैरे-रा ) पुष्कळ होतील ( व चहूंकडे अन्नदानी होईल–रा )

५ **गुरु**— धेनुवृंदमतिदुग्धसमेतं वर्षणात्फलकणादि नितांतम् ॥
यज्ञकर्मणि सतामनुरागः पार्थिवे सुरगुरौ न च रोगः ॥ ५ ॥ क०
जीवस्य राज्ये कनकांबुधारावृष्टिश्च गावो बहुदुग्धयुक्ताः ॥
विप्राः सदा यज्ञमहोत्सवेन प्रहृष्टचित्ताः फलपुष्पसंपत् ॥ ५ ॥ रा०

**अर्थ** - गाई पुष्कळ दूध देतील. पाऊस पाहिजे तसा चांगला पडून फळें व धान्यें पुष्कळ येतील. यज्ञसमारंभ करण्याविषयीं सत्पुरुष उत्कंठित होतील. रोगराई होणार नाहीं.

६ **शुक्र**— वसुमती जलपूर्णजलाशया धनयुता जनता रहिता भिया ॥
फलकणोपचयोऽखिलधेनवः सुपयसो नृपतिर्यदि भार्गवः ॥ ६ ॥ क०
शुक्रस्य राज्ये सरितस्तडागा वाप्यश्च कूपाः परिपूर्णतोयाः ॥
प्रभूतधान्यं फलिताश्च वृक्षा गावः सुदुग्धाः सुखिनश्च लोकाः ॥ ६ ॥ रा०

**अर्थ** पृथ्वीवरील ( नद्या, तळीं, विहिरी, आड वगैरे––रा० ) पाण्याच्या जागा पाण्यानें तुडुंब भरून जातील. सर्व लोक निर्भयपणानें द्रव्य बाळगून सुखानें नांदतील. फळें व धान्यें यांची वृद्धि होईल. सर्व गाई पुष्कळ दूध देतील.

७ **शनि**— फलधान्यजलादिकाल्पता जनता तस्कररोगपीडिता ॥
क्षितिपालगणो रणे रतः क्षितिपालो यदि भानुसुतः ॥ ७ ॥ क०

मंदस्य राज्ये क्वचिदेव वृष्टिर्जने गदश्चोरकृता च पीडा ॥
नृपा विनाशं युधि संप्रयांति दुर्भिक्षमुग्रं फलपुष्पहानिः ॥ ७ ॥ रा०

**अर्थ**—फळें, धान्यें व पाणी कमी होईल (फळें व धान्यें यांची नासाडी होईल. पाऊस अगदीं तुरळक पडेल—रा०). लोकांत रोग व चोर यांचा उपद्रव फार होईल. राजेलोक लढायांत गुंग होतील (नाश पावतील—रा०) (व भयंकर दुष्काळ पडेल—रा०).

## मंत्रीफलानि.

**रवि**— पयोधान्यपुष्पादिकानामभावः सदा भूमिपानां मिथो वैरभावः ॥
जनो रोगचोरादिभीतिं दधानः क्षुधा पीडितश्चेद्रविःस्यात्प्रधानः ॥ १ ॥ क०
सूर्ये प्रधाने ज्वलिता धरित्री क्षुधाभिभूतं जगदल्पसस्यम् ॥
महर्घता रोगभयं जनानां युद्धं नृपाणामतुला त्ववृष्टिः ॥ १ ॥ रा०

**अर्थ**—पाणी, धान्यें, फुलें वगैरे कमी होतील. राजेलोकांमध्यें नेहमीं वैमनस्य (लढाई—रा०) उत्पन्न होईल. लोकांमध्यें रोगराई, चोर वगैरेंचें भय उत्पन्न होईल व ते भुकेनें व्याकुळ होतील. महागाई होईल व विलक्षण अवर्षण पडून पृथ्वी होरपळून जाईल.

**चंद्र**— क्षितिदेवततिः कृतयज्ञमतिः क्षितिपालरतिः फलधान्यभृतिः ॥
पशवः सुखिनो जलदोऽभ्रगणः सचिवो यदि कैरविणीरमणः ॥ २ ॥ क०
सोमे प्रधानेऽभ्युदयं व्रजंति प्रजा महीशा बहुधा च वृष्टिः ॥
शालीक्षुगोधूमगवां विवृद्धिर्यज्ञक्रियायां निरता द्विजाः स्युः ॥ २ ॥ रा०

**अर्थ**—ब्राह्मणसमुदाय यज्ञ करण्यामध्यें गढून जाईल राजे लोकांना आनंद होईल. (राजा व प्रजा यांचा उत्कर्ष होईल—रा०). फळें व धान्यें यांची वृद्धि होईल. (साळी, ऊंस, गहूं व गाई यांची समृद्धि होईल—रा०) जनावरांना सुख होईल. पाऊस पुष्कळ पडेल.

**मंगळ**— ध्रुवमवर्षणतः कणनाशनं ज्वलनतस्कररोगनिपीडनम् ॥
रणपराः क्षितिपा बुधवंदने न निरताः सचिवे क्षितिनंदने ॥ ३ ॥ क०
भौमे प्रधाने क्वचिदेव वृष्टिर्धान्यं महर्घं ज्वलनप्रकोपः ॥
स्यात्तस्कराणामनयोऽतिघोरः प्रजेश्वरा युद्धविधायिनः स्युः ॥ ३ ॥ रा०

अर्थ—पाऊस न पडल्यामुळें धान्याचा नाश होईल. ( धान्य महाग होईल–रा० ) आग, चोर व आजार यांपासून लोकांना अतिशय त्रास होईल. राजे युद्धांत गुंग होतील व विद्वानांचा गौरव करणार नाहींत.

४ बुध—स्यात्कोशवृद्धिर्धरणीश्वराणां गावः सुदुग्धा न गदो नराणाम् ।
गोधूमशालीक्षुयुता धरित्री पूर्णोदका चेच्छशिजोऽत्र मंत्री ॥ ४ ॥ क०
बुधे प्रधाने कमलेक्षुदुग्धगोधूमसंपत्प्रचुरा च वृष्टिः ।
कीलालधान्यानि पचेलिमानि नरेश्वराणामपि कोशवृद्धिः ॥ ४ ॥ रा०

अर्थ—राजे लोकांचा खजिना वाढेल. गाई पुष्कळ दूध देतील. लोकांत रोगराई होणार नाहीं. गहूं, साळी, ऊंस ( कमळ–रा० ) हे पदार्थ पृथ्वीवर विपुल होतील. सर्वत्र पाण्याची समृद्धि होईल.

५ गुरु—पयोधरा भूरि दिशंति पाथो धात्री कणाद्यैर्जनसुद्धिधात्री ।
पृथ्वीभृतां संपदतीव पृथ्वी मंत्री यदास्यात्सुरराजमंत्री ॥ ५ ॥ क०
जीवे प्रधाने मुदिताश्च सर्वे लोकाः सुभिक्षं प्रचुरं विलोक्य ।
अनर्घता स्याद्बहुसस्यसंपन्महीरुहाणामतुला च वृद्धिः ॥ ५ ॥ रा०

अर्थ—मेघ पुष्कळ पाऊस पाडतील. पृथ्वीवर धान्याची समृद्धि होऊन लोकांना आनंद होईल. राजेलोकांचा खजिना अतिशय वाढेल. ( झाडांची वाढ फार जोरानें होईल–रा० ).

६ शुक्र—अतिदुग्धयुतो गवां गणः क्षितिपानां न परस्परं रणः ।
पशुवृद्धिरतीव वृष्टितः कणपोषः सचिवो यदा सितः ॥ ६ ॥ क०
शुक्रे प्रधाने प्रचुरांबुवर्षी सुराधिनाथः सुखिनश्च सर्वे ।
गावो यथा कामदुघा नृपाणामतीव सौख्यं प्रचुरं च धान्यम् ॥ ६ ॥ रा०

अर्थ—गाईंच्या खिल्लारांस अत्यंत दूध येईल. राजांची परस्पर लढाई होणार नाहीं ( राजांना अतिशय सुख होईल रा० ). पाऊस पुष्कळ पडल्यामुळें जनावरें पुष्ट होतील. धान्याची वाढ फार होईल.

७ शनि—नैव धान्यफलपुष्पसंचयः स्यादवर्षणवशाज्जगत्क्षयः ।
वन्हिभीः प्रचुरतस्करोदयः सूर्यजेऽत्र सचिवे महामयः ॥ ७ ॥ क०
मंदे प्रधानेऽखिललोकपीडा वन्हेर्भयं धान्यविनाशनं च ।
रोगाभिभूता जनता न पश्येत्सौख्यं तथास्मिन्नतिहीनवृष्टिः ॥ ७ ॥ रा०

अर्थ धान्यें, फळें, फुलें निपजणार नाहींत. पाऊस न पडल्यामुळें जगाचा

नाश होईल. ( पाऊस अगदीं जुजबी पडेल-रा० ) आगीची भीति फार होईल. चोरांचा सुळसुळाट होईल. मोठा रोग उत्पन्न होईल. लोकांना सुख होणार नाहीं.

## अग्रधान्येश ( सस्येश—पूर्वधान्येश ) फलम्.

**१ रवि**—खंडांबुवृष्टिर्गदचौरभीतिः क्षितीश्वराणां रणकर्मसक्तिः ।
गवामदुग्धं कणपुष्पनाशश्चेदग्रधान्याधिपतिर्दिनेशः ॥ १ ॥ क०
खंडावृष्टिः सस्यहानिर्जनानां व्याधिर्युद्धं भूभुजां दारुणं च ।
चोरक्रीडा दृश्यते सस्यनाथे सूर्ये यस्मिंस्तत्र गोदुग्धनाशः ॥ १ ॥ रा०

**अर्थ**—पाऊस मधून मधून पडेल. रोगराई व चोर यांचें भय फार होईल. राजेलोकांत लढाया होतील. गाई दूध देणार नाहींत. धान्यें व फुलें यांची नासाडी होईल.

**२ चंद्र**—धान्याधिक्यं गोषु दुग्धं प्रभूतं पुत्रैः पौत्रैर्लोकवृंदं समेतम् ॥
मेघव्राता भूरि दिशंति पाथश्चंद्रश्चेत्स्यादग्रधान्याधिनाथः ॥ २ ॥ क०
सस्यं समग्रं प्रचुरांबुवृष्टिः सर्वाणि धान्यानि पचेलिमानि ।
जनाश्च सर्वे शुभसौख्ययुक्ताः सस्याधिनाथे च निशाकरे वै ॥ २ ॥ रा०

**अर्थ**—धान्य विपुल होईल. गाई पुष्कळ दूध देतील. लोक मुलें नातवंडें यांनीं युक्त होतील. पाऊस पुष्कळ पडेल.

**३ मंगळ**—जलकणादिकमल्पमसंशयं ज्वलनतस्करजं प्रचुरं भयम् ।
जगदसृग्गदवृद्धियुतं सदा क्षितिसुतोऽग्रिमधान्यपतिर्यदा ॥ ३ ॥ क०
रोगाभिभूतं जगदस्ति सर्वं महर्घधान्यानि न वारि भूरि ।
वन्हेर्भयं तस्करजं क्वचित्स्यात्सस्याधिनाथे धरणीतनूजे ॥ ३ ॥ रा०

**अर्थ**—पाणी, धान्य वगैरे कमी होईल. आगी व चोर यांची भीति फार होईल. चहूंकडे लोकांत नेहमीं रक्तविकार ( रोगराई—रा० ) वाढेल. ( धान्यें महाग होतील—रा० ).

**४ बुध**- सुखिनो भयवर्जिता नरा धनधान्यांबुभिरन्विता धरा ।
न रतिः कुभुजां रणादिके शशिपुत्रेऽग्रिमधान्यनायके ॥ ४ ॥ क०
मही च सर्वा सलिलेन पूर्णा भयं विनष्टं च सुखी जनः स्यात् ।
सर्वाणि धान्यानि फलैर्युतानि सस्याधिनाथो यदि चंद्रजः स्यात् ॥ ४ ॥ रा

**अर्थ**—सर्व लोक निर्भय होऊन सुखी होतील. पृथ्वीवर द्रव्य, धान्यें व उदक विपुल होईल. राजे लोकांची युद्धाकडे प्रवृत्ति होणार नाहीं.

५ गुरु— धनधान्यफलादिसंयुता धरिणी स्याजनता मुदान्विता ।
यदिवाक्पतिरग्रिमधान्यपः प्रचुरं वारि ददाति देवपः ॥ ५ ॥ क०
आनंदयुक्ता जनता पयोदाः सुवृष्टियुक्ताः फलपुष्पसंपत् ।
धान्यानि सर्वाणि शुभानि यत्र सस्याधिनाथः सुरराजमंत्री ॥ ५ ॥ रा०

अर्थ पृथ्वीवर धान्यें व फळें ( व फुलें--रा० ) चांगलीं येऊन द्रव्य पुष्कळ होईल. सर्व लोकांना आनंद होईल पाऊस पुष्कळ पडेल.

६ शुक्र— विविधधान्यफलोपचयोऽयुतः सकललोकगणो गदवर्जितः ।
नृपतयः सहिता बहुसंपदा प्रथमधान्यपतिर्भृगुजो यदा ॥ ६ ॥ क०
रोगैर्मुक्ता निर्भयाः सर्वलोकाः पच्यंते वा सर्वधान्यानि नूनम् ॥
वृक्षाः शश्वत्पुष्पिता भूरिवृष्टिः सस्याधीशो यत्र दैतेयमंत्री ॥ ६ ॥ रा०

अर्थ— पाऊस चांगला पडून नानाप्रकारचीं धान्यें व फळें चांगलीं येतील. लोकांत रोगराई उद्भवणार नाहीं. राजे लोकांजवळ पुष्कळ द्रव्य होईल. ( झाडांना नेहमीं फुलें येतील — रा० ).

७ शनि- धान्याभावः कोशहानिर्नृपाणां मंदा वृष्टिः स्याजयस्तस्कराणां ॥
रोगाद्वन्हेश्चातिपीडा जनस्य प्राग्धान्येशश्चेत्सुतोभास्करस्य ॥ ७ ॥ क०
धान्यक्षयः कोशविहीनता स्यान्नरेश्वराणामतिमंदवृष्टिः ॥
हुताशभीतिः प्रचुरामयः स्यात्सस्याधिनाथोऽर्कसुतो हि यत्र ॥ ७ ॥ रा०

अर्थ – धान्याचा नाश होईल राजे लोकांचा खजिना खालावेल. पाऊस कमी पडेल. चोरांचा उत्कर्ष होईल. रोगराई व आगी यांपासून लोकांना फार त्रास होईल.

## मेघेशफलम्.

१ रवि—सदा दुर्दिनं धान्यपुष्पादिनाशः करोति क्वचिन्नीरवृष्टिं सुरेशः ॥
भवेत्तस्करोपद्रवो मूषकेतिर्दिनेशे घनेशे सति व्याधिभीतिः ॥ १ ॥ क०
दिव्याभ्रजालैः पिहितोऽर्क इंद्रः क्वचिज्जलं वर्षति मूषकेतिः ॥
महीरुहाः पुष्पफलैर्विहीना मेघाधिपो यत्र दिवाकरः स्यात् ॥ १ ॥ रा०

अर्थ—आभाळ नेहमीं पोकळ ढगानीं भरून राहील. धान्यें, फुलें वगैरे यांची नासाडी होईल. पाऊस कोठें कोठें तुरळक पडेल. चोरांपासून त्रास होईल. उंदरांचा उपद्रव होईल. रोगराई होण्याचें भय राहील.

२ चंद्र--यवां यादसां सस्यपुष्पादिकानां प्रवृद्धिः सुखं भूरि विद्वज्जनानाम् ॥
नदीकूपवापीतडागेषु पाथः प्रभूतं यदा चंद्रमा मेघनाथः ॥ २ ॥ क०

नदीतडागादिषु भूरितोयमतीव धान्यं प्रबला जनाश्च ॥
शालीक्षुगोवारिचराभिवृद्धिर्मेघाधिपो यत्र निशाकरः स्यात् ॥ २ ॥ रा०

**अर्थ**--गाई, जलजंतु (भात, ऊंस,—रा० ), धान्यें, फुलें वगैरे यांचा उत्कर्ष होईल. विद्वान् लोकांना पुष्कळ सुख होईल. ( लोक बलवान् होतील—रा० ) नद्या, आड, विहिरी व तळीं यांमध्यें पाणी विपुल होईल.

३ **मंगळ**—अनिलः प्रबलोऽग्निभयं प्रचुरं धनधान्यफलादिकमल्पतरम् ॥
गदकोपवशाज्जगदल्पबलं क्षितिजे घनपे सति नैव जलम् ॥ ३ ॥ क०
वातः प्रचंडोऽग्निभयं जनानामवृष्टिभीत्या कलितं च धान्यम् ।
व्याधिप्रकोपोपहताश्च सर्वे मेघाधिपो यत्र धरातनूजः ॥ ३ ॥ रा०

**अर्थ**---सोसाट्याचा वारा सुटेल. आगीची भीति फार होईल. ( पाऊस कमी पडल्यामुळें-रा० ) द्रव्य, धान्यें, फळें वगैरे अगदीं कमी होतील. रोग फार वाढून लोकांची शक्ति क्षीण होईल. पाणी फार कमी होईल.

४ **बुध**—क्वचिदामयेन विकलं नृकुलं लिपिकाव्यविद्गणकबुद्धिरलम् ।
जलवृष्टितः सकलधान्यभृतिः शशिनंदनो यदि पयोदपतिः ॥ ४ ॥ क०
कृषीवलाभीष्टकृदंबुवृष्टिर्मही लतापुष्पफलैः सुपूर्णा ।
अल्पामयः क्वापि कलिर्नृपाणां मेघाधिपो यत्र हिमांशुजः स्यात् ॥ ४ ॥ रा०

**अर्थ**—फार थोड्या ठिकाणीं रोग उद्भवतील. लेखक, शास्त्री, ज्योतिषी यांची आपापल्या विषयांत चांगली मति चालेल. (शेतकऱ्यांना पाहिजे असा-रा० ) पाऊस चांगला पडून सर्व धान्यें जोमांत येतील. ( पृथ्वी वेली, फुलें व फळें यांनीं भरून जाईल. राजे लोकांत कलह होईल-रा० ).

५ **गुरु**—सुरपतिः कुरुते जलवर्षणं विविधसस्यफलादिकपोषणम् ॥
द्विजगणो मखकर्मकरः क्षितौ जलधराधिपतौ सति वाक्पतौ ॥ ५ ॥ क०
पश्चाज्जलं भूरि महीश्वराणामन्योन्यमैत्री कलहः क्वचिच्च ॥
धर्मक्रियायां निरता जनाः स्युर्मेघाधिपो यत्र सुरेशमंत्री ॥ ५ ॥ रा०

**अर्थ**—पाऊस ( मागचा पाऊस-रा० ) पुष्कळ पडेल. निरनिराळीं धान्यें व फळें यांची वृद्धि होईल. ( राजे लोकांत परस्पर स्नेह राहून वैर अगदीं कमी होईल—रा० ) पृथ्वीवर ब्राह्मणसमुदाय यज्ञयागादि कर्मे करण्यांत गढून जाईल.

६ **शुक्र**—द्विजकुलमनिशं मुदं प्रयाति त्रिदशपतिः प्रबलं जलं ददाति ॥
अगणितकणसंयुता धरित्री जलदपतिर्यदि पूर्वदेवमंत्री ॥ ६ ॥ क०

नित्योत्सवानंदितमानसानां गृहे द्विजानां धनधान्यसंपत् ॥
गीर्वाणनाथो बहुवृष्टिकर्ता मेघाधिपो यत्र च भार्गवः स्यात् ॥ ६ ॥ रा०

**अर्थ**—ब्राह्मणसमुदायाला निरंतर आनंद होईल ( व त्यांच्या घरीं मंगलकार्यें होऊन त्यांच्याजवळ द्रव्य व धान्य पुष्कळ होईल-रा० ). पाऊस पुष्कळ पडेल. जमिनीवर धान्य अतोनात पिकेल.

७ **शनि**—चोरव्रजादतिभयं नृषु रोगभावः स्यात्कंदमूलफलपुष्पकणाद्यभावः ॥
न क्वापि वृष्टिरवनीपतिकोशहानिः शीतं क्वचित्खलु यदा वनराज ऐनिः ॥७॥क०
न क्वापि वृष्टिर्धरणीश्वराणां कोशोल्पकः शीतभयं क्वचिच्च ॥
न भूरि धान्यं प्रचुरामयश्च मेघाधिपो यत्र रवेः सुतः स्यात् ॥ ७ ॥ रा०

**अर्थ**--चोरांपासून फार उपद्रव होईल लोकांत रोगराई वाढेल. धान्यें, फुलें, फळें, मुळें, व कंद वगैरेची नासाडी होईल. पाऊस कोठेंहीं पडणार नाहीं. राजे लोकांचा खजिना रिकामा होईल. थंडोसा अगदीं विरळ मिळेल. ( थंडीपासून कोठें कोठें त्रास होईल—रा० ).

## रसेशफलानि.

१ **रवि** - वापिकादिषु जलं न नितांतं लोकवृंदमुरुशीतरुजार्तम् ।
इक्षुतैलयवतूलविनाशः स्याद्यदा रसपतिर्नलिनीशः ॥ १ ॥ क०
कार्पासतैलेक्षुगुडादिकानां महर्घता शीतभयं जनानाम् ॥
वापीतडागादिषु तुच्छमंबु रसाधिनाथो दिनकृद्यदा स्यात् ॥ १ ॥ रा०

**अर्थ** – विहिरी ( तळीं—रा० ) वगैरेमध्यें पाणी फार राहणार नाहीं. लोकांमध्यें थंडीपासून विकार उद्भवतील. ऊंस, तेल, सातू, कापूस, ( गूळ – रा० ) यांची नासाडी होईल.

२ **चंद्र**—प्रचुरमैक्षवतैलयवादिकं मखकरं क्षितिदेवकदंबकम् ॥
दिशति दुग्धमतीव गवां ततिर्यदि रसाधिपती रजनीपतिः ॥ २ ॥ क०
गावो बहुक्षीरमभिस्रवंत्यो वत्सोत्सुकाः सस्यभुजोऽतिपुष्टाः ॥
यज्ञक्रियायां निरताश्च विप्रा रसाधिनाथो हिमकृद्यदा स्यात् ॥ २ ॥ रा०

**अर्थ**—ऊंस, तेल, सातू वगैरे पुष्कळ होईल. ब्राह्मण यज्ञ करतील. ( धान्यें खाऊन फार लठ्ठ झालेल्या व आपल्या वासराविषयीं प्रेमभरित झालेल्या—रा० ) गाई पुष्कळ दूध देतील.

३ **मंगळ**-गुडतैलघृताद्यमल्पकं मणिमुक्ताकनकादि नाधिकम् ॥

१७ व्यतीपात-राजे व अवांतर लोक यांच्या द्रव्याचा खात्रीनें ऱ्हास होईल.

१८ वरीयान्-पाऊस थोडा पडल्यामुळें धान्यें, कंद, मूल वगैरे पदार्थ दुर्मिळ होतील.

१९ परिघ —धर्म व अर्थ यांचा क्षय होईल व राजांना पीडा होईल.

२० शिव-सर्व लोक चांगलीं धर्मकृत्यें करतील व त्यांचें सर्वकाल कल्याण होईल.

२१ सिद्ध-लोकांनीं हातीं धरलेलीं सर्व कार्यें तडीस जातील व धान्यादिक पुष्कळ होईल.

२२ साध्य—सर्व लोकांच्या न होण्याजोग्या गोष्टीसुद्धां जुळून येतील.

२३ शुभ – पाऊस पडून सर्वांना आनंद होईल.

२४ शुक्ल—पाऊस पडून धान्यादिकांची वृद्धि होईल.

२५ ब्रह्म—पाऊस आणि सर्व धान्यें मध्यम होतील.

२६ ऐंद्र-—रोगराईची भीति फार होईल.

२७ वैधृति सर्व जीवांना क्लेश होतील.

सर्वसंग्रह—शूल, गंड, व्यतीपात, व्याघात, परिघ, शिव, वैधृति व अतिगंड या योगांवर आर्द्राप्रवेश झाला असतां तो कल्याणकारक नाहीं.

## आर्द्राप्रवेशे वेलाफलम्.

पार्वतीरमणभं दिवा यदा स्याद्दिवाकरसमन्वितं तदा ।
जायते वसुमती कणान्विता तस्करादिकभयं जलाल्पता ॥ १ ॥
निशायां यदा रौद्रभेऽर्कप्रवेशस्तदातीव वृष्टिं विधत्ते सुरेशः ।
गवां स्यात्सुखं सर्वसस्यं प्रभूतं महीपालवृंदं रणे नैव सक्तम् ॥ २ ॥ क०
आर्द्रां याति रविस्त्वन्हि जलान्नक्षयकारकः ।
जगत्क्षेमकरो रात्रौ बहुसस्यजलप्रदः ॥ १ ॥ मयूरचित्रक.
दिवार्द्रा सस्यनाशाय रात्रौ सस्याभिवृद्धये ।
अस्तमानेऽर्धरात्रौ चेन्महदर्घंसुवृष्टिकृत् ॥ १ ॥ रा०
पूर्वाण्हकाले जगतां विपत्तिर्मध्यंदिने चाल्पगता च वृष्टिः ।
अस्तंगतेऽथो बहुसस्यमेदिनी स्वस्थं सुभिक्षं स्थिरमर्धरात्रौ ॥ २ ॥ रा०
आर्द्राप्रवेशोऽन्हि जगद्विपत्तिं सस्यस्य नाशं कुरुतेऽल्पवृष्टिं ।
क्षेमं सुभिक्षं निशि सस्यवृद्धिं सुवृष्टिमत्यंतजनानुरागम् ॥ ३ ॥

तात्पर्य—आर्द्रा प्रवेश दिवसा झाल्यास—पृथ्वीवर धान्य कमी पिकेल. चोरापासून वगैरे भीति उत्पन्न होईल. पाणी मिळणार नाहीं. (धान्याचा तुटवडा पडेल—म० चि०. धान्याचा नाश होईल — रा० ).

,, रात्रीं ,, पाऊस अत्यंत पडेल. गाईंना सुख होईल. सर्व धान्यें पुष्कळ येतील. राजे लोक युद्ध करणार नाहींत. (जगाचें कल्याण होईल. म. चि. व रा.)

,, पूर्वाण्हीं—दिव० प० भागांत—जगाचा नाश होईल.

,, मध्यान्हीं —पाऊस थोडा पडेल.

,, संध्याकाळीं —महागाई होईल.

,, मध्यरात्रीं —पाऊस फार चांगला पडेल.

## आर्द्राप्रवेशे चंद्रफलम्.

रौद्रप्रवेशे तरणेर्विधुश्चेत्त्रिकोणसंस्थोऽथ चतुष्टयस्थः ।
जलर्क्षगो वा शुभवीक्षितो वा धान्यं प्रभूतं हि भवेत्तदानीम् ॥१॥ म. चि.

अर्थ—सूर्याचा आर्द्रा नक्षत्रांत प्रवेश होतो त्यावेळीं जें लग्न असेल त्या लग्नीं चंद्र केंद्रांत ( १, ४, ७, १० या स्थानीं ) अथवा त्रिकोणांत ( ५, ९ या स्थानीं ) असेल, अथवा जलनक्षत्रीं[1] असेल, अथवा त्याच्यावर शुभ ग्रहांची दृष्टि असेल तर सर्व धान्यें पुष्कळ पिकतील.

आर्द्राप्रवेशे वृष्टिः स्यात्सार्धमासमवर्षणम् ॥ म. चि.

अर्थ—आर्द्राप्रवेशकालीं जर पाऊस पडेल तर पुढें दीड महिना पाऊस पडणार नाहीं.

## नवविधमेघानयनम्. ( ९ मेघ आणण्याचा प्रकार.)

( मेघ ९ आहेत असें मानिलें असून त्यापैकीं विवक्षित संवत्सरांत कोणता मेघ आहे व त्याचें फल काय हें काढण्याची रीति. )

शकाब्दान्वसुभिर्हत्वा नवभिर्विभजेत्पुनः ।
शेषमावर्तसंवर्तपुष्करद्रोणकालकाः ॥
नीलं च वरुणो वायुस्तमो मेघा नव स्मृताः ॥ १ ॥ रा०

---

१ पुनर्वसु, पुष्य, आश्लेषा, उत्तरा, पूर्वा, मघा, उत्तराषाढा, अभिजित्, श्रवण, पूर्वाभाद्रपदा, शततारका, धनिष्ठा हीं जलनाडींचीं नक्षत्रें होत.

शाकेऽष्टगुणिते नंदैर्भाजिते शेषतो घनः ।
आवर्त एकशेषे स्यात्संवर्ताख्यो द्विशेषके ॥ १ ॥
त्रिशेषे पुष्करो द्रोणश्चतुःशेषे प्रकीर्तितः ।
कालनामा पंचशेषे षट्शेषे नीलकः स्मृतः ॥ २ ॥
वारुणः सप्तशेषे स्याद्वायुरष्टावशेषके ।
नवशेषे तमो नामा क्रमान्मेघा नव स्मृताः ॥ ३ ॥ क०

**अर्थ** – शकाच्या संख्येस ८ नीं गुणून जो गुणाकार येईल त्यास ९ नीं भागावें आणि जी बाकी राहील त्यावरून १ उरल्यास आवर्त, २ उरल्यास संवर्त, याप्रमाणें ३ पुष्कर, ४ द्रोण, ५ काल, ६ नीलक, ७ वारुण, ८ वायु, ९ तमस् अशीं ९ मेघांचीं नावें जाणावीं.

### उत्पत्तिस्थानानि. (हे मेघ कोठून उत्पन्न होतात )

आवर्तो मेरुशिखरे संवर्तश्चोत्तरे तथा ।
ईशान्यां पुष्करो मेघः प्राच्यां द्रोणः प्रजायते ॥ १ ॥
नीलमेघस्तथाग्नेय्यां कालमेघस्तु दक्षिणे ।
नैर्ऋत्यां वरुणो जातः पश्चिमे तामसस्तथा ॥ २ ॥
अनिलेनिलमेघः स्याज्जन्मदेशाः प्रकीर्तिताः । रा०

**अर्थ**—१ आवर्त, मेरु पर्वताच्या शिखरावर; २ संवर्त, उत्तर दिशेला; ३ पुष्कर, ईशान्य दिशेला; ४ द्रोण, पूर्वेला; ५ नील, आग्नेयीला; ६ काल, दक्षिणेला; ७ वारुण, नैर्ऋत्येस; ८ तमस्, पश्चिमेला; ९ वायु, वायव्येला याप्रमाणें ९ मेघांचीं ९ उत्पत्तिस्थानें जाणावीं.

### मेघनामफलानि. (९ मेघांच्या नांवावरून फलें).

१ **आवर्त**—विनाशनं शालियवादिकानां तथैव कार्पासघृतादिकानाम् ॥
घनो यदा ऽऽवर्तकनामधेयः स्वल्पं जलं स्याद्धनिनामपायः ॥ १ ॥ क.
मंदतोयं महावायुः सेंद्रचापं सगर्जितम् ।
वृद्धिः स्यात्पूर्वसस्यस्य आवर्ते मेघलक्षणम् ॥ १ ॥ रा०

**अर्थ**—साळी, सातू, त्याचप्रमाणें कापूस, तूप वगैरे जिन्नस यांची नासाडी होईल. पाऊस थोडा पडेल व श्रीमान् लोकांस इजा होईल. ( मोठा वारा सुटेल. आकाशांत मेघांचा गडगडाट होत असतां इंद्रधनुष्य वरचेवर दृष्टीस पडेल-रा० )

२ **संवर्त** – कामाधिक्यं स्वल्पता धर्मकार्ये पृथ्वीपालास्तत्परा नान्यकार्ये ॥

संवर्ताख्यो नीरदः स्याद्धि यत्र प्रांचो वायुर्गाति सर्वत्र तत्र ॥ २ ॥ क०
वायुपूरिततोयस्य वर्षणं सर्व दिक्षु च ।
लवणार्णवपर्यंतं संवर्ते मेघलक्षणम् ॥ २ ॥ रा०

अर्थ--लोक मदनातुर फार होतील व धर्मकृत्याकडे त्यांची प्रवृत्ति होणार नाहीं. राजे लोक दुसऱ्यांचीं कामें करण्यास पराङ्मुख होतील. पूर्वेचा (प्रायो-पाठभेद = बहुतकरून) वारा सर्व ठिकाणीं सुटेल ह्मणजे पाऊस पडणार नाहीं. (मिठाच्या समुद्रापर्यंत सर्वत्र पाऊस पडत असतांना चहूंकडून वारा सुटेल ह्मणजे तेणेंकरून पाऊस जाईल. रा०).

३ पुष्कर—नैव कंदफलमूलविवृद्धिर्जायते विविधपातकवृद्धिः ।
रोगतो जनकृशत्वमनल्पं पुष्करे जलधरे जलमल्पम् ॥ ३ क०
मध्या वृष्टिर्मंदसस्यं महावायुः प्रवर्तते ॥
पुष्करे मेघमासाद्य सर्वमूलानि नाशयेत् ॥ ३ ॥ रा०

अर्थ—कंदमूलादिकांची केव्हांही वाढ होणार नाहीं. नाना प्रकारचीं पापकर्में विशेष घडून येतील. आजारामुळें लोक फार खराब होतील. पाऊस थोडा (मध्यम —रा०) पडेल. (धान्य थोडें पिकेल. मोठा वारा सुटेल.).

४ द्रोण—महीशाः स्वसंतानवृद्ध्या समेताः समस्ता मही भूरिधान्येन युक्ता ।
यदा जायते द्रोणनामा पयोदस्तदा देवराजो भवेत्सत्पयोदः ॥ ४ ॥ क०
निरंतरं महावर्षं मध्यदेशे महाजलम् ।
अशुभं सर्वदेशानां द्रोणमेघस्य लक्षणम् ॥ ४ ॥ रा०

अर्थ—राजे लोकांना औरससंतति होईल. सर्व पृथ्वीभर धान्यच धान्य होईल. चांगला पाऊस पडेल (मध्य प्रदेशांत पाणी पुष्कळ होईल. सर्व देशांत लोकांचें कल्याण होणार नाहीं—रा०).

५ काल—रोगतो विकलता वपुष्मतां स्यान्मिथः कलहता क्षमाभृताम् ।
कालनामजलदोदयो यदा नैव वर्षति वृथा जलं तदा ॥ ५ ॥ क०
मध्य-देशे सुवृष्टिः स्यान्नैरंतर्यं महाजलम् ॥
फलंति सर्वधान्यानि कालमेघस्य लक्षणम् ॥ ५ ॥ रा०

अर्थ—आजारानें लोक व्याकुळ होऊन जातील. राजे लोकांत परस्पर भांडण होईल. पाऊस बिलकुल पडणार नाहीं. (मध्यप्रदेशांत चांगला पाऊस पडेल. हेमीं पाणी पुष्कळ सांठेल. सर्व धान्यें चांगलीं पिकतील.—रा० ).

६ नील—सत्पयो दिशति गोकुलपूर्गा वस्त्रतोऽखिलमही परिपूर्णा ।
नीलनाम्नि जलदे जलवृष्टिर्जायते सकलमानवतुष्टिः ॥ ६ ॥ क०
नीलमेघा निरालंबा अल्पा वृष्टिरनर्थता ।
अशोभनं च जीवानां नीलमेघस्य लक्षणम् ॥ ६ ॥ रा०

अर्थ—पाऊस पुष्कळ व चांगला पडेल. ( निळे ढग येतील. पाऊस थोड पडेल—रा० ). सर्व पृथ्वी गाई व वस्त्रें यांणीं भरून जाईल. सर्व लोकांना संतोष होईल. ( लोकांचें अकल्याण होईल. )

७ वरुण—अग्निहोत्रकरणादरा द्विजा स्युःसदाधिकमुदोऽखिलाः प्रजाः ।
अर्णवेन सदृशं महीतलं वारुणे जलधरे भवेदलम् ॥ ७ ॥ क०
एकार्णवं महाघोरं वर्षं वायुसमन्वितं ॥
वरुणो नाम मेघोऽसौ समुद्रांतं प्रवर्षति ॥ ७ ॥ रा०

अर्थ—ब्राह्मणलोक अग्निसेवा करण्याविषयीं फार उत्सुक होतील. सर्व लोकांना फार आनंद होईल. पृथ्वीवर पाऊस पुष्कळ पडून ती समुद्रासारखी दिसेल. ( पाऊस पडत असतांना वाराही सुटेल.—रा० ).

८ वायु—नैवांबुवृष्टिं कुरुते सुरेशः समस्तधान्यांबरकस्य नाशः ।
धराधरः स्याद्यदि वायुनामा जनव्रजस्तर्हि विहीनधामा ॥ ८ ॥ क०
महावाताः प्रवर्तंते महाघोरं महद्भयम् ।
फलंति सर्वधान्यानि वायुमेघस्य लक्षणम् ॥ ८ ॥ रा०

अर्थ—पाऊस बिलकुल पडणार नाहीं. सर्व धान्यें व वस्त्रें यांची नासाडी होईल. लोकांना घरें सोडून भटकावें लागेल. ( सोसाट्याचे वारे सुटतील. संकटें ओढवतील. मोठें भय उत्पन्न होईल. सर्व धान्यें पिकतील.—रा० ).

९ तमस्-रोगाधिक्यं जायते नीरशोषश्चोरोद्रेको नैवधान्यादिपोषः ।
यस्मिन्वर्षे स्यात्तमोनाममेघस्तस्मिन्दुःखं प्राप्नुयाल्लोकसंघः ॥ ९ ॥ क०
महावर्षं महामेघगर्जितं मेघमंडलं ।
एकार्णवं तमोमेघः सागरांतं प्रवर्षति ॥ ९ ॥ रा०

अर्थ—आजार फार फैलावेल. सर्वत्र पाणी आटेल. चोरांचा सुळसुळाट होईल व लोकांना फार क्लेश होतील. ( भयंकर पाऊस पडेल. मेघांचा भयंकर गडगडाट होईल. )

## संक्षिप्तफलानि.

जलं स्वल्पं च आवर्ते संवर्ते जलपूर्णकः ।

पुष्करे जलमल्पं च द्रोणस्तु अतिनीरदः ॥ १ ॥
अतिवृष्टिर्नीलमेघे कालमेघे जलाल्पता ।
वारुणं बहुनीरं च तमे तु जलमल्पकम् ॥ २ ॥
वायुमेघे नीरनाशो नवमेघफलानि वै । क०
आवर्ते मध्यमावृष्टिः संवर्ते वायुपीडनम् ।
पुष्करे मंदतोयं स्याद्द्रोणे वृष्टिरनेकधा ॥ १ ॥
अल्पा वृष्टिश्च कालाख्ये नीलमेघः सुवृष्टिदः ।
वारुणेकार्णवं प्रोक्तं वायौ वर्षं विनश्यति ।
तमस्येकार्णवं प्रोक्तं मुनिभिर्निश्चितं पुरा ॥ २ ॥ रा०

**अर्थ**—१ आवर्तमेघ असेल तर–थोडा ( मध्यम–रा० ) पाऊस पडेल.
२ संवर्त ,, ,, ,, पुष्कळ पाऊस पडेल ( वाऱ्यापासून त्रास होईल रा० )
३ पुष्कर ,, ,, ,, थोडा पाऊस पडेल.
४ द्रोण ,, ,, ,, अतिशय पाऊस पडेल.
५ नील ,, ,, ,, ,, ,, ,,
६ काल ,, ,, ,, पाऊस थोडा पडेल.
७ वारुण ,, ,, ,, पुष्कळ पाऊस पडेल.
८ वायु ,, ,, ,, पाऊस नाहींसा होईल.
९ तमस् ,, ,, ,, थोडा ( अतिशय—रा० ) पाऊस पडेल.

## देशविशेषेण मेघानयनम् तत्फलानि च. ( कल्पलता ).

१ शाके द्विगुणिते सैके चतुर्भक्तेऽवशेषके ।
ऐरावतो महाकायः कुंजितो वामनो घनः ॥ १ ॥
भागीरथीहिमवतोरंतरं यः प्रदेशकः ।
तत्राम्बुवृष्टिकर्ता स्यान्मेघ ऐरावतादिकः ॥ २ ॥

**अर्थ**—शककालास २ नीं गुणावें. गुणाकारांत १ मिळवावा. मिळवणीस ४ नीं भागावें. बाकी १ राहील तर ऐरावत, २ राहील तर महाकाय, ३ राहील तर कुंजित, शून्य अथवा ४ राहिल्यास वामन.

भागीरथी व हिमालय यांच्यामध्यें जो प्रदेश आहे त्या भागांत वर सांगितल्याप्रमाणें ऐरावत आदिकरून मेघ उत्पन्न होऊन त्यांपासून पाऊस मिळतो.

२ शाकस्त्रिगुणितः सैको वेदहृच्छेषतो घनः ।

मंदनामा मंदभद्रो मृगमंदो महास्वनः ॥ १ ॥
जान्हवीविंध्याचलयोर्मध्ये यः स्यात्प्रदेशकः ।
मंदादिको जलधरस्तत्र वर्षणकृद्भवेत् ॥ २ ॥ क०

**अर्थ**—शककालास ३ नीं गुणावें. गुणाकारांत १ मिळवावा. बेरजेस ४ नीं भागावें. बाकी १, २, ३, ४ राहिल्यास क्रमानें १ मंद, २ मंदभद्र, ३ मृगमंद व ४ महास्वन असे मेघ उत्पन्न होतात.

भागीरथी व विंध्याद्रि ( सातपुडा ) यांच्यामध्यें जो प्रदेश आहे त्यांत मंद आदिकरून मेघ उत्पन्न होतात व त्यांपासून पाऊस मिळतो.

३ एकयुक्ते शके वेदैर्भक्ते शेषांकतो घनः ।
विद्युज्जिव्हो महोर्म्याख्यः शीघ्रगो मंदविक्रमः ॥ १ ॥
पृथिव्यां यः प्रदेशःस्याद्गोदाविंध्याद्रिमध्यगः ।
विद्युज्जिव्हादिको मेघो वृष्टिकृत्तत्र जायते ॥ २ ॥ क०

**अर्थ**—शकांत १ मिळवून त्या बेरजेस ४ नीं भागावें, बाकी १ राहिल्यास विद्युज्जिव्ह; २ राहिल्यास महोर्मि, ३ राहिल्यास शीघ्रग व ४ राहिल्यास मंदविक्रम या नांवांचे मेघ अनुक्रमें उत्पन्न होतात, व हे मेघ विंध्याचल व गोदावरी यांच्या दरम्यानचा जो प्रदेश त्यामध्यें वृष्टि करणारे होतात.

४ वन्हिभिर्भाजिते शाके घनः शेषांकसंमितः ।
सिंधुमाता महाकायः पर्जन्याख्यः प्रकीर्तितः ॥ १ ॥
गोदाकृष्णासरिन्मध्ये यः स्याद्भूमिप्रदेशकः ।
करोति वर्षणं तत्र सिंधुमातादिकोघनः ॥ २ ॥ क०

**अर्थ**—शककालास ३ नीं भागावें १ बाकी राहिल्यास सिंधुमाता, २ राहिल्यास महाकाय व ३ राहिल्यास पर्जन्य असे मेघ उत्पन्न होतात.

गोदावरी व कृष्णा या नद्यांच्यामध्यें जो प्रांत आहे त्यांत पाऊस पाडण्याचा अधिकार सिंधुमाता वगैरे मेघाकडे असतो.

५ एकेन सहितः शाको नेत्रहृच्छेषतो घनः ।
संवर्तनामा प्रथमो द्वितीयः पुष्कराभिधः ॥ १ ॥
कृष्णातो दक्षिणे भागे यावद्रामेश्वरावधि ।
वृष्टिकृत्तत्र देशे स्यात्संवर्ताद्यः पयोधरः ॥ २ ॥ क०

**अर्थ**—शककाळांत १ मिळवावा. मिळवणीस २ नीं भागावें. बाकी १ राहील

तर संवर्त व २ राहील तर पुष्कर याप्रमाणें मेघ उत्पन्न होतात व ते कृष्णानदीच्या दक्षिणतीरापासून तहत रामेश्वरापर्यंत पावसाचे अधिकारी असतात.

## वृष्टिप्रमाणम्.

चतुराढौ गुरुशुक्रौ त्र्याढकौ शशिचंद्रजौ ।
द्व्याढकं रविभौमौ च एकमाढकमर्कजः ॥ १ ॥
प्रवर्षंति ग्रहाः स्वाब्दे पूर्वोक्तपरिमाणतः ।
दशभागाः समुद्रेषु षड्भागाः पर्वतेषु च ॥ २ ॥
चत्वारो भुवि पर्जन्यो ह्येवं वर्षति च त्रिधा ॥ राजावलि.

अन्यच्च—समुद्रे दशभागाश्च षड्भागाः पर्वतोपरि ।
भूमौ चत्वारि भागाः स्युरित्येतन्मेघयामले ॥ १ ॥ रा०

अर्थ—गुरु किंवा शुक्र मेघेश झाले असतां ४ आढक पाऊस पडतो.

| | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| चंद्र ,, | बुध | ,, | ,, | ,, | ३ | ,, | ,, | ,, |
| सूर्य ,, | मंगळ | ,, | ,, | ,, | २ | ,, | ,, | ,, |
| व | शनि | ,, | झाला | ,, | १ | ,, | ,, | ,, |

पर्जन्याचें हें जें प्रमाण सांगितलें आहे यांपैकीं १० भाग पाऊस समुद्रावर, ६ भाग पर्वतावर व ४ भाग पृथ्वीवर या प्रमाणांत पडतो.

## आढकम्. ( आढक ह्मणजे किती ? )

१ देवमान—षष्ठियोजनविस्तीर्णं शतयोजनमुन्नतम् ।
आढकस्य प्रमाणं तु देवमानेन गण्यते ॥ १ ॥ रा०

अर्थ—४ कोस ह्मणजे १ योजन याप्रमाणें ६० योजनें लांबरुंद व १०० योजनें उंच इतक्या आकारास आढक ह्मणतात.

२ मानवमान—द्रोणस्तु खार्याः खलु षोडशांशः स्यादाढको द्रोणचतुर्थभागः ।
प्रस्थश्चतुर्थांश इहाढकस्य प्रस्थांऽघ्रिराद्यैः कुडवः प्रदिष्टः ॥ १ ॥
पलद्वयं तु प्रसृतिर्द्विगुणा कुडवं भवेत् ।
चतुर्भिः कुडवैः प्रस्थश्चत्वार आढकः स्मृतः ॥ २ ॥

अर्थ—कोष्टकरूपानें

| | |
|---|---|
| ४ तोळे = १ पल. | ४ कुडव = १ प्रस्थ ( शेर ). |
| २ पल = १ प्रसृति ( पसा ). | ४ प्रस्थ = १ आढक ( पायली ). |
| २ प्रसृति = १ कुडव ( पावशेर ). | ४ आढक = १ द्रोण ( कलश ). |
| | १६ द्रोण = १ खारिका ( १ घनहात ). |

## द्वादशनागानयनम्.

एकंदर १२ नाग आहेत असें कल्पिलें असून, त्यापैकीं प्रकृत संवत्सरांत कोणता नाग आहे हें काढण्याची रीति :—

शाको द्वाभ्यां युतः सूर्यैर्भक्तः शेषांकतः फणी ।
सुबुद्धाख्यो नंदसारी कर्कोटाख्यः पृथुश्रवाः ॥ १ ॥
वासुकिस्तक्षकाख्यः स्यात्कंबलोऽश्वतरस्तथा ।
हेममाली नरेंद्राख्यो वज्रदंष्ट्रो वृषाभिधः ॥ २ ॥ क०

**अर्थ**—शककालाची जी संख्या असेल तींत २ मिळवावेत व त्या बेरजेस १२ नीं भागावें. बाकी जी उरेल त्यावरून त्या वर्षीं कोणत्या नांवाचा नाग आहे हें समजावें. बाकी १ उरला तर सुबुद्ध ( सुबुध्न ), २ उरले तर नंदसारी, ३ उरले तर कर्कोट, ४ उरले तर पृथुश्रवस्, ५ उरले तर वासुकि, ६ उरले तर तक्षक, ७ उरले तर कंबल, ८ उरले तर अश्वतर, ९ उरले तर हेममाली, १० उरले तर नरेंद्र, ११ उरले तर वज्रदंष्ट्र व १२ उरले तर वृष याप्रमाणें १२ नागांचीं नांवें समजावीत.

## द्वादशनागफलानि. क०

१ **सुबुद्ध**—सुबुद्धनामसहितो भुजंगो जायते यदा ।
नृणां सुबुद्धिकर्ता स्यान्मध्यवृष्टिप्रदायकः ॥ १ ॥

२ **नंदसारी**-यस्मिन्वर्षे नागराजो नंदसार्यभिधानकः ।
तस्मिन्वर्षे वृषा वृष्टिं कुरुते नंदते जनः ॥ २ ॥

३ **कर्कोट**—यदा कर्कोटनामा च जायते पवनाशनः ।
तदा नांबु ददातींद्रो मरणं स्यान्महीपतेः ॥ ३ ॥

४ **पृथुश्रवा**-पृथुश्रवा भुजंगेंद्रो जायते यत्र वत्सरं ।
तत्र कीलालमल्पं स्यात्सस्यहानिर्न संशयः ॥ ४ ॥

५ **वासुकि**—उदेति यत्र वत्सरे स वासुकिर्भुजंगमः ।
प्रभूतधान्यदायकः सुवृष्टिकारको वृषा ॥ ५ ॥

६ **तक्षक**—तक्षकाभिधनागेंद्रो जायते यत्र वत्सरे ।
तत्र मध्यमवृष्टिः स्याद्विग्रहो नृपतेर्मृतिः ॥ ६ ॥

७ **कंबल**—यदैव कंबलाभिधो भुजंगमः प्रजायते ।

---

१ 'सुबुध्रा' असाही पाठ आहे. २ सुबुध्न असा पाठभेद आहे. ३ स्यानच्याऐवजीं च असा पाठभेद. ४ 'वृषा' याबद्दल 'महा' असा पाठभेद. ५ 'यदा कर्कोटको नाम' असा पाठभेद.

तदास्ति मध्यमं जलं समस्तधान्यमुत्तमम् ॥ ७ ॥

८ **अश्वतर**-यस्मिन्वर्षे भुजंगेंद्रो जायतेऽश्वतराभिधः ।
न वर्षति जलं वज्री तदा सस्यं विनश्यति ॥ ८ ॥

९ **हेममाली**-हेममालिनि नागेंद्रे जायते सुफला[1] मही ।
समस्तधान्यसंपूर्णा प्रभूतजलवृष्टितः ॥ ९ ॥

१० **नरेंद्र**—यत्र संवत्सरे नागो नरेंद्रो नामतः शुभः ।[2]
तदा स्यान्निखिला पृथ्वी प्रभूतजलपूरिता ॥ १० ॥

११ **वज्रदंष्ट्र**-यत्र संवत्सरे नागो वज्रदंष्ट्राभिधानकः ।
तदांबुवर्षणं नैव सर्वसस्यविनाशनम् ॥ ११ ॥

१२ **वृष**—यदा वृषाभिधानस्य भुजगस्योदयो भवेत् ।
तदा सस्यादिकाल्पत्वं सुतरामीतितो भयम् ॥ १२ ॥ क०

**तात्पर्य—**

१ **सुबुद्ध**—मनुष्यांना चांगली वासना होईल. पाऊस मध्यम पडेल.

२ **नंदसारी**-पाऊस पुष्कळ पडेल व लोकांना आनंद होईल.

३ **कर्कोट**—पाऊस पडणार नाहीं व राजाला मृत्यु प्राप्त होईल.

४ **पृथुश्रवा**-पाऊस थोडा पडेल व धान्याची नासाडी होईल.

५ **वासुकि**-पाऊस चांगला पडेल व धान्य पुष्कळ येईल.

६ **तक्षक**—पाऊस मध्यम पडेल, लढाई जुंपेल व राजास मरण येईल.

७ **कंबरू**—पाऊस मध्यम पडेल; पण सर्व पिकें सर्वोत्कृष्ट साधतील.

८ **अश्वतर**-पाऊस पडणार नाहीं व पिकाची नासाडी होईल.

९ **हेममाली**-सर्व पृथ्वी फळांनीं गजबजून जाईल. पाऊस पुष्कळ पडून सर्व धान्यें विपुल होतील.

१० **नरेंद्र**—सर्व पृथ्वीभर पाणी तुडुंब होईल.

११ **वज्रदंष्ट्र**-पाऊस बिलकुल पडणार नाहीं व सर्व पिकें वाळून जातील.

१२ **वृष**—धान्य वगैरे थोडें पिकेल व उंदीर, टोळ वगैरेपासून त्रास होईल.

---

१ ' सुफला ' याच ऐवजीं ' त्वखिला ' असा पाठभेद.

२ ' नरेंद्रसंज्ञ उरगो यत्र वर्षे प्रजायते ' असा पाठभेद.

## विंशोपका * ( विश्वा ) नयनम्.

१ शाके रामैराहते सप्तभक्ते शेषं द्विघ्नं पंचयुङ्नीरवृष्टिः ।
लब्धं शाकं कल्पयित्वा मुहुस्तत्पूर्वं सर्वं कर्म सम्यग्विधेयम् ॥ १ ॥
धान्यं तृणं शीतमुष्णं वायुर्वृद्धिं विनाशनम् ।
अंतिमो विग्रहो ज्ञेयो गणितार्णवपारगैः ॥ २ ॥ क०
त्रिघ्नः शाकः सप्तभक्तोऽवशिष्टं द्विघ्नं युक्तं पंचभिः स्यात्क्रमेण ।
आपो धान्यं तृणशीतोष्णवायुर्वृद्धिर्नाशो विग्रहो लब्धतोऽपि ॥ १ ॥ रा०

**अर्थ**— शककालास ३ नीं गुणून गुणाकारास ७ नीं भागावें. बाकी उरेल त्याची दुप्पट करावी व त्यांत ५ मिळवून येईल ती १ वृष्टि. भाग जो बसला असेल तोच शककाल आहे असें दर खेपेस समजून वर सांगितलेली सर्व क्रिया पुनः पुनः करावी. ह्मणजे क्रमानें २ धान्य, ३ तृण, ४ शीत, ५ उष्ण, ६ वायु, ७ वृद्धि, ८ विनाशन व ९ विग्रह असे निष्पन्न होतील.

२ शाकोऽब्धिगुणितः शैलैर्भक्तः शेषं द्विसंगुणम् ।
एकेन सहितं क्षुत्स्यादेवमग्रे मुहुः फलात् ॥ ३ ॥
तृष्णा निद्रा तथालस्यमुद्यमः शांतिरग्रतः ।
क्रोधो दंभस्तथा भेदो मैत्री स्यात्तदनंतरम् ॥ ४ ॥
ततः स्याद्रसनिष्पत्तिः फलनिष्पत्तिरग्रतः ।
उत्साहस्तदनुप्रोक्तः क्रमोऽयं सर्वसंमतः ॥ ५ ॥ क०
शाकः सागरताडितो नगहृतो लब्धं निधाय क्वचि-
च्छेषं दस्रहतं शशांकसहितं क्षुत्तृट्सुषुप्तिः क्रमात् ॥
आलस्यं तत उद्यमश्च कथितः शांतिस्तथा क्रोधयुक्
दंभो मैत्रमथोत्सवश्च गदितः पापं च पुण्यं तथा ॥ २ ॥ रा०

**अर्थ**—शककालास ४ नीं गुणून येईल त्या गुणाकारास ७ नीं भागावें. बाकी राहील तीस २ नीं गुणून त्या गुणाकारांत १ मिळवावा. येईल ती १० क्षुधा. भागाकार आला असेल तोच शककाल असें समजून पुनः पुनः वरच्याप्रमाणेंच ४ नीं

---

* विंशोपका ह्मणजे शब्दार्थाप्रमाणें जवळ जवळ २० संख्या. कोणत्याही संवत्सरांत पर्जन्यवृष्टि वगैरे १०५ गोष्टी निघतात त्या किती किती विश्वे येतील हें काढण्याची रीती. २० संख्या ह्मणजे पूर्ण फळ समजून त्यांत चालू संवत्सरांत पर्जन्यवृष्टि वगैरेची जी संख्या येईल तिला विश्वे ह्मणतात. चवथ्या श्लोकाच्या टिपेंत दिल्याप्रमाणें अंक ज्या मानानें कमी अधिक अपतील त्या मानानें वाईट चांगलीं फळें समजणेचीं आहेत. याच विंशोपका आणण्याचा प्रकार ग्रंथांतरीं दिला आहे तो असा—

गुणून ७ नीं भागावें. बाकीस २ नीं गुणून १ मिळवावा ह्मणजे क्रमानें ११ तृष्णा, १२ निद्रा, १३ आलस्य, १४ उद्यम, १५ शांति, १६ क्रोध, १७ दंभ, १८ भेद, १९ मैत्री, २० रसनिष्पत्ति, २१ फलनिष्पत्ति व २२ उत्साह असे निष्पन्न होतात. ( राजावलीच्या मतप्रमाणें भेद, रसनिष्पत्ति, फलनिष्पत्ति काढण्याचा प्रकार पुढें सांगितला असून त्यांच्याऐवजीं पाप, पुण्य याचप्रमाणें काढावें असें आहे. )

---

रामनिघ्ने शके सप्तभक्ते पुनर्द्विघ्नशेषं शरोपेतमाद्यं पुनः ।
क्रमाद्वृष्टिरन्नं च शीतं तृणं मारुतश्चातपो जंतुवृद्धिः क्षयो विग्रहः ॥ १ ॥ रा०
( शाकं त्रिनिघ्नं नगभाजितं च शेषं द्विनिघ्नं शरसंयुतं च ॥
वर्षं धान्यं तथा शीतं तृणमुष्णं च मारुतं । प्रजावृद्धिः क्षयश्चैव राजविग्रह एव च ॥
उग्रं पुण्यं च पापं च द्विहीनं व्याधिनाशनं । आचारश्च दुराचारो मरणं जननं तथा ॥
उपद्रवं च स्वास्थ्यं च चोराधिक्यं च नाशनं । अग्नेर्भयं च नाशं च विद्यादेतानि च क्रमात् ॥ ) रा०

मतांतरे--शकाब्दं वेदगुणितं सप्तभिर्भागमाहरेत् । तच्छेषं द्विगुणीकृत्य रूपं चैत्र तु मिश्रितं ॥ १ ॥
क्षुधा तृष्णा च निद्रा च आलस्योद्योगमेव च । शांतिः क्रोधस्तथा दंभो मित्रभदश्चनैष्ठिकं ॥ २ ॥
ततस्तु रसनिष्पत्तिः फलनिष्पत्तिरेव च । उत्साहश्चैव विज्ञेयः क्रमादेते त्रयोदश ॥ ३ ॥ रा०
शाकोंगघ्नोंकहृच्छेषं द्विघ्नं व्याद्यमवाप्नतः । नव स्थाप्यं यदंकं च शलभैः शूकमूषकैः ॥ १ ॥
हेम ताम्रं स्वचक्रं च परचक्रमिति क्रमात् । तथैव वर्षणं ज्ञेयमवर्षणफलं क्रमात् ॥ २ ॥—रा०
शकाब्दं वसुभिर्निघ्नं नवभिर्भागमाहरेत् । शेषं च द्विगुणीकृत्य त्रिभिर्युक्तं तु कारयेत् ॥ १ ॥
उग्रं रसफलोत्पत्तिर्व्याधिश्च व्याधिनाशनं । सदाचारस्त्वनाचारो मरणं जनिरेव च ॥ २ ॥
देशोपद्रवसुस्थं च चोराकुलभयं तथा । चोरोपशमनं चाग्निभयं साम्यं क्रमेण तु ॥ ३ ॥ रा०
( वसुघ्नं नंदसंभक्तं शकाच्छेषं यमैर्हतं । त्रियुतं व्याधयस्तद्वल्लब्धं चैव पुनः पुनः ॥ १ ॥
व्याधयश्चोपशमनमाचारो दुःप्रवर्तनं । मरणानि च जन्मानि देशोपद्रवमेव च ॥ २ ॥
देशस्वास्थ्यं चोरभयं चोरनाशनमेव च । अग्निभयं चाग्निनाशं दुष्टानां निग्रहस्तथा ॥ ३ ॥
शिष्टानां प्रतिपालं च क्षुधा तृष्णा यथाक्रमं । निद्रालस्ये तथोद्योगं शांतिः क्रोधश्च दंभकं ।
मित्रभेदः सुहृत्त्वं च रसनिष्पत्तिरेव च । फलनिष्पत्तिरित्येते प्रतिसंवत्सरे फलम् ॥ ४ ॥ रा०.

अन्यच्च—

वसुघ्नं नंदसंभक्तं शकाच्छेषं द्विसंगुणं । त्रियुक्तं व्याधयश्चैव पुनश्चैव क्रमेण तु ॥ १ ॥
व्याधेश्चाथोपशमनमाचारो दुष्प्रवर्तनं । मरणानि च जन्मानि देशोपद्रवमेव च ॥ २ ॥
मृगक्षयः कीटभयं कीटनाशनमेव च । मूषकाद्भयनाशौ च रूपोपद्रवनाशनम् ॥ ३ ॥
कामो लोभश्च मोहश्च मदमत्सर एव च । सुखदुःखे च भोगश्च विडंबो मनवेदनं ॥ ४ ॥
द्वेषः प्रतिष्ठाऽप्रतिष्ठा च द्यूतमत्तन स्त्रियः । धातुर्वादं भयं शौर्यं दुष्टनिग्रह एव च ॥ ५ ॥
शिष्टानां पालनं सत्यासत्यविश्वास एव च । विश्वासघातोऽथ दया निर्दयत्वं तु न्यायकं ॥ ६ ॥
अन्यायं क्रमशश्चैव ज्ञातव्यं चाब्दजं फलं । ज्ञानाज्ञाने च कापट्यं निष्कापट्यं च धार्मिकं ॥ ७ ॥
अधार्मिकमिति ज्ञेयं संवत्सरफलं तथा । रा०

अन्यच्च—

वसुघ्नं नवसंभक्तं शाकशेषं यमैर्हतं । त्रियुतं व्याधयश्चैव लब्धं चैव पुनः पुनः ॥ १ ॥

३ शाके सप्तगुणे नंदैर्भाजिते सति शेषकम् ।
द्विघ्नं त्रियुतं शलभाः कर्मैत्रं लब्धतो मुहुः ॥ ६ ॥
अग्रे शूकौ मूषकौ: स्युरतिवृष्टिस्तदग्रतः ।
अनावृष्टिः स्वचक्रं च परचक्रं च नाणकम् * ॥ ७ ॥
ततो रत्नानि वस्त्राणि घृतं तैलं दुकूलकम् ।
ऊर्णावस्त्राणि क्षौमाणि वल्कलं भूर्जपत्रकम् ॥ ८ ॥
सुवर्णं स्यात्ततस्ताम्रं वंगं तदनु रौप्यकम् ।
लोहं खर्परसूताख्यं रीतिर्नागौ च घोषकम् ॥ ९ ॥ क०

**अर्थ**—शककालास ७ नीं गुणावें व गुणाकारास ९ नीं भागावें. बाकी राहील तिची दुप्पट करावी व तींत ३ मिळवावेत. येईल ते २३ शलभ. पुढें याचप्रमाणें भाग बसला असेल तोच शककाल आहे असें समजून हीच क्रिया करावी. म्हणजे क्रमानें २४ शुक, २५ मूषक, २६ अतिवृष्टि, २७ अनावृष्टि, २८ स्वचक्र, २९ परचक्र, ३० नाणक (किंवा परचक्रनाश), ३१ रत्न, ३२ वस्त्र, ३३ घृत, ३४ तैल, ३५ दुकूल, ३६ ऊर्णावस्त्र, ३७ क्षौम (रेशमी कापड), ३८ वल्कल, ३९ भूर्जपत्र, ४० सुवर्ण, ४१ ताम्र, ४२ वंग, ४३ रौप्य, ४४ लोह, ४५ खर्परसूत (=कलखापर), ४६ पित्तल (पितळ), ४७ (शिसें) शीस, व ४८ घोषक (कांस्य) याप्रमाणें निष्पन्न होतात.

४ शाकेऽष्टगुणिते नंदैर्भाजिते सति शेषकम् ।
द्विघ्नं त्रियुक्तमुर्वी स्यात्प्रकृतिर्लब्धतोऽग्रतः ॥ १० ॥
सौम्यस्वभावः संप्रोक्तः स्यात्पापप्रकृतिस्ततः ।
पुण्यस्वभावस्तदनु व्याधिर्भेषजमग्रतः ॥ ११ ॥
आचारः स्यादनाचारो मरणं खलु जन्म च ।
स्याद्देशोपद्रवो नूनं देशस्वास्थ्यं ततः परम् ॥ १२ ॥
चोरभीश्चोरशमनमग्निभीरग्निनाशनम् ।
विषभुक्तिर्विषशमः सेवकत्वं ततः परम् ॥ १३ ॥

---

व्याधिश्चाथोपशमनमाचारस्तु उपप्लवः । मरणं जननं चैव देशोपद्रव एव च ॥ २ ॥
स्वस्थं चोराग्निनाशश्च मूषका मृगकीटकाः । पक्षिनागतुरंगाश्च अजगोमहिषाः स्मृताः ॥ ३ ॥
स्वचक्रं परचक्रं च न्यायस्त्वन्याय एव च । अनाचा स्तु कापट्यं दंभोऽहंकार एव च ॥ ४ ॥
अभिमानस्तु मात्सर्यं निर्दयत्वं तथैव च । दया स्वर्णं तथा रौप्यं पित्तलं कांस्यमेव च ॥ ५ ॥
लोहं सीसं हिंगुलाख्यं क्रमादुक्तं पुरातनैः । इतिवृष्ट्यादिकं चैव यथाचांकस्तथा फलम् ॥ ६ ॥ रा.

* 'नाशकम्' असा पाठभेद असावा असें वाटतें. त्याचा अर्थ परचक्रनाश.

स्वामित्वं स्यान्निजधनं ततः परधनं भवेत् ।
द्यूतं च पुंश्चलीकर्म जारणं जारणात्ययः ॥ १४ ॥
मारणं मारणशमः स्तंभनं स्तंभनात्ययः ।
मोहनं[७९] मोहनशमस्ततस्तूच्चाटनं भवेत् ॥ १५ ॥
उच्चाटनोपशमनं स्याद्वशीकरणं ततः ।
वशीकरणनाशः स्याद्वातप्रकृतिरग्रतः ॥ १६ ॥
स्यात्पित्तप्रकृतिः पश्चात्कफप्रकृतिरीरिता ।
द्वंद्वजं सन्निपातश्च यशश्चापयशो भवेत् ॥ १७ ॥
गर्वोग्रते[९३] प्रपंचः स्याद्भूतबाधा ततः परम् ।
भूतबाधोपशमनं ग्रहदोषोऽथ तच्छमः ॥ १८ ॥ क०

**अर्थ**--शककालास ८ नीं गुणावें. गुणाकारास ९ नीं भागावें. बाकी राहील तिची दुप्पट करून तींत ३ मिळवावेत. ह्मणजे ४९ उग्रप्रकृति समजते. भाग बसला असेल तोच शककाल समजून वरच्याप्रमाणेंच क्रिया वारंवार करीत गेलें ह्मणजे क्रमानें ५० सौम्यप्रकृति, ५१ पापप्रकृति, ५२ पुण्यप्रकृति, ५३ व्याधि, ५४ भैषज्य, ५५ आचार, ५६ अनाचार, ५७ मरण, ५८ जनन, ५९ देशोपद्रव, ६० देशस्वास्थ्य, ६१ चोरभय, ६२ चोरनाश, ६३ अग्निभय, ६४ अग्निनाश, ६५ विषभय, ६६ विषनाश, ६७ सेवकत्व, ६८ स्वामित्व, ६९ निजधन, ७० परधन, ७१ द्यूत, ७२ पुंश्चलीकरण, ७३ जारण, ७४ जारणनाश, ७५ मारण, ७६ मारणनाश, ७७ स्तंभन, ७८ स्तंभननाश, ७९ मोहन, ८० मोहननाश, ८१ उच्चाटन, ८२ उच्चाटन-नाश, ८३ वशीकरण, ८४ वशीकरणनाश, ८५ वातप्रकृति, ८६ पित्तप्रकृति, ८७ कफप्रकृति, ८८ द्वंद्वज, ८९ सन्निपात, ९० यश, ९१ अपयश, ९२ गर्व, ९३ उग्रता, ९४ प्रपंच, ९५ भूतबाधा, ९६ भूतबाधोपशम, ९७ ग्रहदोष, ९८ ग्रहदोषो-पशम असे निष्पन्न होतात.

५ पंचभिः सप्तभिर्गोभिरीशैः पृथक् ताडिते वै शके सप्तभक्ते सति ।
शेषकं व्याहतं पंचयुक् स्युः क्रमादंडजो जारजः स्वेदजोद्भिज्जकाश्चै ॥१९॥

**अर्थ**--शककालास क्रमानें ५।७।९ व ११ यांनीं गुणून प्रत्येक गुणाकारास ७ नीं भागावें, व प्रत्येक बाकींत ५ मिळवावेत, ह्मणजे अनुक्रमानें ९९ अंडज, १०० जारज, १०१ स्वेदज व १०२ उद्भिज्ज असे निष्पन्न होतील.

---

१ शकः पंचभिः सप्तभिर्गोभिरीशैश्चतुर्धा हतः सप्तभक्तावशिष्टम् ।
विनिघ्नं शरैर्युक्तमुद्भिज्जस्वेदजारांडजानां च विंशोपकाः स्युः ॥ १ ॥

६ खंखांभ्रंतर्कभयमैः कलेश्चशेषकं भजेत् ।
फलं हि पुंण्यंमीरितं नखंच्युतं तु पांतकम् ॥ २० ॥ *

अर्थ--शेष कलीस २१६००० नीं भागावें भागाकार येईल तें १०३ पुण्य समजावें. तें पुण्य २० तून वजा केलें म्हणजे बाकी उरेल तें १०४ पातक समजावें.

७ वृष्ट्यादि पातकांतां ये क्रमात्प्रोक्तास्तु विंशकाः ।
तद्योगे नखहृच्छेषे[3] सर्वनिष्पत्तिरीरिता ॥ २१ ॥

अर्थ—वृष्टीपासून पातकापर्यंत जे १०४ विंशोपक आले आहेत त्या सर्वांची बेरीज करून तिला २० नीं भागावें. बाकी उरेल ती १०५ सर्वनिष्पत्ति समजावी.

इति विंशोपकाः

## प्रकारान्तरेण विश्वानयनम्. २१०

शाकं त्रिगुणितं चैव वेदभक्तं तथैव च ।
शेषं फलमवाप्नोति घनादौ मेघ उच्यते ॥ १ ॥
घना एकादश प्रोक्ता द्रोणः पंचदशः स्मृतः ।
पवनः सप्तकं चैव षड्भिः प्रोक्तं तु पंगुलम् ॥ २ ॥
घने तु शारदं धान्यं द्रोणे सस्यं न संशयः ।
पवने फलिता वृक्षा अल्पवृष्टिस्तु पंगुले ॥ ३ ॥ रा०

अर्थ—दुसऱ्या रीतीनें मेघाविषयीं विश्वे सांगून त्यांचीं फलें खालीं दिलीं आहेत. शककालास ३ नीं गुणून गुणाकारास ४ नीं भागावें. शेष १ उरल्यास घन नांवाचा मेघ त्या संवत्सरांत असतो व त्याचे विश्वे ११ असतात. बाकी २ उरल्यास द्रोण नांवाचा मेघ येतो त्याचे विश्वे १५ असतात. ३ बाकी उरल्यास पवन नांवाचा मेघ येतो. त्याचे विश्वे ७ असतात. बाकी० उरल्यास पंगुल नांवाचा मेघ असतो त्याचे विश्वे ६ असतात. त्यांचीं फलें—

१ घन = शरदृतूंत येणारीं पिकें चांगलीं येतील.
२ द्रोण = सर्व पिकें खालीनें चांगलीं पिकतील.
३ पवन = झाडांना फळें चांगलीं येतील.
४ पंगुल = पाऊस थोडा पडेल.

---

* १ कलिशेषं ततः स्थाप्यं खखखाभ्रांकवेदयुक् ।
कलिभक्तं च पुण्यं हि पापं तन्न्यूनविंशतिः ॥ १ ॥ रा०

२ 'पातकं यावत्' असा पाठभेद आहे. ३ 'च्छेषात्' असा पाठभेद आहे.

## नक्षत्रवाहनम्.

सूर्यर्क्षाद्दिनभं नवाप्तमवशिष्टे घोटको जंबुको ।
मंडूकाविमयूरमाखुमहिषौ स्याद्गर्दभः कुंजरः ॥
वाहानां नवके हये गिरिजलं क्रोष्टाविकौ निर्जलौ ।
स्वल्पा केकिखराखुषु प्रचुरतः शेषेषु वृष्टिः शुभा ॥ १ ॥

अर्थ——सूर्यनक्षत्रापासून तात्कालिक दिननक्षत्रापर्यंत मोजून त्याला ९ नीं भागावें आणि बाकी राहील त्या अनुक्रमानें १ घोडा, २ कोल्हा, ३ मंडूक, ४ मेंढा, ५ मयूर, ६ मूषक, ७ महिष, ८ गर्दभ आणि ९ हत्ती हीं वाहनें जाणावीं. यांचें फल — घोडा वाहन असतां पर्वतावर वृष्टि होईल कोल्हा व मेंढा हीं वाहनें असतां वृष्टि होणार नाहीं. मयूर, गर्दभ आणि मूषक हीं वाहनें असतां स्वल्प वृष्टि होईल. ह्याशिवाय जीं बाकीचीं वाहनें राहिलीं तीं असतां सुवृष्टि होईल. हीं वाहनें मृग महानक्षत्रापासून ते हस्त महानक्षत्रापर्यंत पाहण्याची वहिवाट आहे.

## आयव्यय.

### १ राशिपरत्वेन आयव्ययाः

राशींचे किंवा नक्षत्रांचे आयव्यय काढण्याकरितां अगोदर सूर्यादि ग्रहांच्या दशांची वर्षसंख्या समजली पाहिजे. ही वर्षसंख्या दोन प्रकारची आहे——१ विंशोत्तरी मानानें ह्मणजे मनुष्याचा परमायुर्दाय १२० वर्षें आहे असें समजून व २ अष्टोत्तरी मानानें — ह्मणजे परमायुर्दाय १०८ वर्षें आहे असें समजून. विंशोत्तरीमान पराशरादि ऋषींनीं अंगीकृत असून तेंच नर्मदेच्या दक्षिणेस सर्वत्र प्रचलित आहे. अष्टोत्तरी मान गर्गाचार्यादि ऋषींनीं स्वीकारिलें असून तें नर्मदेच्या उत्तरेस चालू आहे.

### १ विंशोत्तरी मानानें वर्षसंख्या —

इनशशिकुजराहूजीवमंदज्ञकेतुभृगुज इति नवानां कृत्तिकादिक्रमेण ।
तर्नुनयसिनैंजार्यातार्यधायोसटौसौनेरं इति परमायुर्भास्करादि क्रमेण ॥ १ ॥ रा.

श्लोकान्तराणि—

षट् सूर्यो दशकश्चंद्रः सप्तसंख्यो धरासुतः ।
राहुरष्टादशश्चैव जीवे षोडशवत्सराः ॥ २ ॥
एकोनविंशतिः सौरिर्बुधे सप्तदश स्मृताः ।
केतोश्च सप्तवर्षाणि शुक्रे विंशतिवत्सराः ॥ ३ ॥ रा०

अर्थ —

ग्रह–१ सूर्य, २ चंद्र, ३ मंगळ, ४ *राहू, ५ गुरु, ६ शनि, ७ बुध, ८ *केतू, ९ शुक्र.
दशावर्षे–६, १०, ७, १८, १६, १९, १७, ७, २०.

## २ अष्टोत्तरी मानानें वर्षसंख्या—

रवौ रसा त्रिधौ तिथ्यो भौमेऽष्टात्यष्टयो बुधे ।
गुरौ एकोनविंशत्यो शुक्रे वर्षैकविंशतिः ॥
शनौ च दशवर्षाणि राहौ च द्वादशाब्दकम् ॥ ४ ॥ क०

श्लोकान्तरं—

षड् रवौ शरभुवो रजनीशेऽष्टौ कुजे नगभुवः शशिपुत्रे ॥
गोभुवः कुयुगुला गुरुभृग्वोर्भास्करस्य तनये च दशाब्दाः ॥ ५ ॥ क०

ग्रंथांतरे–– रवेरंगानि चंद्रस्य तिथयोऽष्टौ कुजस्य च ।
ज्ञस्यात्यष्टिर्गुरोरेकोनविंशतिरथो भृगोः ॥ ६ ॥
एकविंशतिराख्याता मंदस्य दशसंमिताः ।
राहोर्द्वादश वर्षाणि दशायाः कथितानि च ॥ ७ ॥ रा०

तात्पर्य—

ग्रह–१ सूर्य, २ चंद्र, ३ मंगळ, ४ बुध, ५ गुरु, ६ शुक्र, ७ शनि, *८ राहू.
दशावर्षे–६ १५ ८ १७ १९ २१ १० १२

याप्रमाणें ग्रहांच्या दशांची वर्षसंख्या आहे. आतां—

## राशींचे आयव्यय काढण्याची कृति.

त्रिघ्नेऽत्र वर्षपतिराशिपवत्सरैक्ये पंचान्विते तिथिहृते सति शेषमायः ।
लब्धे हुताशनहते पवनैः समेते तिथ्युध्दृते सति च शेषमितो व्ययः स्यात् ॥ ८ ॥ क०

स्वस्वामिवर्षाधिपवत्सरैक्यं त्रिघ्नं शराढ्यं तिथिभक्तशेषम् ॥
आयोऽथ लब्धं त्रिगुणेषुयुक्तं तिथ्याप्तशेषं व्ययसंज्ञकं स्यात् ॥ ९ ॥ रा०

**अर्थ**—वर्षस्वामी आणि राशिस्वामी यांच्या दशावर्षसंख्यांची बेरीज करून तिला ३ नीं गुणावें. गुणाकारांत ५ मिळवून त्या मिळवणीस १५ नीं भागावें. भागून जी बाकी राहील ती त्या राशीचा आय समजावा.

भाग जो बसला असेल त्यास ३ नीं गुणून त्यांत ५ मिळवावेत आणि त्या मिळवणीस १५ नीं भागून जी बाकी उरेल ती त्या राशीचा व्यय समजावा.

---

* या प्रकरणांत राहुकेतूंच्या दशांची वर्षसंख्या सांगितली आहे, त्याचा उपयोग नक्षत्रांचे आयव्यय काढतांना होतो.

## आयव्ययफलम्.

यस्मिन्वर्षे दीर्घ आयः प्रदिष्टस्तस्मिन्वर्षे लाभदश्चातिसौख्यम् ॥
क्लेशो हानिर्द्रव्यनाशो व्ययश्चेदेतत्सर्वं चिंतयेद्वर्षमूले ॥ १० ॥ क०

अर्थ—ज्या वर्षी आय अधिक असेल त्या वर्षी नफा पुष्कळ होईल व सुख लागेल; व व्यय अधिक असेल तर कष्ट, नुकसान व द्रव्यनाश होईल. हें सर्व वर्षारंभीं समजून घ्यावें.

## प्रकारान्तरेण आयव्ययफलम्.

आयव्ययौ समौ कृत्वा एकहीनं तु कारयेत् ।
अष्टभिस्तुहरेद्भागं शेषांके फलमादिशेत् ॥ १ ॥
एकलाभं द्विलाभं वा लाभं च षट्सप्तयोः ।
त्रिभिः पंचचतुः शून्यं बुद्धिमांस्तु विचारयेत् ॥ २ ॥

अर्थ—आयव्ययाची बेरीज करून त्यांत एक उणा करून ८ नीं भागावें, भागून जे शेष राहतील त्याचें फल पहावें. १।२।६ आणि ७ असे शेष उरले तर लाभ होईल. ३।५।४ आणि शून्य असे शेष राहिले तर लाभ होणार नाहीं असें जाणावें.

## २ नक्षत्राणामायव्ययाः

ग्रहांच्या दशांची वर्षसंख्या पूर्वी सांगितलीच आहे. आतां नक्षत्रांचे आयव्यय समजण्याकरितां अगोदर नक्षत्रांचे स्वामी समजले पाहिजेत ते खालीं दाखवितों.

## नक्षत्रस्वामिनः

**विंशोत्तरीमानेन—**

रविश्चंद्रः कुजो राहुर्जीवो मंदो बुधः शिखी ।
शुक्रो दशापतिश्चैवं कृत्तिकादिक्रमात्ततः ॥ १ ॥ *
उत्तरादिततोऽप्येवमुत्तराषाढकात्तथा ।
वर्षाणि क्रमशो वक्ष्ये रसाँ आशाः शिलोच्चयाः ॥ २ ॥
धृतयः क्षितिपाः अंकभुवः शैलभुवो नगाः ।
नखांश्चाब्दाः क्रमेणैते सूर्यादीनां दशाः स्मृताः ॥ ३ ॥ क०

**अर्थ कोष्टकरूपानें.**

| नक्षत्रें | स्वामी. | दशा वर्षसंख्या. |
|---|---|---|
| १ कृत्तिका—उत्तरा—उत्तराषाढा .... .... | रवि .... .... .... | ६ |
| २ रोहिणी—हस्त —श्रवण .... .... .... | चंद्र .... .... .... | १० |

---

* राशींच्या आयव्यय प्रकरणांतील श्लोक १ पहा.

| | | | |
|---|---|---|---|
| ३ | मृग —चित्रा—धनिष्ठा | मंगळ | ७ |
| ४ | आर्द्रा —स्वाती—शततारका | राहु | १८ |
| ५ | पुनर्वसु—विशाखा–पूर्वाभाद्रपदा | गुरु | १६ |
| ६ | पुष्य —अनुराधा–उ. भाद्रपदा | शनि | १९ |
| ७ | आश्लेषा–ज्येष्ठा —रेवती | बुध | १७ |
| ८ | मघा — मूळ —अश्विनी | केतु | ७ |
| ९ | पूर्वा—पूर्वाषाढा— भरणी | शुक्र | २० |

**अष्टोत्तरी मानेन—**

रविः प्रभू रौद्रचतुष्टयस्य मघात्रयस्याधिपतिः शशांकः ।
हस्ताच्चतुष्कस्य च भूमिपुत्रो मैत्रत्रयस्याधिपतिस्तु सौम्यः ॥ ४ ॥
तोयाच्चतुष्कस्य शनेः प्रभुत्वं गुरुर्धनिष्ठात्रयभाधिपः स्यात् ।
राहुस्त्वहिर्बुध्न्यचतुष्कभस्य स्यात्कृत्तिकादित्रयभस्य शुक्रः ॥ ५ ॥ रा०

**अर्थ कोष्टकरूपानें—**

| नक्षत्रें. | ग्रह. |
|---|---|
| आर्द्रा, पुनर्वसु, पुष्य, आश्लेषा | सूर्य. |
| मघा, पूर्वा, उत्तरा ० | चंद्र. |
| हस्त, चित्रा, स्वाती, विशाखा | मंगळ. |
| अनुराधा, ज्येष्ठा, मूळ, ० | बुध. |
| पूर्वाषाढा, उत्तराषाढा, अभिजित्, श्रवण | शनि. |
| धनिष्ठा, शततारका, पूर्वाभाद्रपदा ० | गुरु. |
| उ० भाद्रपदा, रेवती, अश्विनी, भरणी | राहु. |
| कृत्तिका, रोहिणी, मृग, ० | शुक्र. |

याप्रमाणें नक्षत्रांचे स्वामी समजल्यानंतर राशींचे आयव्यय काढतांना श्लोक ८१९ यांत सांगितलेलीच कृति करावी ह्मणजे नक्षत्रांचे आयव्यय निघतील.

## स्कंदायः

चैत्रादितिथिवारर्क्षयोगतिथ्यर्धसंयुतम् ।
जन्मनक्षत्रसंयुक्तं तत्त्रिधा स्थापितं पदम्
गुणशैलकरैर्हत्वा वसुवन्हिशरैर्हृतम् ॥ १ ॥
आदिशून्ये भवेद्व्याधिर्मध्यशून्ये महद्भयम् ।
अंत्यशून्ये भवेत्धानिस्त्रीण्येयंको विजयी भवेत् ॥ २ ॥

---

१ 'करै' याचे ऐवजीं 'गुणै' असाही पाठ आहे. २ हा पाठ अशुद्ध आहे. 'स्त्र्यंकोऽथ', असा पाठ असावा असें वाटतें. 'त्रिकशून्ये न जीवति' असाही पाठ आहे.

विषमे अर्थलाभः स्यात्समे च समता भवेत् ।
शून्ये शून्यमिति प्रोक्तं स्कंदायफलमीदृशम् ॥ ३ ॥

अर्थ--विवक्षित दिवस आपणास लाभप्रद होईल किंवा कसें हें पहावयाचें असेल तर चैत्र आदिकरून महिना, तिथि, वार, नक्षत्र, यांची बेरीज करून तींत १५ मिळवावेत व त्या मिळवणींत आपलें जन्मनक्षत्र मिळवावें. मिळवून आलेली जी संख्या ती संख्या तीन ठिकाणीं मांडावी. एका ठिकाणच्या संख्येस ३ नीं गुणावें व ८ नीं भागावें, दुसऱ्या ठिकाणच्या संख्येस ७ नीं गुणून ३ नीं भागावें व तिसऱ्या ठिकाणच्या संख्येस २ नीं गुणून ५ नीं भागावें. तीन्ही भागाकारांत बाकी उरल्यास आपणास जय मिळेल.

पहिल्यांत बाकी शून्य राहिल्यास व्याधि उत्पन्न होईल, दुसऱ्यांत बाकी ० राहिल्यास मोठें भय उत्पन्न होईल व तिसऱ्यांत बाकी ० राहिल्यास हानि होईल असें समजावें.

बाकी विषम संख्या राहिल्यास धनप्राप्ति होईल, व सम संख्या राहिल्यास लाभ होणार नाहीं व हानिही होणार नाहीं. ह्मणजे आहे ती स्थिति कायम राहील. व शून्य राहिल्यास त्याचें फळ वर दिलेंच आहे. याप्रमाणें स्कंद मताचे आय जाणावे.

## अथ अष्टोत्तरी राशीनामायव्ययौ कोष्टक १.

| राजा. | मेष. | वृषभ. | मिथुन. | कर्क. | सिंह. | कन्या | तूळ. | वृश्चिक | धन. | मकर. | कुंभ. | मीन. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| रवि. | २ | ११ | १४ | ८ | ११ | १४ | ११ | २ | ५ | ८ | ८ | ५ |
| | १४ | ५ | २ | २ | ११ | २ | ५ | १८ | ५ | १४ | १४ | ५ |
| चंद्र. | १४ | ८ | ११ | ५ | ८ | ११ | ८ | १४ | २ | ५ | ५ | २ |
| | २ | ११ | ८ | ८ | २ | ८ | ११ | २ | ११ | ५ | ५ | ११ |
| मंगळ. | ८ | २ | ५ | १४ | २ | ५ | २ | ८ | ११ | १४ | १४ | ११ |
| | १४ | ८ | २ | २ | ११ | २ | ८ | १४ | ५ | १४ | १४ | ५ |
| बुध. | ५ | १४ | २ | ११ | १४ | २ | १४ | ५ | ८ | ११ | ११ | ८ |
| | ५ | ११ | ११ | ८ | २ | ११ | ११ | ५ | ११ | ५ | ५ | ११ |
| गुरु. | ११ | ५ | ८ | २ | ५ | ८ | ५ | ११ | १४ | २ | २ | १४ |
| | ५ | १४ | ११ | ११ | ५ | ११ | १८ | ५ | ११ | ८ | ८ | ११ |
| शुक्र. | २ | ११ | १४ | ८ | ११ | १४ | ११ | २ | ५ | ८ | ८ | ५ |
| | ८ | १४ | ११ | ११ | ५ | ११ | १४ | ८ | १४ | ८ | ८ | १४ |
| शनि. | १४ | ८ | ११ | ५ | ८ | ११ | ८ | १४ | २ | ५ | ५ | २ |
| | १४ | ८ | ५ | ५ | १४ | ५ | ८ | १४ | ८ | २ | २ | ८ |

## अथ अष्टोत्तरी नक्षत्राणामायव्ययौ कोष्टक २.

| १०८ | राजा. | आ० ४ | मघा. ३ | हस्त. ४ | अनुरा. ३ | पूर्वा. ४ | धनिष्टा. ३ | उत्तरा. ४ | कृत्तिका ३ | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ६ | रवि. | ११<br>११ | ८<br>२ | २<br>१४ | १४<br>२ | ८<br>१४ | ५<br>५ | १४<br>१४ | ११<br>५ | रवि. |
| १५ | चंद्र. | ८<br>२ | ५<br>८ | १४<br>२ | ११<br>५ | ५<br>५ | २<br>१४ | ११<br>५ | ५<br>११ | चंद्र. |
| ८ | मंगळ. | २<br>१४ | १४<br>२ | ८<br>१४ | ५<br>५ | १४<br>१४ | ११<br>५ | ५<br>२ | २<br>८ | मंगळ. |
| १७ | बुध | १४<br>२ | ११<br>८ | ५<br>५ | २<br>११ | ११<br>५ | ८<br>११ | २<br>८ | १४<br>११ | बुध. |
| १९ | गुरु. | ५<br>५ | २<br>११ | ११<br>५ | ८<br>११ | २<br>८ | १४<br>११ | ८<br>८ | ५<br>१४ | गुरु. |
| २१ | शुक्र. | ११<br>५ | ८<br>११ | २<br>८ | १४<br>११ | ८<br>८ | ५<br>१४ | १४<br>८ | ११<br>१४ | शुक्र. |
| १० | शनि. | ८<br>१४ | ५<br>५ | १४<br>१४ | ११<br>५ | २<br>५ | २<br>८ | ११<br>२ | ८<br>८ | शनि. |
| | | रवि.<br>६ | चंद्र.<br>१५ | मंगळ.<br>८ | बुध.<br>१७ | शनि.<br>१० | गुरु.<br>१९ | राहु.<br>१२ | शुक्र<br>२१ | |

## अथ विंशोत्तरी राशीनामायव्ययौ कोष्टक ३.

| राजा. | मेष. | वृषभ. | मिथुन | कर्क. | सिंह. | कन्या. | तूळ. | वृश्चिक. | धन. | मकर. | कुंभ. | मीन. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| रवि. | १४<br>११ | ८<br>५ | १४<br>२ | ८<br>१४ | ११<br>११ | १४<br>२ | ८<br>५ | १४<br>११ | ११<br>२ | ५<br>५ | ५<br>५ | ११<br>२ |
| चंद्र. | ११<br>१४ | ५<br>८ | ११<br>५ | ५<br>२ | ८<br>१४ | ११<br>५ | ५<br>८ | ११<br>१४ | ८<br>५ | २<br>८ | २<br>८ | ८<br>५ |
| मंगळ | २<br>१४ | ११<br>५ | २<br>५ | ११<br>१४ | १४<br>११ | २<br>५ | ११<br>५ | २<br>१४ | १४<br>२ | ८<br>५ | ८<br>५ | १४<br>२ |
| बुध. | २<br>५ | ११<br>११ | २<br>११ | ११<br>५ | १४<br>२ | २<br>१४ | ११<br>११ | २<br>५ | १४<br>८ | ८<br>११ | ८<br>११ | १४<br>८ |
| गुरु. | १४<br>२ | ८<br>११ | १४<br>८ | ८<br>५ | ११<br>२ | १४<br>८ | ८<br>११ | १४<br>२ | ११<br>८ | ५<br>११ | ५<br>११ | ११<br>८ |
| शुक्र. | ११<br>५ | ५<br>१४ | ११<br>११ | ५<br>८ | ८<br>५ | ११<br>११ | ५<br>१४ | ११<br>५ | ८<br>११ | २<br>१४ | २<br>१४ | ८<br>११ |
| शनि. | ८<br>५ | २<br>१४ | ८<br>११ | २<br>८ | ५<br>५ | ८<br>११ | २<br>१४ | ८<br>५ | ५<br>११ | १४<br>११ | १४<br>११ | ५<br>११ |

## अथ विंशोत्तरी नक्षत्राणां त्रिरावृत्त्या कोष्टक ४. आयव्ययौ.

| १२० | राजा. | आश्वि. | भरणी. | कृत्तिका. | रोहिणी. | मृग. | आर्द्रा. | पुनर्वसु | पुष्य. | आश्लेषा. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ६ | रवि. | १४<br>११ | ८<br>५ | ११<br>११ | ८<br>१४ | १४<br>११ | २<br>५ | ११<br>२ | ५<br>५ | १४<br>२ |
| १० | चंद्र. | ११<br>१४ | ५<br>५ | ८<br>१४ | ५<br>२ | ११<br>१४ | १४<br>५ | ८<br>५ | २<br>८ | ११<br>५ |
| ७ | मंगळ. | २<br>१४ | ११<br>५ | १४<br>११ | ११<br>१४ | २<br>१४ | ५<br>५ | १४<br>२ | ८<br>५ | २<br>१४ |
| १७ | बुध. | २<br>५ | ११<br>११ | १४<br>२ | ११<br>५ | २<br>५ | ५<br>११ | १४<br>८ | ८<br>११ | २<br>११ |
| १६ | गुरु. | १४<br>२ | ८<br>११ | ११<br>२ | ८<br>५ | १४<br>२ | २<br>११ | ११<br>८ | ५<br>११ | १४<br>८ |
| २० | शुक्र. | ११<br>५ | ५<br>१४ | ८<br>५ | ५<br>८ | ११<br>५ | १४<br>११ | ८<br>११ | २<br>१४ | ११<br>११ |
| १९ | शनि. | ८<br>५ | २<br>१४ | ५<br>५ | २<br>८ | ८<br>५ | ११<br>११ | ५<br>११ | १४<br>११ | ८<br>११ |
| | | केतु. | शुक्र. | रवि | चंद्र. | मंगळ. | राहु. | गुरु. | शनि. | बुध. |
| | | ७ | २० | ६ | १० | ७ | १८ | १६ | १९ | १७ |

## अथ ज्येष्ठागौरीसंबंधाचीं फलें.

अजो वृष: कुक्कुटश्च महिषी कुंजरस्तथा ।
व्याघ्रश्च माहिषश्चैव भानुवारादनुक्रमात् ॥ १ ॥
माषाश्च गुडमन्नं च पायसं क्षीरशर्करा ।
दधि भोजनकं चैव भानुवारादनुक्रमात् ॥ २ ॥
आरक्तं श्वेतवस्त्रं च रक्तांबरहरिद्रका ।
चित्रपीतं च कृष्णं च भानुवारादनुक्रमात् ॥ ३ ॥
शस्त्रं त्रिशूलं खड्गं च परशुर्धनुरेव च ।
पाशांकुशधरा देवी भानुवारादनुक्रमात् ॥ ४ ॥
चंदनं भस्म कस्तूरी कुंकुमागरुकं तथा ।
गोरोचनं च रक्तं च भानुवारादनुक्रमात् ॥ ५ ॥
पूर्वाग्नौ दक्षिणे चैव नैर्ऋतौ पश्चिमे तथा ।
वायव्येशान्ये मुखं देवी भानुवारादनुक्रमात् ॥ ६ ॥
उत्साहश्च सुभिक्षं च दुर्भिक्षं कलहः सुखं ।
लोके भयं राज्यनाशं भानुवारादनुक्रमात् ॥ ७ ॥

**अर्थ—कोष्टकरूपानें.**

| वार. | रविवार. | सोमवार. | मंगळवार. | बुधवार. | गुरुवार. | शुक्रवार. | शनिवार. |
|---|---|---|---|---|---|---|---|
| वाहन. | मेंढा. | बैल. | कोंबडा. | म्हैस. | हत्ती. | वाघ. | रेडा. |
| भक्षण. | उडीद. | गूळ. | भात शिजलेला. | खीर. | दूध. | शर्करा. | दहीं. |
| वस्त्र. | तांबडें वस्त्र. | पांढरे वस्त्र. | तांबडें वस्त्र. | हिरवें वस्त्र. | चित्रविचित्र रंगाचें वस्त्र. | पिंवळें वस्त्र. | काळें वस्त्र. |
| शस्त्र. | शस्त्र. | त्रिशूल | तरवार. | परशु. | धनुष्य. | पाश. | अंकुश. |
| लेपन. | चंदन. | भस्म. | कस्तूरी. | कुंकू. | अगरु. | गोरोचन. | रक्त. |
| दिशांकडे मुख फिरविणें. | पूर्व. | आग्नेय. | दक्षिण. | नैर्ऋत्य. | पश्चिम. | वायव्य. | ईशान्य. |
| इत्यादिकांचीं फलें. | उत्साह. | सुभिक्ष. | दुर्भिक्ष. | कलह | सुख. | लोकांस भय. | राज्यनाश |

## ग्रहणांचें चक्र.

ग्रहणांच्या काळाचें एक चक्र आहे. १८ सौर वर्षें आणि ११ दिवस इतक्या काळांत जीं जीं ग्रहणें ज्या क्रमानें होतात तींच बहुधा त्याच क्रमानें पुढें तितक्या काळांत होतात. चांद्र सौरमानानें कधीं ह्या काळांत १८ वर्षें होतात, कधीं १८ वर्षें आणि एक चांद्रमास होतो. चंद्र सूर्य हे राहु बिंदूंत एकदा आल्यापासून पुनः सुमारें तितक्या काळानें ते एकाच वेळीं फार थोड्या अंतरानें त्या स्थळीं येतात. त्यांच्या स्थितींत कांहीं काळाचें अंतर पडतें यामुळें व चंद्राची स्पष्टगति थोडी कमजास्त होते, यामुळें एका चक्रांतलें एखादें ग्रहण पुढल्यांत कमी होतें व एखादें वाढतें. सुमारें हजार वर्षांनीं पुष्कळ फरक पडतो. एका चक्रांत बहुधा ७० ग्रहणें होतात. त्यांत ४२ सूर्याचीं आणि २८ चंद्राचीं होतात; म्हणजे चंद्राच्या दीडपट सूर्याचीं ग्रहणें होतात. कधीं चक्रांत ७१ ग्रहणें होतात तेव्हां चंद्राचीं २९ होतात व सूर्याचीं ४२ होतात. परंतु एका स्थळीं सूर्याचीं ग्रहणें थोडींच दिसतात. तीं एकंदर जितकीं होतात त्यांचा सहावा हिसा म्हणजे सुमारें ७ ग्रहणें एका ठिकाणीं दिसतात. तींही पृथ्वीवर अन्यस्थळीं खग्रास किंवा कंकणाकृति असलीं तरी विवक्षित ठिकाणीं तशीं दिसतात असें नाहीं. बहुतेक खंडित म्हणजे अपूर्ण दिसतात. खग्रास किंवा कंकणाकृति फार थोडींच दिसतात. चक्रांतील २८ चंद्रग्रहणांपैकीं सरासरीनें १८ एका ठिकाणीं दिसतात. म्हणजे १८ वर्षांत पृथ्वीवर होणाऱ्या एकंदर ७० ग्रहणांपैकीं ७ सूर्यग्रहणें व १८ चंद्रग्रहणें एका ठिकाणीं दिसतात. ४५ दिसत नाहींत.

ओल्ड स्टाईलप्रमाणें व १७५१ नंतर न्यू स्टाईलप्रमाणें पांच हजार वर्षांचे तारखेचे वार काढण्याचें चक्र बसविलें आहे. तें खालीं लिहिल्याप्रमाणें.

कोणत्याही सनाचे जानेवारी महिन्याचे पहिले तारखेस जो वार असेल त्याच्या पुढील वार पुढील सनाचे जानेवारीचे पहिले तारखेस येतो. परंतु लीप इयर ज्या सालीं असेल त्याचे पुढील जानेवारीचे पहिले तारखेस एक वार टाकून पुढील वार येतो. याप्रमाणें होत होत अकरा वर्षांनीं पुनः तोच वार येतो. अशाप्रमाणें हें अकरा वर्षांचें चक्र आहे. प्रत्येक सनाचे-शेंकड्याचे आरंभापासून चौथें व आठवें चक्र संपण्याचे सालीं ह्मणजे ४४ व ८८ या वर्षीं एकेक वार मागें येतो. याप्रमाणें प्रत्येक शेंकड्याचे आरंभापासून होतें.

## इंग्रजी तारखेचा वार काढणें.

जानेवार्यादिमास प्रतिउदयदिनीं वार पाहे क्रमानें ।<br>
इस्वी अंकांत जोडा त्रिविसे[23] गुणे[3] नंखें शून्यं चोवीसे[24] मानें ॥<br>
चॉरी शून्यांष्ट सोळों[16] रंवि[12] त्रिसं ऋतुभूं[16] घालुनीया सवाई ।<br>
करणें रेघेविना त्या नगहृत करुनी शेष वारांक येई ॥ १ ॥

अर्थ—कोणत्याही सनांतील महिन्याच्या तारखेचा वार काढण्याकरितां प्रथम प्रत्येक महिन्याचे क्षेपक अंक खालीं लिहिल्याप्रमाणें दिले आहेत. जानेवारी २३, फेब्रुवारी ३, मार्च २०, एप्रिल ०, मे २४, जून ४, जुलई ०, आगष्ट ८, सप्टेंबर १६, आक्टोबर १२, नवंबर २०, दिसेंबर १६. याप्रमाणें एक उदाहरण करून प्रथम पहिल्या तारखेचा वार काढला ह्मणजे पाहिजे त्या तारखेचा वार काढतां येईल. इष्ट सन १९२२ यांत वर लिहिलेल्या पाहिजे त्या इष्ट महिन्यांतील क्षेपकांक त्या सनांत मिळवावा आणि त्यास चोहोंनीं भागावें. भागाकाराचे अंकही त्यांतच मिळवावे. आलेल्या मिळवणींत एक वजा करावा. (भागाकाराची बाकी सोडून द्यावी.) जी बाकी येईल त्या अंकास सातांनीं भागावें. भागून जो अंक बाकी राहील तो त्या महिन्याच्या पहिल्या तारखेचा वार होय. बाकी १ राहिल्यास रविवार, २ राहिल्यास सोमवार याप्रमाणें क्रमानें शुक्रवारपर्यंत सहा अंक येतील व शनिवारास शून्य येईल. पहिल्या तारखेचा जो वार असतो तोच ८।१५।२२।२९ या तारखेचा वार असतो. याप्रमाणें सदर तारखेचे वार काढावे. याशिवाय कोणत्याहि इष्ट तारखेचा वार काढणें झाल्यास वरील आलेल्या वजाबाकींत इष्ट तारीख मिळवून एक वजा करावा ह्मणजे इष्ट तारखेचा वार येतो.

## उदाहरण.

इसवीसन १९२२ तारीख २७ सप्टेंबरचा वार काढा?

सन १९२२ + क्षेपक १६ = १९३८ ÷ ४ = (४८४). १९३८ + ४८४ = २४२२ − १ = २४२१ + तारीख २७ = २४४८ − १ = २४४७ ÷ ७ बाकी ४ ह्मणजे बुधवार आला.

सौर वर्षाचे ३६५ दिवस, घटिका १५, पळें २३ आहेत. पंचांगांतील वर्षाचे दिवस ३५४ असतात यामुळें आज जी तिथि ज्या तारखेस आली तीच तिथि १९ वर्षांनीं त्याच तारखेस येते किंवा एखादी तारीख मागें पुढें होते. म्हणजे हें १९ वर्षांचें चक्र आहे.

अधिकमास ज्या महिन्यांत जो येतो त्यापासून १९ वर्षांनीं त्याच महिन्यांत तोच महिना अधिक येतो. अशा प्रकारचें हें चक्र आहे.

## हिंदुस्थानांतील कित्येक शहरांच्या लग्नराशी ठरविल्या त्या खालीं लिहिल्याप्रमाणें.

**मेष**—कांबोज, किरात, पांचाळ, कलिंग, सिंहलद्वीप, शरयूदेश, मद्रास, नेपाळ, गंगापूर, अवंतिदेश, बडोदें, म्हैसूर, निरक्षदेश, ( लंका ).

**वृषभ**—शूरसेनदेश, भोजकट, मध्यदेश, घाटावरील प्रदेश.

**मिथुन**—यमुनातट, बाल्हिकदेश, मत्स्यदेश, पद्मकदेश, चंपकदेश, भस्मकदेश, गौडदेश, जळगांव.

**कर्क**—मगधदेश, काठेवाड, कच्छ, गुजराथ, राजपुताना, सिंधप्रांताचें वाळवंटाचें मैदान, चक्रांगदेश, तैलंगदेश, दिल्ली, कलकत्ता, निजामहैद्राबाद.

**सिंह**—वंगदेश, अफगाणिस्थान, पांड्रदेश, कर्नाटक, विंध्याचल, निषाददेश, बलुचिस्थान.

**कन्या**—बगदाद, उज्जनी, दक्षिणदेश, चित्रादिदेश, त्रिपुष्करदेश, गंडनदी, पैठण, पुणें, नागपूर, माळवा.

**तूळ**—चीन, जपान, कुरुक्षेत्र, कण्वदेश, क्षेत्रें, काश्मीर, कोंकण, मुंबई, पुष्करदेश, मारवाड.

**वृश्चिक**—इक्ष्वाकुदेश, उग्रदेश, चोलदेश, गोमतीदेश, सिंधुदेश, मुंबईचा शेवटचा भाग, कोल्हापूर, सुरत, जंजिरा, महाड, सांगली.

**धनु**—मद्रासचा उत्तरेकडील भाग, काशी, मिथिला, मध्यप्रांतांतील नेटिव्ह संस्थानें, अंधकदेश, मिरज, कोल्हापुराकडील दक्षिणेकडील कांहीं भाग, दक्षिण महाराष्ट्रांतील कांहीं भाग, काठेवाडाकडील उत्तरेचा कांहीं भाग, इचलकरंजी, सांगली संस्थानांतील कांहीं भाग.

**मकर**—भरतखंड ( हिंदुस्थान ), पंजाब, सिंधहैद्राबाद, बंगाला, पौंड्र, चित्रकूट, वायव्येकडील प्रांत, कैकेय देश, उत्तर महाराष्ट्रांतील कांहीं देश, सौराष्ट्र, पंचनद, जालंधरदेश, माद्रीदेश, कलकत्त्याकडील कांहीं भाग, अलाहाबाद, सिंधप्रांत.

**कुंभ**—पश्चिम बंगाल, केदारदेश, कलूतदेश, खानदेश, उत्तरदेश, सिंहलदेश.

**मीन**—नैमिषारण्य, हिमशैलदेश, पानिपत, बनारस ( काशी ) कडील कांहीं भाग.

---

# पंचांगांतील धर्मशास्त्रार्थ.

## तिथिनिर्णय.

प्रत्येक महिन्यांतील विशेष कृत्यांच्या तिथीबद्दल माहिती देत आहे. तिथीबद्दल दिवसाचे विभाग सांगतों. १ प्रातः, २ संगव, ३ मध्यान्ह, ४ अपराण्ह, ५ सायान्ह, असे दिवसाचे पांच विभाग करावेत. दिनमानाच्या घटिकांला पांचांनीं भागून ज्या घटिका येतील तितक्या घटिकांचा म्हणजे सामान्यतः सहा घटिकांचा एक विभाग होतो. प्रदोषव्यापिनी तिथि म्हणजे सूर्यास्तापासून सहा घटिका रात्र होईपर्यंतची तिथि. सूर्योदयव्यापिनी म्हणजे सूर्योदयसमयीं असणारी तिथि. पूर्वाण्हव्यापिनी म्हणजे सूर्योदयापासून बारा घटिकांपर्यंत असणारी. मध्यान्हव्यापिनी म्हणजे सूर्योदयापासून अठरा घटिकांपर्यंत असलेली. अपराण्हव्यापिनी म्हणजे चोवीस घटिकांपर्यंत असणारी जी तिथि ती होय. निशीथव्यापिनी म्हणजे मध्यरात्रीपर्यंत असणारी. अरुणोदयव्यापिनी म्हणजे पंचवीस घटिका रात्रीच्यापुढें व सूर्योदयापर्यंत जी तिथि असेल ती, याप्रमाणें मानावें.

## पंचांगांतील धर्मशास्त्रार्थ—चैत्र महिन्यापासून बारा महिन्यांत जे शास्त्रार्थ असतील ते लिहिण्याचे आहेत. ते खालीं दाखविल्याप्रमाणें.

चैत्रमासीं शुक्लपक्षीं प्रथम दिवशीं सूर्योदयीं ब्रह्मदेवानें सर्व जग निर्माण केलें असें हेमाद्रींत वचन आहे, म्हणून चैत्र शुक्ल प्रतिपदेस संवत्सराचा आरंभ करितात.

वर्षप्रतिपदा—प्रतिपद्वत्सरारंभे ग्राह्या पूर्वैव सर्वदा । सा सूर्योदयव्यापिनी ग्राह्या ।
मलमासो यदा चैत्रो वर्षारंभस्तदा मले । न तु शुद्धे ।

चैत्र शुक्ल प्रतिपदा ही उदयव्यापिनी घ्यावी. दोन्ही दिवशीं उदयव्यापिनी असलीं किंवा नसली तरी पूर्वीचीच घ्यावी. जर चैत्र अधिकमास असेल तर संवत्सरारंभानिमित्त तैलाभ्यंग अधिक चैत्र शुक्ल प्रतिपदेसच करावा; आणि ध्वजारोपण, निंबपत्रभक्षण, पंचांगश्रवण, रामनवरात्रारंभ वगैरे हे शुद्ध चैत्र शुक्ल प्रतिपदेस करावेत. ही प्रतिपदा कल्पादि आहे.

देवीनवरात्र—अमायुक्ता न कर्तव्या प्रतिपच्चंडिकार्चने ।
मुहूर्तमात्रा कर्तव्या द्वितीयादि गुणान्विता ॥

कित्येकांच्या कुलांत चैत्र शुद्ध प्रतिपदेपासून देवीनवरात्र करण्याचा सांप्रदाय आहे त्याला प्रतिपदा घेणें ती मुहूर्तमात्र म्हणजे दोन घटिका असेल ती द्वितीयायुक्त घ्यावी. अमावास्यायुक्त घेऊं नये.

चैत्र शुद्ध २. या रोजीं प्रदोषकालीं चंद्रव्रत आणि शिवगौरी दमनार्पण.

आंदोलनगौरीव्रतम्—

चैत्रशुक्लतृतीयायां शिवगौरीं प्रपूजयेत् । यावन्मासो भवेन्नित्यं नारी पतिमती सदा ॥
मुहूर्तमात्रसत्वेपि दिने गौरीव्रतं परे । चतुर्थीसंयुता ग्राह्या द्वितीयासहितां त्यजेत् ॥

चैत्र शुक्ल तृतीयेपासून वैशाख शुक्ल तृतीयेपर्यंत एक महिनाभर सुवासिनी स्त्रियांनीं गौरीची पूजा करावी असें स्कंद पुराणांत सांगितलें आहे. दोन दिवस तृतीयेचा योग असतां दुसऱ्या

दिवसाची ह्मणजे चतुर्थीयुक्त असेल ती घ्यावी. ती मुहूर्तमात्र ह्मणजे दोन घटिका असली तरी चालेल; पण द्वितीयायुक्त जी तृतीया ती निषिद्ध ह्मणून कदापि घेऊं नये. जरी वैधृत्यादि कुयोग असले तरी हीच घ्यावी. सर्व देवांचा दोलोत्सव करावा. ही तृतीया मन्वादि आहे. मच्छजयंती अपराण्हीं.

चैत्र शु० ४ गणेश दमनार्पण. चैत्र शु० ५ कल्पादि, हयव्रत, लक्ष्मीपूजन, देशांतरे नागपूजा.

चैत्र शु० ६ स्कंद दमनार्पण. चैत्र शु० ७ सूर्य दमनार्पण.

चैत्र शु० ८ भवानी उत्पत्ति. ही अष्टमी नवमीयुक्त घ्यावी. पुनर्वसूनेंयुक्त अष्टमी त्या दुर्गाष्टमीचे ठिकाणीं अशोककलिका प्राशन.

रामनवमी —चैत्रशुक्ले तु नवमी पुनर्वसुयुता यदि ।
सैव मध्यान्हयोगेन महापुण्यतमा भवेत् ॥
नवमी चाष्टमीविद्धा त्याज्या विष्णुपरायणैः ॥
उपोषणं नवम्यां च दशम्यां चैव पारणम् ॥ इयं मलमासे न कार्या ॥

चैत्र शुक्ल नवमीला रामजयंती ह्मणतात. त्या दिवशीं जगदीशानें रामावतार घेतला. रामनवमी ही मध्यान्हव्यापिनी घ्यावी. दोन्ही दिवशीं मध्यान्हव्यापिनी असली अगर नसली तरी दुसरीच घ्यावी अष्टमीविद्ध घेऊं नये. पूर्व दिवशीं सकलमध्यान्हव्यापिनी नवमी असली तरी ती न करितां दुसरे दिवशीं मध्यान्हीं एकदेशव्यापिनी असलेलीच करावी. देवी दमनार्पण.

चैत्र शु० १० रामजयंतीचें पारणें. चैत्र शु० ११ कृष्णांदोलनोत्सव, कामदा.

चैत्र शु० १२ विष्णु दमनार्पण. चैत्र शु० १३ अनंगव्रत, ही त्रयोदशी पूर्वविद्ध घ्यावी.

चैत्र शु० १४ नृसिंहदोलोत्सव. शिव, एकवीरा, भैरव, यांना दमनार्पण करावें. ही चतुर्दशी पूर्वविद्ध अपराण्हव्यापिनी घ्यावी. अपराण्हाला स्पर्श करणारी असेल ती पूर्वविद्धच घ्यावी. अपराण्हस्पर्शनीसुद्धां नसेल तर दुसरी घ्यावी.

हनुमजयंती—सा सूर्योदयव्यापिनी ग्राह्या सामान्यनिर्णयात् । ग्राह्या पौर्णमासी परैव च ॥

हनुमज्जयंती ही सूर्योदयव्यापिनी घ्यावी. दोन्ही दिवशीं सूर्योदयीं असेल तर धर्मसिंधुमतें पूर्वदिवशीं घ्यावी व माधवमतें दुसरे दिवशींची घ्यावी. मन्वादि—वैशाखस्नानारंभ. सर्व देवांना दमनार्पण. मेषसंक्रांतीच्या पूर्वींच्या १० घटिका व पुढें १० घटिका पुण्यकाल होय.

चैत्र कृ० ११ वरूथिनी

दमनारोपणं—ऊर्जे व्रतं मधौ दोलां श्रावणे तंतुपूजनम् ।
चैत्रे च दमनारोपमकुर्वाणो व्रजत्यधः ॥

कार्तिकामध्यें व्रताचरण, चैत्रांत आंदोलन, दवणा वाहणें, श्रावणांत पोंवतीं हीं कृत्यें जो आपल्या कुळदेवतेसंबंधानें प्रतिवर्षी करीत नाहीं, तो अधोगतीला जातो असें सांगितलेलें आहे.

## वैशाखमास.

अक्षय्यतृतीया—वैशाखे शुक्लपक्षे तु तृतीया रोहिणीयुता ।
पूर्वाण्हव्यापिनी ग्राह्या परा यदि दिनद्वये ।

दुर्लभा बुधवारेण सोमेनापि युता तथा ।
रोहिणी बुधयुक्तापि पूर्वविद्धा विवर्जिता ॥

**अर्थ**—वैशाख शुक्ल तृतीयेला केलेलें दान अक्षय्य राहतें म्हणून हिला अक्षय्यतृतीया म्हणतात. हा साडेतीन मुहूर्तांपैकीं एक मुहूर्त आहे. ही तृतीया पूर्वाण्हव्यापिनी म्हणजे सूर्योदयापासून निदान बारा घटिकांपर्यंत असल तीं घ्यावी. दोन्ही दिवस पूर्वाण्हव्यापिनी असेल तर दुसऱ्या दिवशींची घ्यावी. रोहिणी नक्षत्र बुधवार किंवा सोमवारादि योगांनींयुक्त असेल तर ती फार पुण्यकारक आहे. पण रोहिणी, बुधवार ह्या योगांनींयुक्त असून जर द्वितीयायुक्त असेल तर मात्र घेऊं नये. दुसऱ्या दिवसाची चतुर्थीयुक्त असेल तीच घ्यावी. ही त्रेतायुगादि आहे व कल्पादिही आहे. हीच परशुराम-जयंती होय.

वैशाखस्य सिते पक्षे तृतीयायां पुनर्वसौ ।
निशायाः प्रथमे यामे रामाख्यः समये हरिः ॥
स्वोच्चगैः षड्ग्रहैर्युक्ते मिथुने राहुसंस्थिते ।
रेणुकायास्तु यो गर्भादवतीर्णः प्रभुः स्वयम् ।
सा प्रदोषव्यापिनी ग्राह्या दिनद्वये तद्व्याप्तावव्याप्तौ
समव्याप्तौ च परा । अन्यथा पूर्वैव ।

**अर्थ**--अक्षय्यतृतीयेच्या दिवशीं रात्रीं प्रथम प्रहरीं पुनर्वसु नक्षत्रावर रेणुकेच्या उदरीं परशुरामानें अवतार घेतला, म्हणून ही परशुरामजयंतीची तृतीया होय. दोन्ही दिवस तृतीया प्रदोषव्यापिनी असेल किंवा सारखी असेल तर जयंतीकरितां दुसऱ्या दिवसाची घ्यावी. असें नसेल तर प्रथम दिवसाचीच उक्त होय. किंवा प्रदोषव्यापिनी नसेल तर मध्यान्हीं घ्यावी असें कांहीं ऋषींचें मत आहे.

वैशाखस्य मलमासत्वे युगादिश्राद्धं मासद्वयेऽपि कार्यम् ।

**अर्थ**—वैशाख अधिक महिना येईल तर युगादि श्राद्ध—अक्षय्यतृतीया दोन्ही महिन्यांत करावी.

वैशाखशुक्लसप्तम्यां गंगोत्पत्तिः । इयं माध्यान्हव्यापिनी ग्राह्या । दिनद्वये तद्व्याप्तौ पूर्वा ॥

**अर्थ**—वैशाख शु० ७ गंगोत्पत्ति. ही ७ मध्यान्हव्यापिनी घ्यावी. दोन्ही दिवशीं मध्यान्हव्यापिनी असेल तर पहिली घ्यावी.

वैशाख शुक्ल ११ मोहिनी ११. वैशाख शु० १२ मधुसूदनपूजा.

नृसिंह जयंती—वैशाखे शुक्लपक्षे तु चतुर्दश्यां निशामुखे । जातो
नृसिंहो भगवान् दैत्यानां मर्दनाय च । सा प्रदोषव्यापिनी ग्राह्या ।
दिनद्वये तद्व्याप्तावव्याप्तौ समव्याप्तौ च परा । स्वातीनक्षत्रयोगेन
शनिसोमेन संयुता । प्रशस्ता सिद्धियोगेन वणिजेन तथैव च ॥

**अर्थ**—वैशाख शुक्लपक्षामध्यें चतुर्दशीच्या दिवशीं प्रदोषकालीं नृसिंहावतार झाला. ही चतुर्दशी

प्रदोषव्यापिनी घ्यावी. दोन्ही दिवस तशी असेल, नसेल किंवा सारखी असेल तर दुसऱ्या दिवसाची घ्यावी. शनिवार, सोमवार, स्वातीनक्षत्र, सिद्धियोग आणि वणिजकरण इत्यादि योगांनीं किंवा यांपैकीं एखाद्या योगानें युक्त असेल तर ती प्रशस्त होय.

वैशाख शु० १५ वैशाखस्नानसमाप्ती. कूर्मजयंती. प्रदोषव्यापिनी घ्यावी.

वृषभ संक्रांतीच्या पहिल्या १६ घटिका पुण्यकाल होय.

वैशाख कृष्ण ११ अपरा ११. वैशाख कृष्ण ३० भावुका.

## ज्येष्ठमास.

ज्येष्ठ शुक्ल १ करवीरव्रतम्, कपिदिनं, दशहरारंभ.

ज्येष्ठ शु० ३ रंभाव्रतम्. सा पूर्वविद्धा ग्राह्या. अर्थ---ज्ये० शु० ३ रंभाव्रत ही पूर्वविद्ध घ्यावी.

ज्येष्ठ शु० ४ उमावतार. उमापूजनव्रतम्. ज्येष्ठ शु० ८ शुक्लादेवी पूजनव्रतम्.

ज्येष्ठ शु० १०—हरते दश पापानि तस्माद्दशहरा स्मृता ।
ज्येष्ठे मासि सिते पक्षे दशम्यां बुधहस्तयोः ।
व्यतीपाते गरानन्दे कन्याचंद्रे वृषे रवौ ॥
दशयोगे नरः स्नात्वा सर्वपापैः प्रमुच्यते ।
यत्रैव योगबाहुल्यं ग्राह्या यदि दिनद्वये ॥
अत्र दशमी व्यतीपातयोर्मुख्यत्वं ।
मलमासे यदा ज्येष्ठे इयं तत्रैव कारयेत् ।

**अर्थ**— ज्येष्ठशुक्ल दशमीला दशहरा म्हणतात. ह्या तिथीचे दहा योग सांगितले आहेत ते असे— १ ज्येष्ठमास, २ शुक्लपक्ष, ३ दशमी, ४ बुधवार, ५ हस्तनक्षत्र, ६ व्यतीपात, ७ गरकरण, ८ आनंदयोग, ९ कन्येचा चंद्र आणि १० वृषभ राशीचा सूर्य, अशा दशयोगांनीं युक्त जी दशमी तिचे ठायीं गंगास्नान केलें असतां महा पुण्यकारक मानिलेलें आहे. दोन दिवस दशमी असेल तर वरील योगांपैकीं अधिक योगांनीयुक्त जी दशमी असेल ती घ्यावी. त्यांत दशमी आणि व्यतीपात हे दोन योग मुख्य आहेत. ज्येष्ठ अधिकमास असतां दशहराव्रत अधिक ज्येष्ठांतच करावें. शुद्ध ज्येष्ठांत करूं नये. त्या दिवशीं गंगेचें पूजन करावें दशहरा समाप्ति.

ज्येष्ठ शु० ११ निर्जला ज्येष्ठ शु० १२—१ प्रदोषकालीं सावित्रीव्रतारंभ. २ त्रिविक्रमपूजा.

ज्येष्ठ शु० १४ सत्याभिनवतीर्थ.

ज्येष्ठ शु० १५— ज्येष्ठे मासि सिते पक्षे पूर्णिमायां वटव्रतम् ।
पूर्वविद्धैव सावित्रीव्रते पंचदशी तिथिः ॥
नाड्योऽष्टादश भूतस्य स्युश्चेत्तस्य परेहनि । अत्र त्रिरात्रव्रते पूर्णिमा
सूर्यास्तात्प्राक् त्रिमुहूर्तापि ग्राह्या त्रिमुहूर्तन्यूनत्वे
परैव। अत्र रजस्वलादिदोषे पूजादि ब्राह्मणद्वारा
उपवासादिकं च स्वयम् कार्यम् ॥

**अर्थ**—ज्येष्ठशुद्ध पौर्णिमेला वटपूर्णिमा म्हणतात. त्या दिवशीं सुवासिनी स्त्रियांनीं वटवृक्षाची

पूजा करावी कोणी त्रिरात्र व्रत करितात. त्रिरात्र व्रताकरितां पूर्णिमा घेणें ती सूर्यास्तापूर्वी सहा घटिका जरी पौर्णिमा लागत असेल तरी तीच घ्यावी. म्हणजे त्या दिवसापूर्वी त्रिरात्र व्रताला दोन दिवस आरंभ करावा. केवळ पूजेकरितां पूर्णिमा घेणें तां जर दोन दिवस पौर्णिमेचा योग असेल तर प्रथम दिवसाचीच घ्यावी. तथापि चतुर्दशी अठरा घटिकांहून जास्त असून नंतर लागणारी पूर्णिमा मात्र प्रथम दिवसाची घेऊं नये. अशा वेळीं दुसऱ्या दिवसाची घ्यावी. स्त्री रजस्वला वगैरे असेल तर तिनें ब्राह्मणद्वारा पूजा करवून आपण उपोषण मात्र करावें. बिल्वत्रिरात्रिव्रत. मन्वादि. मिथुन संक्रांतीच्या पुढच्या १६ घटिका पुण्यकाल.

ज्येष्ठ कृष्ण १ करिदिन. मूळनक्षत्रें वेंदूर ( पोंवळा ). ज्येष्ठ कृष्ण ११ योगिनी.

## आषाढमास.

आषाढ शुद्ध १० मन्वादि. आषाढ शुद्ध ११ शयनी, विष्णुशयनोत्सव, चातुर्मास्यारंभ, पंढरपूरची यात्रा. आषाढ शुद्ध १२ शाकव्रतारंभ.

कर्कसंक्रांति :—' त्रिंशत्कर्काटके पूर्वे ' इति वचनात् कर्क-संक्रांतौ पूर्वं त्रिंशनाड्यः पुण्यकालः । तत्रापि संक्रांतिसन्निहिता नाड्यः पुण्यतमाः रात्रौ तु निशीथात्प्राक् संक्रमेपि पूर्वदिने पुण्यकालः । तदूर्ध्वं परदिने पंचनाड्यः पुण्यकालः ।

अर्थ—कर्क संक्रांतीचा पर्वकाळ संक्रांत लागण्यापूर्वी तीस घटिका असतो. तथापि संक्रांति-काळाच्या जवळच्या पांच घटिका विशेष पुण्यकारक आहेत. मध्यरात्रीच्यापूर्वी संक्रांत निघत असेल तर पूर्व दिवशींच पर्वकाळ धरावा. मध्यरात्रीनंतर निघत असेल तर दुसऱ्या दिवशीं सकाळीं पांच घटिकांपर्यंत पर्वकाळ समजावा.

कोकिलाव्रतम्—आषाढौ द्वौ यदा स्यातां कोकिलायास्तदार्चनम् ।
शुद्धाषाढे तु कर्तव्यमवश्यं पुण्यकारकम् ॥

अर्थ--ज्या वर्षी दोन आषाढ असतील त्या वर्षी शुद्ध आषाढांत कोकिलाव्रत करावें.

आषाढ शुद्ध १५ शिवशयनोत्सव—व्यासपूजा. मन्वादिः. कर्क संक्रांतीच्या पूर्वीच्या १० घटिका पुण्यकाळ होय. दुसरे दिवशीं करिदिन समजावा.

आषाढ कृष्ण ११ कामिका. आषाढ कृष्ण ३० दीपपूजा ( दिवसा ).

## श्रावणमास.

श्रावण शु० ३ स्वर्ण गौरी व्रतम्. श्रावण शु० ४ वरद ४. ही पूर्वविद्ध घ्यावी.

सोमवार—सोमवारव्रतं कार्यं श्रावणे वै यथाविधि ।
शक्तेनोपोषणं कार्यमथवा निशि भोजनम् ॥

अर्थ—श्रावण मासांत सोमवारीं उपोषण करावें. ज्यांस अहोरात्र उपोषण करवणार नाहीं त्यांनीं सायंकाळपर्यंत उपोषित राहून रात्रीं भोजन करावें.

मंगलागौरी—श्रावणे मंगलागौरीं पूजयेद्विधिना व्रती ।
प्रथमे वत्सरे मातुर्गृहे कर्तव्यमेव च ॥

ततो भर्तृगृहे कार्यमवश्यं स्त्रीभिरादरात् ।
पंचमे वत्सरे प्राप्ते कुर्यादुद्यापनं शुभम् ॥

**अर्थ**—लग्न झाल्यानंतर प्रथम वर्षापासून मुलींनीं श्रावणांतील प्रत्येक मंगळवारीं मंगलागौरीचें पूजन करावें. प्रथमवर्षी ही पूजा माहेरीं करावी. पुढें पतिगृहीं करावी. हें व्रत पांच वर्षेपर्यंत करून पांचव्या वर्षी उद्यापन करावें असें भविष्यपुराणांत सांगितलें आहे. अधिक श्रावण असतां त्यांत मंगलागौरीचें पूजन करूं नये, शुद्ध श्रावणांत करावें.

श्रावण शु० ५ नागपंचमी—श्रावणे पंचमी शुक्ला संप्रोक्ता नागपंचमी ।
चतुर्थीसहितां त्यक्त्वा ग्राह्या षष्ठीसमन्विता ।
वल्मीके पूजयेन्नागान् दुग्धं चैव तु पाययेत् ।
सा त्रिमुहूर्तव्यापिनी षष्ठीयुता ग्राह्या ।
परेद्युस्त्रिमुहूर्तन्यूना यदि दिनद्वयेऽस्ति तथा उदयात्
पंचमी पूर्वेद्युस्त्रिमुहूर्तन्यूना चतुर्थीविद्धा तदा पूर्वैव ।
त्रिमुहूर्ताधिकचतुर्थीवेधे द्विमुहूर्तापि परैव ।

**अर्थ**—श्रावण शुक्ल पंचमीला नागपंचमी म्हणतात. त्या दिवशीं वारुळांत सर्पाची पूजा करून सर्पाला दूध पाजावें असें सांगितलें आहे. याकरितां पंचमी घेणें ती, दोन दिवस पंचमीचा योग असतां सूर्योदयापासून सहा घटिकांपर्यंत असणारी षष्ठीयुक्त घ्यावी. चतुर्थीयुक्त घेऊं नये. तथापि दुसऱ्या दिवशीं पंचमी सहा घटिकांपेक्षांही कमी असेल व जर पूर्व दिवशीं चतुर्थी सहा घटिकांपेक्षां अधिक नसेल तर मात्र पूर्व दिवसाची घेतली असतां चालेल. पण चतुर्थी सहा घटिकांहून अधिक असून नंतर लागणारी पंचमी केव्हांही घेऊं नये. अशा वेळीं दुसऱ्या दिवशीं पंचमी दोन मुहूर्त म्हणजे चार घटिका जरी असली तरी तीच घ्यावी.

श्रावण शु० ६ श्रियाळ ६, कल्किजयंति, वर्णषष्ठि. श्रावण शु० ७ शीतला ७.
श्रावण शु० ११ पुत्रदा ११. श्रावण शु० १२ शाकव्रत समाप्ति, दधिव्रतारंभ,
विष्णोः पवित्रारोपणम्. श्रावण शु० १४ शिवस्य पवित्रारोपणं.

पोंवती वाहण्याचा निर्णय—श्रावणशुक्लद्वादश्यां विष्णोः पवित्रारोपणम् ।
शिवस्य चतुर्दश्यां देव्याः अष्टम्यां गणेशस्य चतुर्थ्यां ।
सर्वेषां देवानां पौर्णमास्यां वा कार्यम् ।
पवित्रारोपणं विघ्नाच्छ्रावणे न भवेद्यदि ।
कार्तिक्यावधि शुक्रास्ते कर्तव्यमिति नारदः ।
अत्र सूर्योदयात् त्रिमुहूर्तव्यापिनी तिथिर्ग्राह्या ।

**अर्थ**—श्रावण शुक्ल द्वादशीस विष्णूला, चतुर्दशीस शंकराला, अष्टमीस देवीला व चतुर्थीस गणपतीला याप्रमाणें पोंवतीं वहावीं किंवा सर्व देवांला पोंवतीं वाहण्याला पौर्णिमाही उक्त आहे. याविषयीं जसा कुलाचार असेल त्याप्रमाणें करावें. कांहीं अडचणीमुळें श्रावणांत पोंवतीं वाहणें घडलें

नाहीं तर कार्तिक पूर्णिमेपर्यंत पवित्रारोपण करावें. पोंवतीं ज्या तिथीला वहावयाचीं ती तिथि सूर्योदयापासून सहा घटिकांपर्यंत तरी असावी.

श्रावण शु० १५-नारळीपौर्णिमा, हयग्रीवोत्पत्ति, श्रवणाकर्म.

सिंहसंक्रांतीच्या पुढील १६ घटिका पुण्यकाल होय.

श्रावणी—श्रावण महिन्यांत श्रवणनक्षत्रयुक्त दिवशीं अथवा पूर्णिमेस एक विशेष विधी करितात त्याला श्रावणी ह्मणतात. या विधीचें खरें रहस्य न समजून केवळ पंचगव्य घेऊन व नवीन यज्ञोपवीत घालून संवत्सरकृत पापापासून आपण पुनीत होऊं असें कांहीं लोक समजतात, पण ती समजूत यथार्थ नाहीं. कारण याज्ञवल्क्य स्मृतीमध्यें आचाराध्यायांतील स्नातकधर्मप्रकरणांत असें लिहिलें आहे कीं,

अध्यायानामुपाकर्म श्रावण्यां श्रवणेन वा ।
हस्तेनौषध्यभावेवा पंचम्यां श्रावणस्य तु ।

**अर्थ**—वनस्पति उगवल्या ह्मणजे श्रावणांत श्रवणनक्षत्रयुक्त दिवशीं किंवा हस्तनक्षत्रीं वेदाध्ययनाला आरंभ करावा. वनस्पति उगवल्या नाहींत तर भाद्रपदमासीं उपाकर्म करून साडेचार महिनेपर्यंत अध्ययन चालू ठेवावें व नंतर उत्सर्जन करावें. हीं खरी श्रावणी होय; परंतु वर्तमानकालीं त्या विधीला पापविमोचन विधि समजतात. असो.

ऋग्वेद्यांच्या श्रावणीचा निर्णय – गृह्यसूत्रे-श्रवणेन श्रावणस्य पंचम्यां हस्तेन वा ।

श्रावणशुक्लपक्षे श्रवणनक्षत्रं मुख्यकालः । तदभावे पंचमी हस्तसंयुता ।
तदभावे केवळपंचमी वा केवलहस्तः । इति बह्वृचानां कालत्रयम् ।
श्रवणस्य दिनद्वययोगे धनिष्ठायुक्तं मुहूर्तत्रयं न्यूनं वा परमेव ग्राह्यम् ।
उत्तराषाढासंयुतं न ग्राह्यम् । पंचमी हस्त इति कालद्वयं तु औदयिकं
मुहूर्तत्रयव्यापि मुख्यम् । तदलाभे पूर्वविद्धमपि ।
एवं भाद्रपदशुक्लपक्षेपि श्रवणं पंचमी हस्त इति कालत्रयनिर्णयो ज्ञेयः ।
यद्यर्धरात्रादर्वाक्तु संक्रांतिर्ग्रहणं तथा । उपाकर्म न कुर्वीत श्रावण्यां श्रवणेऽपिवा ।

**अर्थ**—श्रावण शुक्लपक्षांत श्रवण, पंचमी आणि हस्त असे तीन काल ऋग्वेद्यांना उपाकर्मास ह्मणजे श्रावणीस सांगितलेले आहेत. त्यांतें श्रवण नक्षत्र मुख्य आहे. श्रवण नक्षत्र न मिळेल तर पंचमीयुक्त हस्त किंवा केवळ पंचमी किंवा केवळ हस्त घ्यावे. दोन दिवस श्रवणाचा योग असतां दुसऱ्या दिवशीं सूर्योदयापासून सहा घटिका किंवा त्याहून कमी असेल तरी धनिष्ठायुक्त जें श्रवण नक्षत्र तेंच उपाकर्मास घ्यावें. उत्तराषाढायुक्त घेऊं नये. पंचमी व हस्त देखील, दोन दिवस योग असतां, सूर्योदयापासून सहा घटिकांपर्यंत असतील ते घ्यावे. सहा घटिकांहून कमी असतां पूर्व दिवसाचें घ्यावें. याचप्रमाणें भाद्रपदांतील श्रवण, हस्त, पंचमी हे काल संकटकालीं ऋग्वेदीयांस श्रावणी करण्यास युक्त आहेत. पौर्णिमेस श्रावणीच्या दिवशीं मध्यरात्रीच्या पूर्वी ग्रहण किंवा संक्रांती असेल तर त्या दिवशीं श्रावणी करूं नये.

यजुर्वेद्यांच्या श्रावणीचा निर्णय—हिरण्यकेशीतैत्तिरीयकाणां श्रावण्यां पौर्णमास्यां

वा हस्ते उपाकर्म कार्यम् तत्र श्रावणपौर्णमासी सर्वेषां याजुषाणां मुख्यः कालः ।
श्रावणशुक्ल पंचमी तत्तत्सूत्रेऽनुक्तेर्न ग्राह्या ।
एवं श्रावणे ग्रहण-संक्रांति-दोषात् भाद्रपदेपि कालद्वयमिति ।
उपाकर्मणि सूर्योदयमारभ्य पूर्णिमा ग्राह्या ।
यदि पूर्वदिने पूर्णिमा मुहूर्ताद्यनंतरं प्रवृत्ता च द्वितीयदिने
षण्मुहूर्तव्यापिनी सती तदा उत्तरैव । वृद्धियोगात्पूर्वैव ॥

**अर्थ**—हिरण्यकेशी व तैत्तिरीय शाखेच्या लोकांनीं श्रावण पौर्णिमा किंवा हस्त नक्षत्र यांवर श्रावणी करावी. त्यांत श्रावण पौर्णिमा हा काल सर्व यजुर्वेद्यांना मुख्य आहे. त्यांच्या सूत्रांत पंचमी मुळींच सांगितलेली नाहीं. म्हणून त्या दिवशीं त्यांनीं श्रावणी करूं नये. श्रावणांत पौर्णिमेच्या दिवशीं ग्रहणाची, संक्रांतीची किंवा दुसरी व्यावहारिक अडचण आल्यास भाद्रपदमासीं पौर्णिमेस किंवा हस्त नक्षत्रावर श्रावणी करावी. श्रावणीकरितां पूर्णिमा घेणें ती सूर्योदयाला असेल अशी घ्यावी. दोन दिवस पौर्णिमेचा योग असून प्रथम दिवशीं तीन चार घटिकांनीं पौर्णिमा लागत असेल व दुसऱ्या दिवशीं सूर्योदयापासून निदान बारा घटिकांपर्यंत असेल तर दुसऱ्या दिवशींच श्रावणी करावी. पौर्णिमेची वृद्धि असून जर दोन्ही दिवस सूर्योदयीं पूर्णिमा असेल तर प्रथम दिवसाची घ्यावी.

सामवेदी श्रावणीचा निर्णयः—भाद्रपदशुक्लपक्षे हस्तनक्षत्रे उपाकर्म कार्यं ।
संक्रांत्यादिदोषेण तत्रासंभवे श्रावणमासे हस्तो ग्राह्यः ।

**अर्थ**—सामवेदीयांच्या उपाकर्माचा मुख्य काल भाद्रपद शुक्ल पक्षांमध्यें ज्या दिवशीं हस्त नक्षत्र असेल तो दिवस होय. संक्रांति वगैरे दोषांनीं भाद्रपदांतील हस्त नक्षत्र दूषित असता श्रावणांतील हस्त घ्यावें.

नूतन श्रावणी--सिंहस्थे मलमासे च अस्ते च गुरुशुक्रयोः ।
प्रथमोपाकृतिर्न स्यात्कृतं कर्म विनाशकृत् ।

**अर्थ**—सिंहराशीस गुरु असतां, मलमासामध्यें किंवा गुरुशुक्रांच्या अस्तामध्यें नवीन मौंजी झालेल्या मुलाचें उपाकर्म करूं नये.

रक्षाबंधनम्—श्रावणपूर्णिमायां भद्रारहितायां त्रिमुहूर्ताधिकोदयव्यापिन्यामपराण्हे
प्रदोषे वा कार्यं इदं ग्रहणसंक्रांतिदिनेपि कर्तव्यम् ।

**अर्थ**--श्रावण पूर्णिमेला अपराण्ह किंवा प्रदोषकालीं रक्षाबंधन करावें. त्याला सूर्योदयापासून सहा घटिकांहून अधिक व भद्र रहित पूर्णिमा घ्यावी. त्या दिवशीं ग्रहण किंवा संक्रांति असतांही रक्षाबंधन करण्यास प्रत्यवाय नाहीं.

श्रावण कृष्ण २ अशून्यशयन व्रतम्. चंद्रोदयव्यापिनी घ्यावी. राघवेंद्रस्वामिनां पुण्यदिनं.

श्रावण कृष्ण ८ कृष्णजन्माष्टमी ही दोन प्रकारची. जन्माष्टमी व कृष्णजयंती. केवळ अष्टमी जन्माष्टमी आणि रोहिणीयुक्त अष्टमी जयंती. मुहूर्तमात्र कां होईना रोहिणी योग असेल ती उपोषणास योग्य आहे. दोन्ही दिवशीं रोहिणी योग असेल तर जयंतीचे ठिकाणीं जन्माष्टमीचा अंतर्भाव समजून जन्माष्टमी व्रत निराळें करणेचें कारण नाहीं. विशेषतः मध्यरात्रीस अष्टमी व रोहिणी यांचा

योग प्रशस्त आहे. अष्टमी रोहिणीरहित व रोहिणीयुक्त अशा दोन प्रकारची. त्यांतही रोहिणी-रहित अष्टमीचे प्रकार चार. १ पूर्व दिवशीं मध्यरात्रीं अष्टमीयुक्त. २ दुसरे दिवशीं मध्यरात्रीं अष्टमी-युक्त. ३ दोन्ही दिवशीं मध्यरात्रीस अष्टमीयुक्त. ४ दोन्ही दिवशीं मध्यरात्रीस अष्टमीयोगरहित. यांत पहिल्या दोन प्रकारांबद्दल शंका नाहीं. कारण ज्या दिवशीं मध्यरात्रीस अष्टमीयोग, त्या दिवशीं उपोषण करावें. तिसऱ्या व चौथ्या प्रकारास दुसरीच अष्टमी घ्यावी. रोहिणीयुक्त ही चार प्रकारची. १ पूर्व दिवशीं रोहिणीयुक्त. २ दुसरे दिवशीं रोहिणीयुक्त. ३ दोन्ही दिवशीं रोहिणीयोग. ४ दोन्हीं दिवशीं रोहिणीयोगरहित. यांतील पहिल्या दोन प्रकारांत संशय नाहीं. कारण ज्या दिवशीं अष्टमीस रोहिणीयोग, त्या दिवशीं उपोषण करावें. तिसऱ्या प्रकारांत दुसरे दिवशीं उपोषण. चवथ्या प्रका-रांतही तीन पक्ष आहेत. १ पूर्व दिवशीं मध्यरात्रीस अष्टमी, दुसरे दिवशीं रोहिणी. २ पूर्व दिवशीं रोहिणी, दुसरे दिवशीं अष्टमी. ३ दोन्हीं दिवशीं दोन्हींचाही मध्यरात्रीस योग. माधवमतें प्रथम कल्पीं दुसरे दिवशीं, हेमाद्रिमतें पूर्व दिवशींची अष्टमी करावी. तिथ्यंतीं व नक्षत्रांतीं पारणा करावी किंवा तिथ्यंतीं पारणा करावी. दुसऱ्या दोन्हीं पक्षीं दुसऱ्या दिवशीं व्रत करावें. ही मन्वादि आहे.

श्रावण कृष्ण ११ अजा ११. श्रावण कृष्ण ३० कुशग्रहणं. पिठोरी ३०.

## भाद्रपदमास.

भाद्रपद शुद्ध ३ हरितालिका——मुहूर्तमात्रसत्वेपि तृतीया परा ग्राह्या ।
क्षयवशादभावे द्वितीयायुक्ता ग्राह्या ।

**अर्थ**—तृतीयेचा दोन दिवस योग असतां दुसऱ्या दिवसाची दोन घटिका असली तरी घ्यावी. तृतीयेचा क्षय असतां द्वितीयायुक्त व वृद्धि असतां चतुर्थीयुक्त घ्यावी. ही मन्वादि आहे. या व्रतास चतुर्थीविद्ध घ्यावी. एक मुहूर्तमात्र कां असेना ती परविद्धच घ्यावी. द्वितीयाविद्ध केंव्हांही घेऊं नये. ही मन्वादि आहे. तृतीयायामपराह्णं वराहजयंती.

भाद्रपद शुद्ध ४ वरद ४. गणेशचतुर्थी——सा मध्यान्हव्यापिनी ग्राह्या ।
दिनद्वये साकल्येन मध्यान्हव्याप्तौ अव्याप्तौ वा पूर्वा । वैषम्येण
व्याप्तावधिकव्यापिनी चेत्परेति । अस्यां चंद्रदर्शने मिथ्याभिदूषणं दोषः ।

**अर्थ**—ही मध्यान्हव्यापिनी घ्यावी. दोन्हीं दिवस सारखी तशी असेल किंवा नसेल तर पूर्व दिवसाची घ्यावी. कमी अधिक व्याप्ति असतां दुसऱ्या दिवसाची अधिक असेल तर ती घ्यावी. गणेशचतुर्थीच्या दिवशीं चंद्र पाहूं नये. कारण कांहीं तरी आळ येतो असें सांगितलें आहे; परंतु चुकून चंद्रदर्शन झालें असतां

' सिंहः प्रसेनमवधीत् सिंहो जांबवता हतः । सुकुमारक मारोदीस्तव ह्येष स्यमंतकः ।
या मंत्राचा जप करावा ह्मणजे दोष परिहार होतो.

भाद्रपद शुद्ध ५ ऋषिपंचमी—सा मध्यान्हव्यापिनी ग्राह्या
दिनद्वये मध्यान्हव्याप्तौ तदव्याप्तौ च पूर्वा ॥

**अर्थ**—ही मध्यान्हव्यापिनी घ्यावी. दोन्हीं दिवस मध्यान्हीं असतां किंवा नसतां पूर्व दिव-साची घ्यावी. दोन्हीं दिवशीं मध्यान्हव्याप्ति असेल तर हेमाद्रिमतें दुसरी व माधवमतें पहिली करावी असें आहे.

## माघमास.

माघ शु० ४ कुंदचतुर्थी.

माघशुद्ध ५ वसंतपंचमी सा पूर्वाह्णव्यापिनी ग्राह्या। दिनद्वये तथासत्वे पूर्वा.

**अर्थ**—माघ शुक्ल पंचमीला वसंतपंचमी ह्मणतात. ही पूर्वाह्णव्यापिनी घ्यावी. दोन्हीं दिवस तशी असतां पूर्व दिवसाची घ्यावी. ह्या दिवशीं कित्येक ठिकाणीं रति व मदन यांची पूजा करून मोठा उत्सव करितात.

माघ शुद्ध ७ रथसप्तमी—सा आरुणोदयव्यापिनी ग्राह्या दिनद्वयेप्येवं पूर्वा।

माघ शुक्ल सप्तमीला रथसप्तमी ह्मणतात. ही अरुणोदयव्यापिनी घ्यावी. दोन्हीं दिवशीं तशी असतां पूर्व दिवशीं करावी. ही सप्तमी अरुणोदयीं असून तीर्थस्नान केलें असतां सूर्यग्रहणासारखें फल आहे जेव्हां पूर्व दिवशीं २ घटिका षष्ठी व सप्तमीचा क्षय असेल व अरुणोदयाचे पूर्वी सप्तमी संपेल तर दुसरीच घेणें.

माघ शु० ८ भीष्माष्टमी. माघ शु० ९ मध्वनवमी. श्रीमदानंदतीर्थ.

माघ शु० ११ जया ११. माघ शु० १२ भीष्म १२. ही पूर्वविद्ध करावी. संतान १२ तिलोत्पत्तिः

माघ शु० १३ कल्पादि. माघ शु० १५ ही दुसरी घ्यावी. माघस्नान समाप्तिः कुंभसंक्रमणास पूर्वीच्या १६ घटिका पुण्यकाल.

माघ कृष्ण ८ जानक्युत्पत्तिः माघ कृष्ण ९ रामदासनवमी. माघ कृष्ण ११ विजया ११.

माघ कृष्ण १४ महाशिवरात्री. ही कित्येकांचे मतें प्रदोषव्यापिनी घेणें असें आहे. कित्येकांचे मतें निशीथव्यापिनी घेणें असें आहे. त्रयोदशी संध्याकाळपर्यंतच असेल तर त्याच दिवशीं शिवरात्रीचें उपोषण जागरण करावें. दोन्हीं दिवशीं चतुर्दशी निशीथव्यापिनी असेल तर पूर्वीचीच घेणें असें हेमाद्रीचें मत आहे; परंतु दुसरे दिवशीं प्रदोषकाळीं व निशीथास चतुर्दशीव्याप्ति असल्यानें दुसरीच घेणें प्रशस्त आहे असें माधवमत आहे व तें बरोबर आहे. पूर्व दिवशीं निशीथव्यापिनी व उत्तर दिवशीं प्रदोषव्यापिनी चतुर्दशी असेल तर पूर्वीची घेणें. कारण जया योग सांपडतो. जेव्हां पूर्वदिनी चतुर्दशी मध्यरात्रीच्यापुढें लागून दुसरे दिवशीं मध्यरात्रीच्यापूर्वी संपत असेल त्यावेळीं दुसरीच घ्यावी. कारण एकदेशव्याप्ति येते. दोन्हीं दिवशीं प्रदोषकाळीं नसेल तर पूर्वीचीच घ्यावी. हा योग रवि, मंगळवार असतां प्रशस्त होय.

माघ कृष्ण ३० द्वापारयुगादि.

## फाल्गुनमास.

फाल्गुन शुद्ध ११ आमलकी ११.

फाल्गुन शुद्ध १५ हुताशनी १५. ही सायान्हव्यापिनी घ्यावी. भद्रामुख टाकून होलिका करावी. अर्थात् ही पूर्वाविद्ध घ्यावी. दोन्हीं दिवशीं प्रदोषव्याप्ति असेल तर दुसरीच घ्यावी. जेव्हां पूर्व दिवशीं चतुर्दशी प्रदोषव्यापिनी व दुसरे दिवशीं क्षयतिथीमुळें सायान्हाचेपूर्वी पौर्णिमा संपत असेल तर पूर्व दिवशीं रात्रीं समग्र भद्रा असल्यानें होलिका दुसरे दिवशीं ह्मणजे प्रतिपदेवर करावी. जर ग्रहण येईल तर ग्रहणापूर्वी भद्रारहित पौर्णिमेवर होलिका करावी. मलमासामध्यें होलिकादीपन होत नाहीं. ही मन्वादि आहे. ही पूर्वाह्णव्यापिनी घ्यावी. मीन संक्रांतीच्या पुढच्या १६ घटिका पुण्यकाल होय.

फाल्गुन कृष्ण १ करिदिनं. वसंतोत्सव. यास उदयव्यापिनी घ्यावी. धूलिवंदनं. आम्रकुसुमप्राशनं.

फाल्गुन कृष्ण २ कल्पादि.

फाल्गुन कृष्ण ५ रंगपंचमी. ही पूर्वाह्णव्यापिनी घ्यावी. दोन दिवस तशी असतां पूर्वीची घ्यावी. द्वापार युगामध्यें श्रीकृष्णांनीं गोपींशीं रंगविलास केला ती तिथी ही होय.

फाल्गुन कृष्ण ११ पापमोचनी ११. फाल्गुन कृष्ण ३० मन्वादि. अपराह्णव्यापिनी घ्यावी.

सूर्य व चंद्र या ग्रहणाच्या पुढील दिवस करिदिन समजावा.

अधिकमास शु० ११ कमला ११. अधिकमास कृष्ण ११ कमला ११.

संकष्टचतुर्थी—सा चंद्रोदयव्यापिनी ग्राह्या दिनद्वये चंद्रोदयेसत्वे परा ग्राह्या ।
दिनद्वयेपि चंद्रोदये न स्यात् तदा प्रदोषव्यापिनी ।
केचित्तु तृतीयायुक्तैव ग्राह्येत्याहुः ।

**अर्थ**—संकष्टचतुर्थी चंद्रोदयीं असेल ती घ्यावी. दोन्हीं दिवस तशी असतां तृतीयायुक्त दुसऱ्या दिवसाची घ्यावी. दोन्ही दिवस चंद्रोदयाला नसतां प्रदोषव्यापिनी घ्यावी. कित्येकांच्या मतें तृतीय युक्त चतुर्थी प्रशस्त होय.

## योगविशेषः

**चैत्रे**---चैत्र कृष्ण १३ शततारका नक्षत्रयुता वारुणीसंज्ञका ।
तस्यां स्नानादि ग्रहणादिपर्वतुल्यफलदं ।

वरील योग असून शनिवारयुक्ता महावारुणी योग होतो. शुभ योग, शततारका नक्षत्र, शनिवारयुक्ता हा महा महा वारुणी योग झाला. ह्या दिवशीं स्नानदानाद कृत्यें करावीं.

### कपिलाषष्ठी.

**भाद्रपद**—वाराहे—नभस्य कृष्णपक्षेतु रोहिणीपातभूसुतैः ।
युक्ता षष्ठी पुराणज्ञैः कपिला परिकीर्तिता ॥ १ ॥
पुराणसमुच्चये—भाद्रेमास्यसितेपक्षे भानौ चैव करे स्थिते ।
पाते कुजे च रोहिण्यां सा षष्ठी कपिला भवेत् ॥ १ ॥
हेमाद्रि—नभस्य कृष्णपक्षेच षष्ठयां भौमे च रोहिणी ।
व्यतीपातं तथा षष्ठी कपिलानंतपुण्यदा ॥ १ ॥

**अर्थ**—१ वाराहांत-भाद्रपदाच्या कृष्णपक्षांत रोहिणी नक्षत्र, व्यतीपात योग आणि भौमवार यांनीं युक्त जी षष्ठी ती कपिलाषष्ठी.

२ पुराणसमुच्चयांत—भाद्रपदमासीं कृष्णपक्षांत सूर्य हस्त नक्षत्रीं असतां व्यतीपात, भौमवार, रोहिणी नक्षत्र यांनीं युक्त जी षष्ठी ती कपिलाषष्ठी. ही अति उत्तम होय. ३ हेमाद्रींत—हस्तास सूर्य नसला तरी चौघांचा ( षष्ठी, रोहिणी, व्यतीपात आणि मंगळवार ) असा योग असला म्हणजे ती कपिलाषष्ठी होते. स्नान, दान, होम, श्राद्ध वगैरे धर्मकृत्यें केलीं म्हणजे कोटी फल मिळतें. हें सूर्यपर्व असल्यानें दिवसासच हे योग असले पाहिजेत.

## गजच्छायापर्व.

हंसे करस्थिते यातु अमावास्या करान्विता ।
साज्ञेया कुंजरच्छाया इति बौधायनोब्रवीत् ॥ १ ॥

**अर्थ**—भाद्रपदी अमावास्या हस्तनक्षत्रयुक्त असून हस्तनक्षत्रास सूर्य असेल तर ती गजच्छाया जाणावी असें बौधायन सांगतो. ह्या दिवशीं श्राद्धादि धर्मकृत्यें करावीं ह्मणजे अनंत फलाची प्राप्ति होते.

## कार्तिकेयदर्शनम्.

कार्तिक्यां कृत्तिकायोगे यः कुर्यात्स्वामिदर्शनं ।
सप्तजन्म भवेद्विप्रो धनाढ्यो वेदपारगः ॥ १ ॥
विशाखासु यदाभानुः कृत्तिकासु च चंद्रमाः ।
संयोगः पद्मको नाम पुष्करेष्वपि दुर्लभः ॥ २ ॥

**अर्थ**—काशी खंडांत—कार्तिकी पौर्णिमेस कृत्तिका नक्षत्र असतां जो कार्तिकस्वामीचें दर्शन करील तो सात जन्मपर्यंत धनवान् आणि वेदपारंगत असा ब्राह्मण होईल. त्यांत विशेषेंकरून विशाखा नक्षत्रास सूर्य असून कृत्तिका दिननक्षत्रास चंद्रमायुक्त पौर्णिमा असली ह्मणजे पद्मकनामायोग होतो. या योगावर कार्तिकस्वामीचें दर्शन झालें ह्मणजे खात्रीनें वरीलप्रमाणें घडून येईल. हा योग येणें पुष्कराचे स्नानापेक्षां अति श्रेष्ठ अतएव दुर्लभ आहे.

## अर्धोदयः

पौषामावास्यायामर्धोदययोगः । अमार्कपात श्रवणैर्युक्ताचेत्पौषमाघयोः अर्धोदयः स विज्ञेयः कोटिसूर्य ग्रहैः समः ॥ किंचिन्न्यूनं महोदय इति चतुर्थपादं केचित्पठंति । पौष माघयोर्मध्यवर्तिनीत्यर्थ इत्येके । अमांतमासे पौषस्य पूर्णिमांत मासे माघस्य चेत्यर्थ इत्यपरे । सर्वथा पौषपौर्णमास्युत्तरा-मावास्येत्यर्थः । दिवैवयोगः शस्तोयं न तु रात्रौ कदाचन । अर्धोदये तु संप्राप्ते सर्वं गंगासमं जलं । शुद्धात्मानो द्विजाः सर्वे भवेयुर्ब्रह्मसन्निभाः । यत्किंचिद्दीयते दानं तद्दानं मेरुसन्निभं ।

**अर्थ**—पौष अमावास्येचे दिवशीं अर्धोदय योग होतो तो असाः—" पौष, माघ मासांतील अमावास्येचे दिवशीं रविवार, व्यतीपात, श्रवण नक्षत्र यांचा योग असेल तर तो " अर्धोदय " ह्मणावा व तो कोटि सूर्यग्रहणांशीं तुल्य आहे. यांत कांहीं योग कमी असल्यास 'महोदय' होतो. असा चवथा पाद कोणी पठण करितात. पौष व माघ यांच्यामधलीं अमावास्या असा अर्थ कोणी दुसरे ग्रंथकार करितात. अमांत मासामध्यें पौषी अमावास्या, आणि पौर्णिमांत मासामध्यें माघी अमावास्या असा अर्थ आणखी दुसरे ग्रंथकार करितात. सर्व प्रकारानें पौष पौर्णिमेच्यानंतरची अमावास्या असा अर्थ समजावा. " हा अर्धोदय योग दिवसाचे ठिकाणींच प्रशस्त आहे. रात्रीमध्यें कधींही प्रशस्त नाहीं. अर्धोदय आला असतां सर्व उदक गंगेप्रमाणें पवित्र व सर्व ब्राह्मण ब्रह्मदेवासारखे शुद्ध होत. या अर्धोदय कालीं अल्प जें कांहीं दान करावें तें मेरु पर्वताप्रमाणें मोठें होतें. "

## एकादशी.

स्मार्तानां शुद्धाविद्धैकादशीवृद्धौ पूर्वेद्युरुपवासः वैष्णवानां अरुणोदय-
वेधे आधिक्ये वा सर्वत्र एकादशीं विहाय द्वादश्यामुपवासः ॥

स्मार्त आणि वैष्णव असे एकादशीचे दोन भेद आहेत. त्यांविषयींचा शास्त्रार्थ निर्णयसिंधु व धर्मसिंधु ह्या ग्रंथांत विस्तारेंकरून सांगितला आहे. त्याचा सारांश असा आहे कीं, स्मार्तांनीं शुद्ध किंवा विद्ध ( सूर्योदयीं दशमी तिथीनें युक्त ती विद्ध व सूर्योदयीं दशमी तिथीच्या स्पर्शानें रहित ती शुद्ध ) अशा एकादशीची वृद्धि असतां पूर्व दिवशीं उपोषण करावें. आणि वैष्णवांनीं अरुणोदयीं दशमीचा पलमात्र वेध किंवा आधिक्य असतां ती एकादशी टाकून द्वादशीचे दिवशीं उपोषण करावें.

## दशमीचा निर्णय.

रात्रीचा शेवटचा आठवा भाग तो अरुणोदय, असें हेमाद्रीनें सांगितलें तें, आणि जें रात्रिमान मोठें असतां चार घटिका अरुणोदय काल तें दुसऱ्यांचें मत आपणच ( हेमाद्रीनेंच ) दूषित केलें व शेवटींही त्यानें सांगितलें कीं, वेधतारतम्य, दोषतारतम्येंकरून उपपन्न होतें; तें दोषतारतम्य प्रायश्चित्ततारतम्येंकरून समजलें जातें, तें सांगतों —हेमाद्रींत—स्मृत्यंतरांत जर कांणी मनुष्य अज्ञानें-करून किंवा मोहानें दशमीशेषयुक्त एकादशी करील तर त्यानें हें ( पुढें सांगितलेलें ) प्रायश्चित्त करावें, तें असें-" पादकृच्छ्र करून सवत्स गोप्रदान करावें. द्रोणपरिमित तिलांसहित अर्ध सुवर्णदान करावें. " दुसरें विधान-त्या ठिकाणींच सांगतों—" तीस ब्राह्मणांस भोजन द्यावें, सवत्स गाय द्यावी, अथवा द्रोणपरिमित तिल किंवा अर्ध धरण--परिमित सुवर्ण यांचें दान करावें. " यांविषयीं वेधतारतम्येंकरून व्यवस्था करावी असें हेमाद्रि ह्मणतो.

' निशः प्रांते ' असें जें पूर्वोक्त स्मृतिवचन तेंही अधिक दोषप्रदर्शनार्थच आहे, तस्मात् चार घटिका परिमितच अरुणोदय असें सिद्ध झालें. ह्मणून ५६ घटिकांनंतर दशमीचा प्रवेश असेल तर तो अरुणोदय वेध होतो.

अंत्य ह्मणजे सूर्योदय वेधही त्याच ठिकाणीं कण्वानें सांगितला आहे. तो असाः—" जर उदयानंतर दशमीनें विद्ध एकादशी होईल तर ती एकादशी इंद्र दानवांना संतोषार्थ देता झाला. " स्मृत्यंतरांतही—" ज्या कालीं दशमीच्या शेवटच्या पलादि भागांत सूर्य उदय पावतो त्या उदयानें स्पर्श केलेली एकादशी जंभासुराला दिली आहे."

## वैष्णवांस अरुणोदय वेध.

त्या वेधांमध्यें अरुणोदय वेध वैष्णवाविषयीं आहे; कारण अरुणोदय वेधप्रतिपादक वाक्यांत ( वैष्णव ) असें पद पठित आहे. वैष्णवांचें स्वरूप—माधवीयांत-स्कांदांत—" मोठी आपत्ति प्राप्त झाली, किंवा मोठा हर्ष झाला तरी जो एकादशी टाकीत नाहीं, ज्याला वैष्णवी दीक्षा ( उपदेश ) आहे, ज्यानें आपला सर्व आचार ( कर्म ) विष्णूला अर्पण केलें आहे, तो वैष्णव ह्मटला आहे. " पिता पितामह इत्यादिकांनीं आगमदीक्षा ग्रहण केली असेल तर ते मात्र वैष्णव होतात; त्यांचे पुत्रादिक वैष्णव होत नाहींत, असें जरी आहे तथापि आपल्या परंपरेनें प्रसिद्ध जें वैष्णवत्व व स्मार्तत्व तें वृद्ध मानितात. तत्त्वसागरांत—भविष्यांत-" जशी शुक्लैकादशी तशीच कृष्णैकादशी, जशी कृष्णैकादशी तशी शुक्लैकादशी, याप्रमाणें उभय एकादशी जो समान मानतो तो वैष्णव होय. " केचित् ग्रंथकार तर दशमीचे ठायीं नवमी वेधही वर्ज्य करतात, परंतु त्याविषयीं मूळ ( प्रमाण ) नाहीं.

## स्मार्तांस उदय वेध.

जो उदयकालिक वेध तो स्मार्तविषयक होय, तेंच माधव सांगतो—" ह्या एकादशी व्रताविषयीं अरुणोदयवेध व सूर्योदयवेध असे दोन दशमीवेध, वैष्णव व स्मार्त यांना क्रमेंकरून सांगितले आहेत." ह्मणजे अरुणोदयवेध वैष्णवांनीं व सूर्योदयवेध स्मार्तांनीं घ्यावा.

## इतर वेध.

हेमाद्रि तर कित्येकांस अर्ध रात्रींही दशमी वेध सांगतो. " कित्येकांस अर्ध रात्रीं दशमीचा वेध युक्त आहे. तोच कपालवेध होय—असें वैष्णव आचार्य ह्मणतात. परंतु माझें मत तसें नाहीं; कारण तीन प्रहरांची रात्र सांगितली आहे" असें ब्रह्मवैवर्तवचन आहे. या वचनाचा अर्थ असाः— " अनद्यतने लङ्" या सूत्राचे ठिकाणीं, अतीत ( गत ) रात्रीचे पश्चिम ( पुढचे ) दोन प्रहर आणि येणाऱ्या रात्रीचे पूर्व दोन प्रहर व मध्यवर्ती दिवस मिळून जो काल तो सर्व अद्यतन काल होय असें व्याकरण महाभाष्यांत अद्यतन कालाचें विवरण केलें आहे, तो हा वर्तमानकाल, एकादशीचा अहोरात्र उपोष्य ( उपोषणास विहित ) होय; त्या कालांत दशमीचा प्रवेश असतां ती विद्धैकादशी टाकावी, असें आहे ह्मणूनच हेमाद्रींतः—" अर्धरात्रीच्यापुढें दशमीचा संगदोष असेल तर तो एकादशीचा दिवस ( दिवसाचे ४ प्रहर ) संकल्प व पूजा याविषयीं सर्वदा वर्ज्य करावा " असा दोष सांगितला आहे; आपल्या मतें तर रात्रींहीं तीन प्रहरात्मक आहे, ह्मणून तीन प्रहर हे पूर्व दिवसाचा शेष आहे, यावरून चौथ्या प्रहरीं वेध योग्य, व तोहि अरुणोदयकालींच येतो, कारण, " सूर्योदयावांचून स्नान-दानादिक होत नाहींत " असें मार्कंडेय पुराणांत वचन आहे. प्रत्यूष, अहर्मुख हीं नांवें कोशकारानें त्यालाच सांगितलीं आहेत, ह्मणून अरुणोदयापासून सूर्यकिरणांची प्रवृत्ति होते. याकरितां अरुणोदय कालींच दशमीचा निषेध आहे. यावरून मतभेदेंकरून वेधाची व्यवस्था जाणावी असें केचित् ग्रंथ-कार ह्मणतात. कैमुतिक न्यायानें ( दोनप्रहरांत दशमी असली तरी वेध आहे, मग अरुणो-दय कालीं दशमी असेल तर वेध काय सांगावा अशा न्यायानें ) अरुणोदय वेधाचीच स्तुति आहे तर माधव ह्मणतो. आतां जो ' दशमी १५ घटिकांनीं एकादशीला विद्ध करिते ' असा वेध सांगि-तला तो उपवासव्यतिरिक्तविषयक होय असें माधव ह्मणतो; कारण ' हा सर्व प्रकारचा वेध उपवा-साचा दूषक होतो, १५ घटिकापरिमित दशमीयोग हा व्रतास बाध करितो ' असें निगमवाक्य आहे. आतां हा दशमीवेधाचा विचार पुरा करूं.

## वैष्णवांस अरुणोदयविद्धा निषिद्धा.

या विद्ध एकादशीमध्यें माधवाचे मतीं वैष्णवांनीं अरुणोदयविद्धा टाकावी. ज्यावेळीं एकादशीच शुद्धा असून वृद्धिंगत होते ( दुसऱ्या दिवशीं असते ) किंवा द्वादशी वृद्धिंगत होते, अथवा एकादशी व द्वादशी दोनही तिथी वृद्धिंगत असतात त्यावेळीं दुसऱ्या दिवसाची ती वैष्णवांनीं उपोषणास घ्यावी, कारण ' एकादशी किंवा द्वादशी वृद्धिगामिनी ( दुसऱ्या दिवशीं उर्वरित ) असेल तर वैष्णवांनीं पूर्व दिवसाची टाकून उत्तर दिवसाची घ्यावी, असा वैष्णवांचा निर्णय आहे ' असें माधवानें सांगितलें आहे.

## स्मार्तांस सूर्योदयविद्धा निषिद्धा.

स्मार्तांनीं तर सूर्योदयविद्धा टाकावी. ज्या वेळीं एकादशी शुद्ध असून वाढते ( दुसऱ्या दिवशीं असते ) आणि द्वादशी तर समा किंवा न्यूना असते, त्यावेळीं गृहस्थाश्रमी यांनीं पूर्वा करावी, यति

( संन्यासी ) विधवा यांनीं उत्तरा करावी; कारण, " पूर्व दिवशीं अहोरात्र आणि संपूर्ण असून दुसऱ्या दिवशीं द्वादशीचेठायीं एकादशी असेल तर गृहस्थांनीं पूर्वा आणि यतींनीं उत्तरा करावी." असें स्कंदपुराणांत वचन आहे. वर्धमानहि असेंच सांगतो.

## एकादशी स्मार्तवैष्णव निर्णय.

एकादशी व द्वादशी ह्या दोघांची वृद्धि असेल तर शुद्धा असो किंवा विद्धा असो, सर्वांनीं पराच करावी; कारण, " पूर्वदिवशीं संपूर्ण एकादशी असून दुसरे दिवशीं पुनः वृद्धिगामिनी एकादशी व तिसऱ्या दिवशीं द्वादशी जर असेल तर सर्वांनीं उत्तराच करावी " असें नारदवचन आहे. द्वादशीची मात्र वृद्धि असेल तर शुद्धा असतां पूर्वाच करावी; कारण, " द्वादशीचे दिवशीं एकादशी अल्प-सुद्धां नाहीं, आणि द्वादशी त्या दिवशीं असून पुढच्या दिवशीं आहे त्या वेळीं, एकादशीलाच उपोषण करावें " असें नारदवचन आहे; आणि " द्वादशीची मात्र वृद्धि असेल तर शुद्धा आणि विद्धा व्यवस्थित जाणाव्या, ह्मणजे शुध्दा असतां पूर्वा, आणि विध्दा असतां उत्तरा करावी, याप्रमाणें स्मार्त निर्णय समजावा " अशी माधवाचीही उक्ति आहे. मदनरत्नांतहि असेंच आहे. आतां जें " दुसऱ्या दिवशीं द्वादशी नसेल तर, ती विध्दा असतांहि अविध्दा जाणावी. आणि जर दुसऱ्या दिवशीं द्वादशी असेल तर अविध्दा असतांहि विध्दा जाणावी " असें हेमाद्रींत पाद्मवचन तें एकादशीची वृध्दि असतां जाणावें. तेंच माधवानें सांगितलें आहे. तें असें;–" ज्या कालीं एकादशी व द्वादशी ह्या दोनीहि तिथि वाढतात, त्या कालीं स्मार्तांनीं पूर्व दिवस टाकून दुसरा दिवस उपोषणाला घ्यावा.

विध्दैकादशी असून द्वादशीची मात्र वृध्दि असतां सर्वांनीं दुसऱ्या दिवसाचीच उपोषणाला घ्यावी. विध्दैकादशी असून एकादशीची मात्र वृध्दि असतां गृहस्थाश्रमी यांनीं पूर्वा करावी; संन्याशी यांनीं उत्तरा करावी; कारण, " जर दुसऱ्या दिवशीं द्वादशी नसेल तर, ती विध्दा असतांहि अविद्धा आणि जर दुसऱ्या दिवशीं द्वादशी असेल तर अविध्दा असतांहि विद्धा जाणावी " असें पूर्वोक्त पाद्मवचन आहे. " शुक्लपक्षीं आणि कृष्णपक्षीं एकादशीची वृद्धि असेल तर गृहस्थाश्रम्यांनीं पूर्वा करावी आणि यतींनीं उत्तरा करावी " असें प्रचेतसाचें वचन आहे. हें ( प्रचेतसाचें ) वचन शुध्दा व विध्दा यांविषयीं तुल्य आहे असें माधव ह्मणतो; कारण, " त्रयोदशीस अल्पही द्वादशी नसेल तर दशमी-युक्तहि एकादशी उपोषणास घ्यावी " असें स्कांदवचन आहे. आणि " जर निषिध्द अशा दशमीनें अविध्द अशी एकादशी मिळत नाहीं, तर पांच मुहूर्तांनीं विद्ध अशी एकादशी ग्रहण करावी. " असें ऋष्यश्रृंगाचेंही वचन आहे. येथें पांच मुहूर्त ह्मटले ते अरुणोदयापासून समजावे. अरुणोदयापासून न समजतां सूर्योदयापासून घेतले तर दुसऱ्या दिवशीं एकादशी नाहीं, असें होणार नाहीं. आतां जें हेमाद्रीनें सांगितलें कीं, शुध्दसमा किंवा शुध्दन्यूना अशी एकादशी व दुसऱ्या दिवशीं अधिक द्वादशी असेल तर सर्वांनीं पराच करावी, असें तेंहि हेमाद्रीमतें वैष्णवयुक्त समजावें. स्मार्तांनीं तर पूर्वाच करावी, ह्मणजे कोणताहि विरोध येत नाहीं.

आतां हेमाद्रीमत सांगतों–शुध्द भेद-१ शुध्दान्यूनान्यून द्वादशीका, २ शुध्दन्यूना सम द्वादशीका,

---

१ येथें न्यूनत्व ह्मणजे ६० घटिकांत कमी असणें. समत्व ह्मणजे साठ घटिका बरोबर असणें, आणि अधिकत्व ह्मणजे ६० घटिकांपेक्षां अधिक असणें, असें समजावें. वैष्णवांची शुध्द एकादशी ह्मणजे पूर्व दिवशीं ५६ घटिकानंतर पलमात्र देखील दशमी नाहीं ती होय. आणि स्मार्तांची शुद्ध एकादशी ह्मणजे ज्या एकादशीस सूर्योदयाला दशमी नाहीं ती होय.

## हरिवासर.

द्वादश्यां प्रथमः पादो हरिवासरसंज्ञकः । आभाकासितपक्षेषु मैत्रश्रवणरेवती ।
संगमे नहि भोक्तव्यं द्वादशद्वादशीर्हरेत । तिथिनक्षत्रसंयोगे उपवासो यदा भवेत् ।
पारणं तु न कर्तव्यं यावन्नैकस्य संक्षयः ।

अर्थ—द्वादशीचा प्रथमचरण हरिवासरसंज्ञक होय. आषाढ, भाद्रपद, कार्तिक या तीन महिन्यांच्या शुक्लपक्षीय द्वादशीस जर क्रमानें अनुराधा, श्रवण, रेवती या नक्षत्रांचा योग होईल तर उपोषण करावें. उपोषण नाहीं केलें तर बारा द्वादशी निष्फळ होतात. तिथि व नक्षत्र यांच्या संयोगामुळें जेव्हां उपोषण होतें तेव्हां या दोहोंपैकीं एकाची समाप्ती झालेवांचून पारणा करूं नये. आतां एकादशी व्रताविषयीं उपयुक्त असें कांहीं सांगतों.

दशमीचे दिवशीं एकादशीचा योग असेल तर दशमीमध्येंच भोजन करावें; "एकादशीचे ठायीं भोजन करूं नये" या वाक्यांतील भोजन निषेधाला एकादशीच निमित्त आहे; आणि "निषेधतर निवृत्तिरूप असल्यामुळें तो एकादशी कालमात्राचीच उपेक्षा करतो. ह्मणजे एकादशी तिथींत भोजन निषेध आहे" असें देवलवचनहि आहे. कोणी ग्रंथकार तर—काम्य एकादशी व्रताच्या अंगत्वानें, पूर्वदिवशीं एकभुक्त करावें, असा विधि आहे, ह्मणून विधिप्रयुक्ताविषयीं निषेध होत नसल्यामुळें काम्यव्रताचें अंग जें पूर्व दिवशीं भोजन त्याविषयीं निषेध प्रवृत्त होत नाहीं, याकरितां पूर्व दिवशीं एकादशीमध्येंही भोजन करावें, असें ह्मणतात.

## इष्टिकालनिर्णय.

पक्षांता उपवस्तव्या॰ पूर्णिमेच्या चतुर्थ चरणावर व कृष्ण प्रतिपदेच्या प्रथम तीन चरणांवर तत्काळीं इष्टीचा होम करावा. प्रतिपदेच्या चतुर्थचरणावर याग करूं नये हा तात्पर्यार्थ. जेव्हां पूर्णिमा व प्रतिपदा पूर्णतिथि असतील तेव्हां संशयच नाहीं. पूर्णिमेवर अन्वाधान व प्रतिपदेवर सकाळीं याग असें होतें. पण पूर्णिमा खंडतिथि असेल व प्रतिपदेच्या घटिका पूर्णिमेच्या घटीपेक्षां कमी अधिक असतील तर त्या ऱ्हासवृद्धि घटिका मोजून त्याच्या निम्म्या घटिका प्रतिपदेचा ऱ्हास असेल तर पौर्णिमेच्या घटीमध्यें वजा कराव्या. जर वृद्धि असेल तर मिळवाव्या व संधिकाल जाणून अन्वाधान व इष्टि यांचा कालनिर्णय करावा. ज्या ठिकाणीं ऱ्हास वृद्धि नसतील त्या ठिकाणीं संधिकाल स्पष्टच असतो. हा संधि चार प्रकारचा—१ पूर्वाण्हसंधि. २ माध्यान्हसंधि. ३ अपराण्हसंधि. ४ रात्रिसंधि. दिनमानाचे दोन विभाग केले असतां प्रथमभाग पूर्वाण्ह व दुसरा भाग अपराण्ह होय, आणि पूर्वाण्ह व अपराण्ह यांचेमधील दोन घटिका माध्यान्ह होय. तेव्हां पूर्वी सांगितल्याप्रमाणें ऱ्हास वृद्धीच्या घटिकार्धाची बेरीज किंवा वजाबाकी करून जर पूर्णिमा व प्रतिपदेचा संधि पूर्वाण्हीं किंवा मध्यान्हीं येईल तर पूर्व दिवशीं अन्वाधान व संधिदिवशीं इष्टि करावी. जर अपराण्ह अगर रात्रिसंधि येईल तर संधिदिवशीं अन्वाधान व दुसरे दिवशीं इष्टि करावी. बारा घटिकांनंतर तेराव्या घटिकेपासून दिनार्धापूर्वी जर पौर्णिमाप्रतिपदेचा संधि येईल तर ती सद्यस्काला पौर्णमासी होते. अशी आली असतां त्याच दिवशीं अन्वाधान व इष्टिहीं करावीत. हें सद्यस्कालत्व वैकल्पिक आहे असें कोणी ह्मणतात. पौर्णिमा किंवा अमावास्या यांचे ठिकाणीं जर अपराण्ह संधि आला तर प्रतिपदेच्या चतुर्थ चरणावर इष्टि केली असतां दोष नाहीं. ज्या वेळीं संधिदिवशींच इष्टि येईल, तेव्हां इष्टि प्रतिपदेवरच संपूर्ण केली पाहिजे, पर्वामध्यें संपवितां येत नाहीं. कारण पर्वांत इष्टि समाप्त झाली तर पुनः इष्टि करावी लागेल.

# " बृहत्पंचांगफलादर्श भाग २रा. "

## ॥ अथ आदित्यचारः ॥

आश्लेषार्धाद्दक्षिणमुत्तरमयनं रवेर्धनिष्ठाद्यं ॥
नूनं कदाचिदासीद्येनोक्तं पूर्वशास्त्रेषु ॥ १ ॥

**अर्थः**— आश्लेषांच्या अंत्य दोन चरणांहीं रवीचें दक्षिणायन व धनिष्ठांच्या प्रारंभापासून उत्तरायण होतें असें ज्याअर्थी पूर्वशास्त्रांत सांगितलें आहे, त्याअर्थी तें केव्हांतरी पूर्वी खरोखर होत असलें पाहिजे.

सांप्रतमयनं सवितुः कर्कटकाद्यं मृगादितश्चान्यत् ॥
उक्ताभावो विकृतिः प्रत्यक्षपरीक्षणैर्व्यक्तिः ॥ २ ॥

**अर्थः**— सांप्रतकाळीं कर्कसंक्रांतीपासून सूर्याचें दक्षिणायन व मकरसंक्रांतीपासून उत्तरायण होतें. हें हल्लीं प्रत्यक्ष पाहून स्पष्ट होतें. ॥२॥

दूरस्थचिह्नवेधादुदयेऽस्तमयेऽपि वा सहस्रांशोः ॥
छायाप्रवेशनिर्गमचिह्नैर्वा मंडले भवति ॥ ३ ॥

**अर्थः**— दूरस्थाचिन्हवेधानें सूर्याच्या उदयीं व अस्तीं छायाप्रवेश व निर्गम यांच्या चिन्हांहीं दाक्षिणोत्तर अयन होतें. ( समभूमीवर वर्तुळ करून त्यावर दिशेच्या खुणा कराव्या. नंतर मध्यभागीं शंकु ठेवावा. त्याची छाया मेषसंक्रांतीच्या आरंभीं सूर्याच्या उदयास्तकालीं जेथें असत्ये, त्यापासून मिथुन अंतापर्यंत छाया दक्षिणेस जात्ये. तशीच कर्कापासून उत्तरेकडे येऊन तुलासंक्रांतीच्या आरंभीं मध्यभागीं येत्ये. नंतर उत्तरेकडे जात्ये. ती मकरसंक्रांतीपर्यंत जाऊन पुढें दक्षिणेस जावयास लागत्ये. याप्रमाणें न जातां मागें पुढें जाईल तर ती उत्पाता-प्रमाणें समजावी. ) ॥३॥

अप्राप्यमकरमर्को विनिवृत्तो हंति सापरां याम्यां ॥
कर्कटकमसंप्राप्तो विनिवृत्तश्चोत्तरां सैंद्रीं ॥ ४ ॥

**अर्थः**— सूर्य मकरवृत्ताप्रत ( श्रवणाप्रत ) न जाऊन फिरला तर, पश्चिम व दक्षिण या दिशेकडे राहणाऱ्या लोकांचा नाश करितो. तसाच कर्कवृत्ताप्रत ( आश्लेषाप्रत ) न पोंचून मागें फिरला तर, उत्तर व पूर्व दिशेस राहणाऱ्या लोकांचा नाश करितो. ॥४॥

उत्तरमयनमतीत्य व्यावृत्तः क्षेमसस्यवृद्धिकरः ॥
प्रकृतिस्थश्चाप्येवं विकृतगतिर्भयकृदुष्णांशुः ॥ ५ ॥

**अर्थः**— सूर्य मकराप्रत पावून नंतर जर फिरेल तर कल्याण व धान्य यांची वृद्धि करील. तद्वतच कर्का-विषयीं जाणावें. प्रकृतिस्थ ज्या दिवशीं अयन-निवृत्ति गणितानें येईल, त्याच दिवशीं छायाप्रवेश व निर्गम होईल तर क्षेमसस्यवृद्धिकर सूर्य होय; विपरीतगति झाल्यास सूर्य भयकारक होय. ॥५॥

सतमस्कं पर्वविना त्वष्टानामार्कमंडलं कुरुते ॥
स निहंति सप्तभूपान् जनांश्च शस्त्राग्निदुर्भिक्षैः ॥ ६ ॥

**अर्थः**— अमावास्या व पौर्णिमा यांवांचून त्वष्टानामक ग्रह सूर्यमंडलातें अंधकारयुक्त करील, तर तो शस्त्र, अग्नि व दुर्भिक्ष यांहीं करून सात राजांचा व जनांचा नाश करील. ॥६॥

तामसकीलकसंज्ञा राहुसुताः केतवस्त्रयस्त्रिंशत् ॥
वर्णस्थानाकारैस्तान् दृष्ट्वार्के फलं ब्रूयात् ॥ ७ ॥

**अर्थः**-- तामस व कीलक अशा नावांचे राहुपुत्र तेत्तीस केतु आहेत. त्या केतूंतें सूर्यमंडळीं श्वेतादिवर्ण बिंबादि प्रवेश, काकादि सदृश आकार यांहीं प्रविष्ट असें पाहून शुभाशुभ फळें सांगावीं. ॥७॥

ते चार्कमंडलगताः पापफलाश्चन्द्रमंडले सौम्याः ॥
ध्वांक्षकबंधप्रहरणरूपाः पापाः शशांकेऽपि ॥ ८ ॥

**अर्थः**— ते तामस कीलक सूर्यबिंबाप्रत गेले तर अशुभ व चंद्रबिंबाप्रत प्रविष्ट झाले तर शुभ होत. तेच केतु काक, मस्तकरहित पुरुष व खड्ग यांसारखे चंद्रमंडलामध्येंही अशुभ. अर्थात् सूर्यमंडलामध्यें फारच अशुभ होत. ॥८॥

तेषामुदये रूपाण्यंभःकलुषं रजोवृतं व्योम ॥
नगतरुशिखरविमर्दी सशर्करो मारुतश्चंडः ॥ ९ ॥
ऋतुविपरीतास्तरवो दीप्ता मृगपक्षिणो दिशां दाहः ॥
निर्घातमहीकंपादयो भवंत्यत्र चोत्पाताः ॥ १० ॥

**अर्थः**— त्या तामस कीलकांच्या उदयीं हीं वक्ष्यमाण रूपें ( लक्षणें ) होतात. कारणांवाचून उदकें गढूळ होतात, आकाश धुळीनें व्याप्त होतें, पर्वत व वृक्ष यांच्या अग्रांचा नाश करणारा आणि मृत्तिकेचे कण, बारीक दगड यांहीं युक्त असा भयंकर वायु वाहतो, ज्या ऋतूमध्यें जे वृक्ष फलित व पुष्पित व्हावयाचे ते त्यांत न होतां अन्य ऋतूंत होतात, अरण्यपशु व पक्षि तप्त होतात व दिग्दाह होतो. आणि निर्घात [ वायूवर वायूचें ताडण होऊन आकाशापासून तो भूमीवर येतो ] व भूकंप इत्यादिक उत्पात होतात. ॥९॥

न पृथक् फलानि तेषां शिखिकीलकराहुदर्शनानि यदि ॥
तदुदयकारणमेषां केत्वादीनां फलं ब्रूयात् ॥ ११ ॥

**अर्थः**-- अंभःकलुषादिकांची फलें, जर केतु, कीलक व राहू यांचीं दर्शनें [ चंद्र सूर्य यांस ग्रहण ] होतील तर निराळीं होणार नाहींत. [ केत्वादिकांचें सात दिवसांमध्यें दर्शन झाल्यास ते अंभःकलुषादिकांचें उत्पात व्यर्थ जाणावे. ], कदाचित् हे उत्पात होऊन केत्वादिकांचा उदय झाला नाहीं तर, अंभःकलुषादिकांचीं फलें सांगावींत. ॥११॥

यस्मिन्यस्मिन्देशे दर्शनमायांति सूर्यबिंबस्थाः ॥
तस्मिंस्तस्मिन्व्यसनं महीपतीनां परिज्ञेयं ॥ १२ ॥
क्षुत्प्रम्लानशरीरा मुनयोप्युत्सृष्टधर्मसच्चरिताः ॥
निर्मांसबालहस्ताः कृच्छ्रेणायांति परदेशं ॥ १३ ॥
तस्करविलुप्तवित्ताः प्रदीर्घनिःश्वासमुकुलिताक्षिपुटाः ॥
संतः सन्नशरीराः शोकोद्भवबाष्परुद्धदृशः ॥ १४ ॥
क्षामा जुगुप्समानाः स्वनृपतिपरचक्रपीडिता मनुजाः ॥
स्वनृपतिचारितं कर्म च पुराकृतं प्रब्रुवंत्यन्ये ॥ १५ ॥
गर्भेष्वपि निष्पन्ना वारिमुचो न प्रभूतवारिमुचः ॥
सरितो यांति तनुत्वं क्वचित्क्वचिज्जायते सस्यं ॥ १६ ॥

**अर्थः**—तामस कीलक केतु सूर्यमंडळीं ज्या ज्या देशीं दृष्टिगोचर होतील त्या त्या देशीं राजांस दुःख होईल असें जाणावें. ॥१२॥ ऋषींही क्षुधेनें म्लानशरीर होऊन धर्म आणि उत्तम आचरणें सोडतील. व

अन्नाच्या अभावानें शुष्कशरीर असे बाल हातांत धरून दुःखानें अन्य देशाप्रत जातील. ।।१३।। चोरांनीं हृत द्रव्य व दीर्घ श्वासोच्छ्वासानें अर्धमीलितनयन, असे म्लानशरीर व अश्रूंनीं व्याप्तनयन असे सत्पुरुष होतील. ।।१४।। कृश व आपली निंदा करून घेणारे, स्वकीय राजानें व परचक्रानें पीडित असे मनुष्य होतील. व जें आज आह्मी भोगतों तें आह्मीं किंवा राजानें पूर्वी केलेल्या कर्माचें फल, असेंही अन्य लोक बोलतील. ।।१५।। पर्जन्याचें गर्भधारण जरी झालें असलें तथापि मेघ वृष्टि बहुत करणार नाहींत. नद्याही अल्पजल होतील व धान्यही कोठें कोठें होईल ।।१६।।

दंडे नरेंद्रमृत्युर्व्याधिभयं स्यात्कबंधसंस्थाने ।।
ध्वांक्षे च तस्करभयं दुर्भिक्षं कीलकेऽर्कस्थे ।। १७ ।।

अर्थः— सूर्यमंडलीं दंडाकार चिन्ह झालें असतां राजास मृत्यु होतो. तसेंच मस्तकरहित पुरुषासारखें चिन्ह झालें असतां रोगभय होतें. कावळ्यासारखें चिन्ह होईल तर चोरभय होतें. कीलकासारखें चिन्ह होईल तर दुर्भिक्ष होईल. ।।१७।।

राजोपकरणरूपैश्च्छत्रध्वजचामरादिभिर्विद्धः ।।
राजान्यत्वकृदर्कः स्फुलिंगधूमादिभिर्जनहा ।। १८ ।।

अर्थः— राजाचीं उपकरणें [ हस्त्यश्वादिक ] तदाकार चिन्हांनीं व छत्र, ध्वज, चामरादिकांनीं जर सूर्य विद्ध होईल तर दुसरा राजा होईल. अग्निकण, धूम व ज्वालादिकांनीं सूर्य विद्ध असतां लोकनाश होतो. १८

एको दुर्भिक्षकरो व्याधाः स्युर्नरपतेर्विनाशाय ।।
सितरक्तपीतकृष्णैस्तैर्विद्धोर्कोऽनुवर्णघ्नः ।। १९ ।।

अर्थः— पूर्वोक्त वेधांतून एक वेध सूर्यास असला तर दुर्भिक्षकारक व दोन, तीन, चार इत्यादि वेध असले तर राजनाश होतो. सूर्य श्वेत चिन्हानें विद्ध असतां ब्राह्मणांचा नाश, आरक्त वर्ण असतां क्षत्रियांचा, पिंवळा वर्ण असतां वैश्यांचा, कृष्णवर्ण चिन्ह असतां शूद्रांचा नाश करितो. ।। १९ ।।

दृश्यंते च यतस्ते रविबिंबस्योत्थिता महोत्पाताः ।।
आगच्छति लोकानां तेनैव भयं प्रदेशेन ।। २० ।।

अर्थः— सूर्यमंडलीं उत्पन्न झालेलें ध्वांक्षादि उत्पात ज्या दिशेकडे दिसतील त्या दिशेकडून [ त्या प्रदेशां-तून ] लोकांस भय येईल ।।२०।।

ऊर्ध्वकरो दिवसकरस्ताम्रः सेनापतिं विनाशयति ।।
पीतो नरेंद्रपुत्रं श्वेतस्तु पुरोहितं हंति ।। २१ ।।
चित्रोऽथवापि धूम्रो रविरश्मिर्व्याकुलां करोति महीं ।।
तस्करशस्त्रनिपातैर्यदि सलिलं नाशु पातयति ।। २२ ।।

अर्थः— ज्या कालीं सूर्य ऊर्ध्वकिरण [ वरतें किरण ] दिसेल व त्याचा ताम्रवर्ण होईल तर, सेनापतीचा नाश होईल. पीतवर्ण दिसेल तर राजपुत्राचा नाश होईल. श्वेतवर्ण दिसेल तर उपाध्यायाचा नाश होईल. ।।२१।। नानाप्रकारचा चित्रवर्ण अथवा धूम्रवर्ण ऊर्ध्व सूर्यकिरण दिसतील तर चोर व शस्त्रनिपात यांहींकरून सर्व देश व्याकुल होईल; परंतु जर लोकर जलवृष्टि होणार नाहीं तर हीं फळें होतील. पर्जन्यवृष्टि झाली असतां शुभ होईल. ।।२२।।

ताम्रः कपिलो वार्कः शिशिरे हरिकुंकुमच्छायश्च मधौ ।।
आपांडुकनकवर्णो ग्रीष्मे वर्षासु शुक्लश्च ।। २३ ।।

शरदि कमलोदराभो हेमंते रुधिरसंनिभः शस्तः ॥
प्रावृट्काले स्निग्धः सर्वर्तुनिभोऽपि शुभदायी ॥ २४ ॥

**अर्थः**-- माघ, फाल्गुन या मासीं सूर्य ताम्रवर्ण किंवा कपिल ( पिंगटवर्ण ) शुभफलद होय. चैत्र व वैशाखमासीं हिरवा व कुंकुमवर्ण शुभ होय. ज्येष्ठ व आषाढ या मासीं स्वल्प श्वेतवर्ण सुवर्णवर्ण शुभ होय. श्रावण व भाद्रपद या मासीं शुक्रवर्ण शुभ होय. ॥२३॥ आश्विन, कार्तिक या मासीं कमलमध्यासारखा [ पिंवळा ] शुभ. मार्गशीर्ष, पौष या मासीं रक्तासारखा वर्ण प्रशस्त होय. व श्रावण, भाद्रपद या वर्षाऋतुमध्यें स्निग्ध ( विमल ) व शिशिरादि सर्व ऋतूंतील वर्णाचा सूर्य शुभफलद होय. ॥२४॥

रूक्षः श्वेतो विप्रान्रक्ताभः क्षत्रियान्विनाशयति ॥
पीतो वैश्यान्कृष्णस्ततोऽपरान्शुभकरः स्निग्धः ॥ २५ ॥

**अर्थः**-- श्वेतवर्ण रखरखीत सूर्य ब्राह्मणांचा, रक्तवर्ण रखरखीत सूर्य क्षत्रियांचा, पीतवर्ण रखरखीत वैश्यांचा व कृष्णवर्ण रखरखीत सूर्य शूद्रांचा नाश करितो. पूर्वोक्त वर्णाचा सूर्य स्निग्ध असेल तर ब्राह्मणादिकांचें कल्याण करील ॥२५॥

ग्रीष्मे रक्तो भयकृद्वर्षास्वसितः करोत्यनावृष्टिं ॥
हेमंते पीतोऽर्कः करोति नचिरेण रोगभयं ॥ २६ ॥

**अर्थः**— ग्रीष्मऋतूमध्यें आरक्त सूर्य भय करणारा. वर्षाऋतूमध्यें कृष्णवर्ण सूर्य अनावृष्टि करणारा. हेमंत ऋतूमध्यें पीतवर्ण सूर्य शीघ्र रोगभय करणारा होय ॥२६॥

सुरचापपाटिततनुर्नृपतिविरोधप्रदः सहस्रांशुः ॥
प्रावृट्काले सद्यः करोति विमलद्युतिर्वृष्टिं ॥ २७ ॥
वर्षाकाले वृष्टिं करोति सद्यः शिरीषपुष्पाभः ॥
शिखिपत्रनिभः सलिलं न करोति द्वादशाब्दानि ॥ २८ ॥

**अर्थः**— सूर्य इंद्रधनुष्यानें [ इंद्रधनुष्यासारख्या चिन्हानें ] विदारितशरीर होईल तर, राजांचीं युद्धें होतील. वर्षाकालीं स्वच्छकांति सूर्य दिसेल तर त्याच दिवशीं वृष्टि करील. ॥२७॥ वर्षाकालीं शिरसाच्या फुलासारख्या [ नीलपीत ] वर्णाचा सूर्य तत्काल वृष्टि करील. मयूरपिच्छाच्या वर्णासारखा सूर्य होईल तर बारा वर्षे वृष्टि होणार नाहीं ॥२८॥

श्यामेऽर्के कीटभयं भस्मनिभे भयमुशंति परचक्रात् ॥
यस्यर्क्षे सच्छिद्रस्तस्य विनाशः क्षितीशस्य ॥ २९ ॥

**अर्थः**-- श्यामवर्ण सूर्य असतां कृमिभय [ धान्यास किडीचें भय ] होतें. भस्मतुल्य सूर्य असतां शत्रुभय होतें. ज्या राजाच्या जन्मनक्षत्रावर सच्छिद्र सूर्य होतो त्या राजाचा नाश होतो ॥२९॥

शशरुधिरनिभे भानौ नभस्तलस्थे भवंति संग्रामाः ॥
शशिसदृशे नृपतिवधः क्षिप्रं चान्यो नृपो भवति ॥ ३० ॥

**अर्थः**-- सूर्य सशाच्या रक्तासारखा आरक्तवर्ण आकाश मध्याजवळ झाला असतां, युद्धें होतील. चंद्रासारखें शीतल सूर्यकिरण होतील तर राजास मृत्यू होईल आणि लौकरच दुसरा राजा होईल ॥३०॥

क्षुन्मारकृद्घटनिभः खंडो जनहा विदीधितिर्भयदः ।
तोरणरूपः पुरहा छत्रनिभो देशनाशाय ॥३१॥

अर्थः-- घटाकार सूर्य दुर्भिक्ष व मृत्युकारक, खंडित सूर्य जननाशकारक किरणरहित सूर्य भय देणारा, तोरणासारखा सूर्य नगराचा नाशकारक, छत्राकार सूर्य देशनाश करितो. ॥३१॥

ध्वजचापनिभे युद्धानि भास्करे वेपने च रूक्षे च ।
कृष्णा रेखा सवितारि यदि हंति नृपं ततः सचिवः ॥३२॥

अर्थः— पताकारूप किंवा धनुष्यासारखा अथवा कंपित किंवा रूक्ष ( रखरखीत ) सूर्य दिसेल तर युद्धें होतील. सूर्यबिंबामध्यें काळी रेषा दिसेल, तर प्रधान राजास मारील. [ नृपः सचिवं ] असा क्वचित् पाठ आहे. त्यावरून राजा प्रधानास मारील असाही अर्थ होतो. ॥३२॥

दिवसकरमुदयसंस्थितमुल्काशनिविद्युतो यदा हन्युः ।
नरपतिमरणं विद्यात् तदान्यराजप्रतिष्ठां च ॥३३॥

अर्थः— उदयकाळीं किंवा अस्तकाळीं सूर्यातें उल्का, अशनि, व विद्युत् हीं जर ताडण करतील तर राजास मरण होऊन दुसऱ्या राजाची राज्यावर स्थापना होईल. ॥३३॥

प्रतिदिवसमहिमकिरणः परिवेषी संध्ययोर्द्वयोरथवा ।
रक्तोऽस्तमेऽतिरक्तोदितश्च भूपं करोत्यन्यम् ॥३४॥

अर्थः-- सूर्य प्रतिदिवशीं परिवेषयुक्त अथवा उदयास्तसंधीच्याठायीं परिवेषयुक्त किंवा आरक्तच उदय पावून तसाच अस्तास जाईल तर दुसरा राजा करील. ॥३४॥

प्रहरणसदृशैर्जलदैः स्थगितः संध्याद्वयेऽपि रणकारी ।
मृगमहिषविहगखरकरभसदृशरूपैश्च भयदायी ॥३५॥

अर्थः--सूर्य खड्गादिआयुधाकृति मेघांनीं उदयास्तसंधीच्याठायीं आच्छादित असतां युद्धें होतील. हरिण, महिष, पक्षि, गर्दभ, उंट यांच्या सदृशरूप मेघांनीं उदयास्तसंधींत सूर्य जर आच्छादित होईल तर भयप्रद होईल. ॥३५॥

दिनकरकराभितापादृक्षमवाप्नोति सुमहतीं पीडां ।
भवति च पश्चाच्छुद्धं कनकमिव हुताशपरितापात् ॥३६॥

अर्थः-- ज्या नक्षत्रीं सूर्य असतो तें नक्षत्र सूर्यकिरणाच्या संतापानें महत्पीडेतें प्राप्त होतें. तेंच नक्षत्र सूर्यानें सोडिलें म्हणजे जसें अग्नींत तापविलेलें सुवर्ण शुद्ध होतें तसें तें नक्षत्र शुद्ध होतें. ॥३६॥

दिवसकृतः प्रतिसूर्यो जलकृदुदग्दक्षिणे स्थितोऽनिलकृत् ।
उभयस्थः सलिलभयं नृपमुपरि निहंत्यधो जनहा ॥३७॥

अर्थः-- सूर्यासारखा दुसरा सूर्य म्ह० प्रतिसूर्य, तो सूर्यापासून उत्तरेकडे दिसेल तर जलवृष्टि होईल दक्षिणेकडे दिसेल तर वारा बहुत सुटेल. उत्तरदक्षिण दोन्हीं भागीं दिसेल तर उदकभय होईल. ( बहुत पाणी किंवा पर्जन्य न पडणें याचें भय. ) सूर्याचे वर दिसेल तर राजनाश होईल. सूर्याच्या खालीं दिसेल, तर जननाश होइल. ॥३७॥

रुधिरनिभो वियत्यवनिपांतकरो न चिरात् ।
परुषरजोरुणीकृततनुर्यदि वा दिनकृत् ॥३८॥
असितविचित्रनीलपरुषो जनघातकरः ।
खगमृगभैरवस्वररुतैश्च निशाद्युमुखे ॥३९॥

**अर्थ**--सूर्य अस्तोदयावाचून आकाशामध्यें अकस्मात रक्तवर्ण दिसेल तर लवकरच राजाचा नाश होईल. अथवा रक्षरजानें आरक्त झालेला सूर्य राजनाश करितो. कृष्ण, नानावर्ण, नीलवर्ण व रुक्ष असा सूर्य लोकनाश करणारा होय. पक्षि, मृग, [ अरण्यपशु ] यांच्या भयंकर शब्दांनीं प्रातःकाळीं किंवा अस्तमानीं सूर्य युक्त होईल [ त्या वेळेस हे भयंकर शब्द करितील ] तर लोकनाश होईल. ॥३८।३९॥

अमलवपुरवक्रमंडलः स्फुटविमलामलदीर्घदीधितिः ।
अविकृततनुवर्णचिन्हभृज्जगति करोति शिवं दिवाकरः ॥४०॥

**अर्थः**--निर्मल शरीर, अवक्रबिंब, स्फुट ( प्रकट ), विस्तीर्ण, निर्मल, दीर्घ [ लांब, ] असे आहेत किरण ज्याचे असा; विकाररहित शरीर, अविकृतवर्ग व अविकृत [ विकाररहित ] चिन्ह यांतें धारण करणारा असा सूर्य जनाचें कल्याण करितो. ॥४०॥

---

## ॥ अथ चंद्रचारः ॥

नित्यमधस्थस्येंदोर्भाभिर्भानोः सितं भवत्यर्धं ।
स्वच्छाययान्यदसितं कुंभस्येवातपस्थस्य ॥१॥

**अर्थः**--सूर्याचे खालीं राहणारा जो चंद्र त्याचें अर्ध सूर्याच्या तेजानें नित्य श्वेत असतें. [ ज्या गोलकभागीं सूर्यकिरण पडतात तें शुभ्र होतें. ] दुसरें अर्ध त्याचेच छायेनें नित्य कृष्ण असतें. याविषयीं दृष्टांत—घागर उन्हांत ठेविली असतां ज्याभागीं सूर्यकिरण पडतात तो पांढरा दिसतो व दुसरा भाग त्या घागरीच्य छायेनें कृष्णवर्ण दिसतो. तसें चंद्रबिंब होय. ॥१॥

सलिलमये शशिनि रवेर्दीधितयो मूर्छितास्तमो नैशं ।
क्षपयंति दर्पणोदरविहता इव मंदिरस्यांतः ॥२॥

**अर्थः**--उदकमय चंद्रीं सूर्याचे किरण संलग्न होऊन ते किरण रात्रिसंबंधी अंधकाराचा नाश करतात. जसें आरशावरील किरण गृहाच्या मध्यभागच्या अंधकाराचा नाश करितात. ॥२॥

त्यजतोर्कतलं शशिनः पश्चादवलंबते यथा शौक्ल्यं ।
दिनकरवशात्तथेंदोः प्रकाशतेऽधः प्रभृत्युदयः ॥३॥

**अर्थः**- चंद्र सूर्याच्या खालचा समभाग जसजसा सोडतो तसतसा पश्चिमेस शुक्लत्व [ पांढरेपणा ] धारण करितो. त्याप्रकारेंच चंद्राचा सूर्याप्रमाणें अर्धाभागापासून ( पश्चिमेकडून ) उदय होतो [ प्रकाशित होतो ]. हेंच स्पष्ट सांगतो. सूर्याचे सन्मुख अर्ध शुभ्र होतें व दुसरें अधःस्थित अर्ध कृष्णवर्ण होतें. नंतर प्रतिपदादि तिथींस जसजसा स्वाभाविक सूर्यापासून प्राङ्मुख शीघ्रगतित्वास्तव, जातो तसतसा दृष्टीस पडणारा अधोभाग शुभ्र होतो ॥३॥

प्रतिदिवसमेवमर्कस्थानविशेषेण शौक्ल्यपरिवृद्धिः ।
भवति शशिनोऽपराण्हे पश्चाद्भागे घटस्येव ॥४॥

**अर्थः**--या पूर्वोक्त प्रकारें प्रतिदिवशीं दुसऱ्या जागीं जाण्यानें चंद्राच्या शुक्लत्वाची वृद्धि होते. ( जसजसा राशी भोगितो तशीतशी चंद्राच्या शुक्लत्वाची वृद्धि अधिक होते ). अपराण्हीं खालच्या भागीं घटाप्रमाणें चंद्राची वृद्धि अधिक होते. तात्पर्य :- चंद्र जसा सूर्याचे पुढें प्राङ्मुख राशि भोगीत जातो तशी शुक्लत्वाची

वृद्धि होत्ये. ती शुक्लपक्षीं अष्टमीस सूर्यापासून राशित्रयांतरानें अर्धी शुक्लवृद्धि होत्ये. पुढें वृद्धि होत होत पौर्णिमेच्या अंतीं समार्धी [ सहा राशीस ] चंद्र जातो तेव्हां पूर्ण होतो. नंतर जसजसा सूर्याजवळ जातो तसतसा कमी होऊन वद्य अष्टमीस अर्धा होऊन अमावास्येच्या अंतीं सर्व बिंब कृष्ण होतें. ॥४॥

ऐंद्रस्य शीतकिरणो मूलाषाढाद्वयस्य चायातः ।
याम्येन बीजजलचरकाननहा वन्हिभयदश्च ॥५॥

अर्थः— चंद्र ज्येष्ठा, मूळ, पूर्वाषाढा, उत्तराषाढा या नक्षत्रांचे दक्षिणभागानें जाईल तर बीजें, जलचर प्राणी व वनें यांचा नाश आणि अग्निभय करील. अर्थात् उत्तरभागानें गेला तर शुभ होय. ॥५॥

दक्षिणपार्श्वेन गतः शशी विशाखानुराधयोः पापः ।
मध्येन तु प्रशस्तः पित्र्यस्य विशाखयोश्चापि ॥६॥

अर्थः-- चंद्र, विशाखा व अनुराधा यांचे दक्षिण बाजूनें गेला तर अनिष्ट होय. मघा व विशाखा यांचे मधून गेला तर प्रशस्त आणि उत्तरभागाकडून गेला तरी प्रशस्त ( शुभ ) होय. ॥६॥

षडनागतानि पौष्णाद्द्वादशरौद्राच्च मध्ययोगीनि ।
ज्येष्ठाद्यानि नवर्क्षाण्युडुपतिनातीत्य युज्यंते ॥७॥

अर्थः— रेवती, अश्विनी, भरणी, कृत्तिका, रोहिणी, मृग या नक्षत्रीं चंद्र न येतांच संयोग होतो म्हणजे मागील नक्षत्रीं असतां नक्षत्र तारेबरोबर होतो. आर्द्रादि अनुराधांत १२ नक्षत्रीं तारेच्या मध्ययोगीं संयोग होतो. ज्येष्ठादि उत्तराभाद्रपदांत ९ नक्षत्रें भोगून पुढें गेल्यावर चंद्राचा योग होतो. तात्पर्य, ज्या दिवशीं उत्तराभाद्रपदा नक्षत्र असेल त्या दिवशीं रेवतीच्या तारेबरोबर चंद्र असतो अशीं ६ नक्षत्रें. आर्द्रापासून १२ नक्षत्रीं त्यांच्याच तारेबरोबर असतो. मूळ दिवसनक्षत्र असतां ज्येष्ठेच्या तारांबरोबर चंद्र असतो अशीं ९ नक्षत्रें. ॥७॥

उन्नतमीषच्छृंगं नौः संस्थाने विशालता चोक्ता ।
नाविकपीडा तस्मिन् भवति शिवं सर्व लोकस्य ॥८॥

अर्थः— चंद्राचीं शृंगें किंचित् उंच व विस्तीर्ण असलीं तर तें नौ संस्थान होय. तें झालें असतां नाविक ( नावाडी ) लोकांस पीडा व इतर सर्व लोकांस सुख होतें. ॥८॥

अर्धोन्नते च लांगलमिति पीडा तदुपजीविनां तस्मिन् ।
प्रीतिश्च निर्निमित्तं मनुजपतीनां सुभिक्षंच ॥९॥

अर्थः-- चंद्राचे उत्तरेकडील शृंग अर्धोन्नत असतां, लांगलसंस्थान होतें. तें झालें असतां शेतकरी लोकांस पीडा होत्ये. व कारणावांचून परस्पर राजांची प्रीति [ सख्य ] होत्ये. व इतर लोकांचें कल्याण आणि सुभिक्ष [ धान्याची सवंगाई ] होत्ये. ॥९॥

दक्षिणविषाणमर्धोन्नतं यदा दुष्टलांगलाख्यं तत् ।
पांड्यनरेश्वरनिधनकृदुद्योगकरं बलानां च ॥१० ॥

अर्थः— चंद्राचें दक्षिण शृंग अर्धोन्नत असतां, दुष्ट लांगलनामक संस्थान होतें. तें झालें तर पांड्यदेशच्या राजाचा नाश होतो. व तें सैन्याच्या यात्रेविषयीं [ शत्रूवर जाण्याविषयीं ] उद्योग करितें. ॥१०॥

समशशिनि सुभिक्षक्षेमवृष्टयः प्रथमदिवससदृशाः स्युः ।
दंडवदुदिते पीडा गवां नृपश्चोग्रदंडोऽत्र ॥११॥

अर्थः—समशृंग चंद्र असतां, प्रथम दिवसा [ प्रतिपदा ] सारखीं सुभिक्ष, कल्याण, जलवृष्टि हीं होतील. दंडाकार चंद्र प्रथमदिवशीं दिसला असतां, गाईस पीडा होईल. व राजे भयंकर दंड करतील. ॥११॥

कार्मुकरूपे युद्धानि यत्र तु ज्या ततो जयस्तेषां ॥
स्थानं युगमिति याम्योत्तरायतं भूमिकंपाय ॥१२॥

अर्थः-- धनुष्यासारखें चंद्राचें संस्थान असतां युद्धें होतील. परंतु जिकडे धनुष्याची दोरी असेल त्या दि-शेकडच्यांचा जय होईल. चंद्ररेखा दक्षिणोत्तर विस्तीर्ण जर दिसेल तर तें युगसंस्थान, तें झालें तर भूमिकंप होतो. ॥१२॥

युगमेव पार्श्वकोव्यां किंचित्तुंगं स पार्श्वशायीति ॥
विनिहंति सार्थवाहान्वृष्टेश्च विनिग्रहं कुर्यात् ॥१३॥

अर्थः--पूर्वोक्त युगसंस्थानींच दक्षिणशृंगाग्रीं किंचित् उंच असेल तर, तो चंद्र पार्श्वशायी होय. तो झाला तर व्यापारी लोकांचा नाश करितो व वृष्टीचा अभाव [ अवर्षण ] करितो. ॥१३॥

अभ्युच्छ्रायादेकं यदि शशिनोऽवाङ्मुखंऽभवेच्छृंगं ॥
आवर्जितमित्यसुभिक्षकारितद्गोधनस्यापि ॥१४॥

अर्थः—दोहों शृंगाच्या बरोबरीच्या उंचीपासून जर चंद्राचें शृंग अधोमुख होईल तर तें आवर्जित नामक संस्थान होय. असें दृष्टिगोचर झालें असतां, दुर्भिक्ष होतें. व गोधनाचा नाश होतो ॥१४॥

अव्युच्छिन्ना रेखा समंततो मंडले च कुंडाख्यं ॥
अस्मिन्मांडलिकानां स्थानत्यागो नरपतीनां ॥१५॥

अर्थः--चंद्राच्या सभोंवतीं अखंड रेषा दिसेल तर तें कुंडाख्य संस्थान होय. असें दृष्टिगोचर झालें असतां मांडलिक राजांचा स्वस्थानत्याग होईल. ॥१५॥

प्रोक्तस्थानाभावादुदगुच्चः क्षेमवृष्टिकरः ॥
दक्षिणतुंगश्चंद्रो दुर्भिक्षभयाय निर्दिष्टः ॥१६॥

अर्थ—सांगितलेल्या नौ, इत्यादि स्थानांचा अभाव असतां उत्तरेकडे चंद्राचें शृंग उंच असलें तर कल्याण व वृष्टि करणारें होय. दक्षिणेकडचें शृंग उंच असलें तर दुर्भिक्ष व भयकारक होय. ॥ १६ ॥

शृंगेणैकेनेंदुं विलीनमथवाप्यवाङ्मुखं शृंगं ॥
संपूर्णं वाभिनवं दृष्ट्वैकोजीविताद्भ्रश्येत् ॥ १७ ॥

अर्थ--एक शृंग अथवा नष्टशृंग किंवा खालीं लवलेलें शृंग असा चंद्र शुक्ल द्वितीयेस जो एकच मनुष्य पाहील त्यांस मृत्यु होईल. ॥ १७ ॥

संस्थानविधिः कथितो रूपाण्यस्माद्भवंति चंद्रमसः ॥
स्वल्पे दुर्भिक्षकरो महान् सुभिक्षावहः प्रोक्तः ॥ १८ ॥
मध्यतनुर्वज्राख्यः क्षुद्भयदः संभ्रमाय राज्ञां च ॥
चंद्रो मृदंगरूपः क्षेमसुभिक्षावहो भवति ॥ १९ ॥
ज्ञेयो विशालमूर्तिर्नरपतिलक्ष्मीविवृद्धये चंद्रः ॥
स्थूलः सुभिक्षकारी प्रियधान्यकरस्तु तनुमूर्तिः ॥ २० ॥

अर्थः– चंद्राचा संस्थानप्रकार सांगितला. आतां पुढें रूपें सांगतों. फारच लहान चंद्रस्वरूप दुर्भिक्षकारक. व फार मोठेंस्वरूप सुभिक्षकारक होय. ॥१८॥ जो मध्यमस्वरूप चंद्र तो वज्रसंस्थ, तो क्षुद्भय ( दुर्भिक्ष ) व राजांचा उद्योग ( शत्रूंवर स्वारी ) कारक होतो. मृदंगरूप चंद्र कल्याण व सुभिक्षकारक होय. ॥१९॥

विस्तीर्णबिंब चंद्र राजाची लक्ष्मी वाढवितो. स्थूल ( घन ) मूर्ति चंद्र सुभिक्षकारक होय. अघनमूर्ति चंद्र दुर्भिक्षकारक होय ॥२०॥

म्लेच्छंतान् कुनृपांश्च हंत्युडुपतिः शृंगे कुजेनाहते ।
शस्त्रक्षुद्भयकृद्यमेन शशिजेनावृष्टिदुर्भिक्षकृत् ॥
श्रेष्ठान् हंति नृपान् महेंद्रगुरुणा शुक्रेण चाल्पान्नृपान् ।
शुक्ले याप्यमिदं फलं ग्रहकृतं कृष्णे यथोक्तागमं ॥ २१ ॥

अर्थ—चंद्राचें शृंग भौमानें ताडित असतां, म्लेंच्छ देशस्थ कुत्सित राजांचा नाश होतो. शनैश्चरानें ताडित असतां, युद्ध व दुर्भिक्ष होतें. बुधानें ताडित असतां, अनावृष्टि व दुर्भिक्ष होतें. गुरूनें ताडित असत श्रेष्ठ राजांचा नाश होतो. शुक्रानें चंद्राचें शृंग ताडित असतां, स्वल्प ( लहान ) राजांचा नाश होतो. या भौमादि ग्रहकृत शृंगताडनाचें फल शुक्लपक्षीं अल्प होतें व कृष्णपक्षीं जसें सांगितलें तसें ( बहुत ) होतें. ॥ २१ ॥

भित्त्वा सितेन मगधान् यवनान् पुलिंदान् नेपालशृंगिमरुकच्छसुराष्ट्रमद्र न् ॥
पांचालकैकयकुलूनकपौरुषादान् हन्यादुशीनरजनानपि सप्तमासात् ॥ २२ ॥

अर्थ—शुक्र, चंद्रबिंबाच्या मधून गेला तर, मगध, यवन, पुलिंद या देशाच्या लोकांचा नाश होतो. शृंगि, मरु, कच्छ, सुराष्ट्र, मद्र, पांचाल, कैकय, कुलूनक, पुरुष भक्षण करणारे व उशीनर देशच्या लोकांचा नाश होतो. हीं फलें सात महिन्यांपर्यंत होतात ॥ २२ ॥

गांधारसौवीरकसिंधुकीरान् धान्यानि शैलान्द्रविडाधिपांश्च ॥
द्विजांश्च मासान्दश शीतरश्मिः संतापयेद्वाक्पतिना विभिन्नः ॥२३॥

अर्थ—चंद्र, गुरूनें भिन्न असतां, गांधार, सौवीर, सिंधु, कीर, या देशीं राहणाऱ्या व व्रीह्यादि धान्यें पर्वत, द्रविड देशाचे राजे, ब्राह्मण या सर्वांस दहा महिनेपर्यंत पीडा होते. ॥२३॥

उद्युक्तान्सहवाहनैर्नरपतीन्त्रैगर्तकान् मालवान् ॥
कौलिंदान्गणपुंगवानथशिबीनायोध्यकान्पार्थिवान् ॥
हन्यात्कौरवमत्स्यशुक्त्यधिपतीन्राजन्यमुख्यानपि ॥
प्रालेयांशुरसृग्ग्रहे तनुगते षण्मासमर्यादया ॥ २४ ॥

अर्थ—चंद्र, भौमानें भेदित असतां, अश्वादि वाहनांसहवर्तमान उद्युक्त ( जयेच्छु ) राजांचा. त्रिगर्त मालवा, कुलिंद या देशचे लोकांचा, समुदायांमध्यें श्रेष्ठांचा, शिबि देशस्थ लोकांचा, अयोध्यावासी राजांचा, कुरुदेशस्थ लोकांचा, मत्स्यदेश व शुक्तिदेश यांच्या राजांचा, क्षत्रियांमध्यें श्रेष्ठांचा षण्मासपर्यंत नाश होतो.

यौधेयान् सचिवान् सकौरवान् प्रागीशानथचार्जुनायनान् ॥
हन्यादर्कजभिन्नमंडलः सितांशुर्दशमासपीडया ॥२५॥

अर्थ—चंद्र, शनीनें भेदितबिंब असतां, योद्धे ( शूर ) लोकांचा, प्रधानांचा, कुरुदेशस्थ लोकांसहवर्तमान पूर्वेकडील राजांचा, अर्जुनायन लोकांचा दहा महिनेपर्यंत पीडेनें नाश होतो. ॥२५॥

मगधान्मथुरांश्च पीडयेद्वेणायाश्च तटं शशांकजः ॥
अपरत्र कृतं युगं वदेद्यदि भित्वा शशिनं विनिर्गतः ॥२६॥

अर्थ—बुध, चंद्रबिंबातें भेदन करून जाईल तर, मगध देश, माथुर देश यांमध्यें राहणाऱ्या लोकांचा व वेणानामक नदीच्या तीरीं राहणाऱ्या लोकांचा नाश होईल. पूर्वोक्त देशादिकांनी सोडून अन्य देशादिकां कृतयुगाप्रमाणें सुख होईल. ॥२६॥

क्षेमारोग्यसुभिक्षविनाशी शीतांशुः शिखिना यदि भिन्नः ।
कुर्यादायुधजीविविनाशं चौराणामधिकेन च पीडाम् ॥२७॥

**अर्थ**—धूमकेतूनें, चन्द्र भिन्न असतां, कल्याण, आरोग्य, सुभिक्ष यांचा नाश व आयुधानें वाचणारे [ शिपाई, शूर ] यांचा नाश होतो. आणि चोरास फार पीडा होते. २७

उल्कया यदा शशी ग्रस्त एव हन्यते ।
हन्यते तदा नृपो यस्य जन्मनि स्थितः ॥२८॥

**अर्थ**—चन्द्रग्रहण असतां त्याचे सन्मुख उल्का जाईल तर ज्या राजाच्या जन्मनक्षत्रास तो तसा चन्द्र असेल त्या राजाचा नाश होतो. २८

भस्मनिभः परुषोरुणमूर्तिः शीतकरः किरणैः परिहीनः ।
श्यामतनुः स्फुटितः स्फुरणो वा क्षुत्समरामयचौरभयाय ॥२९॥

**अर्थ**—भस्मतुल्य वर्ण, ( मलिन ) परुष, ( अतिरूक्ष ) आरक्तशरीर, किरणांनीं रहित, कृष्णशरीर, फुटलेला, कंपित, असा चन्द्र दुर्भिक्ष, युद्ध, रोग, चोर यांचें भय करतो. २९

प्रालेयकुंदकुमुदस्फटिकावदातो यत्नादिवाद्रिसुतया परिमृज्य चन्द्रः ।
उच्चैःकृतो निशि भविष्यति मे शिवाय यो दृश्यते स भविता जगतः शिवाय ॥३०॥

**अर्थ**—बर्फ, कुंदपुष्प, पांढरें कमल, स्फटिक यांसारखा शुभ्र चन्द्र व पार्वतीनें, आपला पति जो सदाशिव त्याच्या संतोषार्थ रात्रीच्या ठाईं फार प्रयत्नानें निर्मळ केलेला, असा चन्द्र [ स्वच्छ चन्द्र ] दृष्टीस पडेल तर सर्व जगताचें कल्याण होईल. ३०

यदि कुमुदमृणालहारगौरस्तिथिनियमात् क्षयमेति वर्धते वा ।
अविकृतगतिमंडलांशुयोगी भवति नृणां विजयाय शीतरश्मिः ॥३१॥

**अर्थ**- चन्द्र, कुमुद, ( कमल ), मृणाल ( कमलाची देंठी ) व मोत्यांचा हार यासारख्या वर्णाचा ( शुभ्र ) असेल, व त्याची प्रतिपदादि तिथींनियमाप्रमाणें क्षय किंवा वृद्धि होईल; आणि विकाररहित ( कंपनादि दोषरहित ) गति, अविकृतबिंब व अविकृतकिरणयुक्त असा चन्द्र असेल तर मनुष्यास सुखकारक होतो. ३१

शुक्ले पक्षे संप्रवृद्धे प्रवृद्धिं ब्रह्मक्षत्रं याति वृद्धिं प्रजाश्च ।
हीने हानिस्तुल्यता तुल्यतायां कृष्णे सर्वं तत्फलं व्यत्ययेन ॥३२॥

**अर्थ**--शुक्लपक्षीं चन्द्राची वृद्धि होत असेल तर ब्राह्मण, क्षत्रिय व प्रजा यांची वृद्धि होईल. या शुक्लपक्षींच चन्द्राची हानि ( क्षय ) क्षीण होईल तर ब्राह्मणादिकांची हानि होईल या शुक्लपक्षींच समता म्ह० वृद्धि हानीचा अभाव असतां, त्या ब्राह्मणादिकांची समता होईल. हेंच फल कृष्णपक्षीं विपरीत जाणावें. ३२

---

## ॥ अथ राहुचारः ॥

अमृतास्वादविशेषाच्छिन्नमपिशिरः किलासुरस्येदं ॥
प्राणैरपरित्यक्तं ग्रहतां यातं वदंत्येके ॥ १ ॥

**अर्थ**- सैंहिकेय दैत्याचें शिर भगवंतानें छेदून केलें; तें अमृत भक्षणाच्या योगानें जिवंत राहून ग्रह झालें, तो राहु. असें कोणी म्हणतात. १

इंद्वर्कमंडलाकृतिरसितत्वात्किल न दृश्यते गगने ।
अन्यत्र पर्वकालात् वरप्रदानात्कमलयोनेः ॥ २ ॥

अर्थ-तो राहु चंद्रसूर्य बिंबासारख्या आकृतीचा आहे, परंतु ब्रह्मदेवाच्या वरप्रदानास्तव पर्वकाळा (ग्रहण) वांचून कृष्णवर्णास्तव आकाशामध्यें दृष्टिगोचर होत नाहीं. २

मुखपुच्छविभक्तांगं भुजंगमाकारमुपदिशंत्यन्ये ।
कथयंत्यमूर्तमपरे तमोमयं सैंहिकेयाख्यं ॥ ३ ॥

अर्थ-मुख व पुच्छ या दोनच अवयवांनीं विभक्तांग राहु आहे असें कोणी ह्मणतात. सर्पाकार राहु असें अन्य ह्मणतात. कोणी देहरहित अंधकाररूप राहु आहे असें ह्मणतात. ३

यदि मूर्तो भविचारी शिरोथवा भवति मंडली राहुः ।
भगणार्धेनांतरितो गृह्णाति कथं नियतचारः ॥ ४ ॥

अर्थ-जर राहु मूर्तिमान् [ देहधारी ] नक्षत्रीं गमन करणारा, मस्तकरूप, मंडलवान् असा आहे तर निश्चित ( ३।११ ) अशी एकच गति होऊन सहा राशींनीं अंतर असतां, चंद्रसूर्याचें ग्रहण कसें करितो. ४

अनियतचारः खलु चेदुपलब्धिः संख्यया कथं तस्य ।
पुच्छाननाभिधानोंतरेण कस्मान्नगृह्णाति ॥ ५ ॥

अर्थ-जर हा राहु अनियंत्रितगति केत्वादिकांसारखा आहे तर त्याची गणितानें उपलब्धि [ प्राप्ति ] कशी होईल. ( या राशीस राहु आहे असें कसें समजेल ) पुच्छ व मुख असा विभक्तावयव आहे तर जसा सहा राशींच्या अंतरानें सूर्यचंद्राचें ग्रहण करतो, तसा एक दोन इत्यादि राश्यंतरानें कां ग्रहण करीत नाहीं. ५

अथ तु भुजगेंद्ररूपः पुच्छेन मुखेन वा स गृह्णाति ।
मुखपुच्छांतरसंस्थं स्थगयति कस्मान्न भगणार्धं ॥ ६ ॥

अर्थ-आतां जर सर्पाकार राहु आहे, व तो पुच्छानें व मुखानें राशिषट्कांतरित सूर्यचंद्राचें ग्रहण करितो. तर मधील ७ राशीस चंद्रसूर्य असतां, कां आच्छादन करीत नाहीं. ६

राहुद्वयं यदि स्याद्ग्रस्तेऽस्तमितेऽथवोदिते चंद्रे ।
तत्समगतिनान्येन ग्रस्तः सूर्योऽपि दृश्येत ॥ ७ ॥

अर्थ-एक नियमितगति व दुसरा अनियमितगति असे दोन राहु जर असतील तर चंद्राच्या उदयों किंवा अस्तासीं ग्रासणाऱ्या राहूच्या बरोबर आहे गति ज्याची, अशा दुसऱ्या राहूनें पङ्राश्यंतरितास्तव सूर्याला ही ग्रहण लागलेलें दिसेल. तसें दिसत नाहीं. तेव्हां दोन राहूही नाहींत. ७

भूच्छायां स्वग्रहणे भास्करमर्कग्रहे प्रविशतींदुः ।
प्रग्रहणमतः पश्चान्नेंदोर्भानोश्च पूर्वार्धात् ॥ ८ ॥

अर्थ-( जर राहूच सूर्यचंद्राचें ग्रहण करतो तर चंद्रास प्रथम ग्रहण लागून नंतर सूर्यास ग्रहण लागतें हें एक राहु असून कसें होतें त्याविषयीं सांगतात. ) चंद्र आपल्या ग्रहणीं भूच्छायेप्रतिप्रवेश करतो. व सूर्यग्रहणीं सूर्याप्रतिप्रवेश करितो. भूछाया सूर्यापासून सप्तराशीस असते व पौर्णिमेस चंद्रही तेथेंच असतो. ह्मणून तो चंद्र शीघ्रगतित्वास्तव पूर्वाभिमुख भूछायेंत प्रवेश करतो. यास्तव त्याचें ग्रहण पूर्वार्धाकडून होतें. सूर्यग्रहणीं सूर्यचंद्र एकराशिस्थित होतात. तेथें चंद्र शीघ्रगतित्वास्तव पश्चिमेकडून येऊन अमावास्येतीं सूर्यमंडलाप्रति प्रवेश करितो यास्तव अधःस्थचंद्र. सूर्याचें आच्छादन करितो. या कारणास्तव चंद्राचें ग्रहण पश्चिमार्धाकडून होत नाहीं व सूर्याचें ग्रहण पूर्वार्धाकडून होत नाहीं. ८

वृक्षस्य स्वच्छाया यथैकपार्श्वेन भवति दीर्घा च ।
निशि निशि तद्वद्भूमेरावरणवशाद्दिनेशस्य ॥ ९ ॥

अर्थ-जशी वृक्षाची छाया एक बाजूस होते व दीर्घ ( लांब ) ही होते. तशी रात्रिरात्रीचा ठाई (प्रत्येक रात्रीस) सूर्याच्या आच्छादनानें भूमीची छाया पार्श्वभागीं [ एका अंगास ] होते व लांबही होते असें आहे तर प्रतिमासास चंद्रग्रहण कां होत नाहीं. या शंकेचें निवारण पुढें आहे. ९

सूर्यात्सप्तमराशौ यदि चोदग्दक्षिणेन वातिगतः ।
चंद्रः पूर्वाभिमुखच्छायामौर्वी तदा विशति ॥ १० ॥

अर्थ-जेव्हां चंद्र सूर्यापासून सप्तमराशिस्थित होऊन भूछायेंत उत्तरेकडून किंवा दक्षिणेकडून येतो. तेव्हां पूर्वाभिमुख जात असतां, भूछायेप्रति प्रवेश करितो, [ यास्तव दिसेनासा होतो तें चंद्रग्रहण ] १०

चंद्रोऽधःस्थः स्थगयति रविमंबुदवत्समागतः पश्चात् ।
प्रतिदेशमतश्चित्रं दृष्टिवशाद्भास्करग्रहणं ॥ ११ ॥

अर्थ-सूर्याच्या खालीं राहणारा चंद्र पश्चिमेकडून येऊन, अभ्रासारखा सूर्याते आच्छादितो. म्हणून देशोदेशांत तें सूर्यग्रहण दृष्टिवशाद्यास्तव [ पाहण्यास ] नानाप्रकारचें ( कोठें सर्वग्रास, कोठें अर्धग्रास, कोठें ग्रास नाहीं ) असें दिसतें. ११

आवरणं महदिंदोः कुंठविषाणस्ततोऽर्धसंच्छन्नः ।
स्वल्पं रवेर्यतोऽतस्तीक्ष्णविषाणो रविर्भवति ॥ १२ ॥

अर्थ-चंद्रास मोठें आच्छादन होतें यास्तव अर्धग्रस्त चंद्र कुंठविषाण ( बुथ्थशृंग ) होतो. सूर्यास स्वल्प आच्छादन होतें. या स्तव अर्धग्रस्त सूर्य तीक्ष्ण विषाण होतो. १२

एवमुपरागकारणमुक्तमिदं दिव्यदृग्भिराचार्यैः ।
राहुः कारणमस्मिन्नित्युक्तः शास्त्रसद्भावः ॥ १३ ॥

**अर्थ**---या पूर्वोक्त प्रकारें ज्ञानचक्षुयुक्त दृष्टि आचार्यांनीं ग्रहणाचें कारण सांगितलें. या ग्रहणाविषयीं राहु कारण असा शास्त्रसद्भाव ( परमार्थ ) सांगितला. ( त्याप्रमाणें पुढील श्लोकांत सांगतात.) १३

योऽसावसुरो राहुस्तस्य वरो ब्रह्मणा य आज्ञप्तः ।
आप्यायनमुपरागे दत्तहुतांशेन ते भविता ॥ १४ ॥

**अर्थ**---जो हा सैंहिकेय नामक राहु त्यास ब्रह्मदेवानें, ग्रहणामध्यें जें दान दिलें किंवा अग्नींत हवन केलें त्याच्या भागानें तुझें आप्यायन [ पुष्टता ] होईल हा वर दिला १४

तस्मिन्काले सान्निध्यमस्य तेनोपचर्यते राहुः ।
याम्योत्तराशशिगतिर्गणितेऽप्युपचर्यते तेन ॥ १५ ॥

**अर्थ**---यास्तव ग्रहणकालीं राहूचें सांनिध्य होतें. यावरून राहु ग्रासतो असा व्यवहार होतो. गणितामध्यें दक्षिणोत्तर चन्द्रगति पात वशास्तव होते. त्या चन्द्रपातासच राहु असें म्हणतात. ( चन्द्रविक्षेपाच्या ज्ञानार्थ चन्द्रपात कल्पिला आहे, त्यासच राहु असें लोकांमध्यें म्हणतात ) १५

न कथंचिदपि निमित्तैर्ग्रहणं विज्ञायते निमित्तानि ।
अन्यस्मिन्नपि काले भवंत्यथोत्पातरूपाणि ॥ १६ ॥

**अर्थ**--अशातज्ञ निमित्तांनीं ग्रह याचें कधींही ज्ञान होणार नाहीं, कारण ते उत्पात अन्यकालीं ( गणितांवांचूनही ) होतात, [ यास्तव गर्गादिकांनीं उत्पातामध्यें ग्रहणाचा गणना केली तें योग्य नव्हे., १६

पंचग्रहसंयोगान्नकिल ग्रहणस्य संभवो भवति ।
तैलं च जलेऽष्टम्यां न विचिन्त्यमिदं विपश्चिद्भिः ॥१७॥

**अर्थ**—अमावास्या पौर्णिमा यास जर पंच ग्रहांचा योग असेल तर ग्रहण होत नाहीं, व अष्टमीस पात्रांत जल घालून त्यांत तेल घातलें असतां, ज्या दिशेकडे जाणार नाहीं तिकडे ग्रहण होईल, इत्यादि जें वृद्ध गर्गादि विद्वानांचें मत, त्याचा ही विचार करूं नये. १७

अवनत्यार्के ग्रासो दिग्ज्ञेया वलनयावनत्या च ।
तेष्ववसानाद्वेला करणे कथितानि तानि मया ॥१८॥

**अर्थ**--नतीनें ( स्पष्ट विक्षेपानें ) सूर्यग्रहणीं ग्रास जाणावा व वलन आणि नति यांवरून दिशा जाणावी स्थिति समाप्तीवरून ग्रहणाची वेळ जाणावी. तीं सर्व मी ( पंचसिद्धांतिकेमध्यें ) सांगितलीं आहेत. १८

( आतां पर्वेश सांगावयाचे ते आणण्याचा अन्य ग्रंथांतील सुलभ प्रकार प्रथम सांगतो. शक १२ नीं गुणून त्यांत चैत्रादि मास मिळवून ४२ नीं भागावें जें लब्ध तो भगण होतो व जें शेष राहील ते ७ नीं भागावें म्हणजे पर्वेश येतात; त्यांचा अनुक्रम पुढील श्लोकाप्रमाणें जाणावा. )

षण्मासोत्तरवृद्धया पर्वेशाः सप्त देवताः क्रमशः ।
ब्रह्मशशींद्रकुबेरावरुणाग्नियमाश्च विज्ञेयाः ॥१९॥

**अर्थ**—कल्पारासून आरंभ करून सहा सहा महिन्याचे ब्रह्मादि सात देवता अनुक्रमानें पर्वेश होतात. तें- १ ब्रह्मा, २ चंद्र, ३ इंद्र, ४ कुबेर, ५ वरुण, ६ अग्नि, ७ यम हे जाणावे. १९

ब्राह्मे द्विजपशुवृद्धिक्षेमारोग्याणि सस्यसंपच्च ।
तद्वत्सौम्ये तस्मिन्पीडा विदुषामवृष्टिश्च ॥ २० ॥

**अर्थ** ब्रह्मा पर्वेश असतां ब्राह्मण व पशु यांची वृद्धि, क्षेम [ लब्धपालन ] आरोग्य व धान्य, संपत्ति हीं होतात. चन्द्र असतां पूर्वोक्त सर्व व विद्वानांस पीडा व अवर्षण हीं होतात. २०

ऐंद्रे भूपविरोधः शारदसस्यक्षयो न च क्षेमम् ।
कौबेरेऽर्थपतीनामर्थविनाशः सुभिक्षं च ॥२१॥

**अर्थ**- इंद्र पर्वेश असतां राजांचे वैर व शरदृतूंत उत्पन्न होणाऱ्या धान्याचा नाश, लोकांचें अकल्याण होतें. कुबेर असतां, धनवानांच्या धनाचा नाश व सुभिक्ष होतें. २१

वारुणमवनीशाशुभमन्येषां क्षेमसस्यवृद्धिकरम् ॥
आग्नेयं मित्राख्यं सस्यारोग्याभयांबुकरम् ॥२२॥

**अर्थ**--वारुणपर्व, राजास अशुभकर होय. अन्यास क्षेम करणारें व धान्यवृद्धि करणारें होय. आग्नेयपर्व त्यासच मित्रनाम होय. हें पर्व असतां धान्य, आरोग्य, अभय व उदक यांचें करणारें होय. २२

याम्यं करोत्यवृष्टिं दुर्भिक्षं संक्षयं च सस्यानाम् ।
यदतः परं तदशुभं क्षुन्मारावृष्टिदं पर्व ॥२३॥

**अर्थ**--याम्यपर्व अनावृष्टि, दुर्भिक्ष व धान्याचा नाश करितें. या पर्वाहून पुढें जे पर्व कदाचित् होतें तें अशुभ, दुर्भिक्ष, मृत्यु, अवर्षण करणारें होय २३

वेलाहीने पर्वणि गर्भविपत्तिश्च शस्त्रकोपश्च ।
अतिवेले कुसुमफलक्षयो भयं सस्यनाशश्च ॥२४॥

अर्थ--गणितागत वेळेच्यापूर्वी जर ग्रहण लागेल तर गर्भनाश व शस्त्रभय होईल. गणितागत वेळेच्या पुढें ग्रहण होईल तर पुष्पें, फलें यांचा नाश, लोकांस भय व धान्यनाश होईल. २४

हीनातिरिक्तकाले फलमुक्तं पूर्वशास्त्रदृष्टत्वात् ॥
स्फुटगणितविदः कालः कथंचिदपि नान्यथा भवति ॥२५॥

अर्थ--गणितागत कालाच्यामागें पुढें ग्रहण झाल्याचें फल जें मी सांगितलें, तें पूर्व गर्गादिकांच्या ग्रंथावरून सांगितलें. स्वमतानें सांगितलें नाहीं. कारण चांगलें गणित जाणणारानें सांगितलेला काळ कधींही फिरणार नाहीं. २५

यद्येकस्मिन्मासे ग्रहणं रविसोमयोस्तदा क्षितिपाः ।
स्वबलक्षोभैः संक्षयमायांत्यतिशस्त्रकोपश्च ॥२६॥

अर्थ—एक महिन्यांत सूर्यचंद्राचीं ग्रहणें होतील तर राजे आपल्या सैन्याच्या क्षोभानें नाशाप्रत पावतील व बहुत युद्धेंही होतील. २६

ग्रस्तावुदितास्तमितौ शारदधान्यावनीश्वरक्षयदौ ।
सर्वग्रस्तौ दुर्भिक्षमरकदौ पापसंदृष्टौ ॥२७॥

अर्थ--ग्रस्तोदित व ग्रस्तास्तमित चंद्र शारदीय धान्याचा नाश करितो. तसाच सूर्य राजांचा नाश करितो सर्वग्रस्त चन्द्र, सूर्य, पापग्रह दृष्ट असतां दुर्भिक्ष व मृत्यु करणारे होत. २७

अर्धोदितोपरक्तो नैर्ऋतिकान् हन्ति सर्वयज्ञांश्च ।
अग्न्युपजीविगुणाधिकद्विजाश्रमिणो युगाभ्युदितः ॥२८॥

अर्थ—चन्द्र सूर्य अर्धोदित असतां ग्रहण लागेल तर निषाद जातीचे लोकांचा व संपूर्ण यज्ञांचा नाश होईल. आकाशाच्या प्रथम सप्तमांशीं ग्रहण लागेल किंवा सप्तमांशाच्या मध्येंच लागेल तर सुवर्णकारादिक अग्नीवर जीविका करणारांचा, गुणवानांचा, ब्राह्मणांचा व चतुर्थाश्रमी [ सन्यासी ] यांचा नाश होतो. २८

कर्षकपाखंडिवणिक् क्षत्रियबलनायकान् द्वितीयेंशे ।
कारुकशूद्रम्लेच्छान्खतृतीयांशे समंत्रिजनान् ॥२९॥
मध्यान्हे नरपतिमध्यदेशहा शोभनश्च धान्यार्घः ।
तृणभुक्प्रात्यान्तः पुरवैश्यघ्नः पंचमे खांशे ॥३०॥
स्त्रीशूद्रान् षष्ठेंशे दस्युप्रत्यन्तहास्तमयकाले ।
यस्मिन्खांशे मोक्षस्तत्प्रोक्तानां शिवं भवति ॥३१॥

अर्थ--द्वितीय आकाशांशीं ग्रहण झालें असतां शेती लोक, नास्तिक, व्यापारी, राजे व सेनापति यांचा नाश होतो. तृतीय आकाशभागीं ग्रहण झालें असतां शिंपी, शूद्र, म्लेंच्छ व प्रधान मंडळी यांचा नाश होतो. २९. मध्यान्हीं ( चतुर्थखांशीं ) ग्रहण असतां राजांचा व मध्यदेशाचा नाश व समर्घ धान्य होतें. पंचम आकाशांशीं तृणभक्षक, प्रधान, राजस्त्रिया व वैश्यजातीय यांचा नाश होतो. ३० सहाव्या आकाशभागीं ग्रहण असतां स्त्रिया व शूद्र यांचा नाश होतो. अस्तमानकाळीं [ सप्तमखांशीं ] ग्रहण झालें असतां, चोर व अरण्यवासी लोक यांचा नाश होतो ज्या आकाशभागीं मोक्ष होईल, त्यात्र आकाशभागीं ग्रहणस्पर्श झाला

असेल तर तत्संबंधीं सांगितलेलीं अशुभ फलें शुभ होत ; दिनमानाचे सात भाग करावेत, तेच आकाशाचे भाग समजावे ३१

द्विजनृपतीनुदगयने विट्शूद्रान् दक्षिणायने हन्ति ।
राहुरुदगादिदृष्टः प्रदक्षिणं हन्ति विप्रादीन् ॥३२॥
म्लेंच्छान् विदिक्स्थितो यायिनश्च हन्याध्दुताशसक्तांश्च ।
सलिलचरदंतिघाति याम्येनोदग्गवामशुभः ॥३३॥
पूर्वेण सलिलपूर्णां करोति वसुधां समागतो दैत्यः ।
पश्चात्कर्षकसेवकबीजविनाशाय निर्दिष्टः ॥३४॥

अर्थ—उत्तरायणीं ग्रहण झालें असतां, ब्राह्मण व क्षत्रिय यांचा नाश होतो. दक्षिणायनीं झालें असतां वैश्य व शूद्र यांचा नाश होतो. ग्रहणाचा स्पर्श उत्तरेस झाला तर ब्राह्मणांचा, पूर्वेस झाला तर क्षत्रियांचा, दक्षिणेस झाला तर वैश्यांचा व पश्चिमेस झाला तर शूद्रांचा नाश होतो. ३२. ईशानी, आग्नेय, निर्ऋति व वायव्य या विदिशांस ग्रहण झालें तर म्लेंच्छ जातीयांचा, मार्गस्थांचा व अग्निहोत्र्यांचा नाश होतो. [ पुनः दक्षिणेचें व उत्तरेचें फल ] दक्षिणेस स्पर्श झाला तर, जलचरांचा व गजांचा नाश, उत्तरेस झाला तर गाईचा नाश होतो. ३३. (पुनः पूर्व व पश्चिमेचें फल) पूर्वेकडून स्पर्श झाला तर, उदकानें पृथ्वी पूर्ण होईल. [ बहुजल] वृष्टि होईल ] पश्चिमेकडून झाला तर शेती लोक, सेवक, बीजें, यांचा नाश होईल. ३४.

पांचालकलिंगशूरसेनाः कांबोजोड्रकिरातशस्त्रवार्ताः ।
जीवंति च ये हुताशवृत्त्या ते पीडामुपयांति मेषसंस्थे ॥३५॥

अर्थ--मेषराशिस्थित चन्द्र सूर्य असतां ग्रहण होईल तर पांचाल, कलिंग, शूरसेन, कांबोज, उंड्र, किरात या देशांत राहणारे लोकांस व शस्त्रजीवितास ( शूर ); सुवर्णकार, लोहकार इत्यादि अग्निजीवी यांस पीडा होते. ३५.

गोपाः पशवोथगोमिनो मनुजा ये च महत्वमागताः ।
पीडामुपयाति भास्करे ग्रस्ते शीतकरेऽथवा वृषे ॥ ३६ ॥

अर्थ--वृषभराशिस्थित चन्द्र सूर्य असतां ग्रहण होईल तर गोरक्षक, पशु, गाई पाळणारे व श्रेष्ठ [पूज्य] मनुष्यांस पीडा होते. ३६.

मिथुने प्रवरांगना नृपा नृपमात्रा बलिनः कलाविदः ।
यमुनातटजाः सबाह्लिका मत्स्याः सुह्मजनैः समन्विताः ॥ ३७ ॥

अर्थ—मिथुनराशिस्थित चन्द्र सूर्य असतां ग्रहण होईल तर श्रेष्ठ स्त्रिया, राजे, नृपसदृश [ प्रधान ] बलिष्ठ प्राणी, कलाविद, ( चित्रें, नृत्य, गायन व वाद्यें यांचे जाणणारे ); यमुनातीरस्थ लोक, बाल्हिक, मत्स्य, सुह्म या देशांतील लोक या सर्वांस पीडा होते. ३७.

आभीरान् शबरान्सपल्हवान्मल्लान्मत्स्यकुरून् शकानपि ।
पांचालान्विकलांश्च पीडयत्यन्नं वापि निहंति कर्कटे ॥ ३८ ॥

अर्थ—कर्कस्थित चन्द्र सूर्य असतां ग्रहण झालें तर आभीर [ गवळीलोक ], शबर [ भिल्ल ], पल्हव [ पर्शियन लोक ], मल्ल [ बाहुयुद्ध करणारे ], मत्स्य, कुरु, शक व पांचाल या देशांतील लोक, अंगहीन [ विकलांग ], यांस पीडा होते व धान्यनाशही होतो. ३८.

सिंहे पुलिंदगणमेकलसत्वयुक्तान् राजोपमान्नरपतीन्वनगोचरांश्च ।

षष्ठे तु सस्यकविलेखकगेयसक्तान् हंत्यश्मकत्रिपुरशालियुतांश्च देशान् ॥

**अर्थ**— सिंहस्थित चन्द्र सूर्य असतां ग्रहण झालें तर म्लेंच्छसमुदाय, मेकलपर्वतस्थ लोक, प्रधान, राजतुल्य राजे, अरण्यवासी, यांचा नाश होतो. कन्यास्थित चन्द्र सूर्य असतां ग्रहण झालें तर धान्य, कवि, लेखक, गायक अश्मक लोक, त्रिपुरनगरांमध्यें राहणारे लोक, बहुत धान्ययुक्त देश यांचा नाश होतो. ३९.

तुलाधरेऽवंत्यपरांत्यसाधून्वणिग्दशार्णान् मरुकच्छपांश्च ।

अलिन्यथोदुंबरमद्रचोलान् द्रुमान्सयौधेयविषायुधीयान् ॥ ४० ॥

**अर्थ**—तुलास्थित चन्द्र सूर्य असतां ग्रहण झालें तर अवंति ( उज्जनी ), अपरांत या देशांतील लोक, साधु, व्यापारी, दशार्ण व मरु, कच्छप ( भरोन्छ ) या देशांतील लोक; यांचा नाश होतो. वृश्चिकस्थित चन्द्र सूर्य असतां ग्रहण झालें तर उदुंबर, मद्र, चोल या देशांतील लोक; वृक्ष, युद्ध करणारे लोक, विषायुध लोक, यांचा नाश होतो. ४०.

धन्विन्यमात्यवरवाजिविदेहमल्लान्पांचालवैद्यवणिजो विषमायुधज्ञान् ।

हन्यान्मृगे तु झषमंत्रिकुलानि नीचान् मंत्रौषधीषु कुशलान् स्थविरायुधी-
यान् ॥ ४१ ॥

**अर्थ**—धनराशीस चन्द्र सूर्य असतां ग्रहण झालें तर अमात्यश्रेष्ठ, अश्व, विदेह ( जनकराजाची मिथिला नगरी ) यांतील लोक, मल्ल, पांचालदेशस्थ लोक, वैद्य, व्यापारी, क्रूर आयुध जाणणारे यांचा नाश होतो. मकरराशीस चन्द्र सूर्य असतां ग्रहण झालें तर मत्स्य, प्रधानकुलें, निंद्यकर्म करणारे, मंत्र व औषधांमध्यें कुशल, वृद्ध शस्त्रजीवी यांचा नाश होतो. ४१.

कुंभेऽतर्गिरिजान्सपश्चिमजनान् भारोद्वहान् तस्करान्

आभीरान् दरदार्यसिंहपुरकान् हन्यात्तथा बर्बरान् ।

मीने सागरकूलसागरजलद्रव्याणि मान्यान् जनान्

प्राज्ञान्वार्युपजीविनश्च भफलं कूर्मोपदेशाद्वदेत ॥ ४२ ॥

**अर्थ**—कुंभस्थित चन्द्र सूर्य असतां ग्रहण झालें तर पर्वतांमधील लोक, पश्चिमदिशेकडचे लोक, ओझीं वाहणारे लोक, चोर, गवळी, विष देणारे, श्रेष्ठजन, सिंहपुरस्थ लोक, बर्बर ( म्लेंच्छदेश ) यांत रहाणारे लोक, या सर्वांचा नाश होतो. मीनस्थ चन्द्र सूर्य असतां ग्रहण झालें तर समुद्रतीरस्थलोक, समुद्राच्या पाण्यानें उत्पन्न झालेलीं रत्नें [ पोंवळीं, मोत्यें इ० ]. पूज्य लोक, बुद्धिमान् लोक, पाण्याच्या व्यापारानें वांचणारे यांचा नाश होतो. हीं सर्व नक्षत्रराशीफलें कूर्मविभाग फलांतरुन पाहून सांगावीं. ४२.

सव्यापसव्यलेहग्रसननिरोधावमर्दनारोहाः ।

आघ्रातं मध्यतमस्तमोंत्य इति ते दशग्रासाः ॥ ४३ ॥

**अर्थ**—सव्य, अपसव्य, लेह, ग्रसन, निरोध, अवमर्दन, आरोह, आघ्रात, मध्यतम, तमोंत्य, असे दहा प्रकारचे ग्रास आहेत. ४३.

सव्यगते तमसि जगज्जलप्लुतं भवति मुदितमभयं च ।

अपसव्ये नरपतितस्करावमर्दैः प्रजानाशः ॥ ४४ ॥

**अर्थ**—सूर्य चन्द्रांच्या ग्रहणाचें सव्य भ्रमण झालें असतां, पृथ्वीवर जलवृष्टि बहुत होईल, व सर्व जगत् आनंदित व भयरहित होईल. अपसव्य भ्रमण झालें असतां राजे व चोर यांच्या पीडेनें लोकांचा नाश होईल.

जिव्होपलेढि परितस्तिमिरनुदो मंडलं यदि स लेहः ।
प्रमुदितसमस्तभूता प्रभूततोया च तत्र मही ॥ ४५ ॥

अर्थ--चन्द्र किंवा सूर्य यांचें बिंब आसमंताद्भागीं जिव्हेनें चाटल्यासारखें दिसतें त्यास लेहसंज्ञक ग्रास असें ह्मणतात. तसा ग्रास झाला असतां, आनंदित सर्व लोक व बहुत उदक यांहीं युक्त पृथ्वी होतेय. ४५.

ग्रसनमिति यदा त्र्यंशः पादो वा गृह्यतेऽथवाप्यर्धं ।
स्फीतनृपवित्तहानिः पीडा च स्फीतदेशानाम् ॥ ४६ ॥

अर्थ—अर्धग्रास किंवा तृतीयांश ग्रास किंवा चतुर्थांश ग्रास जेव्हां होतो, तेव्हां त्यास ग्रसन असें ह्मणावें. तें झालें असतां, बहुत द्रव्ययुक्त राजाच्या द्रव्याचा नाश व सधन देशाचा नाश होतो. ४६.

पर्यंतेपु गृहीत्वा मध्ये पिंडीकृतं तमस्तिष्ठेत् ।
स निरोधो विज्ञेयः प्रमोदकृत्सर्वभूतानाम् ॥ ४७ ॥

अर्थः--राहु, सूर्यचंद्रांचीं बिंबें आसमंताद्भागीं [ सर्व ] ग्रासून मध्यें पिंडीकृत राहील तें ग्रहण निरोधसंज्ञक होय. तसें झालें तर सर्व प्राणिमात्रांस आनंद होईल. ४७.

अवमर्दनमिति निःशेषमेव संछाद्य यदि चिरं तिष्ठेत् ।
हन्यात्प्रधानदेशान्प्रधानभूपांश्च तिमिरमयः ॥ ४८ ॥

अर्थः--चंद्रसूर्यांचें बिंब सर्व ग्रासून, बहुत वेळ राहील तर, तो अवमर्दनसंज्ञक ग्रास होतो. तो झाला तर मुख्य देश व मुख्य राजे यांचा नाश होतो. ४८.

वृत्ते ग्रहे यदि तमस्तत्क्षणमावृत्य दृश्यते भूयः ।
आरोहणमित्यन्योन्यमर्दनैर्भयकरं राज्ञां ॥ ४९ ॥

अर्थः--ग्रहणकालीं ग्रहण लागून सुटलें नंतर पुनः लागलेलें दिसेल तर, तो आरोहण संज्ञक ग्रास होय. तो झाला तर परस्पर युद्धांनीं राजांस भय करणारा होय ४९.

दर्पण इवैकदेशे सबाष्पनिःश्वासमारुतोपहतः ।
दृश्यत आघ्रातं तत्सुवृष्टिवृद्ध्यावहं जगतः ॥ ५० ॥

अर्थः—चंद्रसूर्यांचें बिंब उष्ण निःश्वास वायूनें उपहत [ ताडित ] होत्सातें आरशासारखें दिसतें. तें आघ्रातसंज्ञक ग्रसन होय. तें झालें असतां देशांमध्यें सुभिक्ष व वृद्धि करणारें होय. ५०.

मध्ये तमः प्रविष्टं वितमस्कं मंडलं च यदि परितः ।
तन्मध्यदेशनाशं करोति कुक्ष्यामयभयं च ॥ ५१ ॥

अर्थः— राहु जर चंद्रसूर्यांच्या बिंबामध्यें प्रवेश करील आणि सभोंवतें बिंब स्वच्छ दिसेल तर, मध्यतमसंज्ञक ग्रास होतो. त्या ग्रासीं मध्यदेशाचा नाश होतो व कुक्षिरोगाचें भय होतें. ५१.

पर्यंतेष्वतिबहुलं स्वच्छं मध्ये ततस्तमोंत्याख्यं ।
सस्यानामीतिभयं भयमस्मिंस्तस्कराणां च ॥ ५२ ॥

अर्थः— चंद्रसूर्यबिंबाच्या परिध्यंतर्भागीं ( सभोंवतीं ) फार काळें व मध्यभागीं अल्पकाळें ग्रहण दिसेल तर तो तमोंत्यनामक ग्रास होतो तो झाला असतां, धान्याला टोळ इत्यादिकांचें भय व चोरभय होतें. ५२.

श्वेते क्षेमसुभिक्षं ब्राह्मणपीडां च निर्दिशेद्राहौ ।
अग्निभयमनलवर्णे पीडा च हुताशवृत्तीनां ॥ ५३ ॥

हरिते रोगोल्बणता सस्यानामीतिभिश्च विध्वंसः ।
कपिले शीघ्रगसत्वम्लेच्छध्वंसोऽथ दुर्भिक्षं ॥ ५४ ॥

**अर्थः**—राहु [ ग्रहण ] शुभ्रवर्ण दिसेल तर क्षेम, सुभिक्ष, ब्राह्मणांस पीडा होईल. अग्निवर्ण ग्रहण असेल तर अग्निभय, सुवर्णकारादिकांस पीडा होत्ये. ५३. हरितवर्ण ( पोपटी ) दिसेल तर बहुत रोग, धान्यांचा टोळ इत्यादिकांनीं नाश होईल. कपिलवर्ण असतां शीघ्रगमन करणारे प्राणी [ उष्ट्रादि ] यांचा व म्लेंच्छ यांचा नाश व दुर्भिक्ष होतें. ५४.

अरुणकिरणानुरूपे दुर्भिक्षावृष्टयो विहगपीडा ।
आधूम्रे क्षेमसुभिक्षमादिशेन्मंदवृष्टिं च ॥ ५५ ॥
कापोतारुणकपिलश्यावाभे क्षुद्भयं विनिर्देश्यं ।
कापोतः शूद्राणां व्याधिकरः कृष्णवर्णश्च ॥ ५६ ॥
विमलकमणिपीताभो वैश्यध्वंसो भवेत्सुभिक्षाय ।
सार्चिष्मत्यग्निभयं गैरिकरूपे तु युद्धानि ॥ ५७ ॥
दुर्वाकाण्डश्यामे हारिद्रे वापि निर्दिशेन्मरकं ।
अशनिभयसंप्रदायी पाटलिकुसुमोपमो राहुः ॥ ५८ ॥
पांशुविलोहितरूपः क्षत्रध्वंसाय भवति वृष्टेश्च ।
बालरविकमलसुरचापरूपभृच्छस्त्रकोपाय ॥ ५९ ॥

**अर्थः**—स्वल्पलोहितवर्ण राहु असतां दुर्भिक्ष, अवृष्टि व पक्ष्यांस पीडा होत्ये. धूम्रवर्ण राहु असतां क्षेम, सुभिक्ष व स्वल्पवृष्टि होत्ये. ५५. कपोतवर्ण, अरुण, मिश्रवर्ण, श्यामकांति राहु असतां दुर्भिक्षभय होतें. कपोतवर्ण व कृष्णवर्ण राहु असतां, शूद्रास पीडा होत्ये. ५६. नीलवर्ण राहु असतां वैश्यांचा नाश व सुभिक्ष होतें. ज्वालासहित राहु असतां अग्निभय होतें. गैरिकसदृश तांबडा राहु असतां युद्धें होतात. ५७ दूर्वाकांडासारखा श्याम व पीतवर्ण राहु असतां, मृत्युभय होतें. पाटलिपुष्पसदृश ( श्वेतलोहित ) वर्ण राहु, अशनि भय देणारा होतो. ५८. पांसु ( धूळ ) वर्ण व मिश्रवर्ण राहु, क्षत्रिय व वृष्टि यांचा नाश करितो. बालसूर्य, कमल व इंद्रधनुष्य यांचेसारख्या वर्णाचा राहु, शस्त्रकोप [ युद्ध ] कारक होतो. ५९.

पश्यन्ग्रस्तं सौम्यो घृतमधुतैलक्षयाय राज्ञां च ।
भौमः समरविमर्दं शिखिकोपं तस्करभयं च ॥ ६० ॥
शुक्रः सस्यविमर्दं नानाक्लेशांश्च जनयति धरित्र्यां ।
रविजः करोत्यवृष्टिं दुर्भिक्षं तस्करभयं च ॥ ६१ ॥

**अर्थः**—राहुग्रस्त चंद्रसूर्यातें, बुध पाहील [ बुधाची दृष्टि असेल ] तर घृत, मध, तेल, व राजे यांचा नाश होईल. भौम पाहील तर, युद्धें, अग्निभय व चोरभय होईल. ६० शुक्र पाहील तर धान्यनाश व भूमीवर नानाप्रकारचीं दुःखें होतील. शनि पाहील तर अवर्षण, दुर्भिक्ष व चोरभय होईल. ६१

यदशुभमवलोकनाभिरुक्तं ग्रहजनितं ग्रहणे प्रमोक्षणे वा ।
सुरपतिगुरुणावलोकिते तच्छममुपयाति जलैर्यथाग्निरिद्धः ॥ ६२ ॥

**अर्थः**—बुधादि दृष्टीनीं सांगितलेलें जें चंद्रसूर्य ग्रहणीं किंवा मोक्षीं अशुभ, तें बृहस्पतीची दृष्टि ग्रहणीं ( ग्रस्त चंद्रसूर्यावर ) असेल तर, जसा प्रदीप्त अग्नि जलसिंचनानें नाहींसा होतो तसें नाहींसें होतें. ६२.

ग्रस्ते क्रमान्निमित्तैः पुनर्ग्रहो मासषट्कपरिवृद्ध्या ।
पवनोल्कापातरजः क्षितिकंपतमोऽशनिनिपातैः ॥ ६३

अर्थः—चंद्रसूर्य यांचीं ग्रहणें असतां, हीं पुढील निमित्तें ।तील तर सहा सहा महिन्यांनीं अनुक्रमानें ग्रहणें होतील. ग्रहणामध्यें वायु सुटेल तर, सहा महिन्यांनीं, उल्का ( तारा ) पात होईल तर १२ महिन्यांनीं, रज ( धूळ ) होईल तर, १८ महिन्यांनीं, भूकंप होईल त २४ महिन्यांनीं, अंधकार होईल तर ३० महिन्यांनीं, अशनि [ वीज ] पात होईल तर ३६ महिन्यांनीं पुन्हा ग्रहण होईल असें जाणावें. ६३.

आवंतिका जनपदाः कावेरीनर्मदातटाश्रयिणः ।
दृप्त श्चमनुजपतयः पीड्यंते क्षितिसुते ग्रस्ते ॥ ६४ ॥

अर्थः—जो ग्रह चंद्रसूर्यांबरोबर ( फारच जवळ ) एक राशीस असता तो चंद्रसूर्यांचे ग्रहणानें आच्छादित होतो तेव्हां, त्याला ग्रस्त ह्मणावें. तसा भौम ग्रस्त असतां, अवंतिदेशोद्भव लोक, कावेरी व नर्मदा या नद्यांच्या तीरीं राहणारे लोक व गर्वित मनुष्यपति ( राजे ) यांस पीडा होते ६४.

अंतर्वेदीसरयूं नेपालं पूर्वसागरं शोणं ।
स्त्रीनृपयोधकुमारान्सहविद्वद्भिर्बुधो हंति ॥ ६५ ॥

अर्थः—बुध ग्रस्त असतां, गंगा व यमुना यांचे मध्यभागीं राहणारे, नेपाळ, पूर्वसमुद्र, शोणनद, यांप्रत राहणारे लोक, स्त्रिया, राजे, युद्धकुशल, बाल, ( प्रथमवयस्क ) यांचा नाश होतो. ६५.

ग्रहणोपगते जीवे विद्वन्नृपमंत्रिगजहयध्वंसः ।
सिंधुतटवासिनामप्युदग्दिशं संश्रितानां च ॥ ६६ ॥

अर्थः—गुरु ग्रस्त असतां, पंडित, राजे, प्रधान, गज, अश्व यांचा नाश व सिंधु नदाच्या तीरीं राहणारे लोक व उत्तर दिशेस राहणारे यांचा नाश होतो. ६६.

भृगुतनये राहुगते दासेरककैकयाः सयौधेयाः ;
आर्यावर्ताः शिवयः स्त्रीसचिवगणाश्च पीड्यंते ॥ ६७ ॥

अर्थः—शुक्र ग्रस्त असतां कोळीलोक, केकय राजाच्या देशांतील लोक, योद्धे, सातपुडा व हिमालय या दोन पर्वतामध्यें राहणारे लोक, शिविराच्या देशातील लोक, स्त्रिया, प्रधानसमुदाय यांस पीडा होते. ६७.

सौरे मरुभवपुष्करसौराष्ट्रधातवोर्बुदांत्यजनाः ।
गोमंतपारियात्राश्रिताश्च नाशं व्रजंत्याशु ॥ ६८ ॥

अर्थः—शनि ग्रस्त असतां, मरुदेशोत्पन्न लोक, पुष्करद्वीपस्थ अथवा पुष्करतीर्थस्थ लोक, काठेवाड प्रांतांतील लोक, सुवर्णादि धातु पदार्थ, अर्बुदनामक पर्वतवासी लोक, कनिष्ठजातीचे लोक, गोमंत व पारियात्रपर्वताश्रित लोक या सर्वांचा नाश होतो. ६८.

कार्तिक्यामनलोपजीविमगधान्प्राच्याधिपान्कोशलान् ।
कल्माषानथशूरसेनसहितान्काशींश्च संतापयेत् ॥
हन्याच्चाशुकलिंगदेशनृपतिं सामात्यभृत्यं तमो-
दृष्टं क्षत्रियतापदं जनयति क्षेमं सुभिक्षान्वितं ॥ ६९ ॥

अर्थः—कार्तिकीपौर्णिमेस किंवा अमावास्येस ग्रहण झालें तर सुवर्णकारादि अग्निजीवी, मागधदेशस्थ व प्राच्यदेशस्थ राजे, कोसलदेशस्थ लोक, कल्माष [ कृष्णवर्ण लोक ], शूरसेनदेशस्थ लोक, काशीस्थ लोक यांस दुःख होतें. प्रधान सेवक यांहींसहित कलिंगदेशाच्या राजाचा तत्काल नाश होतो व क्षत्रियांस दुःख होतें. सुभिक्षसहित कल्याणही होतें. ६९.

काश्मीरकान् कोशलकान्सपुंड्रान्मृगांश्च हन्यादपरांतकांश्च ।
ये सोमपास्तांश्च निहंति सौम्ये सुवृष्टिकृत्क्षेमसुभिक्षकृच्च ॥ ७० ॥

अर्थः—मार्गशीर्षमासीं चंद्रसूर्यग्रहण झालें तर काश्मीर, कोशल, पुंड्र, या देशांतील लोक; अरण्यपशु अपरांतक लोक, सोमपान करणारे ( दीक्षित ), यांचा नाश होतो. व उत्तम वृष्टि, कल्याण व सुभिक्ष होतें. ७०

पौषे द्विजक्षत्रजनोपरोधः ससैंधवाख्याः कुकुरा विदेहाः ।
ध्वंसं व्रजंत्यत्र च मंदवृष्टिं भयं च विंद्यादसुभिक्षयुक्तं ॥ ७१ ॥

अर्थः--पौषमासीं ग्रहण झालें तर ब्राह्मण, क्षत्रिय लोक यांस उपद्रव होतो. सैंधव, कुकुर व विदेह या देशींचे लोक नाश पावतात. अल्पवृष्टि व दुर्भिक्षयुक्त भयही उत्पन्न होतें. ७१.

माघे तु मातृपितृभक्तवसिष्ठगोत्रान् स्वध्यायधर्मनिरतान् करिणस्तुरंगान् ।
वंगांगकाशिमनुजांश्च दुनोति राहुर्वृष्टिं च कर्षकजनानुमतां करोति ॥ ७२ ॥

अर्थः--माघमासीं ग्रहण झालें तर मातृपितृभक्त वसिष्ठगोत्रोत्पन्न, अध्ययन व धर्म यांच्याठाईं तत्पर; हत्ती, अश्व, वंग, अंग, काशी या देशीं राहणारे लोक, या सर्वांस पीडा [ दुःख ] होतें. व शेती लोकांस मनाप्रमाणें वृष्टिही होते. ७२

पीडाकरं फाल्गुनमासि पर्व वंगाश्मकावन्तकमेकलानां ॥
नृत्यज्ञसस्यप्रवरांगनानां धनुष्करक्षत्रतपस्विनां च ॥ ७३ ॥

अर्थ--फाल्गुन मासीं ग्रहण झालें तर वंग, अश्मक, अवंत, मेकल या देशांतील लोकांस पीडा होते. नृत्य जाणणारे, धान्यें, श्रेष्ठांच्या स्त्रिया, धनुष्यें करणारे, क्षत्रिय, तपस्वी या सर्वांस पीडा होते. ७३

चैत्रेतु चित्रकरलेखकगेयसक्तान् रूपोपजीविनिगमज्ञहिरण्यपण्यान् ॥
पौंड्रोग्रकैकयजनानथचाश्मकांश्च तापःस्पृशत्यमरपोत्र विचित्रवर्षी ॥७४॥

अर्थ—चैत्रमासीं ग्रहण झालें तर चित्रें करणारे, लेखक, गायक, वेश्या, वेदपाठक सुवर्णाचा विक्रय करणारे, पौंड्र, उग्र, कैकय या देशचे लोक, अश्मक लोक या सर्वांस दुःख होतें. व इंद्र विचित्र वृष्टि करील. ७४

वैशाखमासग्रहणे विनाशमायांति कार्पासतिलाः समुद्गाः ॥
इक्ष्वाकुयौधेयशकाः कलिंगाः सोपद्रवाः किं तु सुभिक्षमस्मिन् ॥७५॥

अर्थ--वैशाखमासीं ग्रहण झालें तर कापूस, तीळ, मूग, यांचा नाश होतो. इक्ष्वाकु, यौधेय, शक कलिंग. या देशीं राहणारे लोक हे सर्व दुःखानें युक्त होतील; परंतु या ग्रहणीं सुभिक्ष होतें. ७५.

ज्येष्ठे नरेंद्रद्विजराजपत्न्यः सस्यानि वृष्टिश्च महागणाश्च ॥
प्रध्वंसमायांति जनाश्च सौम्याः साल्वैः समेताश्च निषादसंघाः ॥७६॥

अर्थ--ज्येष्ठमहिन्यामध्यें ग्रहण झालें तर राजे, ब्राह्मण, राजांच्या स्त्रिया, धान्यें, वृष्टि, मोठ समुदाय सुंदर पुरुष अथवा उत्तर दिशेस राहणारे पुरुष, साल्वदेशस्थ लोक व कोळी लोकांचा समूह यांचा नाश होतो.

आषाढपर्वण्युदपानवप्रनदीप्रवाहान् फलमूलवार्तान् ॥
गांधारकाश्मीरपुलिंदचीनान् हतान् वदेन्मंडलवर्षमस्मिन् ॥७७॥

अर्थः--आषाढमासीं ग्रहण झालें तर जलाधार [ वापीकूपादि ] व त्यांचे तट [ तीर ], नद्यांचे प्रवाह, फलें मूलें यांवर जीविका करणारे, गांधार, काश्मीर, पुलिंद, चीन या देशांतील लोक यांचा नाश होतो. व क्वचित् क्वचित् वृष्टि होईल. ७७.

काश्मीरान्सपुलिंदचीनयवनान् हन्यात्कुरुक्षेत्रकान् ।
गांधारानपि मध्यदेशसहितान् दृष्टो ग्रहः श्रावणे ॥
कांबोजैकशफांश्च शारदमपि त्यक्त्वा यथोक्तानिमान् ।
अन्यत्र प्रचुरान्नहृष्टमनुजैर्धात्रीं करोत्यावृतां ॥ ७८ ॥

अर्थः—श्रावणमासीं ग्रहण झालें तर, काश्मीर, पुलिंद, चीन, यवन. कुरुक्षेत्र, गांधार, मध्यदेश; या देशांतील लोक; कांबोजदेशस्थ लोक, एकशफ [ गर्दभादिक ] शरदृतूंतील धान्य, या सर्वांचा नाश होईल. हे पूर्वोक्त काश्मीरादिक सोडून इतर देशीं बहुत धान्य व आनंदित लोकांहीं व्याप्त पृथ्वी होईल. ७८.

कलिंगवंगान्मगधान्सुराष्ट्रान् म्लेच्छान्सुवीरान् दरदांच्छकांश्च ।
स्त्रीणां च गर्भानसुरो निहंति सुभिक्षकृद्भाद्रपदेऽभ्युपेतः ॥ ७९ ॥

अर्थः—भाद्रपदमासीं ग्रहण झालें तर, कलिंग, वंग, मगध, सुराष्ट्र, म्लेच्छ, सुवीर, दरद, शक या देशांतील लोक; व स्त्रियांचे गर्भ यांचा नाश होतो. आणि सुभिक्षही होतें. ७९

कांबोजचीनयवनान् सहशल्यहृद्भिर्वाल्हीकसिंधुतटवासिजनांश्च हन्यात् ।
आनर्तपौंड्रभिषजश्च तथा किरातान् दृष्टो सुरोश्वयुजि भूरि सुभिक्षकृच्च ॥८०॥

अर्थः—आश्विनमासीं ग्रहण झालें तर, कांबोज, चीन, यवन, या देशांतील लोक; व्रणचिकित्सक ( जखमांचे वैद्य ), वाल्हीक देशांतील लोक, सिंधु नदाच्या तीरीं राहणारे लोक व आनर्त, पौंड्र, किरात या देशांतील लोक; वैद्य या सर्वांचा नाश होतो आणि बहुत सुभिक्ष होतें. ८०.

हनुकक्षिपायुभेदा द्विर्द्विः संछर्दनं च जरणं च ।
मध्यांतयोश्च विदरणमिति दशशशिसूर्ययोर्मोक्षाः ॥ ८१ ॥

अर्थ—१ दक्षिण हनु, २ वामहनु, ३ दक्षिणकुक्षि, ४ वामकुक्षि, ५ दक्षिणपायु, ६ वामपायु ( यांचे भेद ) ७ संछर्दन, ८ जरण, ९ मध्यविदरण, १० अन्त्यविदरण या प्रकारचे दहा चंद्रसूर्य ग्रहणाचे मोक्ष आहेत. [ यांचीं लक्षणें व फलें पुढील श्लोकापासून सांगतों.] ८१.

आग्नेय्यामपगमनं दक्षिणहनुभेदसंज्ञितं शशिनः ॥
सस्यविमर्दो मुखरुक् नृपपीडास्यात्सुवृष्टिश्च ॥८२॥

अर्थ—अग्नेयी दिशेस जर चंद्रग्रहणमोक्ष होईल तर तो दक्षिणहनुभेदसंज्ञक मोक्ष होय. अशा मोक्षीं धान्यनाश, मुखरोग, राजांस पीडा, हीं होतात व सुवृष्टिही होते. ८२.

पूर्वोत्तरेण वामो हनुभेदो नृपकुमारभयदायी ॥
मुखरोगं शस्त्रभयं तस्मिन्विद्यात्सुभिक्षं च ॥८३॥

अर्थः—ईशानीस जर चंद्रग्रहण सुटेल तर, वामहनुभेदसंज्ञक मोक्ष होतो. त्या मोक्षीं राजपुत्रास भय होतें व मुखरोग, शस्त्रभय व सुभिक्षही होतें. ८३.

दक्षिणकुक्षिविभेदो दक्षिणपार्श्वेन यदि भवेन्मोक्षः ॥
पीडा नृपपुत्राणामभियोज्या दक्षिणा रिपवः ॥८४॥

अर्थः—दक्षिणभागानें चंद्रग्रहणाचा मोक्ष होईल तर दक्षिणकुक्षिभेदसंज्ञक मोक्ष होतो. त्या मोक्षीं राजपुत्रास पीडा होते व दक्षिणदिशेस राहणाऱ्या शत्रूंवर स्वारीचा उद्योग होईल. ८४.

वामस्तु कुक्षिभेदो यद्युत्तरमार्गसंस्थितो राहुः ॥
स्त्रीणां गर्भविपत्तिः सस्यानि च तत्र मध्यानि ॥८५॥

**अर्थः**--उत्तरेकडे ग्रहणमोक्ष होईल तर वामकुक्षिभेदसंज्ञक मोक्ष होतो. तो झाला तर स्त्रियांचे गर्भांचा नाश होईल व धान्येंही मध्यम होतील. ८५.

नैर्ऋतवायव्यस्थे दक्षिणवामौ तु पायुभेदौ द्वौ ॥
गुह्यरुगल्पा वृष्टिर्द्वयोस्तु राज्ञीक्षयो वामे ॥८६॥

**अर्थः**—नैर्ऋति दिशेस ग्रहणमोक्ष झाला तर, दक्षिणपायुभेद व वायव्यदिशेस झाला तर वामपायुभेद या नावांचा मोक्ष होतो. त्या दोहोंच्याठाई गुह्य [ लिंग ] यास रोग व अल्पवृष्टि होईल. वामपायु ( गुद ) भेदीं राजस्त्रियांचा नाश होतो. ८६.

पूर्वेण प्रग्रहणं कृत्वा प्रागेव चापसर्पेत ।
संछर्दनमिति तत् क्षेमसस्यहार्दिप्रदं जगतः ॥ ८७ ॥

**अर्थः**--ग्रहणाचा पूर्वेस स्पर्श होऊन पूर्वेसच मोक्ष होईल तर तो संछर्दनसंज्ञक मोक्ष होय. तो मोक्ष लोकांस क्षेम ( कल्याण ) धान्य व संतोष देणारा होतो. ८७.

प्राक्प्रग्रहणं यस्मिन् पश्चादपसर्पणं तु तज्जरणं ।
क्षुच्छस्त्रभयोद्विग्नाः क शरणमुपयांति तत्र जनाः ॥ ८८ ॥

**अर्थः**--ज्या ग्रहणीं पूर्वेस स्पर्श होऊन पश्चिमेस मोक्ष होतो तो जरण संज्ञक मोक्ष होय. तो झाला तर क्षुधा [ दुर्भिक्ष ] व शस्त्रभय ( युद्धभय ) यानीं दुःखित झालेले लोक कोणास शरण जातील. ? ( कोणीही त्यांस त्राता मिळणार नाहीं ). ८८.

मध्ये यदि प्रकाशः प्रथमं तन्मध्यविदरणं नाम ।
अंतः कोपकरं स्यात्सुभिक्षदं नातिवृष्टिकरं ॥ ८९ ॥

**अर्थः**--चंद्रबिंबाच्या मध्यभागीं प्रथमतः प्रकाश होईल तर तो मध्यविदरण नामक मोक्ष होतो. तसा झाला तर, राजगृहामध्यें सैन्याचा क्षोभ होतो, सुभिक्ष होतें व फार वृष्टि होत नाहीं. ८९.

पर्यंतेषु विमलता बहुलं मध्येतमोंतदरणाख्ये ।
मध्याख्यदेशनाशः शारदसस्यक्षयश्चास्मिन् ॥ ९० ॥

**अर्थः**--जर बिंबाच्या अंत्यभागीं निर्मलत्व [ स्वच्छ ] होईल आणि मध्यभागीं बहुत काळें राहील तर तो अंत्यविदारण नामक मोक्ष होतो. तो झाला असतां मध्यदेशाचा नाश होतो, व शरदृतूंतील धान्याचाही नाश होतो. ९०.

एते सर्वे मोक्षा वक्तव्या भास्करेपि किंत्वत्र ॥
पूर्वादिक् शशिनि यथा तथा रवौ पश्चिमा कल्प्या ॥९१॥

**अर्थः**--हे पूर्वोक्त सर्व दक्षिणहनुभेदादि मोक्ष, सूर्याचे ग्रहणींही समजावे; परंतु चंद्राच्या ग्रहणमोक्षीं जेथें पूर्वदिशा आहे, तेथें सूर्यग्रहणमोक्षीं पश्चिम कल्पावी ( घ्यावी ) याचप्रमाणें इतरही दिशा विपरीत घ्याव्या.

मुक्ते सप्ताहांतः पांशुनिपातोन्नसंक्षयं कुरुते ।
नीहारो रोगभयं भूकंपः प्रवरनृपमृत्युं ॥ ९२ ॥
उल्का मंत्रिविनाशं नानावर्णाघनाश्च भयमतुलं ।
स्तनितं गर्भविनाशं विद्युन्नृपदंष्ट्रिपरिपीडां ॥ ९३ ॥
परिवेषो रुक्पीडां दिग्दाहो नृपभयं च साग्निभयं ।
रुक्षो वायुः प्रबलश्चौरसमुत्थं भयं धत्ते ॥ ९४ ॥

निर्घातः सुरचापं दंडश्च क्षुद्भयं सपरचक्रं ।
ग्रहयुद्धं नृपयुद्धं केतुश्च तदेव संदृष्टः ॥ ९५ ॥
अधिकृतसलिलनिपाते सप्ताहांतः सुभिक्षमादेश्यं ।
यच्चाशुभं ग्रहणजं तत्सर्वं नाशमुपयाति ॥ ९६ ॥

अर्थः—चंद्रसूर्य ग्रहण सुटल्यावर सात दिवसांमध्यें पांशु [ रजःकण ] धुळीची वृष्टि होईल तर अन्ननाश [ दुर्भिक्ष ], वर्फ पडेल तर रोगभय, भूमिकंप होईल तर श्रेष्ठ राजास मृत्यु, उल्का [ आकाशांतून तारा पडतो तो पडेल तर प्रधानाचा नाश, नानाप्रकारच्या रंगाचे मेघ दिसतील तर बहुत भय, मेघगर्जना होतील तर गर्भनाश वीज चमकेल तर राजे व दंष्ट्री ( सूकर इत्यादि ) यांस पीडा, परिवेष [ खळें ] होईल तर रोगांपासून पीडा, दिग्दाह ( दिशेचे ठायीं ज्वाळा दिसणें ) झाला तर राजभय व अग्निभय, रुक्ष [ कठिण ] मोठा वारा सुटला तर चोरांपासून भय, निर्घात [ तुफानी वाऱ्याचा शब्द ] व इंद्रधनुष्य व दंड ( सूर्यकिरण, मेघ आणि वायू यांचा संघात ) यांतून एखादें झालें तर दुर्भिक्ष व शत्रुभय, ग्रहांचें युद्ध झालें, किंवा केतूचें ( ईश्वे नक्षत्राचें ) दर्शन झालें तर राजांचें युद्ध, हीं फलें हातात. ९३-९५. सात दिवसांमध्यें स्वच्छ जलवृष्टि होईल तर सुभिक्ष होईल असें सांगावें व जें ग्रहणाचें अशुभ फल तेंही सर्व नाहींसें होतें. ९६

सोमग्रहे निवृत्ते पक्षांते यदि भवेद्ग्रहोर्कस्य ।
तत्रानयः प्रजानां दंपत्योर्वैरमन्योन्यं ॥ ९७ ॥

अर्थः—चंद्रग्रहण झाल्यावर पंधरा दिवसांनीं सूर्यग्रहण होईल तर लोकांमध्यें अनीति व स्त्रीपुरुषांमध्यें परस्पर वैर ( द्वेष ) हीं होतील. ९७.

अर्कग्रहात्तु शशिनो ग्रहणं यदि दृश्यते ततो विप्राः ।
नैकक्रतुफलभजो भवंति मुदिताः प्रजाश्चैव ॥ ९८ ॥

अर्थः—सूर्यग्रहणानंतर पंधरा दिवसानीं चंद्रग्रहण होईल तर ब्राह्मण एकयज्ञाचें फल भोगणारे असे होणार नाहींत ( बहुत यज्ञ करतील ) व सर्व लोक आनंदित होतील. ९८.

---

## ग्रहणफळें.

जन्मर्क्षे निधनं ग्रहेजनिभतो घातः क्षतिः श्रीर्व्यथा ।
चिंतासौख्यकलत्रदौस्थ्यमृतयः स्युर्माननाशः सुखं ॥
लाभोऽपाय इति क्रमात्तदशुभध्वस्त्यै जपः स्वर्णगो— ।
दानं शांतिरथो ग्रहं त्वशुभदं नोवीक्ष्यमाहुः परे ॥ १ ॥

अर्थः—जन्मनक्षत्रावर सूर्याला किंवा चंद्राला ग्रहण लागलें असतां त्याचें फळ मृत्यु जाणावें. जन्मराशीपासून १ घात ( शरीरपीडा ), २ क्षति ( द्रव्यनाश ), ३ श्री ( लक्ष्मीप्राप्ति ), ४ व्यथा, ५ चिंता, ६ सुख, ७ पत्नीला दुःख, ८ मृत्यु, ९ मानभंग, १० सुख, ११ लाभ, १२ अपाय हीं बारा फळें जाणावीं. जन्मराशीला ग्रहण असतां घात, द्वितीय राशीला ग्रहण असतां क्षति इत्यादि फळें पहावीं. ग्रहण अशुभ असतां जप आणि सुवर्ण, गो, रौप्य, इत्यादि दानें व धर्मशास्त्रांत सांगितल्याप्रमाणें शांति करावी म्हणजे ग्रहणाचें अशुभ फळ टळतें. अशुभ ग्रहण पाहूं नये असें कित्येकांचें मत आहे. ६

मदनरत्ने गर्गः—जन्मसप्ताष्टरिःफांकदशमस्थे निशाकरे। (दिवाकरे)
दृष्टेरिष्टप्रदोराहुर्जन्मर्क्षे निधनेऽपि च ॥ २ ॥
पृथ्वीचंद्रोदये विष्णुधर्मे—यन्नक्षत्रगतोराहुर्ग्रसतेशशिभास्करौ।
तज्जातानां भवेत्पीडा ये नराः शांतिवर्जिताः ॥ ३ ॥

**अर्थः**— जन्मराशि व जन्मराशीपासून सात, आठ, बारा, नऊ, दहा या राशीस; तसेंच जन्मनक्षत्र व जन्मनक्षत्रापासून सातवें नक्षत्र या नक्षत्रास ग्रहण असतां तें ग्रहण जर पाहिलें तर अरिष्टकारक होतें. १. ज्या नक्षत्रीं ग्रहण असतें त्या नक्षत्रावर जे जन्मास आलेले असतात त्यांनीं शांति केली नाहीं तर पीडा होते. २.

पुराणांतरे—सूर्यस्य संक्रमो वापि ग्रहणं चंद्रसूर्ययोः।
यस्य त्रिजन्मनक्षत्रे तस्य रोगोथवा मृतिः ॥ ४ ॥
तस्य दानं च होमं च देवार्चनजपौ तथा।
उपरागाभिषेकं च कुर्याच्छांतिर्भविष्यति ॥ ५ ॥
स्वर्णेन वाथ पिष्टेन कृत्वा सर्पस्य चाकृतिम्।
ब्राह्मणाय ददेत्तस्य न रोगादिश्च तत्कृतः ॥ ६ ॥
जन्मनक्षत्रं तत्पूर्वोत्तरे च त्रिजन्मनक्षत्रमित्युच्यते।
" जन्मदशमैकोनविंशतितारा " इति केचित्—सर्पस्यतदाकारस्थराहोरित्यर्थः"।
अद्भुतसागरे भार्गवः—यस्य राज्यस्य नक्षत्रे स्वर्भानुरुपरज्यते।
राज्यभंगं सुहृन्नाशं मरणं चात्र निर्दिशेत् ॥ ७ ॥
राज्यस्य नक्षत्रं अभिषेकनक्षत्रमिति तत्रैव व्याख्यातम् ॥

**अर्थ**—" ज्याचे त्रिजन्मनक्षत्रावर ( जन्मनक्षत्र, त्याच्या पूर्वींचे व पुढचे नक्षत्रावर ) सूर्याची संक्रांति अथवा चंद्रसूर्यग्रहण होईल त्यास रोग किंवा मरण प्राप्त होईल ; त्याच्या परिहाराकरितां दान, होम, देवपूजा, जप, बिंबावर अभिषेक हीं करावीं ह्मणजे शांति होते. सुवर्णाचा किंवा पिष्टाचा सर्पाकृति राहु करून तो ब्राह्मणास द्यावा, ह्मणजे रोगादिक होत नाहींत. " ज्या नक्षत्रीं राज्याभिषेक झाला त्या नक्षत्रीं राहू असून ग्रहण होईल तर राज्यभंग, सुहृन्नाश, मरण हीं प्राप्त होतात. ' राज्यस्य नक्षत्रं ' याची राज्याभिषेक नक्षत्र अशी तेथेंच ह्मणजे अद्भुतसागर ग्रंथांत व्याख्या केली आहे.

---

## ॥ अथ भौमचारः ॥

यद्युदयर्क्षाद्वक्रं करोति नवमाष्टसप्तमर्क्षेषु।
तद्वक्रमुष्णमुदये पीडाकरमग्निवार्तानां ॥ १ ॥

**अर्थः**—भौम आपल्या उदयनक्षत्रापासून ९।८।७ या नक्षत्रीं वक्र होईल तर तें उष्णसंज्ञक वक्र होतें; तशा वक्रापासून पुनः उदय होईल ( सूर्यमंडलांतून निघेल ) त्यानेळीं अग्निजीवी (सुवर्णकारादिक.) यांस पीडा होत्ये. १.

द्वादशदशमैकादशनक्षत्राद्वक्रिते कुजेऽशुमुखं ।
दूषयति रसानुदये करोति रोगान्सुवृष्टिं च ॥ २ ॥

अर्थ:--भौम उदयनक्षत्रापासून १०।११।१२ इतक्या नक्षत्रीं वक्र होईल तें अश्रुमुख संज्ञक वक्र होतें. अशा वक्रापासून पुनः उदयकाळीं मधुरादि रसातें दूषित करितो ( त्या रसभक्षणार्थें लोकांचा नाश होतो ) व रोगातेंही करितो व वृष्टिही चांगली होते. २.

व्यालं त्रयोदशर्क्षाच्चतुर्दशाद्वा विपच्यतेऽस्तमये ।
दंष्ट्रिव्यालमृगेभ्यः करोति पीडां सुभिक्षं च ॥ ३ ॥

अर्थ-भौम उदय नक्षत्रापासून १३।१४ या नक्षत्रीं वक्र होईल तर तें वक्र व्यालसंज्ञक होतें. त्यापासून पुनः अस्त समयीं वराहादिक दंष्ट्री, सर्प व श्वापदें यांपासून भय होतें; व सुभिक्षही होतें. ३.

रुधिराननमिति वक्रं पंचदशात्षोडशाच्च विनिवृत्त ॥
तत्कालं मुखरोगं सभयं च सुभिक्षमावहति ॥४॥

अर्थ—भौमउदय १५।१६ या नक्षत्रीं वक्र होईल तर वक्रगति आहे तेथपर्यंत मुखरोग व भयसहित सुभिक्ष करतो. ४.

असिमुसलं सप्तदशादष्टादशतोऽपि वा तदनुवक्रे ॥
दस्युगणेभ्यः पीडांकरोत्यवृष्टिं सशस्त्रभयां ॥५॥

अर्थ—भौमउदय १७।१८ या नक्षत्रीं वक्र होईल तर तें असिमुसल नामक वक्र होय. असें झालें तर स्पष्ट गतीनें वक्र आहे तोपर्यंत प्रजांस चोरांपासून पीडा होईल व अवृष्टि व शस्त्रभय होईल. ५.

भाग्यार्यमोदितो यदि निवर्तते वैश्वदैवते भौमः ॥
प्रजापत्येस्तमितस्त्रीनपि लोकान्निपीडयति ॥६॥

अर्थ--भौम पूर्वा फ० व उत्तरा फ० यांतून एकावर उदय पावून उत्तराषाढावर वक्र होऊन रोहिणीवर अस्तंगत होईल तर त्रैलोक्यास ( भूर्भुवःस्वर्लोकांस ) पीडा होईल. ६.

श्रवणोदितस्य वक्रं पुष्ये मूर्धाभिषिक्तपीडाकृत् ॥
यस्मिन्नृक्षेभ्युदितस्तद्दिग्व्यूहान् जनान्हंति ॥७॥

अर्थ--भौमाचा श्रवण नक्षत्रावर उदय होऊन पुष्यावर वक्रत्व होईल तर मूर्धाभिषिक्त राजांस पीडा होईल. व ज्या नक्षत्रीं असून उदय पावेल त्या नक्षत्राचे दिशेकडील ( कूर्मविभागावरून दिशा पहावी ) जनसमुदायाचा नाश होईल. ७.

मध्येन यदि मघानां गतागतं लोहितः करोति ततः ॥
पांड्यो नृपो विनश्यति शस्त्रोद्योगाद्भयमवृष्टिः ॥८॥

अर्थ--भौम मघा नक्षत्राच्या मध्यभागानें ( मघा नक्षत्राच्या ५ तारा आहेत त्यांतून ) स्पष्ट गतीनें जाईल आणि वक्रगतीनें परत येईल तर पांड्य देशचा राजा नाश पावेल व शस्त्रोद्योगानें ( युद्धानें ) लोकांस भय होईल व अवर्षणही होईल. ८.

भित्वा मघां विशाखां भिंदन् भौमः करोति दुर्भिक्षं ॥
मरकं करोति घोरं यदि भित्वा रोहिणीं याति ॥९॥

अर्थ-भौम मघानक्षत्राच्या योग तारेचा भेद करून विशाखांचा भेद करील तर दुर्भिक्ष होईल, रोहिणीचा भेद करून जाईल तर लोकांचा मोठा नाश होईल. ९.

दक्षिणतो रोहिण्याश्चरन् महीजोर्घवृष्टिनिग्रहकृत् ॥
धूमायन् सशिखो वा विनिहन्यात् पारियात्रस्थान् ॥१०॥

अर्थ–भौम रोहिणी नक्षत्राच्या दक्षिणभागानें गमन करील तर धान्य व वृष्टि यांचा नाश होईल. भौम धूम्रवर्ण अथवा शिखायुक्त दिसेल तर पारियात्र पर्वतस्थ लोकांचा नाश करील. १०.

प्राजापत्ये श्रवणे मूले तिसृषूत्तरासु शाक्रे च ॥
विचरन् घननिवहानामुपघातकरः क्षमातनयः ॥११॥

अर्थ–भौम रोहिणी, श्रवण, मूळ, उत्तरा, उत्तराषाढा, उत्तराभाद्रपदा, ज्येष्ठा या नक्षत्रीं असतां मेघसमुदायांचा ( वृष्टीचा ) नाश करणारा होतो. ११.

चारोदयाः प्रशस्ताः श्रवणमवादित्यमूलहस्तेषु ॥
एकपदाश्विविशाखा प्राजापत्येषु च कुजस्य ॥१२॥

**अर्थ**–श्रवण, मघा, पुनर्वसु, मूल. हस्त, पूर्वाभाद्रपदा, आश्विनी, विशाखा, रोहिणी या नक्षत्रावर भौमाचे चार व उदय शुभ होत ह्मणजे पूर्वोक्त अशुभ फल होत नाहीं. १२.

विपुलविमलमूर्तिः किंशुकाशोकवर्णः स्फुटरुचिरमयूखस्तप्तताम्रप्रभाभः ॥
विचरति यदि मार्गे चोत्तरं मेदिनीजः शुभकृदवनिपानां हार्दिदश्च प्रजानां ॥१३

अर्थ–विस्तीर्ण ( मोठी ) व स्वच्छ अशी आहे मूर्ति ( तारा ) ज्याची, असा; पळस, अशोक यांच्या पुष्पाच्या रंगासारखा ( अति आरक्त ) स्पष्ट व तेजयुक्त आहेत किरण ज्याचे असा, तापलेल्या तांब्यासारखी आहे प्रभा ज्याची असा व उत्तर मार्गानें जाणारा असा भौम राजांस शुभकारक व लोकांस संतोषकारक . १३.

---

# अथ बुधचारः ।

नोत्पातपरित्यक्तः कदाचिदपि चंद्रजो व्रजत्युदयं ॥
जलदहनपवनभयकृद्धान्यार्घक्षयाय वृध्यै वा ॥ १ ॥

**अर्थ**—बुध उत्पातावांचून कधींहि उदय पावत नाहीं. त्याचा उदय झाला असतां, उदक, अग्नि, वायु यांचें भय होतें. धान्याची किंमत कमी किंवा जास्ती होते. ( फार महागाई किंवा फार स्वस्ताई होते.) हे उत्पातच होत ॥ १ ॥

विचरञ्छ्रवणधनिष्ठाप्राजापत्येंदुविश्वदैवानि ॥
मृद्नन् हिमकरतनयः करोत्यवृष्टिं सरोगभयां ॥ २ ॥

**अर्थ**--बुध श्रवण, धनिष्ठा, रोहिणी, मृगशीर्ष, उत्तराषाढा या नक्षत्रांचा भेद करून गमन करील तर अवर्षण व रोगभय करील. २.

रौद्रादीनि मघांतान्युपाश्रिते चंद्रजे प्रजापीडा ॥
शस्त्रनिपातक्षुद्भयरोगानावृष्टिसंतापैः ॥ ३ ॥

**अर्थ**—आर्द्रा, पुनर्वसु, पुष्य, आश्लेषा, मघा, ही नक्षत्रें बुध भेदून जाईल तर युद्ध, दुर्भिक्ष, रोग, अवर्षण व संताप यांहींकरून प्रजेला पीडा होईल. ३

हस्तादीनि विचरन्षड्‌ऋक्षाण्युपपीडयन् गवामशुभः ॥
स्नेहरसार्घविवृद्धिं करोति चोर्वी प्रभूतान्नां ॥ ४ ॥

अर्थ--हस्त चित्रा स्वाती, विशाखा, अनुराधा, ज्येष्ठा या नक्षत्रीं बुध असून योगतारांस भेद करील तर गाईस अशुभ होय. तैलादि रसांची वृद्धि करील व भूमीवर धान्य बहुत करील. ४.

आर्यम्णं हौतभुजं भद्रपदामुत्तरां यमेशं च ॥
चंद्रस्य सुतो निघ्नन्प्राणभृतां धातुसंक्षयकृत् ॥ ५ ॥

अर्थ—उत्तराफल्गुनी, कृत्तिका, उत्तराभाद्रपदा, भरणी या नक्षत्रास बुध भेदन करील तर प्राणिमात्रांच्या धातूंचा ( वसासृक्मांसमेदोऽस्थिमज्जाशुक्राणि ) नाश करील. ५.

आश्विनवारुणमूलान्युपमृद्नन् रेवतीं च चंद्रसुतः ॥
पण्यभिषङ्नौजीविकसलिलजतुरगोपघातकरः ॥ ६ ॥

अर्थ—अश्विनी, शततारका, मूळ, रेवती, या नक्षत्रांतें बुध भेदन करील तर व्यापारी, वैद्य, नाविक, उदकोत्पन्न द्रव्यें ( मुक्ताफलादिक ), अश्व यांचा नाश होतो. ६.

पूर्वात्र्यर्क्षत्रितयादेकमपींदोः सुतोऽभिमृद्नीयात् ॥
क्षुच्छस्त्रतस्करामयभयप्रदायी चरन् जगतः ॥ ७ ॥

अर्थ—पूर्वा, पूर्वाषाढा, पूर्वाभाद्रपदा या तीन नक्षत्रांतून बुध एकासही भेदन करील तर जगास दुर्भिक्ष युद्ध, चोर, रोग, यापासून भय देणारा होईल. ७.

प्राकृतविमिश्रसंक्षिप्ततीक्ष्णयोगांतघोरपापाख्याः ॥
सप्त पराशरतंत्रे नक्षत्रैः कीर्तिता गतयः ॥ ८ ॥

अर्थ--प्राकृता, विमिश्रा, संक्षिप्ता तीक्ष्णा, योगांता, घोरा, पापा, अशा ७ बुधाच्या गति, नक्षत्रांहीं करून पराशरतंत्रामध्यें सांगितल्या आहेत. ८.

प्राकृतसंज्ञा वायव्ययाम्यपैतामहानि बहुलाश्च ॥
मिश्रागतिः प्रतिष्ठा शशिशिवपितृभुजगदैवानि ॥९॥
संक्षिप्तायां पुष्यः पुनर्वसुः फल्गुनीद्वयं चेति ॥
तीक्ष्णायां भद्रपदाद्वयं सशाक्राश्वयुक् पौष्णं ॥१०॥
योगांतिकेति मूलं द्वे चाषाढे गतिः सुतस्येंदोः ॥
घोरा श्रवणस्त्वाष्ट्रं वसुदेवं वारणं चैवं ॥११॥
पापाख्या सावित्रं मैत्रं शक्राग्निदैवतं चेति ॥
उदयप्रवासदिवसैः स एव गतिलक्षणं प्राह ॥१२॥

अर्थ-स्वाती, भरणी, रोहिणी, कृत्तिका या नक्षत्रीं बुध असतां प्राकृत गतीमध्यें असतो. मृगशीर्ष, आर्द्रा मघा, आश्लेषा यांस बुध असतां मिश्रागति. ९. पुष्य, पुनर्वसु, पूर्वा, उत्तरा यांस बुध असतां संक्षिप्तागति. पूर्वाभाद्रपदा, उत्तराभाद्रपदा, ज्येष्ठा, अश्विनी, रेवती या नक्षत्रीं बुध असतां तीक्ष्णागति. १०. मूळ, पूर्वाषाढा, उत्तराषाढा यांस बुध असतां योगांतिका गति. श्रवण, चित्रा, धनिष्ठा, शततारका या नक्षत्रीं बुध असतां घोरागति. ११. हस्त, अनुराधा, विशाखा या नक्षत्रीं बुध असतां पापाख्यागति होते. उदय अस्त यांच्या दिवसानीं पूर्वोक्तगतिलक्षण पराशरच सांगता झाला . १०.

चत्वारिंशत्त्रिंशत् द्विसमेता विंशतिर्द्विनवकं च ॥
नव मासार्धं दशचैकसंयुताः प्राकृताद्यानां ॥१३॥

**अर्थ**–प्राकृतगतीमध्यें बुध उदय पावेल तर ४० दिवस उदित राहील; अस्त पावेल तर ४० दिवस अस्तमित राहील, असाच मिश्रागतीमध्यें ३० दिवस, संक्षिप्तागतीमध्यें २२ दिवस, तीक्ष्णागतीमध्यें १८ दिवस, योगांतिकेमध्यें ९ दिवस, घोरागतीमध्यें १५ दिवस, पापाख्येमध्यें ११ दिवस उदय किंवा अस्त बुधाचा राहतो.

प्राकृतगत्यामारोग्यवृष्टिसस्यप्रवृद्धयः क्षेमं ॥
संक्षिप्तमिश्रयोर्मिश्रमेतदन्यासु विपरीतं ॥१४॥

**अर्थ**–प्राकृतगतीमध्यें बुध असतां, आरोग्य, वृष्टि, धान्यवृद्धि व कल्याण हीं होतात. संक्षिप्त व मिश्रगतीमध्यें बुध असतां हीं पूर्वोक्त मध्यम होतात. परिवेषा, तीक्ष्णा, योगांतका, घोरा, पापाख्या, या गतींत बुध असतां रोग अवर्षण, धान्याभाव व अकल्याण हीं होतात. १४.

ऋज्व्यतिवक्रा वक्रा विकला च मतेन देवलस्यैताः ॥
पंचचतुर्व्द्येकाहा ऋज्व्यादीनां षडभ्यस्ताः ॥१५॥

**अर्थ**--ऋजु, अतिवक्रा, वक्रा, विकला अशा बुधाच्या चार गती देवल ऋषींच्या मतानें आहेत. बुध ऋजुगतींत ३० दिवस राहतो, अतिवक्रगतींत २४ दिवस, वक्रगतींत १२ दिवस व विकलगतींत ६ दिवस राहतो असें देवलाचें मत आहे. १५.

ऋज्वी हिताप्रजानामतिवक्रार्धं गतिर्विनाशयति ॥
शस्त्रभयदा च वक्रा विकला भयरोगसंजननी ॥१६॥

**अर्थ**—बुधाची ऋज्वी गति प्रजांस हित करिते, अतिवक्रागति धान्यनाश करितें, वक्रागति शस्त्रभय करिते व विकलागति भय व रोग यातें उत्पन्न करिते. १६.

पौषाषाढाश्रावणवैशाखेष्विंदुजः समाघेषु ॥
दृष्टो भयाय जगतः शुभफलकृत्प्रोषितस्तेषु ॥१७॥

**अर्थ**--पौष, आषाढ, श्रावण, वैशाख, माघ या महिन्यांत बुधाचा उदय, झाला तर जगास भय होतें व यास मासांमध्यें बुधाचे अस्त झाले तर शुभ फल होतें. १७.

कार्तिकेऽश्वयुजि वा यदि मासे दृश्यते तनुभवः शिशिरांशोः ॥
शस्त्रचोरहुतभुग्गदतोयक्षुद्भयानि च तदा विदधाति ॥१८॥

**अर्थ**–कार्तिक, आश्विन या महिन्यांत बुधाचा उदय होईल तर शस्त्र, चोर, अग्नि, रोग, जल व दुर्भिक्ष यांचें भय होईल. १८.

रुद्धानि सौम्येऽस्तमिते पुराणि यान्युद्गते तान्युपयांति मोक्षं ॥
अन्ये तु पश्चादुदिते वदंति लाभः पुराणां भवतीति तज्ज्ञाः ॥१९॥

**अर्थ**--जीं नगरें शत्रूंनीं बुधास्तामध्यें रोधिलीं [वेष्टिलीं] तीं बुधोदय झाला म्हणजे सुटतील व पश्चिमेकडे बुधोदय झाला तर नगरांचा लाभ होतो [ सुटतात ] असें अन्य ज्योतिर्वेत्ते म्हणतात. १९.

हेमकांतिरथवा शुकवर्णः सस्यकेन मणिना सदृशो वा ॥
स्निग्धमूर्तिरलघुश्च हिताय व्यत्यये न शुभकृच्छशिपुत्रः ॥२०॥

**अर्थ**--बुधाचा सुवर्णासारखा व पोपटासारखा व नीलमण्यासारखा वर्ण आणि निर्मल देह [ बिंब ] व विस्तीर्ण बिंब लोकांस शुभ व याहून अन्य वर्णादिकांचा बुध अशुभकारक होय. २०.

# अथ बृहस्पतिचारः ।

नक्षत्रेण सहोदयमस्तं वा येन याति सुरमंत्री ॥
तत्संज्ञं वक्तव्यं वर्षं मासक्रमेणैव ॥ १ ॥

अर्थः—बृहस्पति ज्या नक्षत्राबरोबर सूर्यमंडळापासून उदय पावतो तत्संज्ञक अथवा ज्या नक्षत्राबरोबर सूर्यमंडळीं प्रवेश करितो ( अस्त पावतो ) तत्संज्ञक बार्हस्पत्य वर्ष लोकांमध्यें बोलावें; परंतु तें मासानुक्रमानेंच बोलावें. ज्या नक्षत्रावर उदय किंवा अस्त होईल त्यावरून वर्षास नांवें द्यावीं असें मूळ श्लोकांत आहे. पण टीकेमध्यें उदयवर्षच मानावें असें बहुत ऋषींचें मत आहे असें लिहिलें आहे. १.

वर्षाणि कार्तिकादीन्याग्नेयाद्भद्वयानुयोगीनि ॥
क्रमशस्त्रिभं तु पंचममुपांत्यमंत्यं च यद्वर्षं ॥ २ ॥

अर्थ—कृत्तिकादि दोन दोन नक्षत्रांच्या योगानें कार्तिकादि मासानुक्रमानें वर्षे होतात. परंतु ५।११।१२ या महिन्यांच्या वर्षास मात्र तीन तीन नक्षत्रें जाणावीं. ह्मणजे कत्तिका रोहिणी या नक्षत्रावर बृहस्पतीचा उदय झाला तर कार्तिक वर्ष जाणावें. मृग, आर्द्रा, मार्गशीर्ष व०; पुनर्वसु, पुष्य पौष व०; आश्लेषा, मघा माघ व०; पूर्वा, उत्तरा, हस्त, फाल्गुन व०; चित्रा, स्वाती चैत्र व०; विशाखा, अनुराधा वैशाख व०; ज्येष्ठा, मूळ ज्येष्ठ व०; पूर्वाषाढा, उत्तराषाढा आषाढ व० श्रवण, धनिष्ठा श्रावण व० शततारका पूर्वाभाद्रपदा, उत्तराभाद्रपदा भाद्रपद व०, रेवती, अश्विनी, भरणी आश्विन वर्ष याप्रमाणें बार्हस्पत्य वर्ष जाणावें. २.

शकटानलोपजीवकगोपीडाव्याधिशस्त्रकोपश्च ॥
वृद्धिस्तु रक्तपीतककुसुमानां कार्तिके वर्षे ॥ ३ ॥

अर्थ—बृहस्पतीच्या कार्तिक वर्षामध्यें, शकटानें ( गाड्यानें ) उपजीविका करणारे व सुवर्णकारादि अग्न्युपजीवी व गाई यांस पीडा होते व रोग आणि युद्धें होतात. तांबडें, पिवळें फूल ज्यांचें त्यांची वृद्धि होते.

सौम्येऽब्देनावृष्टिर्मृगाखुशलभांडजैश्च सस्यवधः ॥
व्याधिभयं मित्रैरपि भूपानां जायते वैरं ॥४॥

अर्थ—मार्गशीर्ष वर्षी अवर्षण, अरण्यपशु, उंदीर, शलभ ( कीरजाति ) यांपासून धान्याचा नाश, रोगभय, मित्राबरोबरही राजांचें वैर हीं होतात. ४.

शुभकृज्जगतः पौषो निवृत्तवैराः परस्परं क्षितिपाः ॥
द्वित्रिगुणो धान्यार्घः पौष्टिककर्मप्रसिद्धिश्च ॥ ५ ॥

अर्थ—पौष वर्ष लोकांस कल्याणकारक होय. राजे परस्परें द्वेषरहित होतील. धान्याची जी पूर्वी किंमत असेल त्याच किंमतीला दुप्पट तिप्पट धान्य मिळेल. ( समर्घ होईल ). पुष्टिद कार्ये बहुत होतील. ५.

पितृपूजापरिवृद्धिर्माघे हार्दिश्च सर्वभूतानां ॥
आरोग्यवृष्टिधान्यार्घसंपदो मित्रलाभश्च ॥ ६ ॥

अर्थ—माघ वर्षी सर्व लोक पितृपूजा करतील व सर्वांस संतोष होईल. आरोग्य, वृष्टि, धान्य व संपत्ति हीं होतील आणि मित्रप्राप्तिही होईल. ६.

फाल्गुनवर्षे विंद्यात्क्वचित्क्वचित्क्षेमवृष्टिसस्यानि ॥
दौर्भाग्यं प्रमदानां प्रबलश्चौरा नृपाश्चोग्राः ॥ ७ ॥

अर्थ— बृहस्पतीच्या फाल्गुनवर्षी क्षेम,, वृष्टि, धान्यें हीं कोठें कोठें होतील. सर्वत्र होणार नाहींत स्त्रियांस दुर्भगत्व ( पतींची अप्रीति ) चोर बहुत होतील व राजे क्रूर होतील. ७

चैत्रे मंदा वृष्टिः प्रियमन्नं क्षेममवनिपा मृदवः ॥
वृद्धिस्तु कोशधान्यस्य भवति पीडा च रूपवतां ॥ ८ ॥

अर्थ—चैत्रवर्षी वृष्टि अल्प होईल. अन्न दुर्लभ होईल. कल्याण होईल. राजे सदय होतील. मुद्रादि कोशधान्यें बहुत होतील. रूपवंतास पीडा होईल. ८.

वैशाखे धर्मपरा विगतभयाः प्रमुदिताः प्रजाः सनृपाः ॥
यज्ञक्रियाप्रवृतिर्निष्पत्तिः सर्वसस्यानां ॥ ९ ॥

अर्थः—वैशाखवर्षी राजे व प्रजा हे धर्मपरायण, भयरहित व आनंदित होतील, यज्ञकर्में बहुत होतील व सर्व धान्यांची उत्पत्ति बहुत होईल. ९.

ज्येष्ठे ज्ञातिकुलधनश्रेणीश्रेष्ठा नृपाः सधर्मज्ञाः ।
पीड्यंते धान्यानि च हित्वा कंगुंशमीजातिं ॥१०॥

अर्थः--ज्येष्ठवर्षी ज्ञाति, कुल, धन, जनसमुदाय यांमध्यें मुख्य व राजे व धर्म जाणणारे हे सर्व पीडा पावतात. व कांग, राळे, तीळ, मुद्ग इत्यादि शेंगेंत होणारी धान्यें खेरीज करून इतर धान्यांस पीडा होत्ये. ( महर्घ होतात ). १०.

आषाढे जायंते सस्यानि कचिदवृष्टिरन्यत्र ।
योगक्षेमं मध्यं व्यग्राश्च भवंति भूपालाः ॥ ११ ॥

अर्थः--आषाढवर्षी धान्यें क्वचित होतील. अन्यदेशीं अवर्षणही होईल. अप्राप्ताचा लाभ व प्राप्ताचें पालन हीं मध्यम होतील. राजें व्यग्र [ उद्योगयुक्त ] होतील. ११.

श्रावणवर्षे क्षेमं सम्यक्सस्यानि पाकमुपयांति ।
क्षुद्रा ये पाखंडाः पीड्यंते ये च तद्भक्ताः ॥ १२ ॥

अर्थः--श्रावणवर्षी क्षेम [ प्राप्तपालन ] होईल. धान्यें उत्तमप्रकारें पक्व होतील. क्रूर वेदबाह्य पाखंडी लोक व त्यांचें सेवक हे पीडा पावतील. १२

भाद्रपदे वल्लीजं निष्पत्तिं याति पूर्वसस्यं च ।
न भवत्यपरं सस्यं क्वचित्सुभिक्षं क्वचिच्च भयं ॥ १३ ॥

अर्थः—भाद्रपदवर्षी वल्लीज ( मुद्गादि ) धान्य होईल व प्रथम पेरलेलें धान्य चांगलें होईल. मागून पेरलेलें धान्य होणार नाहीं. कोठें सुभिक्ष व कोठें भयही होईल. १३

आश्वयुजेब्देऽजस्रं पतति जलं प्रमुदिताः प्रजाः क्षेमं ।
प्राणचयः प्राणभृतां सर्वेषामन्नबाहुल्यं ॥ १४ ॥

अर्थः—बृहस्पतीच्या अश्विनवर्षी बहुत जलवृष्टि, लोक आनंदित, कल्याण, सर्व प्राण्यांची बलवृद्धि व बहुत अन्न हीं होतील. १४.

उदगारोग्यं सुभिक्षक्षेमकरो वाक्पतिश्च न् भानां ।
याम्येतद्विपरीतो मध्येन तु मध्यफलदायी ॥ १५ ॥

अर्थः—बृहस्पति नक्षत्रांच्या उत्तरेकडून गमन करील तर आरोग्य, सुभिक्ष, कल्याण यांचा करणारा होतो. व दक्षिणेकडून गमन करील तर रोग, दुर्भिक्ष, अकल्याण यांते करितो व नक्षत्रमध्यानें गमन करील तर हीं पूर्वोक्त आरोग्यादिक मध्यम होतात. १५.

विचरन् भद्वयमिष्टस्तत्सार्धं वत्सरेण मध्यफलः ॥
सस्यानां विध्वंसी विचरेदधिकं यदि कदाचित् ॥ १६ ॥

अर्थः—बृहस्पति एक वर्षामध्यें दोन नक्षत्रें भोगील तर शुभ होय. अडीच नक्षत्रें भोगील तर मध्यम होय. कदाजित् अडीच नक्षत्रांहून अधिक आपल्या एक वर्षांत भोगील तर, धान्यांचा नाश करील. १६.

अनलभयमनलवर्णे व्याधिः पीते रणागमः श्यामे ।
हरिते च तस्करेभ्यः पीडा रक्ते तु शस्त्रभयं ॥ १७ ॥

अर्थः—बृहस्पतीचा अग्नीसारखा वर्ण असतां अग्निभय, पीतवर्ण असतां, रोगभय; कृष्णवर्ण असतां, युद्धभय, हिरवा असतां चोरापासून भय; तांबडा असतां शस्त्रभय हीं होतात. १७.

धूमाभेऽनावृष्टिस्त्रिदशगुरौ नृपवधो दिवा दृष्टे ।
विपुलेऽमले सुतारे रात्रौ दृष्टे प्रजा स्वस्थाः ॥ १८ ॥

अर्थः—बृहस्पतीचा धूम्रवर्ण असतां आवर्षण होतें. बृहस्पति दिवसा दृष्टिगोचर झाला तर राजाचा वध ह्मणजे मृत्यू होतो. बृहस्पति विपुल ( मोठा ), स्वच्छ, सुंदर तारा असा रात्रीस दृष्टिगोचर असला, तर सर्व प्रजा स्वस्थ होतील. १८.

रोहिण्यानलभं च वत्सरतनुर्नाभिस्त्वषाढाद्वयं
सार्पं हृत्पितृदैवतं च कुसुमं शुद्धं शुभं तैः फलं ।
देहे क्रूरनिपीडितेऽग्न्यनिलजं नाभ्यां भयं क्षुत्कृतं
पुष्पे मूलफलक्षयोथ हृदये सस्यस्य नाशो ध्रुवं ॥ १९ ॥

अर्थः—बार्हस्पत्य नक्षत्राचें रोहिणी व कृत्तिका हीं दोन नक्षत्रें शरीर होत. पूर्वाषाढा व उत्तराषाढा हीं २ नाभि होत. आश्लेषा हृदय होय. मघा पुष्प होय. तीं शरीरादि नक्षत्रें पापरहित असतां, शुभफल होतें. तीं शरीरनक्षत्रें पापग्रहानें पीडित असतां, अग्नि व वायु यांचें भय; नाभि नक्षत्र पीडित असतां, दुर्भिक्षभय; पुष्पनक्षत्र पीडित असतां, मूलें व फलें यांचा क्षय; हृदयनक्षत्र पापग्रहपीडित असतां, धान्यनाश; हीं फलें निश्चयेंकरून होतात. १९.

गतानि वर्षाणि शकेंद्रकालाद्धतानि रुद्रैर्गुणयेच्चतुर्भिः ॥
नवाष्टपंचाष्टयुतानि कृत्वा विभाजयेच्छून्यशरागरामैः ॥२०॥
फलेन युक्तं शकभूपकालं संशोध्य षष्ठ्याविषयैर्विभज्य ॥
युगानि नारायणपूर्वकाणि लब्धानि शेषाः क्रमशः समाः स्युः ॥२१॥

अर्थः—विक्रमशकारंभापासून वर्तमान शकापर्यंत गतवर्षें ह्मणजे विक्रमशकांक घेऊन ११ नीं गुणून पुनः ४ नीं गुणावें. आणि त्यांत ८५८९ मिळवून ३७५० यांनीं भागावीं. लब्धवर्षें त्याच बृहस्पतीच्या राशी होत. शेष ३० नीं गुणून ३७५० नीं भागून जें लब्ध ते अंश राशींच्या खालीं मांडावे. भाग शेष ६० नीं गुणून ३७५० नीं भागून जें लब्ध त्या कला अंशाच्या खालीं मांडाव्या. कलाशेष ६० नीं गुणून ३७५० नीं भागून जें लब्ध त्या विकला कलांच्या खालीं मांडाव्या. नंतर तें लब्ध राश्यादिक वर्तमान विक्रमशकांत मिळवावें ह्मणजे शकांत राशीचा अंक मिळवावा. त्या अंकास राशी किंवा वर्षे ह्मणावें. नंतर राशी ६० नीं भागून जें लब्ध ते गत षष्ठिसंवत्सर आणि जें शेष तीं वर्तमान षष्ठिसंवत्सरांचीं गतवर्षें होत. तीं ५ नीं भागून जें लब्ध तीं वर्तमान षष्ठिसंवत्सरांचीं नारायणपूर्वक युगें गत होतात. पांचांनीं भागून जें शेष तींच वर्तमान युगाचीं वर्षें, दिवस, घटी, पळें गत होतात. २०।२१.

एकैकमब्देषु नवाहतेषु दत्वा पृथक् द्वादशकं क्रमेण ॥
हृत्वा चतुर्भिर्वसुदेवताद्यान्युडूनि शेषांशकपूर्वमब्दं ॥२२॥

अर्थ--साठांनीं भागून जें वर्षादि आले तें दोहोंस्थळीं मांडावें. एका अंकास ९ नीं गुणावें व द्वि-तीय अंकास १२ नीं भागून जें येईल तें मिळवावें. नंतर त्यास चोहोंनीं भागावें म्हणजे जें लब्ध तीं धनिष्ठादि नक्षत्रें होतात. व जे शेषांश तत्पूर्वक वर्ष होतें. २२.

विष्णुः सुरेज्यो बलभिद्धुताशस्त्वष्टोत्तरप्रोष्ठपदाधिपश्च ॥
क्रमाद्युगेशाः पितृविश्वसोमाः शक्रानलाख्याश्विभगाः प्रदिष्टाः ॥२३॥

अर्थ--१ विष्णु, २ बृहस्पति, ३ इंद्र, ४ अग्नि, ५ त्वष्टा, ६ अहिर्बुध्न्य, ७ पितर, ८ विश्वे, ९ सोम, १० इंद्राग्नि, ११ अश्वि, १२ भग; हे १२ युगांचे स्वामी अनुक्रमें करून सांगितले. २३.

संवत्सरोग्निः परिवत्सरोर्क इदादिकः शीतमयूखमाली ॥
प्रजापतिश्चाप्यनुवत्सरः स्यादिद्वत्सरः शैलसुतापतिश्च ॥२४॥

अर्थ--त्या विष्ण्वादि युगांच्या पहिल्या वर्षाचें नांव संवत्सर. त्याची देवता अग्नि. दुसऱ्या वर्षाचें नांव परिवत्सर, देवता, सूर्य, तिसऱ्या वर्षाचें नांव इदावत्सर, देवता चंद्र. चवथ्या वर्षाचें नांव अनुवत्सर, देवता ब्रह्मा. पांचव्या वर्षाचें नांव इद्वत्सर, देवता रुद्र. याप्रमाणें पांच वर्षांचीं नावें व देवता जाणाव्या; हें सांगण्याचें कारण जसें युगांचे स्वामी सांगितले तसेंच वर्षांचेही स्वामी सांगून देवताही सांगितल्या. त्या वर्षी त्या देवतेचे प्रीत्यर्थ याग करण्यासाठीं सांगितल्या. हें वेदामध्येंही सांगितलें आहे. २४.

वृष्टिः समाद्ये प्रमुखे द्वितीये प्रभूततोयाकथिता तृतीये ॥
पश्चाज्जलं मुंचति यच्चतुर्थं स्वल्पोदकं पंचममब्दमुक्तं ॥२५॥

अर्थ--संवत्सराख्य प्रथमवर्षी वृष्टि मध्यम, परिवत्सराख्य द्वितीय वर्षी प्रथम दोन महिनेच वृष्टि; इदावत्सराख्य तृतीय वर्षी बहुत वृष्टि; अनुवत्सराख्य चतुर्थ वर्षी पुढील [अन्त्य] दोन महिने वृष्टि; इद्वत्सराख्य पंचम वर्षी अल्पवृष्टि. याप्रमाणें युगाच्या पांच वर्षांचें फल सांगितलें. २५.

चत्वारि मुख्यानि युगान्यथैषां विष्ण्विंद्रजीवानलदैवतानि ॥
चत्वारि मध्यानि च मध्यमानि चत्वारि चांत्यान्यधमानि विंद्यात् ॥२६॥

अर्थ--ह्या बारा युगांमध्यें विष्णु, इंद्र, गुरु, अग्नि ह्या देवतांचीं प्रथम चार युगें मुख्य (श्रेष्ठ) होत. मधली त्वष्टा, अहिर्बुध्न्य, पितर, विश्वे ह्या देवतांचीं चार युगें मध्यम होत. अंत्य सोम, इंद्राग्नि, अश्वि, भग ह्या देवतांचीं चार युगें अधम (अशुभ) होत. २६.

आद्यं धनिष्ठांशमभिप्रपन्नो माघे यदा यात्युदयं सुरेज्यः ।
षष्ट्यब्दपूर्वः प्रभवः सनाम्ना प्रवर्तते भूतहितस्तदाब्दः ॥ २७ ॥

अर्थ-बृहस्पति धनिष्ठा नक्षत्राच्या पहिल्या चरणीं असून जेव्हां माघमासीं उदय पावेल, त्या काळीं साठ वर्षांतील प्रभवनामक प्रथमवर्षाची प्रवृत्ति होते (त्या प्रभववर्षाचा आरंभ होतो). तें वर्ष सर्व प्राण्यास हितकारक होय. २७.

क्वचित्त्ववृष्टिः पवनाग्निकोपः संतीतयः श्लेष्मकृताश्च रोगाः ।
संवत्सरेऽस्मिन्प्रभवे प्रवृत्ते न दुःखमाप्नोति जनस्तथापि ॥ २८ ॥

अर्थ--हें प्रभवाख्य वर्ष प्राप्त झालें असतां, क्वचित् अवर्षण, वायु व अग्नि यांचा कोप अतिवृष्ट्यादिक उपद्रव, कफोत्पन्नरोग, हीं कोठें कोठें होतील; असें झालें असतांही लोकांस दुःख होणार नाहीं. २८.

तस्मात् द्वितीयो विभवः प्रदिष्टः शुक्लस्तृतीयः परतः प्रमोदः ।
प्रजापतिश्चेति यथोत्तराणि शस्तानि वर्षाणि फलानि चैषां ॥ २९ ॥

अर्थः—त्या पूर्वोक्त प्रभवापासून दुसरा विभव, तिसरा शुक्ल, चवथा प्रमोद, पांचवा प्रजापति, हीं चार वर्षें उत्तरोत्तर प्रशस्त. २९.

निष्पन्नशालीक्षुयवादिसस्यां भयैर्विमुक्तामुपशांतवैरां ।
संहृष्टलोकां कलिदोषमुक्तां क्षत्रं तदा शास्ति च भूतधात्रीं ॥ ३० ॥

अर्थः—या विभवादि चार वर्षांमध्यें राजे, शालि, इक्षु, यव, गोधूम, मसूर, चणक, माष इत्यादि धान्यें बहुत होणारी भय व द्वेष यांहीं रहित आनंदित लोकयुक्त व कलिदोषरहित अशा भूमीचें पालन करतील. ३०.

आद्योंगिराः श्रीमुखभावसंज्ञौ युवाथ धातेति युगे द्वितीये ।
वर्षाणि पंचैव यथाक्रमेण त्रीण्यत्र शस्तानि समे परे द्वे ॥३१॥

त्रिष्वाद्यवर्षेषु निकामवर्षी देवो निरातंकभयाश्च लोकाः ।
अब्दद्वयेंत्येऽपि समा सुवृष्टिः किंत्वत्र रोगाः समरागमश्च ॥ ३२ ॥

अर्थः—द्वितीय बार्हस्पत्य युगामध्यें प्रथम अंगिरावर्ष, दुसरें श्रीमुख, तृतीय भाव, चतुर्थ युवा, पंचम धाता हीं पांच होतात. यांमध्यें पहिलीं तीन प्रशस्त व पुढील दोन मध्यम होत. ३१. पहिल्या तीन वर्षांत इंद्र बहुतवृष्टि करील आणि लोक उपद्रव व भीतिरहित होतील. अंत्य दोन वर्षांमध्यें बहुत नव्हे व अल्पही नव्हे अशी समान म्ह० उत्तम वृष्टि होईल. परंतु रोग व युद्धें बहुत होतील. ३२.

शाक्रे युगे पूर्वमथेश्वराख्यं वर्षं द्वितीयं बहुधान्यमाहुः ।
प्रमाथिनं विक्रममध्यतोन्यद्वृषं च विंद्याद्गुरुचारयोगात् ॥ ३३ ॥
आद्यं द्वितीयं च शुभे तु वर्षे कृतानुकारं कुरुतः प्रजानां ।
पापः प्रमाथी वृषविक्रमौ तु सुभिक्षदौ रोगभयप्रदौ च ॥ ३४ ॥

अर्थ—ऐंद्रयुगामध्यें प्रथम ईश्वरवर्ष, दुसरें बहुधान्य, तिसरें प्रमाथी, चवथें विक्रम, पांचवें वृष हीं गुरुचार योगानें जाणावीं. ३३ पहिलें व दुसरें वर्ष शुभ यांमध्यें कृतयुगाप्रमाणें (धर्मरत, सुखी, दीर्घजीवी) प्रजा होतात. प्रमाथी तृतीय वर्ष अनिष्ट फल देणारें होय. वृष व विक्रम यावर्षी सुभिक्ष होईल; परंतु रोगापासून भय होईल. ३४

श्रेष्ठ चतुर्थस्य युगस्य पूर्वं यच्चित्रभानुं कथयंति वर्षं ।
मध्यं द्वितीयं तु सुभानुसंज्ञं रोगप्रदं मृत्युकरं न तच्च ॥ ३५ ॥
तारणं तदनु भूरिवारिदं सस्यवृद्धिमुदितं च पार्थिवं ।
पंचमं व्ययमुशंति शोभनं मन्मथप्रबलमुत्सवाकुलं ॥ ३६ ॥

अर्थः—चतुर्थ हुताशयुगाचें प्रथम चित्रभानु वर्ष श्रेष्ठ (शुभ) होय. दुसरें सुभानु वर्ष मध्यम. तृतीय तारण रोगप्रद; परंतु मृत्युप्रद नव्हे. चतुर्थ पार्थिव वर्ष त्यांत बहुत वृष्टि होऊन धान्यवृद्धि होते तेणेंकरून लोक आनंदित होतात पांचवें व्ययनामक वर्ष तें शुभ होय. त्यांत काम प्रबल होईल व विवाहादि उत्साह होतील. ३५।३६

त्वाष्ट्रे युगे सर्वजिदाद्य उक्तः संवत्सरोन्यः खलु सर्वधारी ।
तस्माद्विरोधी विकृतः खरश्च शस्तोद्वितीयोऽत्र भयाय शेषाः ॥३७॥

अर्थः—पंचमत्वाष्ट्रयुगामध्यें प्रथम सर्वजित्वर्ष, दुसरें सर्वधारी, तिसरें विरोधी, चवथें विकृत, पांचवें खर होय. यांतून दुसरें शुभ व बाकी चार वर्षें भयप्रद होतात. ३७

नंदनोथ विजयो जयस्तथा मन्मथोऽस्य परतश्च दुर्मुखः ।
कांतमत्र युगआदितस्त्रयं मन्मथः समफलोऽधमोपरः ॥ ३८ ॥

अर्थ—साहाव्या युगामध्यें प्रथम नंदन, दुसरें विजय, तिसरें जय, चवथें मन्मथ, पांचवें दुर्मुख हीं होत. या युगामध्यें पहिल्यापासून तीन शुभ होत. चवथें मन्मथ वर्ष मध्यम. पांचवें दुर्मुख वर्ष अशुभ होय. ३८.

हेमलंब इति सप्तमे युगे स्याद्विलंबि परतो विकारि च ।
शर्वरीति तदनुप्लवः स्मृतो वत्सरो गुरुवशेन पंचमः ॥३९ ॥

ईतिप्राया प्रचुरपवना वृष्टिरब्दे तु पूर्वे । मंदं सस्यं न बहुसलिलं वत्सरेऽतो द्वितीये ॥
अत्युद्वेगः प्रचुरसलिलः स्यात्तृतीयश्चतुर्थो दुर्भिक्षाय प्लव इति ततः शोभनो भूरितोयः ॥४०॥

अर्थ—सप्तम पैत्र्ययुगामध्यें प्रथम हेमलंब, दुसरें विलंबी, तिसरें विकारी, चवथें शर्वरी, पांचवें प्लव हीं पांच वर्षे गुरूचारयोगानें होतात. ३९ प्रथमवर्षी अतिवृष्ट्यादि उपद्रवयुक्त व बहुत वायुरहित वृष्टि होईल. दुसऱ्या वर्षी अल्पधान्य व अल्पवृष्टि होईल. तृतीयवर्षी अति दुःख देणारें व बहुत वृष्टिकारक होय. चतुर्थ वर्ष दुर्भिक्षकारक होय व पंचम वर्ष शुभ व अतिवृष्टिप्रद होय ४०.

वैश्वे युगे शोभकृदित्यथाद्यः संवत्सरोऽतः शुभकृत् द्वितीयः ।
क्रोधी तृतीयः परतः क्रमेण विश्वावसुश्चेति पराभवश्च ॥ ४ ॥
पूर्वापरौ प्रीतिकरौ प्रजानामेषां तृतीयो बहुदोषदोऽब्दः ॥
अंत्यौ समौ किं तु पराभवेऽग्निः शस्त्रामयार्तिर्द्विजगोभयं च ॥ ४२ ॥

अर्थ—अष्टमवैश्वयुगांमध्यें प्रथम शोभकृत, दुसरें शुभकृत, तिसरें क्रोधी, चवथें विश्वावसु, पांचव पराभव हीं होतात. ४१. पहिलें व दुसरें वर्ष प्रजांस संतोषकारक होय. तिसरें फार अशुभ, चवथें व पांचवें सम होय; परंतु पांचव्या पराभव वर्षी अग्नि, शस्त्र, रोग यांची पीडा व ब्राह्मण, गाई यांस भय हीं होतील. ४२

आद्यः प्लवंगो नवमे युगेऽब्दः स्यात्कीलकोन्यः परतस्तु सौम्यः ॥
साधारणो रोधकृदित्यथाब्दः शुभप्रदौ कीलकसौम्यसंज्ञौ ॥ ४३ ॥
कष्टः प्लवंगो बहुशः प्रजानां साधारणेऽल्पं जलमीतयश्च ॥
यः पंचमो रोधकृदित्यथाब्दश्चित्रं जलं तत्र च सस्यसंपत् ॥४३

अर्थ—नवम सौम्य युगांमध्यें प्रथम प्लवंग, दुसरें कीलक, तिसरें सौम्य, चवथें साधारण, पांचवें रोधकृत, हीं पांच वर्षे होतात. त्यांमध्यें कीलक व सौम्य हीं दोन वर्षे शुभ होत. प्लवंग वर्ष प्रजांस अति दुःखद होय. साधारण वर्षामध्यें अल्पवृष्टि व पीडा होईल. पांचव्या रोधकृत वर्षामध्यें क्वचित् वृष्टि होईल, परंतु त्यांमध्यें धान्य चांगलें होईल. ४३।४४.

इंद्राग्निदैवं दशमं युगं यत् तत्राद्यमब्दं परिधाविसंज्ञं ॥
प्रमाद्यथानंदमतः परं यत्स्याद्राक्षसं चानलसंज्ञितं च ॥ ४५ ॥
परिधाविनि मध्यदेशनाशो नृपहानिर्जलमल्पमग्निकोपः ॥
अलसस्तुजनः प्रमादिसंज्ञे डमरं रक्तकपुष्पबीजनाशः ॥ ४६ ॥
तत्परः सकललोकनंदनो राक्षसः क्षयकरोनलस्तथा ॥
ग्रीष्मधान्यजननोऽत्र राक्षसो वन्हिकोपमरकप्रदोऽनलः ॥ ४७ ॥

अर्थ—दशमइंद्राग्निदैवत युगांमध्यें प्रथम परिधावि वर्ष, दुसरें प्रमादि, तिसरें आनंद, चवथें राक्षस, पांचवें अनल हीं वर्षें होतात. ४५. परिधावि वर्षामध्यें मध्यदेशांचा नाश, राजमरण, अल्पवृष्टि व अग्निभय हीं होतात. प्रमादि वर्षांमध्यें लोक आळशी होतात व शस्त्ररहित युद्ध ( कलह ) होईल. तांबड्या पुष्पांचे बीजांचा नाश होईल. ४६. आनंद वर्षामध्यें सर्व लोकांस आनंद होईल. राक्षस व अनल हे लोकक्षय करणारे होत. परंतु राक्षसांमध्यें गहूं व यव इत्यादि ग्रीष्म धान्यें होतील व अनलांमध्यें अग्निकोप आणि महामारी ( मृत्यू ) हीं होतात. ४७.

एकादशे पिंगलकालयुक्तसिद्धार्थरौद्राः खलु दुर्मतिश्च ॥
आद्ये तु वृष्टिर्महती सचौरा श्वासोहनूकम्पयुतश्च कासः ॥ ४८ ॥
यत्कालयुक्तं तदनेकदोषं सिद्धार्थसंज्ञे बहवो गुणाश्च ॥
रौद्रोतिरौद्रः क्षयकृत्प्रदिष्टो यो दुर्मतिर्मध्यमवृष्टिकृत्सः ॥४९॥

अर्थः—अकराव्या अश्वियुगांमध्यें प्र० पिंगल, दुसरें कालयुक्त, तिसरें सिद्धार्थ, च० रौद्र, पां० दुर्मति हीं पांच वर्षें होतात. त्यांत प्रथम वर्षी महान् वृष्टि, चोरभय, श्वास, हनुकंपयुक्त कास हीं होतात. ४८. कालयुक्त वर्षामध्यें अनेक अशुभ होतात. सिद्धार्थ वर्षामध्यें बहुत गुण ( धान्य संपत्ति इत्यादि ) होतात. रौद्र व अतिरौद्र हीं वर्षें लोकांचा क्षय करणारीं होत. आणि दुर्मति वर्षामध्यें मध्यम वृष्टि होते. ४९.

भाग्ये युगे दुंदुभिसंज्ञमाद्यं सस्यस्य वृद्धिं महतीं करोति ।
अंगारसंज्ञे तदनुक्षयाय नरेश्वराणां विषमा च वृष्टिः ॥ ५० ॥
रक्ताक्षसंज्ञं कथितं तृतीयं तस्मिन्भयं दंष्ट्रिकृतं गदाश्च ।
क्रोधं बहुक्रोधकरं चतुर्थं राष्ट्राणि शून्यीकुरुते विरोधैः ॥५१॥

अर्थ–द्वादश भाग्ययुगांमध्यें प्र० दुंदुभि वर्ष, यांत महान् धान्यवृद्धि होते. दु० अंगार वर्ष यांत राजांचा नाश होतो व वृष्टि विषम (अतुल्य अति भयंकर ) होईल. ५०. ति० रक्ताक्ष वर्ष यांत वराहादि दंष्ट्रींचें भय रोग हीं होतात. च० क्रोध वर्ष यांत कोध बहुत उत्पन्न होईल व वैरानें राज्यें शून्य होतील. ५१.

क्षयमिति युगस्यांत्यस्यांत्यं बहुक्षयकारकं ।
जनयति भयं तद्विप्राणां कृषीवलवृद्धिदं ॥
उपचयकरं विट्शूद्राणां परस्वहृतां तथा ।
कथितमखिलं षष्ट्यब्दे यत्तदत्र समासतः ॥ ५२ ॥

अर्थः—द्वादश युगाचें पांचवें वर्ष क्षयसंज्ञक होय. हें बहुत क्षय करणारें व ब्राह्मणांस भयजनक व शेतीलोकांस वृद्धि करणारें, वैश्य, शूद्र आणि परद्रव्य हरण करणारे यांस वृद्धि करणारें होय. याप्रमाणें साठ बार्हस्पत्य वर्षांचें जें सर्व फल तें येथें ( बृहस्पतिचारांमध्यें ) संक्षेपानें सांगितलें. ५२.

अकलुषांशुजटिलः पृथुमूर्तिः कुमुदकुंदकुसुमस्फटिकाभः ॥
ग्रहहतो न यदि सत्पथवर्ती हितकरोमरगुरुर्मनुजानां ॥५३॥

अर्थः—निर्मल किरण, आसमंतात् भागीं किरणांनीं व्याप्त, विशाल देह ( तारा ), श्वेत कमल, कुंदपुष्प व स्फटिकमणि यांसारखी आहे कांति ज्याची असा, ग्रहानें युद्धामध्यें जिंकलेला नाहीं असा, ग्रहांच्या व नक्षत्रांच्या उत्तर मार्गानें जाणारा व वक्रगति नव्हे असा गुरु मनुष्यास हितकारक होय. ५३.

# अथ गुरुचारफलानि (राजावलि).

१ मेष —मेषस्थिते देवगुरौ च मेषविनाशनं सस्यसमर्थवृद्धिः ।
भूपालकानां कलहस्तथापि भवंति चान्ये सुखिनो जनाश्च ॥ १ ॥

अर्थ—बकरीं फार मरतील. धान्याची सवंगाई फार होईल. राजे लोकांत तंटे होतील; परंतु अवांतर लोकांना मात्र सुख होईल.

२ वृषभ—वृषराशिगते जीवे पशुस्त्रीशिशुनाशनम् ॥
मंदवृष्टिः सस्यहानिर्नृपाणां समरं महत् ॥ २ ॥

अर्थ—जनावरें, बायका व मुलें यांची हानि होईल, पाऊस थोडा पडेल, धान्याची नासाडी होईल व राजेलोकांत तुमुल युद्ध जुंपेल.

३ मिथुन—सुरेंद्रवंद्ये भुवि युग्मराशिं गते क्षितीशाः कलहोत्सुकाः स्युः ॥
ईतेर्भयं सस्यभयं प्रजानां क्वचित्प्रवर्षंति पयोधराश्च ॥ ३ ॥

अर्थ—राजे लोकांत भांडणतंटे होतील, लोकांस उंदीर, टोळ वगैरे पासून उपद्रव होईल व पिकांनांही इजा होईल. पाऊस कोठें कोठें पडेल.

४ कर्क—बृहस्पतौ कर्कटराशिसंस्थे गावश्च मेघाश्च पयःप्रदाः स्युः ॥
सस्याभिवृद्धिश्च भवेद्धरित्र्यां सदा द्विजाश्चाध्वरतत्पराः स्युः ॥ ४ ॥

अर्थ—गाई पुष्कळ दूध देतील. पाऊस पुष्कळ पडेल. पिकें चांगलीं येतील. ब्राह्मण नेहमीं यज्ञयागादि कर्में करताल.

५ सिंह—सिंहराशिगते जीवे निस्वा भूसुरसज्जनाः ॥
अतिवृष्टिर्व्याधिभयं नृपा युद्धे लयं गताः ॥ ५ ॥

अर्थ-ब्राह्मण व प्रतिष्ठित लोक द्रव्यहीन होतील. अतिशय पाऊस पडेल. शारीरिक पीडा फार होईल. राजेलोकांचा लढायांत नाश होईल,

६ कन्या—जीवे कन्यागते पुष्टा वृष्टिः स्वस्थाः क्षितीश्वराः ॥
मखोत्सुकाः क्षितिसुराः स्वस्थाःस्युर्निखिला जनाः ॥ ६ ॥

अर्थ—पाऊस पुष्कळ पडेल. राजे लोकांना सुख होईल. ब्राह्मण समुदाय यज्ञतत्पर होईल. व सर्व लोकांना सुख होईल.

७ तुला—तुलान्विते देवगुरौ सुवृष्टिः संपूर्णसस्यानि भवंति भूमौ ॥
यानीह वस्तूनि तुलोद्धृतानि स्युस्तानि सर्वाणि सुदुर्लभानि ॥७॥

अर्थः—पाऊस पुष्कळ पडेल, पृथ्वीवर सर्व पिकें भरपूर येतील. वजनानें ज्यांचा व्यवहार चालतो असे सर्व पदार्थ दुर्मिळ होतील.

८ वृश्चिक—मदोद्धतानां भूपानां युद्धे जनपदक्षयः ॥
अतुला वृष्टिरत्युग्रं डामरं कीटके गुरौ ॥ ८ ॥

अर्थः—मदोन्मत्त झालेल्या राजे लोकांच्या समरांगणांत देशाचा नाश होईल. पाऊस अप्रतिम पडेल. गांवकऱ्यांचें परस्पर भयंकर युद्ध होईल.

९. धन—वीतरोगभयाः सर्वे चापस्थे देवपूजिते ॥
हृदयानंदिनी धात्री फलशालीक्षुवृष्टिभिः ॥ ९ ॥

अर्थः—सर्व लोकांना रोगराईचें भय उरणार नाहीं. फळें, साळी व ऊंस उत्तम येऊन व पाऊस चांगला पडून पृथ्वी रमणीय होऊन जाइल.

१० मकर—अशत्रवो जना धात्री पूर्णा सस्यार्घवृष्टिभिः ॥
वीतरोगभयाः सर्वे मकरस्थे सुरार्चिते ॥ १० ॥

अर्थ—लोकांत वैरभाव उत्पन्न होणार नाहीं. पृथ्वीवर धान्य, द्रव्य व पर्जन्य विपुल होईल. रोगराईची भीति नाहींशी होईल.

११ कुंभ—सुरस्पर्धिजनैर्धात्री संपूर्णा यैः सुवृष्टिभिः
राजानः कुंभगे जीवे वीतरागोश्च निर्भयाः ॥ ११ ॥+

अर्थ—पृथ्वीवर पाऊस उत्तम पडल्यामुळें लोकांजवळ पैसे उत्तम होऊन ते देवांची बरोबरी करूं लागतील. राजे लोक निरोगी होऊन त्यांना कसलीही भीति उरणार नाहीं.

१२ मीन—नानाविधोद्यानतडागसस्यमहोत्सवानेकमखक्रियाढ्या ।
मीनस्थिते देवगुरौ धरित्री रम्या क्षीतीशाः सुखिनः परे च ॥१२॥

अर्थ—निरनिराळ्या प्रकारच्या बागा, तळीं, धान्यें, समारंभ, पुष्कळ यज्ञोत्सव यांनीं युक्त अशी पृथ्वी सुंदर दिसेल. राजे व इतर लोक यांना सुख होईल.

+टीप—हृदयानंदिनी धात्री फलिता च सुवृष्टिभिः । अजातशत्रवः सर्वे कुंभगे देवपूजिते ॥ ग्रंथातरे.

---

# अथ शुक्रचारः

नागगजैरावतवृषभगोजरद्गवमृगाजदहनाख्याः ।
अश्विन्याद्याः कश्चित् त्रिभाः क्रमाद्वीथयः कथिताः ॥ १ ॥

अर्थ-नाग, गज, ऐरावत, वृषभ, गो, जरद्गव, मृग, अज, दहन हे नऊ मार्ग अश्विन्यादि तीन तीन नक्षत्रांही होतात असें कोणी ज्योतिर्वेत्ते म्हणतात १.

नागात्तुपवनयाम्यानलानि पैतामहात्त्रिभात्तिस्रः ।
गोवीथ्यामश्विन्यः पौष्णं द्वे चापि भद्रपदे ॥ २ ॥
जारद्गव्यां श्रवणात् त्रिभं मृगाख्या त्रिभं च मैत्राद्यं ।
हस्तविशाखात्वष्ट्राण्यजेत्यषाढाद्वयं दहना ॥ ३ ॥

अर्थ—स्वाती, भरणी, कृत्तिका या तीन नक्षत्रांची नागवीथी ( नागमार्ग ) होय. रोहिणी, मृगशीर्ष, आर्द्रा गजवीथी, पुनर्वसु, पुष्य, आश्लेषा, ऐरावतवीथी; मघा, पूर्वा, उत्तरा, वृषभवीथी; आश्विनी, रेवती, पूर्वाभा०, उत्तराभा०, गोवीथी; श्रवण, धनिष्ठा, शततारका, जारद्गवीवीथी; अनुराधा, ज्येष्ठा, मूळ, मृगवीथी; हस्त, विशाखा, चित्रा अजवीथी, पूर्वापा० उत्तरापा०, दहनवीथी. याप्रकारें करून २७ नक्षत्रांच्या ९ वीथी ( मार्ग) आहेत २।३.

तिस्रस्तिस्रस्तासांक्रमादुदङ्मध्ययाम्यमार्गस्थाः ।
तासामप्युत्तरमध्यदक्षिणावस्थितैकैका ॥ ४ ॥

अर्थ-- त्या नागादि नऊ वीथी मध्येंहीं तीन तीन अनुक्रमानें उत्तर, मध्य व दक्षिण या मार्गांत आहेत. त्या उत्तरादि मार्गस्थ तीन तीन वीथींतही एकेक उत्तर, मध्य व दक्षिण यांकडे राहणार अशी होय (हेंच स्पष्ट सांगतो.) नाग, गज, ऐरावत या तीन वीथी उत्तरेस होत. त्यांमध्येंही नाग उत्तरेच्या उत्तरेस, गज उत्तरेच्या मध्यें, ऐरावत उत्तरेच्या दक्षिणेस, वृषभा, गो, जारद्गवी या ३ मध्यें. त्यांत वृषभा मध्याच्या उत्तरेस, गो मध्याच्या मध्यें, जारद्गवी मध्याच्या दक्षिणेस, मृगा, अजा, दहना ह्या ३ दक्षिणेस. त्यांमध्येंही मृगा दक्षिणेच्या उत्तरेस, अजा दक्षिणेच्या मध्यें, दहना दक्षिणेच्या दक्षिणेस या प्रमाणें वीथी जाणाव्या. ४.

वीथी मार्गानपरे कथयंति यथास्थिता भमार्गस्य ।
नक्षत्राणां तारायाम्योत्तरमध्यमास्तद्वत् ॥ ५ ॥

अर्थ—कोणी आचार्य, नक्षत्रमार्गप्रमाणेंच वीथी मार्ग सांगतात. कारण तशाच नक्षत्रांच्या तारा दक्षिण, उत्तर, मध्य अशा आहेत- यास्तव तसेच वीथीमार्गही जाणावें असें म्हणतात ५.

उत्तरमार्गोयाम्यादिनिगदितोमध्यमस्तु भाग्याद्यः ।
दक्षिणमार्गोषाढादिकैश्चिदेवं कृता मार्गाः ॥ ६ ॥

अर्थ– भरण्यादि नऊ नक्षत्रांचा उत्तर मार्ग, पूर्वा फाल्गुनी इत्यादि नऊ नक्षत्रांचा मध्यम मार्ग, पूर्वाषाढादि नऊ नक्षत्रांचा दक्षिण मार्ग. कांहीं आचार्यांहीं असें मार्ग केलें आहेत. ६

ज्योतिषमागमशास्त्रं विप्रतिपत्तौ न योग्यमस्माकं ।
स्वयमेव विकल्पयितुं किं तु बहूनां मतं वक्ष्ये ॥७॥

अर्थ— नक्षत्र ग्रहादि विषयक जें शास्त्र तें ज्योतिष शास्त्र होय. हें वेदोक्त शास्त्र आहे. यास्तव वेदावांचून समजत नाहीं म्हणून आह्मास मतभेदांविषयीं विकल्प करणें (हें योग्य हें अयोग्य असें म्हणणें) योग्य (न्याय्य) नाहीं. कारण सर्व मुनि त्रिकालज्ञ होत. यास्तव जसें ज्यांस वाटेल तसें त्यांणीं लिहिलें असावें म्हणून बहुत ऋषींचें मत सांगतों ७.

उत्तरवीथिषु शुक्रः सुभिक्षशिवकृद्गतोस्तमुदयं वा ।
मध्यासु मध्यफलदः कष्टफलो दक्षिणस्थासु ॥ ८॥

अर्थ--शुक्र, नाग, गज, ऐरावत या उत्तर वीथींत असून जर अस्त किंवा उदय पावेल तर सुभिक्ष व कल्याण करील, मध्यवीथीमध्यें मध्यफल करील. दक्षिणवीथी मध्यें असून उदयास्त होतील तर अशुभ करील ८.

अत्युत्तमोत्तमोनं सममध्यन्यूनमधमकष्टफलं ।
कष्टतमं सौम्याद्यासु वीथिषु यथाक्रमं ब्रूयात् ॥९ ॥

अर्थ---शुक्राचीं उत्तरादि वीथींत अत्युत्तमादि नऊ फलें अनुक्रमानें सांगावीं. ती अशी कीं नागा अत्युतम गजा उत्तमा, ऐरावता कांहीं कमी उत्तमा, वृषभा समा, गो मध्या, जारद्गावी कांहीं अधमा, मृगा अधमा, अजा कष्टा, दहना अतिकष्टा, अशा होत ९.

भरणीपूर्वं मंडलमृक्षचतुष्कं सुभिक्षकरमाद्यं ।
वंगांगमहिषबाल्हिककलिंगदेशेषु भयजननं ॥१०॥
अत्रोदितमारोहेत् ग्रहोपरो यदि सितं ततो हन्यात् ।
भद्राश्वशूरसेनकयौधेयककोटिवर्षे नृपान् ॥ ११ ॥

अर्थ— भरणीपूर्वक चार नक्षत्रांचें प्रथम मंडल सुभिक्षकर होय. हें वंग, अंग, महिर, बाल्हिक, कलिंग, या देशांमध्यें भय उत्पन्न करणारे होय. १०. या मंडलामध्यें उदय पावलेल्या शुक्रावरून दुसरा ग्रह जाईल तर भद्राश्व, शूरसेन, योधेयक, कोटिवर्ष या देशांतील लोक व तेथील राजे यांचा नाश होतो ११.

भचतुष्टयमार्द्राद्यं द्वितीयममितांबुसस्यसंपत्त्यै ।
विप्राणामशुभकरं विशेषतः क्रूरचेष्टानां ॥ १२ ॥
अन्येनात्राक्रांते म्लेंच्छाटविकाश्वजीविगोमंतान् ।
गोनर्दनीचशूद्रान् वैदेहांश्चानयः स्पृशति ॥ १३ ॥

अर्थ—आर्द्रादि ४ नक्षत्रांचें द्वितिय मंडल; तें बहुत उदक व धान्य यांची संपत्ति करितें. ब्राह्मणांस व विशेषेंकरून दुर्जनांस अशुभ होय. १२. पूर्वोक्त मंडलांमध्यें अन्य ग्रहानें रुद्ध (स्तंभित) शुक्र असतां तो म्लेंच्छ, अरण्यवासी, अश्वजीवी, गाई बाळगणारे, गोनर्ददेशचे, नीचशूद्र वैदेहजन या सर्वांप्रत उपद्रव देतो १३.

विचरन्मघादिपंचकमुदितः सस्यप्रणाशकृच्छुक्रः ।
क्षुत्तस्करभयजननो नीचोन्नतिसंकरकरश्च ॥ १४ ॥
पित्र्याद्येवष्टब्धो हंत्यन्येनाविकाञ्छबरशूद्रान् ।
पुंड्रापरांत्यशूलिकवनवासिद्रविडसामुद्रान् ॥ १५ ॥

अर्थ—मघादि पांच नक्षत्रांचें तिसरें मंडल. यांत उदय पावलेला शुक्र धान्यांचा नाश करील. दुर्भिक्ष व चोर उत्पन्न करील. नीचांचें प्राधान्य व वर्णसंकर यांतें करील १४. मघादि पंचकांमध्यें अन्य ग्रहानें शुक्र रुद्ध असतां आविक (ऊर्णावस्त्रें) शबर (भिल्ल) शूद्र पुंड्रदेशस्थ, अपरांत्यदेशस्थ, शूलिक, (त्रिशूळ) धारण करणारे लोक, वनचर, द्राविड, समुद्रतीरवासी लोक या सर्वांचा नाश करितो ॥१५

स्वात्याद्यं भत्रितयं मंडलमेतच्चतुर्थमभयकरं ।
ब्रह्मक्षत्रसुभिक्षाभिवृद्धये मित्रभेदाय ॥ १६ ॥
अत्राक्रांतेमृत्युः किरातभर्तुः पिनष्टि चेक्ष्वाकून ।
प्रत्यंतावंतिपुलिंदतंगणाञ्छूरसेनांश्च ॥ १७ ॥

अर्थ—स्वात्यादि तीनें नक्षत्रांचें चतुर्थ मंडल, हें अभयकारक व ब्राह्मण, क्षत्रिय, सुभिक्ष यांची वृद्धि व मित्रभेद यांतें करितें. १६. या मंडलामध्यें अन्य ग्रहानें रुद्ध (स्तंभित) शुक्र, असतां किरात देशाधिपतीस मृत्यु होतो. इक्ष्वाकुदेशवासी, गुहावासी, अवंतिवासी, पुलिंद (रानटी लोक) तंगणसंज्ञक, शूरसेन (मथुरा प्रांतस्थ) या लोकांतें चूर्णत्व प्राप्त होतें. १७.

ज्येष्ठाद्यं पंचर्क्षं क्षुत्तस्कररोगदं प्रबाधयते ।
काश्मीराश्मकमत्स्यान् सचारुदेवीनवंतींश्च ॥१८॥
अत्रारोहे द्रविडाभीरांबष्ठत्रिगर्तसौराष्ट्रान् ।
नाशयति सिंधुसौवीरकांश्च काशीश्वरस्य वधः ॥ १९ ॥

अर्थ—ज्येष्ठापूर्वक पांच नक्षत्रांचें पांचवें मंडल; हें दुर्भिक्ष, चोर, रोग यांतें करणारें व काश्मीर, अश्मक, मत्स्य या देशांतील लोक; चारुदेवी नामक नदीच्या तीरीं राहणारे लोक, अवंती नगरवासी लोक, या सर्वांस पीडा करितें. १८. या मंडलामध्यें जर दुसरा ग्रह शुक्राप्रत आरोहण करील (रोध करील) तर द्रविड, आभीर, आंबष्ठ, त्रिगर्त, सौराष्ट्र, सिंधु, सौवीर या देशांतील लोकांचा नाश होईल व काशी राजाचा वध होईल. १९.

षष्ठं षण्णक्षत्रं शुभमेतन्मंडलं धनिष्ठाद्यं ।

भूरिधनगोकुलाकुलमनल्पधान्यं क्वचित्सभयं ॥ २० ॥

अत्रारोहे शूलिकगांधारावंतयः प्रपीड्यंते ।

वैदेहवधः प्रत्यंतयवनशकदासपरिवृद्धिः ॥२१॥

**अर्थ**--धनिष्ठादि सहा नक्षत्रांचें सहावें मंडल; हें शुभ होय. बहुत धन, गाईचे समुदाय, आकुल (उद्योगयुक्त) बहुत धान्य यांणीं युक्त असे लोक होतील व कोठें कोठें भयही होईल. २०. या मंडलामध्यें जर दुसरा ग्रह शुक्राप्रत आरोहण करील तर शूलिक, गांधार अवंति या देशांतील लोकांस पीडा होईल. वैदेह राजाचा वध होईल. व प्रत्यंत, यवन, शक, दास, या देशांतील लोकांची वृद्धि होईल. २१.

अपरस्यां स्वात्याद्यं ज्येष्ठाद्यं चापि मंडलं शुभदं ।

पित्र्याद्यं पूर्वस्यां शेषाणियथोक्तफलदानि ॥ २२॥

**अर्थ**--पश्चिम दिशेस स्वात्यादि व ज्येष्ठादि हीं दोन मंडलें शुभ होत. पूर्व दिशेस मघादि मंडळ शुभ होय शेष राहिलेलीं तीन मंडलें पूर्वी जशीं फलें सांगितलीं तशींच देणारीं होत. २२.

दृष्टोनस्तगतेर्के भयकृत् क्षुद्रोगकृत्समस्तमहः ।

सार्धदिवसं च सेंदुर्नृपबलपुरभेदकृच्छुक्रः ॥ २३ ॥

**अर्थ**—सूर्यास्तापूर्वी दिवसास शुक्र दृष्टिगोचर झाला तर भय, दुर्भिक्ष रोग यांतें करणारा होय. मध्यान्हीं सचंद्र शुक्र दृष्टीस पडला तर राजे, सैन्य, नगरें यांचा भेद होतो २३.

भिंदन् गतोनलर्क्षं कूलातिक्रांतवारिवाहाभिः ।

अव्यक्ततुंगनिम्नासमा सरिद्भिर्भवति धात्री ॥ २४ ॥

**अर्थः**--कृत्तिका नक्षत्रातें भेदून ( तारांमधून ) शुक्र जाईल तर, नद्यांस अति महापूर हेतील, तेणें-करून उंचसखल हें कांहीं दिसणार नाहीं. २५

प्रजापत्ये शकटे भिन्ने कृत्वेव पातकं वसुधा ॥

केशास्थिशकलशबला कापालमिव व्रतं धत्ते ॥२५॥

**अर्थः**—रोहिणी नक्षत्राचा शकट [ गाडा ] भेद करून शुक्र जाईल तर भूमि, ब्रह्महत्यादि पातकयुक्त ऊन केश, हाडांचे तुकडें यांहीं मिश्रित [ काळी व पांढरी ] होऊन; म्हणजे मनुष्यसंहार होऊन कापालासारखें शिवभक्तासारखें व्रत धारण करत्ये, २५.

सौम्योपगतो रससस्यसंक्षयायोशनाॅ समुद्दिष्टः ॥

आर्द्रागतस्तु कोशलकलिंगहा सलिलनिकरः ॥२६॥

**अर्थ**--शुक्र मृगशीर्ष नक्षत्रास गेला तर मधुरादि रस व धान्यें यांचा नाश करितो. आर्द्रा न० गेला तर कोशल, कलिंग या देशांत राहणारे लोकांचा नाश करितो व अतिवृष्टिही करितो. २६.

अश्मक वैदर्भाणां पुनर्वसुस्थे सिते महाननयः ॥

पुष्ये पुष्टा वृष्टिर्विद्याधरगणाविमर्दश्च ॥ २७ ॥

**अर्थः**--शुक्र पुनर्वसुनक्षत्रीं असतां, अश्मक व वैदर्भ या देशस्थ लोकांस मोठा उपद्रव होतो. पुष्यस्थित असतां बहुत वृष्टि होत्ये. विद्याधरसंज्ञक देवयोनींच्या समुदायांचा नाश होतो. २७.

आश्लेषासु भुजंगमदारुणपीडावहश्चरञ्छुक्रः ॥

भिंदन्मघां महामात्रदोषकृद् भूरिवृष्टिकरः ॥ २८ ॥

अर्थः--शुक्र आश्लेषा नक्षत्रीं असतां, लोकांस सर्पांपासून भयंकर पीडा होते. तसाच मघा नक्षत्राचा भेद करीत असतां, महामात्र [ हत्तीचा महात ] यास दूषित करितो व बहुत वृष्टिही करितो. २८.

भाग्ये शबरपुलिंदप्रध्वंसकरोंऽनुनिवहमोक्षाय ॥

अर्यम्णे कुरुजांगलपांचालघ्नः सलिलदायी ॥ २९ ॥

अर्थ-शुक्र, पूर्वाफल्गुनी नक्षत्रीं असतां, शबर व पुलिंद राजांचा नाश करितो. वृष्टि चांगली होत्ये. उत्तरा फल्गुनी नक्षत्रीं असतां, कुरु, जांगल ( स्वल्पोदकस्थान ) व पांचाल या देशांतील लोकांचा नाश करितो. व वृष्टिही होत्ये. २९

कौरवचित्रकराणां हस्ते पीडा जलस्य च निरोधः ।

कूपकृदंडजपीडा चित्रास्थे शोभना वृष्टिः ॥ ३० ॥

अर्थ—हस्त नक्षत्रीं शुक्र असतां, कुरु देशस्थ लोक, चितारी, यांस पीडा होत्ये व अवर्षणही होतें. चित्रा नक्षत्रीं शुक्र असतां, कूपकार ( विहिरी बांधणारे ) व पक्षी यांस पीडा व उत्तम वृष्टि होत्ये. ३०.

स्वातौ प्रभूतवृष्टिर्दूतवणिङ्नाविकान्स्पृशत्यनयः ।

ऐंद्राग्नेऽपि सुवृष्टिर्वणिजां च भयं विजानीयात् ॥ ३१॥

अर्थ-स्वाती नक्षत्रीं शुक्र असतां, बहुत जलवृष्टि होईल. व दूत, व्यापारी, नावाडी यांस उपद्रव होईल. विशाखा नक्षत्रीं शुक्र असतां उत्तम वृष्टि होईल. व व्यापारी लोकांस भय होईल.

मैत्रे क्षत्रविरोधो ज्येष्ठायां क्षत्रमुख्यसंतापः ।

मौलिकभिषजां मूले त्रिष्वपि चैतेष्वनावृष्टिः ॥३२॥

अर्थ—अनुराधा नक्षत्रीं शुक्र असतां, क्षत्रियांस उपद्रव होतो. ज्येष्ठा नक्षत्रीं शुक्र असतां, क्षत्रिय मुख्यांस उपद्रव होतो. मूल नक्षत्रीं शुक्र असतां, मौलिक ( द्रव्यें विकणारें ) व वैद्य यांस उपद्रव होतो. व या अनुराधादि तीन नक्षत्रीं शुक्र असतां, अवर्षणही होतें. ३२.

आप्ये सलिलजपीडा विश्वेशे व्याधयः प्रकुप्यंति ।

श्रवणे श्रवणव्याधिः पाखंडिभयं धनिष्ठासु ॥ ३३ ॥

अर्थ—पूर्वाषाढा नक्षत्रीं शुक्र असतां, उदकांतील प्राणी अथवा द्रव्यें यांस पीडा होत्ये. उत्तराषाढा नक्षत्रीं शुक्र असतां, रोग बहुत होतील. श्रवण नक्षत्रीं शुक्र असतां, कानास रोग होतो. धनिष्ठा नक्षत्रीं शुक्र असतां, पाखंडि ( वेदबाह्य ) लोकांस पीडा होत्ये. ३३.

शतभिषजि शौंडिकानामजैकपे द्यूतजीविनां पीडा ।

कुरुपांचालानामपि करोति चास्मिन् सितः सलिलं ॥ ३४ ॥

अर्थ—शततारका नक्षत्रीं शुक्र असतां, मद्यपान करणारास पीडा होत्ये. पूर्वाभाद्रपदा नक्षत्रीं शुक्र असतां, जुगार खेळून त्या पेशावर वांचणारांस पीडा होत्ये. व कुरु, पांचाल देशस्थ लोकांसही पीडा होत्ये. व वृष्टि बहुत होत्ये. ३४.

आहिर्बुध्न्ये फलमूलतापकृद्यायिनां च रेवत्यां ।

अश्विन्यां हयपानां याम्ये तु किरातयवनानां ॥३५॥

अर्थ-उत्तरा भा० नक्षत्रीं शुक्र असतां, फलें व मूलें यांस पीडा होत्ये. रेवती नक्षत्रीं शुक्र असतां पथिकांस पीडा होत्ये. अश्विनी न० शुक्र असतां अश्वपतींस पीडा होते. भरणी न० शुक्र असतां, किरात व यवन या लोकांस पीडा होत्ये. ३५.

चतुर्दशे पंचदशे तथाष्टमे तमिस्रपक्षस्य तिथौ भृगोः सुतः ।
यदा व्रजेद्दर्शनमस्तमेव वा तदा मही वारिमयीव लक्ष्यते ॥३६॥

अर्थ–शुक्र कृष्णपक्षीं चतुर्दशी, अमावस्या, अष्टमी या तिथींस उदय किंवा अस्त जेव्हां पावेल तेव्हां सर्व भूमि उदकमय अशी दिसेल ( अति वृष्टि होईल ). ३६.

गुरुर्भृगुर्वापरपूर्वकाष्ठयोः परस्परं सप्तमराशिगौ यदा ।
तदा प्रजा रुग्भयशोकपीडिता न वारि पश्यंति पुरंदरोज्झितं ॥३७॥

अर्थ—बृहस्पति आणि शुक्र यांतून कोणताही एक ग्रह पश्चिमेस व कोणताही एक ग्रह पूर्वेस असून परस्पर सप्तम राशिगत ज्या काळीं असतील त्या काळीं लोक रोग भय व शोक यांणीं पीडित होतील व इंद्रानें सोडलेल्या उदकातें पाहणार नाहींत. ( वृष्टि होणार नाहीं ). ३७.

यदा स्थिता जीवबुधारसूर्यजाः सितस्य सर्वेऽग्रपथानुवर्तिनः ।
नृनागविद्याधरसंगरास्तदा भवंति वाताश्च समुच्छ्रितांतकाः ॥ ३८ ॥

न मित्रभावे सुहृदो व्यवस्थिताः क्रियासु सम्यङ् न रता द्विजातयः ।
न चाल्पमप्यंबु ददाति वासवो भिनत्ति वज्रेण शिरांसि भूभृतां ॥३९॥

अर्थ–बृहस्पति, बुध, भौम, शनि हे सर्व ग्रह शुक्राचे अग्रभागीं जेव्हां राहतील तेव्हां मनुष्य, सर्प, विद्याधर ( देवयोनि वि० ) यांचीं युद्धें होतील व उंच वृक्षादिकांतें मोडणारे वायुही सुटतील. ३८. सुहृद् (मित्र) मित्रभावातें सोडतील, ब्राह्मण वेदोक्त यज्ञादि कर्मातें करणार नाहींत, इंद्र अल्पही उदक देणार नाहीं ( वृष्टि होणार नाहीं ) व पर्वतांचीं मस्तकें वज्रानें ( विजेनें ) भेदन करील ( पर्वतावर वीज पडेल ). ३९.

शनैश्चरे म्लेच्छबिडालकुंजराः खरा महिष्यो सितधान्यशूकराः ॥
पुलिंदशूद्राश्च सदक्षिणापथाः क्षयं व्रजंत्यक्षिमरुद्गदोद्भवैः ॥ ४० ॥

अर्थः––शनैश्चर शुक्राचे पुढें राहिला असतां यवन, मार्जार, हत्ती, गर्दभ, महिषी, कृष्ण धान्यें, डुकर, रानटी लोक, शूद्र, व दक्षिणापथ ( दक्षिणेकडील लोक ) हे सर्व नेत्ररोग व वायु यांणीं उत्पन्न झालेल्या दोषांनीं नाशाप्रत पावतील. ४०.

निहंति शुक्रः क्षितिजेऽग्रतः प्रजा हुताशशस्त्रक्षुदवृष्टितस्करैः ॥
चराचरं व्यक्तमथोत्तरापथं दिशोऽग्निविद्युद्रजसा च पीडयेत् ॥४१॥

अर्थ-शुक्र भौम पुढें असतां अग्नि, युद्ध, दुर्भिक्ष, अवर्षण व चोर यांहीं करून प्रजांचा नाश करितो. व जंगम स्थावर जगत्, उत्तरस्थ लोक यांचा नाश करितो आणि सर्व दिशा अग्नि, वीज, धूळ यांहींकरून पीडित [ दुःखित ] होतात. ४१.

बृहस्पतौ हंति पुरःस्थिते सितः सितं समस्तं द्विजगोसुरालयान् ॥
दिशं च पूर्वां करकासृजोंबुदा गले गदा भूरि भवेच्च शारदं ॥४२॥

अर्थ––शुक्र; बृहस्पतीपुढें असतां सर्व शुक्ल पदार्थ व ब्राह्मण, गाई, देव यांची गृहें व पूर्व दिशा या सर्वांचा नाश करितो. मेघ गारांची वृष्टि करतात. तसेंच लोकांच्या कंठीं रोग होतील व शरदृतूंतील धान्य बहुत होईल. ४२.

सौम्योस्तोदययोः पुरो भृगुसुतस्यावस्थितस्तोयकृद्- ॥
रोगान् पित्तजकामलां च कुरुते पुष्णाति च ग्रैष्मकान् ॥

हन्यात्प्रव्रजिताग्निहोत्रिकभिषग्रंगोपजीव्यान् हयान् ॥
वैश्यान् गाः सहवाहनैर्नरपतीन्पीतानि पश्चाद्दिशं ॥ ४३ ॥

अर्थ.——अस्तंगत किंवा उदित बुध, शुक्राचे पुढें असेल तर वृष्टि होईल व ज्वरादि रोग, पित्तज कावीळ यांहीही करितो ग्रीष्म ऋतूंतील धान्यें उत्तम होतात. संन्यासी ( वनस्थ ) अग्निहोत्री, वैद्य, मल्ल, घोडे, वैश्य, गाई, अश्वादियुहित राजे, पीतवर्ण द्रव्यें व पश्चिम दिशा या सर्वांचा नाश करितो. ४३.

शिखिभयमनलाभे शस्त्रकोपश्च रक्ते कनकनिकषगौरे व्याधयो दैत्यपूज्ये ॥
हरितकपिलरूपे श्वासकासप्रकोपः पतति न सलिलं खाद्भस्मरुक्षासिताभे ॥४४॥

अर्थः—शुक्राचा अग्निसारखा वर्ण असतां अग्निभय; रक्तवर्ण असतां शस्त्रभय, सुवर्णाच्या कसोटीसारखा वर्ण असतां रोग, हिरवा ( पोपटी ), पिंगटवर्ण असतां श्वास व कास हे रोग होतात व भस्मवर्ण रुक्षरक्षीत व कृष्णवर्ण असतां पाऊस पडत नाहीं. ( अवर्षण होतें. ). ४४.

दधिकुमुदशशांककांतिभृत्स्फुटविकसत्किरणो बृहत्तनुः ॥
सुगतिरविकृतो जयान्वितः कृतयुगरूपकरः सिताह्वयः ॥४५॥

अर्थ—दधि, कुमुदपुष्प, चंद्र यांसारखी कांति धारण करणारा, स्पष्ट, व चकचकीत अशा किरणांचा व बृहच्छरीर ( मोठा तारा ), नक्षत्रांच्या उत्तरेकडून जाणारा, उत्पातरहित, युद्धांत जय पावलेला असा शुक्र कृतयुग करणारा होतो ( लोक; व्याधि. दारिद्र्य, शोक यांहीं रहित होतात.) ४५.

---

# अथशनैश्वरचारः ।

श्रवणानिलहस्तार्द्राभरणीभाग्योपगः सुतोऽर्कस्य ॥
प्रचुरसलिलोपगूढां करोति धात्रीं यदि स्निग्धः ॥ १ ॥
अहिवरुणपुरंदरदैवतेषु सुक्षेमकृन्न चातिजलं ॥
क्षुच्छस्त्रावृष्टिकरो मूले प्रत्येकमपि वक्ष्ये ॥ २ ॥

अर्थः–श्रवण, स्वाती, हस्त, आर्द्रा, भरणी, पूर्वाफल्गुनी, या नक्षत्रीं शनैश्वर असेल आणि तो स्निग्ध ( विपुलमूर्ति )असेल तर वहुत उदकानें व्याप्त अशी भूमि करील. आश्लेषा, शततारका, ज्येष्ठा, या नक्षत्रीं शनैश्वर असेल तर उत्तम कल्याण करील. व वहुत वृष्टि करणार नाहीं ( अल्प वृष्टि करील. )मूल नक्षत्रीं शनि असेल तर दुर्भिक्ष, युद्धें अवर्षण हीं करील. प्रत्येक ( सर्व ) नक्षत्रांचींही फलें पुढें सांगतो. १–२.

तुरगतुरगोपचारककविवैद्यामात्यहार्कजोऽश्विगतः ॥
याम्ये नर्तकवादकगेयज्ञक्षुद्रनैकृतिकान् ॥ ३ ॥

अर्थ—शनि, अश्विनी नक्षत्रीं असेल तर अश्व, अश्वरक्षक, कवि, वैद्य, प्रधान, यांचा नाश होतो. शनि भरणींत असतां नर्तक, वादक (वाद्यें वाजविणारे ), गाणारे, अन्यायानें वागणारे, दुष्ट आचरण करणारे यांचा नाश होतो. ३.

बहुलास्थे पीड्यंते सौरेऽग्न्युपजीविनश्चमूनाथाः ॥
रोहिण्यां कोशलमद्रकाशिपांचालशाकटिकाः ॥ ४ ॥

**अर्थः**—शनि कृत्तिका नक्षत्रीं असेल तर सुवर्णकारादि अग्न्युपजीवी व सेनापति यांस पीडा होते. शनि रोहिणीस असेल तर कोशल, मद्र काशी, पांचाल देशीं राहणारे लोक व गाड्यांवर जीविका करणारे यांचा नाश होतो. ४.

मृगशिरसि वत्सयाजकयजमानार्यजनमध्यदेशाश्च ॥
रौद्रस्थे पारदरामठतैलिकरजकचौराश्च ॥ ५ ॥

**अर्थः**—शनि मृगशीर्ष नक्षत्रीं असेल तर वत्सप्रदेशीं राहणारे लोक, यजन करणारे ( ऋत्विज ), यजमान श्रेष्ठलोक, मध्यदेश, यांस पीडा होते. शनि आर्द्रा नक्षत्रीं असेल तर पारा काढणारे, हिंग करणारे, तेली, रजक, चोर, या सर्वांस पीडा होते. ५.

आदित्ये पंचनदप्रत्यंतसुराष्ट्रसिंधुसौवीराः ॥
पुष्ये घांटिकघोषिकयवनवणिक्कितवकुसुमानि ॥ ६ ॥

**अर्थः**—शनि पुनर्वसुन० अ० पंचनद, प्रत्यंत, सुराष्ट्र, सिंधु, सौवीर या देशांतील लोकांस पीडा होते. पुष्यन ० अ० घंटावादक ( श्रावक ), घोषिक ( गव्हरवासी ), यवन, व्यापारी, कपटी, पुष्पें यांस पीडा होते.

सार्पे जलरुहसर्पाः पित्र्ये वाल्हीकचीनगांधाराः ॥
शूलिकवैश्याः कोष्टागाराणि वणिजश्च ॥ ७ ॥

**अर्थः**—शनि, आश्लेषांस अ० जलोद्भव प्राणी व सर्प यांस पीडा. मघान० अ० वाल्हीक, चीन, गंधार, या देशांतील लोक, शूलिक ( त्रिशूल धारण करणारे ) पारा काढणारे, वैश्य, धान्यांचीं कोठारें व व्यापारी यांस पीडा होते. ७.

भाग्ये रसविक्रयिणः पण्यस्त्रीकन्यका महाराष्ट्राः ॥
आर्यम्णे नृपगुडलवणभिक्षुकांबूनि तक्षशिला ॥८॥

**अर्थः**—शनि पूर्वाफ० अ० रसविक्रय करणारे वेश्याकन्या, महाराष्ट्र देशांतील लोक, या सर्वांस पीडा होते. उत्तरा फ० अ० राजे, गुड, लवण, संन्यासी, उदकें, तक्षशिला नगरी, या सर्वांस पीडा होते. ८.

हस्ते नापितचाक्रिकचौरभिषक्सूचिकद्विपग्राहाः ॥
बंधक्यः कौशलका मालाकाराश्च पीड्यंते ॥ ९ ॥

**अर्थ**—शनि हस्त, न० अ० नापित, चाक्रिक, ( कुंभकार तेली इत्यादि ) चोर, वैद्य, शिंपी, हस्तिग्राह ( महात ), वेश्या, कसबी लोक, माळी या सर्वांस पीडा होते. ९

चित्रास्थे प्रमदाजनलेखकचित्रज्ञचित्रभांडानि ॥
स्वातौ मागधचरदूतसूतपोतप्लवनटाद्याः ॥ १० ॥

**अर्थ**—शनि, चित्रा न० अ० स्त्रीजन, लेखक, चित्रकार, व अनेक तऱ्हेचीं भांडीं यांस पीडा होते. स्वातीस अ०, दक्षिण वऱ्हाडप्रांतस्थ लोक, गुप्त बातमीदार, जासूद, सूत ( सारथि अथवा पौराणिक, ) नौकेंतून गमन करणारे, नृत्य जाणणारे यांस पीडा होते. १०

ऐंद्राग्न्याख्ये त्रैगर्तचीनकौलूतकुंकुमं लाक्षा ॥
सस्यान्यथ मांजिष्ठं कौसुंभं च क्षयं याति ॥ ११ ॥

**अर्थ**—शनि विशाखान० अ० त्रैगर्त, चीन, कौलूत, या देशांतील लोक, कुंकुम, लाख, धान्यें, मांजिष्ट, व कौसुंभ ( कुसुंबा रंग ) या सर्वांचा नाश होतो. ११

मैत्रे कुलूततंगणखसकाश्मीराः स मंत्रिचक्रचराः ॥
उपतापं यांति च घांटिका विभेदश्च मित्राणां ॥ १२ ॥

अर्थ—शनि, अनुराधास अ० कुलूत, तंगण, खस, (नेपाळादि डोंगराळ प्रदेश), काश्मीर, या देशांतील लोक, प्रधान, कुंभार घंटा वाजिगारे ( श्रावक ) यांस पीडा होतये. व मित्रांचा परस्पर भेद होतो. १२.

ज्येष्ठासु नृपपुरोहितनृपसत्कृतशूरगणकुलश्रेण्यः ॥
मूले तु काशिकोशलपांचालफलौषधीयोधाः ॥ १३ ॥

अर्थ—शनि ज्येष्ठान० अ० राजे, राजोपाध्याय, राजपूजित, योद्धे, समुदाय, श्रेष्ठ कुलें, बहुत सजाती-यांचे समुदाय हे सर्व संतापालें पावतील. मूल न० अ० काशि, कोशल, पांचाल या देशांतील लोक, आम्रादि फळें, औषधी यांस ताप होतो. १३.

आप्येऽगवंगकोशलगिरिव्रजामगधपुंड्र मिथिलाश्च ॥
उपतापं यांति जना वसंति ये तामलिप्त्यां च ॥ १४ ॥

अर्थ—शनि पूर्वाषाढा न० अ० अंग, बंग, कोशल, गिरिव्रज, ( मगधदेशाची राजधानी. ) मगध, पुंड्र, मिथिल या देशांतील लोक व ताम्रलिप्ती नगरींत जे लोक राहतात ते. हे दुःखाति प्राप्त होतील. १४.

विश्वेश्वरेऽर्कपुत्रश्चरन् दशार्णान्निहंति यवनांश्च ॥
उज्जयनीं शबरान् पारियात्रिकान् कुंतिभोजांश्च ॥ १५ ॥

अर्थ—शनि, उत्तराषाढा न० अ० दशार्ण देशस्थलोक, यवन, उज्जयनी देशस्थ लोक, शबर ( भिल्ल ), पारियात्र पर्वतावरील लोक, कुंति, भोज, ( बागलपूर, ) या देशांतील लोक, या सर्वांचा नाश होतो. १५.

श्रवणे राजाधिकृतान्विप्राग्र्यभिषक्पुरोहितकलिंगान् ॥
वसुभे मगधेशजयो वृद्धिश्च धनेष्वधिकृतानां ॥ १६ ॥

अर्थः—श्रवण, न० शनि, अ० राजानें अधिकार दिलेले, ब्राह्मणश्रेष्ठ, वैद्य, आचार्य व कलिंग देशस्थ लोक, यांचा नाश होतो. धनिष्ठा न० अ० मगध देशाच्या राजाचा जय होतो, व द्रव्यरक्षणीं नियुक्त अशा लोकांची वृद्धि होतये. १६.

साजे शतभिषजि भिषक् कविशौंडिकपण्यनीतिवार्तानां ॥
आहिर्बुध्न्ये नद्यो यानकराः स्त्री हिरण्यं च ॥ १७ ॥

अर्थ—शनि, शततारका व पूर्वाभाद्रपदा या दोन न० अ० वैद्य, कवि, मद्य विकणारे, व्यापारी, नीतिशास्त्र जाणणारे, यांस पीडा होतये. उत्तराभाद्रपदा न० अ० नदीतीरीं राहणारे, पालख्या करणारे सुतार, स्त्रिया, सुवर्ण यांस पीडा होतये १७.

रेवत्यां राजभृतः क्रौंचद्वीपाश्रिताः शरत्सस्यं ॥
शबराश्च निपीड्यंते यवनाश्च शनैश्चरे चरति ॥ १८ ॥

अर्थ—शनि रेवती न० अ०, राजानें पोषित लोक (राजाश्रित), क्रौंचद्वीपीं रहाणारे लोक. शरदृतूंतील धान्य, शबर ( भिल्ल, ) यवन या सर्वांस पीडा होतये. १८.

यदा विशाखासु महेंद्रमंत्री सुतश्च भानोर्दहनर्क्षयातः ॥
तदा प्रजानामनयोतिघोरः पुरप्रभेदो गतयोर्भमेकं ॥ १९ ॥

अर्थ—जेव्हां विशाखानक्षत्रीं बृहस्पति आणि कृत्तिका न० शनैश्चर असे असतील तेव्हां लोकांत फार अनीति होईल व दोघेहीं एक न० असतील तर नगराचा भेद होईल. १९.

अंडजहा रविजो यदि चित्रः क्षुद्भयकृद्यदि पीतमयूखः ॥
शस्त्रभयाय च रक्तसवर्णो भस्मनिभो बहुवैरकरश्च ॥२० ॥

अर्थ-शनि, जर अनेक रंगाचा दिसेल तर पक्ष्यांचा नाश होतो, जर पीतकिरण दिसेल तर दुर्भिक्ष करील, रक्तवर्ण दिसेल तर संग्रामभय होतें. भस्मासारखा दिसेल तर लोकांमध्यें बहुत वैरें होतील. २०

वैडूर्यकांतिरमलः शुभदः प्रजानां बाणातसीकुसुमवर्णनिभश्च शस्तः ॥
यं चापिवर्णमुपगच्छति तत्सवर्णान्सूर्यात्मजः क्षपयतीति मुनिप्रवादः ॥२१॥

अर्थ-शनि, वैडूर्यमण्यासारखा असून स्वच्छ असेल तर प्रजांचें कल्याण होईल. व (बाण: कोरंटा) अतसि, [जवसाचें झाड] यांच्या पुष्पांच्या वर्णासारखा शनीचा वर्ण असेल तर प्रशस्त होय श्वेत, रक्त, पीत, कृष्ण, या चार वर्णांतून जो वर्ण शनि धरील त्या ब्राह्मणादि चार वर्णांचा नाश होईल, असें गर्गादिऋषि म्हणतात. [श्वेतवर्ण शनि ब्राह्मणाचा, रक्त व० क्षत्रियांचा, पीत० वैश्यांचा, व कृष्णवर्ण शूद्रांचा नाश करतो.] २१.

---

## शनिचारफलम् । [राजावलि].

१ मेष-- मेषस्थिते भानुसुते नृपाणां मतंगजानां च तुरंगमाणाम् ।
कवीश्वराणामपि गायकानां वैद्योत्तमानामपि चोत्कृतिः स्यात् ॥ १ ॥

अर्थ--राजे, हत्ती, घोडे, कविश्रेष्ठ, गवई, व चांगले वैद्य यांचे वाईट होईल. १.

२ वृषभ--गोसंस्थिते सूर्यसुते त्वमात्यधान्यार्घभूपाद्युपजीविनाशः ।
अवंतिपांचालककोसलादिदेशा विनष्टाः कुरवश्च मंदाः ॥ २ ॥

अर्थः—राजमंत्री, धान्यें, बाजारभाव व राजे वगैरे यांच्यावर अवलंबून असणारे नोकर चाकर यांची हानि होईल. अवंति, पांचाल, कोसल वगैरे देशांचा नाश होईल. व कुरु देशांतील लोक आळशी होतील. २.

३ मिथुन-युग्मस्थितेऽर्कतनये प्रमदो नृपाणां जायेत सस्यबहुला वसुधा सुवृष्टिः ।
नष्टाश्च तौलिकयुता रजकाश्च चोराः स्युः पारदाश्च वरदाश्च सुराष्ट्रदेशाः

अर्थः--राजेलोकानां फार आनंद होईल. पृथ्वीवर पर्जन्य पुष्कळ पडून धान्य विपुल होईल. चितारी परीट व चोर यांचा नाश होईल. सौराष्ट्र देशांत पारा व विष [ सोमल ] पुष्कळ सांपडेल. ३.

४ कर्क—कुलीरगे भानुसुते धरित्री सुवृष्टिसस्यार्घफलान्विता स्यात् ।
वैद्योत्तमाः पंचनदांतिकाश्च सर्पादयो जातिविनाशमीयुः ॥ ४ ॥

अर्थः—पृथ्वीवर पाऊस चांगला पडून धान्यें, फळें पुष्कळ येतील. व त्यांना भावही चांगला येईल. आयुर्वेदिक पंडित, पंजाब देशांतील लोक व साप वगैरे यांच्या जातींचा नाश होईल. ४,

४ सिंह--मृगेंद्रसंस्थेऽर्कसुतेऽश्वनागजनाः स्युरन्यायपथानुगाश्च ।
वाल्हीकगांधारकचीनकोष्टसद्मानि कन्यागणिकाश्च नष्टाः ॥ ५ ॥

अर्थः—घोडे व हत्ती बाळगणारे लोक नीतीला सोडून वागतील. वाल्हीक, गांधार व चीन या देशांतील खजिन्याची, अविवाहित कन्या व वेश्या यांची हानी होईल. ५.

६ कन्या-कन्यास्थिते सूर्यसुते तुरंगमृगेभधान्यार्घसुवृष्टिवृद्धिः ।
नष्टं तदा दारुकपंचकं स्याद्रसाश्च षड् भूपतयश्च नष्टाः ॥ ६ ॥

अर्थ--घोडे, हरिण, हत्ती, व यांचें यानां पुष्कळ किंमत येईल. पाऊस चांगला व पुष्कळ पडेल. सुतार, कोष्टी, न्हावी, परीट व चाभार या लोकांचा नाश होईल. रक्षा रस व राजेलोक यांचीही हानि होईल.

७ तूळ--घटस्थिते भानुसुते सुवृष्टिः सस्याभिवृद्धिः सुखिनो जनाश्च।
कौसुंभलाक्षारसकुंकुमाद्या नृपोपजीविप्रकरः प्रनष्टः ॥ ७ ॥

अर्थः--पाऊस उत्तम पडेल. पिकें चांगलीं येतील. लोकांनां सौख्य होईल करडे, लाख, केशर वगैरे पदार्थांची नासाडी होईल. व राजावर अवलंबून असणाऱ्या चाकरमाणसांचा नाश होईल. ७.

८ वृश्चिक--अलिस्थिते रोगभयं जनानां भवेत्पशूनां मृतिरर्कपुत्रे।
एणीकुलानां च जनस्य नाशो महीपतीनामुपजापकं स्यात् ॥ ८ ॥

अर्थः--लोकांत रोगराई फार होईल. जनावरें मरतील. हरिणीच्या कळपाची व लोकांचीही हानि होईल. राजेलोकांत फितुरी फार होईल. ८.

१० धन--मंदे स्थिते धन्विनि वृष्टिनाशः स्याद्भूपतीनां कलहो न चार्घम्।
पांचालकाशीकुरुकोसलाश्च नष्टाश्च काश्मीरकलिंगवंगाः ॥ ९ ॥

ग्रंथान्तरे--धनुराशिस्थितो मंदो भूपानामाहवप्रदः।
जनानां व्याधिपीडा च क्षुत्पीडा शस्त्रताडनम् ॥

अर्थः--पाऊस नाहींसा होईल. राजेलोकांत तंटे होतील. बाजार मंदावेल. पांचाल, काशी, कुरु, कोसल, काश्मीर, कलिंग व वंग या देशांची हानि होईल. ९. [ लोकांनां निरनिराळे रोग जडतील. ते भुकेनें व्याकूळ होतील. त्यानां शस्त्राचे घाव लागून पीडा होईल ]

१० मकर--नक्रस्थिते भानुसुते च भीतिः स्यादर्घवृद्धिर्महती च वृष्टिः।
दशार्णदेशा यवनाश्च नष्टाः पुरोहिताविप्रभिषङ्नृपालाः ॥ १० ॥

अर्थ--लोकांत भय फार उत्पन्न होईल. पदार्थांची किंमत वाढेल. पाऊस फार पडेल. दशार्ण देशांतील लोक, यवन लोक आणि उपाध्ये ब्राह्मण, वैद्य व राजेलोक यांची हानि होईल. १०.

११ कुंभ--मंदे घटस्थे सति वृष्टिनाशो राज्ञां भयं सस्यलयो नराणाम् ॥
भिषग्वराणां च कवीश्वराणां कोशाधिपानां च महद्भयं स्यात् ॥ ११ ॥

अर्थ--पाऊस नाहींसा होईल. धान्याची नासाडी होईल लोकांनां राजापासून भीति उत्पन्न होईल. उत्तम उत्तम असे वैद्य, कवि आणि खजिना बाळगणारे लोक यांच्यावर मोठें संकट येईल. ११.

१२ मीन--मीनस्थिते सूर्यसुते धरित्री विनष्टसस्या विविधापमृत्युः ॥
नद्यश्च गोष्पादमिता हिरण्यं मृग्यं भवेद्दारुणकर्मभूपाः ॥ १२ ॥

अर्थ--पृथ्वीवर धान्य नाहींसें होईल. निरनिराळ्या प्रकारांनीं अपमृत्यु येतील. नद्यांचें पाणी आटेल. सोनें अगदीं कमी उत्पन्न होईल. व राजे लोक क्रूरपणाचीं कृत्यें करतील. १२.

ग्रंथांतरे--प्रक्षुभ्यंति क्षितीशाः प्रचलति वसुधा मोदते दस्युवर्गो ॥
विभ्रंशो वृद्धिजानां जनपदहरणं चित्रवर्षी पयोदः ॥
चंद्रार्कौ मंदरश्मी ग्रहगणसहितौ चातिवातः प्रचंड--
श्चक्राकारं समस्तं भ्रमति जगदिदं मीनगे सूर्यसूनौ ॥ १ ॥

अर्थ-राजे लोक स्वबळून जातील. भूमिकंप होतील. चोरानां आनंद होईल. लोकांची मति भ्रष्ट होईल. राज्यभ्रंश होईल. पाऊस चमत्कारिक पडेल. सूर्य, चंद्र व इतर ग्रह यांचें तेज मंद होईल. भयंकर सोसाट्याचा वारा सुटेल. सारांश हें विश्व चक्रासारखें फिरत राहील

शौनक——मीने धनुर्युवतियुग्मगतोऽर्कपुत्रः सौम्यैर्युतो व्रजति यद्यवलोकितो वा।
दुर्भिक्षशस्त्रगररोगभयानि यानि प्रोक्तानि तानि न भवंति भवंति पापैः ॥ १ ॥

अर्थ—मीन, धन, कन्या, व मिथुन या राशीस शनि गेला असतां तो शुभ ग्रहांनीं युक्त किंवा दृष्ट असेल तर दुष्काळ, शस्त्रांपासून इजा, विष, व रोगराई इत्यादि संकटें येणार नाहींत. परंतु तोच जर दुष्ट ग्रहांनीं युक्त किंवा दृष्ट असेल तर वरील संकटें येतील.

इंद्रादित्रितये वक्रं करोति रविनंदनः ॥ अवंतियवनाधीशमृतिं कुर्यादृतुत्रये ॥२॥

अर्थ——ज्येष्ठा, मूळ व पूर्वाषाढा या नक्षत्रांस शनि येऊन वक्री होईल तर उज्जयिनी व यवन देश यांचे अधिपति ६ महिन्यांत मृत्यु पावतील.

---

# अथ धूमकेतुचारः।

## [ धूमकेतु म्ह० शेंडेनक्षत्र. ]

गार्गीयं शिखिचारं पाराशरमासितदेवलकृतं च।
अन्यांश्च बहून् दृष्ट्वा क्रियतेऽयमनाकुलश्चारः ॥१॥

अर्थ—गार्गी, पराशर, असित, देवल, या ऋषींनीं केलेले व अन्य ऋषींनींही केलेले बहुत केतुचार पाहून मी हा निःसंशय केतुचार करितों. १.

दर्शनमस्तमयो वा न गणितविधिनास्य शक्यते ज्ञातुं।
दिव्यांतरिक्षभौमास्त्रिविधाः स्युः केतवो यस्मात् ॥ २ ॥

अर्थ——या केतूंचे उदय किंवा अस्त हे गणितानें समजत नाहींत. कारण केतु दिव्य ( आकाशांतील ), आंतरिक्ष ( आकाशांतील व पृथ्वीवरील यांचेमध्यें झालेले ), भौम ( भूमीवर झालेले पिशाचदीपिकादि ) असे तीन प्रकारचे आहेत. २.

अहुताशेऽनलरूपं यस्मिंस्तत्केतुरूपमेवोक्तं।
खद्योतपिशाचालयमणिरत्नादीन्परित्यज्य ॥ ३ ॥

अर्थ-ज्या देशीं अग्नि नसून अग्नि ( तेज ) दिसतो तें केतुस्वरूपच सांगितलें; परंतु खद्योत ( काजवा किंवा इंद्रगोप म्ह० सोनकिडा), पिशाचालय ( ज्या ठिकाणीं रात्रीच्या वेळेस वारंवार ज्योति वगैरे दिसतात तें), चंद्रकांतादि मणि, मरकतादि रत्नें, पाच इत्यादि काष्ठप्रभृति म्ह. कांहीं नियमित कुसलेल्या काष्ठांत तेज (फास्फरस) दिसतें तें इत्यादि सोडून अन्य जीं तेजें राहिलीं तें केतुस्वरूप होय असें सांगितलें आहे. ३.

ध्वजशस्त्रभवनतरुतुरंगकुंजराद्येष्वथांतरिक्षास्ते ॥
दिव्या नक्षत्रस्था भौमाः स्युरतोऽन्यथा शिखिनः ॥४॥

अर्थ—ध्वज, शस्त्र, गृह, वृक्ष, अश्व गज, इत्यादिकांचे ठायीं जें तेज दिसतें तें आंतरिक्ष केतु होत. नक्षत्रांमध्यें जे केतु दिसतात ते दिव्य होत. यांहून अन्य जे भूमीवर दिसतात ते भौम केतु होत. ४.

शतमेकाधिकमेके सहस्रमपरे वदंति केतूनां ।
वहुरूपमेकमेव प्राह मुनिर्नारदः केतुं ॥५॥

अर्थः—पराशरादि कोणी ऋषि एकशेएक केतु आहेत असें ह्मणतात. अन्य ऋषि हजार केतु असें ह्मणतात. नारद ऋषि केतु एकच आहे; परंतु त्याचीं बहुत रूपें आहेत असें ह्मणतात. ५.

यद्येको यदि बहवः किमनेन फलं तु सर्वथा वाच्यं ।
उदयास्तमयैः स्थानैः स्पर्शैराधूमने वर्णैः ॥६॥

अर्थः—केतु एक असो किंवा बहुत असोत तेथें केतूंच्या उदय, अस्त, स्थान, स्पर्श, आधूमन ( शेंडी असणें ) व वर्ण यांहींकरूनच त्यांचें फल सांगावयाचें आहे. ६.

यावंत्यहानि दृश्यो मासास्तावंत एव फलपाकः ।
मासैरब्दांश्च वदेत्प्रथमात्पक्षत्रयात्परतः ॥ ७ ॥

अर्थ—जितके दिवस, केतु दिसेल, तितके महिन्यांनीं फल होईल. जितके महिने दिसेल तितक्या वर्षांनीं फल होईल. तें फल केतु दृष्टिगोचर झाल्यापासून ४५ दिवसांपुढें महिने किंवा वर्षे जाणावीं ७.

ऱ्हस्वस्तनुः प्रसन्नः स्निग्धस्त्वृजुरचिरसंस्थितः शुक्लः ।
उदितो वाप्यभिवृष्टः सुभिक्षसौख्यावहः केतुः ॥ ८ ॥

अर्थ—ऱ्हस्व ( आंखूड ), तनु ( जड ), निर्मल, स्निग्ध ( आर्द्र ), सरळ, थोडा वेळ राहणारा, श्वेत वर्ण, ज्याचा उदय झाला असतां पर्जन्य पडतो असा केतु सुभिक्ष व सौख्य यांतें करणारा होय. ८.

उक्तविपरीतरूपो न शुभकरो धूमकेतुरुत्पन्नः
इंद्रायुधानुकारी विशेषतो द्वित्रिचूलो वा ॥ ९ ॥

अर्थ—पूर्वोक्ताहून, विपरीतस्वरूप उत्पन्न जो केतु, तो शुभ नव्हे, व इंद्रधनुष्यासारखा अशुभ होय, दोन शिखेचा किंवा तीन शिखेचा विशेषेंकरून अशुभ होय. ९.

हारमणिहेमरूपः किरणाख्याः पंचविंशतिः सशिखाः ।
प्रागपरदिशोर्दृश्या नृपतिविरोधावहा रविजाः ॥ १० ॥

अर्थ—हार ( मोत्यांचा ) चंद्रकांतादि मणि, सुवर्ण, यां सारख्या रूपांचे शिखायुक्त जे केतु, ते किरण संज्ञक सूर्यापासून उत्पन्न झाले असून पंचवीस आहेत. त्यांतून एकच दृष्टिगोचर होतो तो पूर्वेस किंवा पश्चिमेस दिसतो. तो दिसला असतां राजांस विरोधावह ( अशुभ ) होतो. १०.

शुकदहनबंधुजीवकलाक्षाक्षतजोपमाहुताशसुताः ।
आग्नेय्यां दृश्यंते तावंतस्तेऽपि शिखिभयदाः ॥ ११ ॥

अर्थ—कीर, अग्नि, दुपारीचें पुष्प ( अति तांबडें ), लाख, रक्त यांसारखे आग्नेयीस दिसणारे पंचवीसच आग्निपुत्र धूमकेतु दृष्टिगोचर झाले तर अग्नीपासून भय होतें. त्यांतून एकच दृष्टिगोचर होतो हें सर्वत्र जाणावें. ११.

वक्रशिखामृत्युसुतारूक्षाः कृष्णाश्च तेऽपि तावंतः ।
दृश्यंते याम्यायां जनमरकावेदिनस्ते च ॥ १२ ॥

अर्थ—वांकड्या शिखांचे, रखरखीत, कृष्णवर्ण असे मृत्युपुत्र पंचवीस केतु आहेत, ते दक्षिण दिशेकडे दिसतात, तेही लोकांस मृत्युकारक होत. १२.

दर्पणवृत्ताकारा विशिखाः किरणान्विता धरातनयाः ।
क्षुद्भयदा द्वाविंशतिरैशान्यामंबुतैलनिभाः ॥ १३ ॥

अर्थ—आरशासारखे वर्तुळ, शिखारहित, किरणयुक्त असे २२ केतु भूमिपुत्र उदक व तेल यांसारख्या वर्णांचे ईशानी दिशेस दिसतात ते दुर्भिक्ष करणारे होत १३.

शशिकिरणरजतहिमकुमुदकुंदकुसुमोपमाः सुताः शशिनः ।
उत्तरतो दृश्यंते त्रयः सुभिक्षावहाः शिखिनः ॥ १४ ॥

अर्थ-चंद्रकिरण, रुपें, बर्फ, कमल, कुंदपुष्प यांच्या वर्णासारखे तीन चंद्रपुत्र केतु उत्तरेस दिसतात, ते सुभिक्ष करणारे होत १४.

ब्रह्मसुत एक एव त्रिशिखो वर्णैस्त्रिभिर्युगांतकरः ।
अनियतदिक् संप्रभवो विज्ञेयो ब्रह्मदंडाख्यः ॥ १५ ॥

अर्थ—तीन शिखांचा व तीन वर्णांचा ब्रह्म पुत्र ब्रह्मदंड नामक सर्व दिशेस दिसणारा असा केतु एकच आहे, तो युगांत ( प्रलय ) करणारा होय. १५.

शतमभिहितमेकसमेतमेतदेकेन विरहितान्यस्मात् ॥
कथयिष्ये केतूनां शतानि नव लक्षणैः स्पष्टैः ॥ १६ ॥

अर्थः—केतूंचें एकाधिकशत १०१ सांगितलें. त्यानंतर केतूंची एकोन नऊ शतें ८९९ स्पष्ट लक्षणांहीं सांगतों. १६.

सौम्यैशान्योरुदयं शुक्रसुता यांति चतुरशीत्याख्याः ॥
विपुलसिततारकास्ते स्निग्धाश्च भवंति तीव्रकलाः ॥ १७ ॥

अर्थः—शुक्र पुत्र ८४ केतु उत्तर व ईशानी या दिशांस उदय पावतात. ते विस्तीर्ण, शुभ्रतारांचे व निर्मल असे दृष्टिगोचर होतात, त्यांपासून अशुभ फल होतें. १७.

स्निग्धाः प्रभासमेता द्विशिखाः षष्टिः शनैश्चरांगरुहाः॥
अतिकष्टफला दृश्याः सर्वत्रैते कनकसंज्ञाः ॥

अर्थः—निर्मल व तेजयुक्त आणि दोन शिखांचे शनैश्चराचे पुत्र साठ, कनकसंज्ञक केतु आहेत, ते सर्व दिशेस दृष्टीस पडतात, त्यांचें अशुभ फल होय. १८.

विकचानाम गुरुसुताः सितैकताराः शिखापरित्यक्ताः ॥
षष्टिः पंचभिरधिकाः स्निग्धायाम्याश्रिताः पापाः ॥ १९ ॥

अर्थ—श्वेत, एकतारा, शिखारहित, निर्मल, विकचनामक पांसष्ट ६५ बृहस्पतिपुत्र केतु दक्षिणेस दिसतात, ते अशुभफलद होत. १९.

नातिव्यक्ताः सूक्ष्मा दीर्घाः शुक्ला यथेष्टदिक्प्रभवाः ॥
बुधजास्तस्करसंज्ञाः पापफलास्त्वेकपंचाशत् ॥२०॥

अर्थ-अस्पष्ट, सूक्ष्म, लांब, श्वेतवर्ण, सर्व दिशेस दिसणारे, तस्करसंज्ञक, बुधाचे पुत्र केतु एकावन्न आहेत, ते अशुभफलद होत. २०.

क्षतजानलानुरूपास्त्रिचूलताराः कुजात्मजाः षष्टिः ॥
नाम्ना च कौंकुमास्ते सौम्याशासंस्थिताः पापाः ॥ २१ ॥

अर्थः--रक्त व अग्नि यांसारखे, तीन शिखांचे, कौंकुमसंज्ञक भौमपुत्र, साठ केतु उत्तरेस दिसतात, ते अशुभ होत. २१.

त्रिंशत्त्र्यधिका राहोस्ते तामसकीलका इति ख्याताः ॥
रविशशिजा दृश्यंते तेषां फलमर्कचारोक्तं ॥ २२ ॥

अर्थ–तेतीस राहूचे पुत्र तामसकीलकसंज्ञक केतु चंद्र सूर्यमंडळीं दिसतात, त्यांचे फल रविचारामध्यें सांगितलें.

विंशत्याधिकमन्यच्छतमग्नेर्विश्वरूपसंज्ञानां ॥
तीव्रानलभयदानां ज्वालामालाकुलतनूनां ॥ २३ ॥

अर्थः--एकशेवीस विश्वरूपसंज्ञक अग्निपुत्र केतु ज्वालांनीं व्याप्त देह, असे आहेत, ते तीव्र अग्निभय देणारे होत. २३.

श्यामारुणा वितारा श्चामररूपा विकीर्णदीधितयः ॥
अरुणाख्या वायोः सप्तसप्ततिः पापदाः परुषाः ॥२४ ॥

अर्थः–श्यामलोहित वर्ण, ताराहित, चंवरीसारखे व पसरलेल्या किरणांचे अरुणसंज्ञक वायुपुत्र रुक्ष असे ७७ केतु आहेत, ते अशुभ होत. २४.

तारापुंजनिकाशा गणकानामप्रजापतेरष्टौ ॥
द्वे च शते चतुरधिके चतुरस्रा ब्रह्मसंतानाः ॥२५॥

अर्थ--नक्षत्रसमुदायासारखे गणक नामक आठ प्रजापतिपुत्र केतु, ते अशुभ होत. दोनशेचार चतुरस्र ( चौकोनी किंवा चतुरस्रनामक ) ब्रह्मपुत्र केतु आहेत ते अशुभ होत. २५.

कंकानाम वरुणजा द्वात्रिंशद्वंशगुल्मसंस्थानाः ॥
शशिवत्प्रभासमेतास्तीव्रफलाः केतवः प्रोक्ताः ॥ २६॥

अर्थ–कंकनामक, वेळूच्या बेटासारखे, चंद्रासारख्या तेजानें युक्त बत्तीस वरुणपुत्र केतु सांगितले, ते तीव्र ( अशुभ ) फलद होत. २६.

षण्णवतिः कालसुताः कबंधसंज्ञाः कबंधसंस्थानाः ॥
चंडाभयप्रदाः स्युर्विरूपताराश्च ते शिखिनः ॥२७॥

अर्थ—छिन्नमस्तक [धड] यासारखे, कबंधसंज्ञक, भयंकर अस्पष्ट तारेचे शाण्णव कालपुत्र केतु आहेत ते भय देणारे होत. ( ज्यास दिशा सांगितली नाहीं ते अनियतादिक् जाणावे. ) २७.

शुक्लविपुलैकतारा नवविदिशां केतवः समुत्पन्नाः ॥
एवं केतुसहस्रं विशेषमेषामतो वक्ष्ये ॥ २८ ॥

अर्थ--श्वेतवर्ण व मोठा एकच तारा आहे ज्यांचा असे, अंतराल दिशेचे पुत्र व आग्नेय्यादि विदिशेमध्यें दिसणारे नऊ केतु आहेत ते दृष्टिगोचर झाले तर भय देणारे होत. या प्रकारें हजार केतु सांगितले. आतां त्यांचाच विशेष सांगतों. २८.

उदगायाते महान् स्निग्धमूर्तिरपरोदयी वसाकेतुः ।
सद्यः करोति मरकं सुभिक्षमप्युत्तमं कुरुते ॥ २९ ॥

अर्थ—उत्तर दिशेस दीर्घ, अतिस्थूल स्वच्छ, पश्चिमेस उदय पावणारा वसासंज्ञक केतु पाहिला असतां त्याच दिवशीं महामारी इत्यादि रोग उद्भवतात व उत्तम सुभिक्षही होतें.

तल्लक्षणेऽस्थिकेतुः स तु रूक्षः क्षुद्भयावहः प्रोक्तः ॥
स्निग्धस्तादृक् प्राच्यां शस्त्राख्यो डमरमरकाय ॥ ३० ॥

अर्थ—अस्थिकेतु नामक केतु वसाकेतूच्या लक्षणांनीं युक्त व रुक्ष ( रखरखीत ) दुर्भिक्षकारक होय. वसाकेतूसारखाच निर्मल देह, पूर्वेस दिसणारा शस्त्रकेतु संज्ञक केतु, युद्ध (शस्त्रकलह) व महामारी करणारा होय.

दृश्योऽमावास्यायां कपालकेतुः सधूम्ररश्मिशिखः ॥
प्राङ्नभसोऽर्धविचारीक्षुन्मरकावृष्टिरोगकरः ॥ ३१ ॥

अर्थ—धूम्रवर्ण शिखांचा कपालकेतु अमावास्येस पूर्व दिशेकडे आकाशाच्या अर्धामध्यें दृष्टिगोचर होतो. दुर्भिक्ष, महामारी, अवर्षण, व रोग यांते करतो. ३१.

प्राग्वैश्वानरमार्गे शूलाग्रः श्यावरूक्षताम्रार्चिः ।
नभसस्त्रिभगामी रौद्र इति कपालतुल्यफलः ॥ ३२ ॥

अर्थ—पूर्वेकडे अग्निवीथिन [ पूर्वाषाढा-उत्तराषाढा यांसमीप ] शूलाकृति ( त्रिशिख ), धूम्रवर्ण, रुक्ष व ताम्र आहे कांति ज्याची अशा आणि आकाशाच्या तीन भागांत फिरणारा रौद्रनामक केतु, कपालकेतूसारखेंच [ क्षुन्मारकावृष्टिरोगकर ] फल देतो. ३२.

अपरस्यां चलकेतुः शिखया याम्याग्रयांगुलोच्छ्रितया ॥
गच्छेद्यथा यथोदक् तथा तथा दैर्घ्यमायाति ॥ ३३ ॥
सप्तमुनीन्संस्पृश्य ध्रुवमभिजितमेव च प्रतिनिवृत्तः ॥
नभसोऽर्धमात्रमित्वा याम्येनास्तं समुपयाति ॥ ३४ ॥
हन्यात्प्रयागकूलाद्यावदवन्तीं च पुष्करारण्यं ।
उदगपि च देविकामपि भूयिष्टं मध्यदेशाख्यं ॥३५॥
अन्यानपि च सदेशान् क्वचित् क्वचिद्धंति रोगदुर्भिक्षैः ।
दशमासान्फलपाकोऽस्य कैश्चिदष्टादशप्रोक्तः ॥३६॥

अर्थ—चलकेतु, पश्चिम दिशेस एक अंगुल उंच व दक्षिणेकडे अग्र अशा शिखीनें युक्त दिसतो, तो जसजसा उत्तरेकडे जाईल तसतसा लांब होतो आणि तो सप्तऋषींस, ध्रुवास व अभिजित् नक्षत्रास स्पर्श करून मागें फिरतो. आणि आकाशाच्या अर्ध्या भागांत जाऊन दक्षिणेस अदर्शन ( अस्त ) पावतो तो चलकेतु प्रयागाच्या तीरापासून अवंतिका नामक नदीपर्यंत, पुष्कर नामक अरण्य, व उत्तर दिशेकडे देविका नामक नदी व मोठा मध्यदेश यांचा. ३५. व अन्य देशांचाही रोग व दुर्भिक्ष यांहीं करून कोठें कोठें नाश करतो. या चलकेतूच्या फलाचा अनुभव दहा महिन्यांनीं येतो. कोणी गर्गादि मुनींनीं १८ महिन्यांनीं येतो असें सांगितलें आहे. ३३—३६.

प्रागर्धरात्रदृश्यो याम्याग्रः श्वेतकेतुरन्यश्च ।
क इति युगाकृतिरपरे युगपत्तौ सप्तदिनदृश्यौ ॥ ३७ ॥
स्निग्धौ सुभिक्षशिवदावथाधिकं दृश्यते कनामा यः ।
दशवर्षाण्युपतापं जनयति शस्त्रप्रकोपकृतं ॥३८॥

अर्थ—दक्षिण दिशेस शिखा असा श्वेतकेतुनामक केतु, मध्यरात्रीच्या पूर्वी दिसतो व दुसरा क नामक केतु, युग [ जोखड ] यासारखा पश्चिमेस दिसतो हे दोन्ही एककालीं सात दिवस दृष्टीस पडतात. ३७. ते

स्निग्ध ( अति निर्मल ) सुभिक्ष व कल्याण करणारे होत. कदाचित् जो क नामक केतु तो अधिक दिवस दृष्टीस पडेल तर दहा वर्षेपर्यंत युद्धकृत दुःख होईल. ३८.

श्वेत इति जटाकारो रूक्षः श्यावो वियत्त्रिभागगतः ।
विनिवर्ततेऽपसव्यं त्रिभागशेषाः प्रजाः कुरुते ॥३९॥

अर्थः—श्वेत नामक केतु जटाकार, रुक्ष, ( रखरखीत ) धूम्रवर्ण, आकाशाच्या ३ भागांत फिरणारा होय. तो जर अपसव्य फिरेल, तर तिसरा हिस्सा प्रजा राहील [ प्रजांच्या दोन भागांचा नाश करील ] ३९.

आधूम्रया तु शिखया दर्शनमायाति कृत्तिकासंस्थः ।
ज्ञेयः स रश्मिकेतुः श्वेतसमानं फलं धत्ते ॥४०॥

अर्थः—स्वल्पधूम्रवर्ण शिखेनें दृष्टीस पडणारा व कृत्तिकानक्षत्राजवळ राहणारा असा रश्मिकेतु पूर्वोक्त श्वेतासारखें फल [ तिसरा हिस्सा प्रजा शेष राहणें ] देतो. ४०.

ध्रुवकेतुरनियतगतिप्रमाणवर्णाकृतिर्भवति विष्वक् ।
दिव्यांतरिक्षभौमे भवत्ययं स्निग्ध इष्टफलः ॥४१॥

सेनांगेषु नृपाणां गृहतरुशैलेषु चापि देशानां ।
गृहिणामुपस्करेषु च विनाशिनां दर्शनं याति ॥४२॥

अर्थः—ध्रुवकेतुसंज्ञक केतु, गमन, प्रमाण, ( स्थूलसूक्ष्मादि ) श्वेतादि वर्ण व आकृति यांहींकरून अनिश्चित व आसमंतात् [ सर्वत्र ] होणारा होय. हा दिव्य, अंतरिक्ष व भौम असा होतो. हा स्निग्ध ( निर्मल ) व शुभ फल देणारा होय. ४१. हा ध्रुवकेतु नाश पावणाऱ्या राजांच्या सेनांगांत [ गज, वाजी, रथ, पदाति ] व नाश पावणारे देशांतील गृहें, वृक्ष, पर्वत यांवर व गृहस्थांच्या दर्वी, शूर्प, मार्जनी इत्यादिकांच्या ठायीं दृष्टीस पडतो. ४२. म्हणजे ज्या स्थळीं हा दिसतो तेथें नाश होतो.

कुमुद इति कुमुदकांतिर्वारुण्यां प्राक्शिखो निशामेकां ॥
दृष्टः सुभिक्षमतुलं दश किल वर्षाणि स करोति ॥४३॥

अर्थ—कुमुदनामक केतु श्वेतवर्ण, पश्चिमेकडे पूर्वशिख असा एक रात्र दृष्टीस पडतो, तो दृष्टीस पडेल तर दहा वर्षे बहुत सुभिक्ष होईल. ४३.

सकृदेकयामदृश्यः सुसूक्ष्मतारोपरेण मणिकेतुः ।
ऋज्वी शिखास्य शुक्ला स्तनोद्गता क्षीरधारेव ॥४४॥

उदयन्नेव सुभिक्षं चतुरो मासान् करोत्यसौ सार्धान् ।
प्रादुर्भावं प्रायः करोति च क्षुद्रजंतूनां ॥४५॥

अर्थः—मणिकेतु नामक केतु, पश्चिमेकडे एक प्रहरपर्यंत एकदां दिसणारा, अतिसूक्ष्म तारा जसा स्तनांतून निघालेल्या दुधाच्या धारा तसा व सरळ आणि श्वेत शिखेच होय. ४४. याचा उदय झाला असतां साडेचार महिने सुभिक्ष होतें व क्षुद्रजंतु ( नकुलादिक ) यांचा प्रादुर्भावहि [ उत्पत्ति ] होतो. ४५.

जलकेतुरपि च पश्चात्स्निग्धः शिखयापरेण चोन्नतया ।
नवमासान्स सुभिक्षं करोति शांतिं च लोकस्य ॥४६॥

अर्थ—पश्चिमेकडे उंच अशा शिखेचा निर्मल देह असा जलकेतु नामक केतु पश्चिमेकडे दृष्टिगोचर होतो. तो दृष्टीस पडला तर नऊ महिने सुभिक्ष करितो व लोकांचें कल्याणही करितो. ४६.

भवकेतुरेकरात्रं दृश्यः प्राक् सूक्ष्मतारकः स्निग्धः ।
हरिलांगूलोपमया प्रदक्षिणावर्तया शिखया ॥४७॥
यावत एव मुहूर्तान् दर्शनमायाति निर्दिशेन्मासान् ।
तावदतुलं सुभिक्षं रूक्षे प्राणांतिकान् रोगान् ॥४८॥

अर्थः--पूर्वदिशेस एक रात्र दिसणारा, निर्मल देह, सिंहाच्या पुच्छासारखी व प्रदक्षिण फिरलेल्या शिखेनें युक्त असा भवकेतु नामक केतु जितके मुहूर्त ( दोन घटिकेचा एक ) दृष्टीस पडेल तितके महिने बहुत सुभिक्ष होईल व तोच केतु रुक्ष ( रखरखीत ) असेल तर प्राणनाशक रोग होतील ४७।४८.

अपरेण पद्मकेतुर्मृणालगौरो भवेन्निशामेकां
सप्तकरोति सुभिक्षं वर्षाण्यतिहर्षयुक्तानि ॥ ४९ ॥

अर्थ--श्वेतवर्ण पद्मकेतु नामक केतु पश्चिमेकडे एक रात्र दृष्टीस पडतो, तो सात वर्षे सुभिक्ष करून हर्षित करितो. ४९.

आवर्त इति निशार्धे सव्यशिखोरुणनिभो परे स्निग्धः ।
यावत्क्षणान् सदृश्यस्तावन्मासान्सुभिक्षकरः ॥५०॥

अर्थ--निर्मल देह, आरक्त, सव्यशिख, असा आवर्तनामक केतु, मध्यरात्रीस दृष्टीस पडतो. तो जितके मुहूर्त दृष्टीस पडतो तितके महिने सुभिक्ष करितो. ५०.

पश्चात्संध्याकाले संवर्तो नाम धूम्रताम्रशिखः ।
आक्रम्य वियत्त्र्यंशं शूलाग्रावस्थितो रौद्रः ॥५१॥
यावत एव मुहूर्तान् दृश्यो वर्षाणि हंति तावन्ति ।
भूपाञ्छत्रनिपातैरुदयर्क्षं चापि पीडयति ॥५२॥

अर्थ--धूम्रवर्ण असून तांबड्या शिखांचा, आकाशाचा तिसरा भाग व्यापून राहणारा, शूलाग्रासारखा [ त्रिशिख ] भयंकर असा संवर्तनामक केतु संध्याकाळीं पश्चिमेकडे जितके मुहूर्त दृष्टीस पडतो, तितकीं वर्षे युद्धांनीं राजांचा नाश करतो व ज्या नक्षत्रीं उदय होतो तें नक्षत्र दूषित होतें. ५१।५२.

ये शस्तास्तान् हित्वा केतुभिराधूमितेऽथवा स्पृष्टे ॥
नक्षत्रे भवति वधो येषां राज्ञां प्रवक्ष्ये तान् ॥५३॥

अर्थ--जे शुभ केतु त्यांतें सोडून अशुभ केतूंनीं आधूमित ( त्यांजवर शिखा गेलेलीं ) अथवा स्पृष्ट ( धूम्र केतूच्या शिखा नक्षत्रास लागलेल्या ) अशीं अश्विन्यादि नक्षत्रें असतां कोणतें नक्षत्र स्पृष्ट अ० कोणत्या राजांचा नाश होईल तो प्रकार पुढें सांगतों. ५३.

अश्विन्यामश्मकपं भरणीषु किरात पार्थिवं हन्यात् ।
बहुलासु कलिंगेशं रोहिण्यां शूरसेनपतिं ॥ ५४ ॥

अर्थ--अशुभ केतूनें अश्विनी न० आधूमित किंवा स्पृष्ट अ० अश्मक ( सूर्य वंशांतील ) राजाचा नाश होतो. भरणी न० अ० किरात राजाचा नाश. कृतिका न० अ० कलिंग राजाचा नाश. रोहिणी न० अ० शूरसेन राजाचा नाश होतो. ५४.

औशीनरमपि सौम्ये जलजाजीवाधिपं तथार्द्रासु ।
आदित्येश्मकनाथं पुष्ये मगधाधिपं हंति ॥ ५५ ॥

अर्थः--मृगशीर्ष नक्षत्र अशुभ केतूनें धूमित किंवा स्पृष्ट असतां उशीनर देशाच्या राजाचा नाश होतो. आर्द्रा नक्षत्र असतां मल्लादि जलज प्राण्यांवर वांचणारे जे प्राग्देशवासी लोक त्यांच्या राजाचा नाश होतो. पुनर्वसु नक्षत्र असतां अश्मक राजाचा नाश होतो. पुष्य नक्षत्र असतां मगधदेशाच्या राजाचा नाश होतो.

असिकेशं भौजंगेपित्र्येंगं पांड्यनाथमपि भाग्ये ।
औज्जयनिकमार्यम्णे सावित्रे दंडकाधिपतिं ॥ ५६ ॥

अर्थः-आश्लेषा नक्षत्र असतां अश्मिक राजाचा नाश होतो. मघा नक्षत्र असतां अंग देशाच्या राजाचा नाश होतो. पूर्वा नक्षत्र असतां पांड्य देशाच्या राजाचा नाश होतो. उत्तरा नक्षत्र असतां उज्जयनीच्या राजाचा नाश होतो. हस्त नक्षत्र असतां दंडकारण्याच्या राजाचा नाश होतो. ५६.

चित्रासु कुरुक्षेत्राधिपस्य मरणं समादिशेत्तज्ज्ञः ।
काश्मीरककांबोजौ नृपती प्राभंजने न स्तः ॥५७ ॥

अर्थ--चित्रा नक्षत्रास असतां कुरुक्षेत्राच्या राजास मरण, केतुफल जाणणारानें सांगावें. स्वाती नक्षत्रास असतां काश्मीर कांबोज देशांचे राजे नाहींसे होतात. ५७.

इक्ष्वाकुरलकनाथौ हन्येते यदि भवेद्विशाखासु ।
मैत्रे पुंड्राधिपतिर्ज्येष्ठास्वथसार्वभौमवधः ॥ ५८ ॥

अर्थ---विशाखा नक्षत्रीं स्पृष्ट असतां इक्ष्वाकु राजाच्या व अलका नगरीचा राजा यांचा नाश होतो अनुराधा नक्षत्रीं असतां पुंड्र देशाच्या राजाचा नाश होतो. ज्येष्ठा नक्षत्रीं असतां सार्वभौम राजाचा नाश होतो. ५८.

मूलेंऽध्रमद्रकपती जलदेवे काशिपो मरणमेति ।
यौधेयकार्जुनायनशिबिचैद्यान् वैश्वदेवे च ॥ ५९ ॥

अर्थः--मूल नक्षत्र केतूनें आधूमित किंवा स्पृष्ट असतां आंध्र व मद्र या देशांच्या राजांचा नाश होतो. पूर्वाषाढा नक्षत्रीं असतां, काशिराजाचा नाश होतो. उत्तराषाढा नक्षत्रीं असतां यौधेयक, आर्जुनायन, शिबि, चैद्य या राजांचा नाश होतो. ५९.

हन्यात्कैकयनाथं पांचनदं सिंहलाधिपं वांगं ।
नैमिषनृपं किरातं श्रवणादिषु षट्स्विमान् क्रमशः ॥ ६० ॥

अर्थः—श्रवण नक्षत्रीं असतां कैकय राजाचा. धनिष्ठा नक्षत्रीं असतां पांचनद राजाचा, शततारका नक्षत्रीं असतां सिंहल देशाच्या राजाचा पूर्वाभाद्रपदा नक्षत्रीं अंगदेशाच्या राजाचा, उत्तराभाद्रपदा नक्षत्रीं अ. नैमिषारण्याच्या राजाचा, रेवती नक्षत्र अशुभ केतूनें आधूमित किंवा स्पृष्ट असतां किरात देशाच्या राजाचा नाश होतो. ६०.

उल्काभिताडितशिखः शिखी शिवः शिवतरोऽभिवृष्टो यः ॥
अशुभ स एव चोलावगाणसितहूणचीनानां ॥ ६१ ॥

अर्थ--उल्केनें [ आकाशातून तेजरूप तारा पडतो तो ] ताडित आहेत शिखा ज्याच्या असा केतु शुभ होय व जो दृष्टीस पडतांच वृष्टि होते तो तर अतिशुभ होय. पूर्वोक्तच केतु चोल, अवगाण, सित, हूण, [जंगल प्रदेश ] चीन या देशच्या लोकांस अशुभ होय. ६१.

यत्रायतः शिखि शिखाभिसृतायतो वा ऋक्षं च यत्स्पृशति तत्कथितांश्च देशान्
दिव्यप्रभावनिहतान् स यथा गरुत्मान् भुंक्ते गतो नरपतिः परभोगि भोगान् ॥ ६२ ॥

**अर्थः**--ज्या दिशेकडे केतूच्या शिखा नम्र झाल्या किंवा ज्या दिशेस गेल्या त्या दिशेकडे गेलेला किंवा केतुशिखांनीं ज्या नक्षत्रास स्पर्श केला त्या नक्षत्राच्या वक्ष्यमाण देशांकडे गेलेला राजा उत्तम पराक्रमानें शत्रू मारून देशातें उपभोगितो. जसा गरुड उद्धट सर्पाच्या देहातें खातो तसा शत्रूस मारून राज्य भोगितो. ६२.

---

# अथ अगस्त्यचारः ।

भानोर्वर्त्मविघातवृद्धशिखरो विंध्याचलः स्तंभितो ।
वातापिर्मुनिकुक्षिभित्सुररिपुर्जीर्णश्चयेनासुरः ॥
पीतश्चांबुनिधिस्तपोऽबुनिधिना याम्या च दिग्भूषिता ।
तस्यागस्त्यमुनेः पयोद्युतिकृतश्चारः समासादयं ॥ १ ॥

**अर्थः**--सूर्याच्या मार्गाचा अवरोध करण्याकरितां वाढलीं आहेत शिखरें ज्याचीं असा जो विंध्यपर्वत तो ज्याणें पूर्ववत् केला असा व ऋषींच्या पोटांत शिरून पोटें फोडणारा, देवांचा शत्रु जो वातापि नामक दैत्य तोही ज्याणें पोटांत जिरवला असा व समुद्र ज्याणें प्राशन केला असा तपाचा केवळ समुद्र असा व ज्याणें दक्षिण दिशा सुशोभित केली असा व उदकें स्वच्छ करणारा असा जो अगस्त्य ऋषि त्याचा चार सांगतों.. १.

समुद्रोऽतः शैलैर्मकरनखरोत्खातशिखरैः ।
कृतस्तोयोच्छित्या सपदि सुतरां येन रुचिरः ।
पतन्मुक्तामिश्रैः प्रवरमणिरत्नांबुनिवहैः ।
सुरान्प्रत्यादेष्टुं मितमुकुटरत्नानिव पुरा ॥ २ ॥

**अर्थः**--ज्या अगस्त्य मुनीनें, उदकाच्या नाशेंकरून मकर ( सुसर ) यांचीं नखें त्यांहींकरून उकरलीं आहेत, शिखरें ज्यांचीं असे जे इंद्रभयानें आंत रहाणारे मैनाकादिक पर्वत त्यांहींकरून समुद्र तत्काल अत्यंत सुंदर केला त्या ऋषीचा उदय श्रवण करा असा सहाव्या श्लोकीं संबंध आहे. जो समुद्र पतन पावणाऱ्या मौक्तिकांनीं मिश्रित असे जे श्रेष्ठमणि, रत्नें, व उदकसमुदाय त्यांहींकरून परिमित आहेत मुकुटसंबंधी रत्नें, ज्यांचा अशा देवांप्रत सांगावयाकारणेंच काय जाता झाला.

येन चांबुहरणेऽपि विद्रुमैर्भूधरैः सगणिरत्नविद्रुमैः ।
निर्गतैस्तदुरगैश्च राजितः सागरोधिकतरं विराजितः ॥ ३

**अर्थः**--ज्या मुनीनें हरण केलें असतांही वृक्षरहित पर्वतांहींकरून व मणि, रत्नें, पोंवळीं यांहींसहित पंक्तिशः बाहेर निघालेले जे पर्वतातील सर्प त्यांहींकरून समुद्र फारच शोभूं लागला.

प्रस्फुरत्तिमिजलेभजिह्मगः क्षिप्तरत्ननिकरो महोदधिः ।
आपदां पदगतोऽपि यापितो येन पीतसलिलोऽमरश्रियं ॥ ४ ॥

**अर्थः**--ज्या मुनीनें प्यालें आहे उदक ज्याचें असा व विपत्तीप्रत पावलेला असाही जो समुद्र त्यास देवांची लक्ष्मी ( शोभा ) दिली. तो समुद्र कसा हालणारे मत्स्य जलहस्ति व सर्प हे ज्यांत आहेत असा व पसरला आहे रत्न समुदाय ज्यामध्यें असा, देव लक्ष्मी [ शोभा ] कशी. तेजस्वी, मत्स्य जल, गज, कुटिल, यांहीं गमन करणारे. कोणी मत्स्यग, जलग, [ नारायण ] गजग, [ इंद्र ] कुटिलगति [ भौमादि ग्रह ]

यांहीं युक्त व क्षिप्त [ पसरलें ] आहेत रत्नसमुदाय, जीमध्यें अशी देवांची लक्ष्मी तिची शोभा समुद्रास आणिली. ४.

प्रचलत्तिमिशुक्तिजशंखचितः सलिलेऽपहृतेऽपि पतिः सरितां ।
सतरंगसितोत्पलहंसभृतः सरसः शरदीव बिभर्ति रुचं ॥ ५ ॥

**अर्थ**—चलन पावणारे मत्स्य, शिंपींतले जीव व शंख यांहीं व्याप्त असा समुद्र ऋषीनें उदक हरण केलें असतांही तरंगांनीं सहित जीं श्वेतकमलें, व हंस यांतें धारण करणाऱ्या सरोवराच्या शरदृतूंतील शोभेतें धारण करिता झाला. ५.

तिमिसितांबुधरं मणितारकं स्फटिकचंद्रमनंबुशरद्द्युति ।
फणिफणोपलरश्मिशिखिग्रहं कुटिलगेशवियच्च चकार यः ॥ ६ ॥

**अर्थ**—जो मुनी समुद्रच आकाश करिता झाला. तो समुद्र व आकाश कसें? मत्स्य हेच श्वेतमेघ, मणि हेच नक्षत्रें, स्फटिक हेच चंद्र, उदकाभाव हीच शरदृतूची कांति, सर्पांच्या फणांतील मण्यांचें किरण हेच केतुग्रह अशा प्रकारचें केलें. ६.

दिनकररथमार्गविच्छित्तयेऽभ्युद्यतं यच्चलच्छृंगं उद्भ्रांतविद्याधरां-
सावसक्तप्रियाव्यग्रदत्तांकदेहावलंबांबराभ्युच्छ्रितोद्धूयमानध्वजैः शोभितं ।
करिकटमदमिश्ररक्तावलेहानुवासानुसारिद्विरेफावलीनोत्तमांगैः
कृतान्वाणपुष्पैरिवोत्तंसकान्धारयद्भिर्मृगेंद्रैः सनाथीकृतांतर्दरीनिर्झरं ॥
गगनतलमिवोल्लिखंतं प्रवृद्धैर्गजाकृष्टफुल्लद्रुमत्रासविभ्रांतमत्त-
द्विरेफावलीगीतमंद्रस्वनैः शैलकूटैस्तरक्षर्क्षशार्दूलमृगाध्यासितैः ।
रहसि मदनसक्तया रेवया कांतयेवोपगूढं सुराध्यासितोद्यानमंभोशना-
न्नमूलानिलाहारविप्रान्वितं विंध्यमस्तंभयद्यश्च तस्योदयः श्रूयताम् ॥ ७ ॥

**अर्थः**—सूर्याच्या रथाचा मार्ग बंद करण्याकरितां उद्युक्त झालें आहे चंचल शिखर ज्याचें असा, घाबरलेल्या विद्याधरांच्या [ देवयोनि ] बाहूंच्याठायीं संलग्न झालेल्या ज्या स्त्रिया त्यांहींकरून घाबरून मांडीवर बसलेल्या देहांवरचीं वस्त्रें तींच उंच व कंपित जे ध्वज त्यांहीं करून शोभायमान असा, हत्तींच्या गंडस्थळांतील जो मद त्यांणें मिश्र जें रक्त त्याचें जें चाटणें त्याच्या सुगंधाचें अनुसरण करणारे जे भ्रमर त्यांहीं आश्रयलीं आहेत मस्तकें ज्यांचीं असे व निळ्या कोरांट्यांच्या पुष्पांनीं केलेलींच काय जीं शिरोभूषणें त्यांतें धारण करणारे असे जे सिंह त्यांहीं युक्त आहेत गुहेंतले पाझर ज्याचे असा, हत्तींनीं ओढवलेले जे फुललेले वृक्ष त्यांहीं त्रासलेले व भ्रमिस्त झालेले व उन्मत्त जे भ्रमर त्यांच्या समुदायाच्या गाण्याचा आहे सुंदर शब्द ज्यांच्याठाईं अशीं, तरस आस्वल, व्याघ्र, वानर, यांहीं अधिष्ठित ( हे ज्यांवर आहेत ) अशीं व वाढलेलीं जीं पर्वतांचीं शिखरें त्यांहीं करून आकाशतलाप्रत रेघा काढतोच काय असा, एकांत स्थलीं कामासक्त जी नर्मदा नदी तिणें स्त्रीप्रमाणेंच काय आलिंगित असा, देवांनीं आश्रित आहेत बागा ज्याच्या असा व उदक भक्षण करणारे, अन्न न खाणारे, मुळें व वायु यांतें भक्षण करणारे असे जे ब्राह्मण ( ऋषि ) यांहीं युक्त असा जो विंध्यपर्वत त्यातें जो स्तंभन करिता झाला. त्या अगस्त्य ऋषीचा उदय श्रवण करावा. ७

उदये च मुनेरगस्त्यनाम्नः कुसमायोगमलप्रदूषितानि ।
हृदयानि सतामिव स्वभावात्पुनरंबूनि भवंति निर्मलानि ॥ ८ ॥

**अर्थ**–अगस्त्य नामक ऋषीचा उदय झाला असतां ( दर्शन झालें असतां ) भूमीच्या योगानें झालेला जो मळ त्याणें दूषित [ गढूळ ] अशीं जीं उदकें तीं पुनः स्वभावानेंच स्वच्छ होतात. कोणासारखीं ? दुष्टांच्या

योगानें जें पाप त्याणें दूषित झालेलीं चित्तें तीं साधूंच्या दर्शनानें जशीं निष्पाप होतात तशीं उदकें स्वच्छ होतात. ८.

पार्श्वद्वयाधिष्ठितचक्रवाकामापुष्णती सस्वनहंसपंक्तिं ।
तांबूलरक्तोत्कषिताग्रदंती विभाति योषेव सरित्सहासा ॥ ९ ॥

**अर्थ**–दोहों बाजूंस बसले आहेत चक्रवाक पक्षी जिच्या अशी जी शब्द करणारी हंसांची पंक्ति तीतें धारण करणारी अशी नदी, तांबूलानें आरक्त झालेले आहेत पुढील दंत जिचे अशी जी हास्ययुक्त स्त्री तिचेपरी शोभती झाली. ९.

इंदीवरासन्नसितोत्पलान्विता सरिद्भ्रमत्षट्पदपंक्तिभूषिता ।
सभ्रूलताक्षेपकटाक्षवीक्षणा विदग्धयोषेव विभाति सस्मरा ॥ १० ॥

**अर्थ**–नीलकमलें ज्यांजवळ आहेत अशीं जीं शुभ्र कमलें त्यांहीं युक्त व फिरणारी जी भ्रमरांची पंक्ती तिणें सुशोभित अशी नदी, भिंवया फिरवून वक्रदृष्टीनें पाहणारी जी कामयुक्त प्रौढ स्त्री तिचेपरी शोभती झाली. १०.

इंदोः पयोदविगमोपहितां विभूतिं द्रष्टुं तरंगवलया कुमुदं निशासु ।
उन्मीलयत्यलिनि लीनदलं सुपक्ष्मवापीविलोचनमिवासिततारकांतं ॥ ११ ॥

**अर्थ**—तरंग हेच आहेत वलयें ( हस्त भूषणें ) जिला अशी वापी ( रुंद विहीर ) मेघांच्या गमनानें प्राप्त झालेली अशी चंद्राची शोभा पहावयाकारणें रात्रीस भ्रमर ज्यामध्यें लीन झाले अशीं आहेत पत्रें ज्यांचीं असे व सुंदर आहे पत्र ज्यांचें असें व काळे आहेत नेत्रांतील बुब्बुळ ज्यांचे असें जें कुमुद [ चंद्र विकासी कमल ] त्यातें नेत्रासारखेंच काय उघडिती झाली ( अगस्त्युदय झाला म्हणजे कुमुदें फुलतात ). ११.

नानाविचित्रांबुजहंसकोककारंडवापूर्णतडागहस्ताः ।
रत्नैः प्रभूतैः कुसुमैः फलैश्च भूर्यच्छतीवार्घमगस्त्यनाम्ने ॥ १२ ॥

**अर्थ**–नाना प्रकारच्या अनेक रंगांनीं जीं कमलें व हंस, चक्रवाक, कारंडव हे पक्षी आणि उदकपूर्ण तळीं हेच आहेत हस्त जिचे अशी भूमि बहुत पुष्पें व फलें हींच रत्नें यांहीं करून अगस्त्यनामक ऋषीकारणें अर्घ्य देत्ये अशीच काय शोभती झाली. १२.

सलिलममरपाज्ञयोज्झितं यद्घनपरिवेष्टितमूर्तिभिर्भुजंगैः ॥
फणिजनितविषाग्निसंप्रदुष्टं भवति शिवं तदगस्त्यदर्शनेन ॥ १३ ॥

**अर्थः**––मघांनीं वेष्टित आहेत शरीरें ज्यांचीं असे जे सर्प, त्यांणीं इंद्राच्या आज्ञेनें टाकलेलें असें व सर्पापासून उत्पन्न झालेलें जें विष तोच अग्नि त्याणें दूषित असें जें उदक तें अगस्त्य ऋषीच्या दर्शनानें शुभ [ कल्याणकारक ह्मणजे स्वच्छ ] होतें. १३

स्मरणादपि पापमपाकुरुते किमुतस्तुतिभिर्वरुणांगरुहः ॥
मुनिभिः कथितोस्य यथार्घविधिः कथयामि तथैव नरेंद्रहितं ॥ १४ ॥

**अर्थः**–ज्या अगस्त्य ऋषीच्या स्मरणानेंही पाप जातें मग स्तुतीनें जाईल यांत काय सांगावयाचें. या ऋषीचा अर्घविधि जसा ऋषींनीं सांगितला तसाच राजानांही हितकारक असा सांगतों. १४

संख्याविधानात्प्रतिदेशमस्य विज्ञाय संदर्शनमादिशेज्ज्ञः ॥
तच्चोज्जयन्यामगतस्य कन्यां भागैः स्वराख्यैः स्फुटभास्करस्य ॥ १५ ॥

**अर्थः**–ज्योतिःशास्त्र जाणणारा पंडित गणितानें या अगस्त्य ऋषीचा उदय देशादेशांच्या ठायीं जाणून सांगावा [ज्योतिष्यानें सांगावा ]. तो असा कीं, उज्जयनीमध्यें स्पष्ट सूर्य कन्याराशीस जाण्यास सात अंश कमी असतां ( सिंहसंक्रांतीचे २३ अंश झाले असतां ) अगस्तीचा उदय होतो. १५.

ईषत्प्रभिन्नैररुणरश्मिजालैर्नैशेंऽधकारे दिशि दक्षिणस्यां ॥
सांवत्सरावेदितदिग्विभागे भूपोऽर्घमुर्व्यां प्रयतः प्रयच्छेत् ॥ १६ ॥

अर्थः–अरुणाच्या किरणांनीं रात्रीसंबंधीं अंधकार कांहीं कमी झाला असतां व ज्योतिष्यानें दिग्विभाग दाखविला असतां दक्षिण दिशेस भूमीवर राजानें नम्र होऊन अर्घ्य द्यावें. १६.

कालोद्भवैः सुरभिभिः कुसुमैः फलैश्च रत्नैश्च सागरभवैः कनकांबरैश्च ॥
धेन्वा वृषेण परमान्नयुतैश्च भक्ष्यैर्दध्यक्षतैः सुरभिधूपविलेपनैश्च ॥१७॥

अर्थ–त्या कालीं उत्पन्न झालेलीं व सुगंधी अशीं पुष्पें, फलें, समुद्रांत झालेलीं रत्नें, सुवर्ण, वस्त्रें, गाई, वृषभ, क्षीरयुक्त अन्नें, दधि, अक्षता, सुगंध धूप, व गंध, यांहींकरून अगस्तीची पूजा करावी. १७.

नरपतिरिममर्घं श्रद्दधानो दधानः प्रविगतगददोषो निर्जितारातिपक्षः ॥
भवति यदि च दद्यात्सप्तवर्षाणि सम्यग्जलनिधिरसनायाः स्वामितां याति भूमेः ॥१८॥

अर्थ–राजा, श्रद्धायुक्त होत्साता अर्घ ह्मणजे पूजा करील तर रोग व दोष यांहीं रहित व शत्रु जिंकणारा असा होईल आणि जर या विधीनें हें अर्घ अविच्छिन्न सात वर्षें करील तर तो समुद्रवलयांकित पृथ्वीचा [ सार्वभौम ] राजा होईल. १८.

द्विजो यथालाभमुपाहृतार्घः प्राप्नोति वेदान्प्रमदाश्च पुत्रान् ॥
वैश्यश्च गां भूरि धनं च शूद्रो रोगक्षयं धर्मफलं च सर्वे ॥ १९ ॥

अर्थ–ब्राह्मण जसे पदार्थ मिळतील त्यांणींच जर पूजा करील तर वेद, स्त्रिया, पुत्र, यातें प्राप्त होईल. वैश्य गाईतें व शूद्र बहुत धनातें प्राप्त होतो. ब्राह्मणादि चारही वर्ण रोगनाश व धर्मफल यांतें प्राप्त होतात. १९

रोगान्करोति परुषः कपिलस्त्ववृष्टिं धूम्रो गवामशुभकृत् स्फुरणो भयाय ॥
मांजिष्ठरागसदृशः क्षुधमाहवांश्च कुर्यादणुश्च पुररोधमगस्त्यनामा ॥ २० ॥

अर्थ–तो अगस्त्यनामाऋषि रुक्ष असेल तर रोग करतो. त्याचा पिंगट वर्ण असेल तर अवृष्टि होईल. धूम्रवर्ण असेल तर गाईस अशुभ करील. चंचल असेल तर भय करतो. मांजिष्ठ [ तांबडा ] वर्ण असेल तर दुर्भिक्ष व युद्ध करील. फार बारीक असेल तर नगरास वेष्टन [ वेढा ] करील. २०

शातकुंभसदृशःस्फटिकाभस्तर्पयन्निव महीं किरणौघैः ॥
दृश्यते यदि ततः प्रचुरान्ना भूर्भवत्यभयरोगजनाढ्या ॥ २१ ॥

अर्थः–अगस्त्यऋषीचा सोन्यासारखा व स्फटिकासारखा वर्ण दिसेल व किरण समुदायांनीं पृथ्वीतें पुष्ट करतो काय असा ऋषि जर दिसेल तर बहुत अन्न होईल व निर्भय आणि निरोगी असे लोक होतील. २१.

उल्कया विनिहतः शिखिना वा क्षुद्भयं मरकमेव च धत्ते ॥
दृश्यते स किल हस्तगतेऽर्के रोहिणीमुपगतेऽस्तमुपैति ॥ २२ ॥

अर्थः—उल्का ( आकाशांतून पडणारा अग्निरूप तारा ) व धूमकेतु यांहीं स्पृष्ट अगस्त्यऋषि, दुर्भिक्ष व महामारी यांतें करतो, तो ऋषि हस्त नक्षत्रीं सूर्य असतां दिसतो ( उदय होतो ) आणि रोहिणी नक्षत्रीं सूर्य असतां अस्ताप्रत पावतो, याचे उदयास्त सर्व ठिकाणीं एकाच वेळीं होतात असें नाहीं. स्थलास्थलाचे उदयास्त निरनिराळे आहेत. हे उदयास्त उज्जनीचे आहेत. ग्रहलाघव अस्तोदयाधिकार श्लोक २१ प्रश्न. २२.

---

# अथ सप्तर्षिचारः ।

सैकावलीव राजति ससितोत्पलमालिनी सहासेव ॥
नाथवतीव च दिग्यैः कौबेरीं सप्तभिर्मुनिभिः ॥ १ ॥

अर्थः-उत्तर दिशा ज्या सप्तऋषींनीं नाथवती ( पति युक्त स्त्री ) सारखी शोभत्ये. नाथवती कशी? एकावली ( सौभाग्यसूचक विवाहसमयीं गळेसरी गळ्यांत बांधितात ती ) तिणें युक्तच काय. या सप्तऋषींनीं उत्तरदिशा शोभत्ये १.

ध्रुवनायकोऽपदेशान्नरिनर्तीवोत्तरा भ्रमद्भिश्च ॥
यैश्चारमहं तेषां कथयिष्ये वृद्धगर्गमतात् ॥ २ ॥

अर्थ-फिरणारे जे सप्तऋषि, त्यांहीं करून उत्तरदिशा ध्रुवसंज्ञक नायकाच्या उपदेशानें नाचत्येच काय अशी आहे. त्या सप्तऋषींचा चार गर्गमताप्रमाणें मी सांगतों. २.

आसन्मघासु मुनयः शासति पृथ्वीं युधिष्ठिरे नृपतौ ॥
षड्द्विकपंचद्वियुतः शककालस्तस्य राज्ञश्च ॥ ३ ॥

अर्थ—युधिष्ठिर राजा, राज्य करीत असतां सप्तऋषि, मघानक्षत्रीं होते. त्या राजाचा शककाल १०१२ आहे. षट्द्विक ह्मणजे १२ व पंचद्विक ह्म० १० एकूण १०१२ त्या राजाच्या शकास ह्म० गतकलीस मिळवावे. त्यांस १०० नीं भागावें. भागाकारास २८ नीं भागावें आणि जो शेष अंक राहील तितकीं नक्षत्रें मघांपासून पुढें मोजावीं व त्या नक्षत्रांस ऋषि आहेत असें समजावें. उदाहरण, गतकलि ५०१५+१०१२=६०२७ होतात. त्यांस १००नीं भागिलें. भाग ६० चा लागला. त्यांस २८ नीं भागिलें. बाकी ४ राहिले. व शंभरांची बाकी २७ आहे. मघांपासून ४ नक्षत्रें भुक्त होऊन पांचव्याची २७ वर्षें झालीं आहेत असें समजावें. त्याप्रमाणेंच जवळजवळ सांप्रत सप्तऋषि हस्त नक्षत्रास आहेत. ३.

एकैकस्मिन्नृक्षे शतं शतं ते चरंति ऋक्षाणां ॥
प्रागुत्तरतश्चैते सदोदयंते ससाध्वीकाः ॥ ४ ॥

अर्थ—ते सप्तऋषि एक एक नक्षत्रीं शंभर शंभर वर्षें राहतात. हे ईशानी दिशेस अरुंधतीसहित निरंतर उदयातें पावतात. ४.

पूर्वे भागे भगवान् मरीचिरपरे स्थितो वसिष्ठोऽस्मात् ॥
तस्यांगिरास्ततोऽत्रिस्तस्यासन्नः पुलस्त्यश्च ॥ ५ ॥
पुलहः क्रतुरितिभगवानासन्नानुक्रमेण पूर्वाद्याः ॥
तत्र वसिष्ठं मुनिवरमुपाश्रितारुंधती साध्वी ॥ ६ ॥

अर्थ—पूर्वेकडे भगवान् मरीचिऋषि, त्याचे पश्चिमेस वसिष्ठ, त्याहून पश्चिमेस अंगिरा, त्याहून पश्चिमेस अत्रि, त्याचे जवळ पुलस्त्य, पुलह आणि क्रतु; हे सप्तऋषि ओळीनें पूर्वेपासून राहतात. त्यांत मुनिश्रेष्ठ वसिष्ठाजवळ पतिव्रता अरुंधती आहे. ५-६.

उल्काशनिधूमाद्यैर्हता विवर्णा विरश्मयो ह्रस्वाः ॥
हन्युः स्वं स्वं वर्गं विपुलाः स्निग्धाश्च तद्वृद्ध्यै ॥ ७ ॥

अर्थः-उल्का, अशनि ( वज्र ), धूम, नीहार ( बर्फ ) इत्यादिकेंकरून हत ( आच्छादित ) विवर्ण ( फिक्कट ) किरणरहित शाणि ऱ्हस्व ( बारीक बिंब ) असे ते ऋषि जर असतील तर आपापल्या वक्ष्यमाण वर्गाचा नाश करितात ते विपुल ( मोठें बिंब ) निर्मल असतील तर आपल्या वर्गाची वृद्धि करतात. ७.

गंधर्वदेवदानवमंत्रौषधिसिद्धयक्षनागानां ॥
पीडाकरो मरीचिर्ज्ञेयो विद्याधराणां च ॥ ८ ॥
शकयवनदरदपारदकांबोजांस्तापसान्वनोपेतान् ॥
हंति वसिष्ठोऽभिहतो विवृद्धिदो रश्मिसंपन्नः ॥ ९ ॥

अर्थः--गंधर्व (अश्वमुख नर देवयोनि) देव, दैत्य, मंत्र, औषधि, सिद्ध. यक्ष, सर्प, विद्याधर (देवयोनि) यांस मरीचिऋषि संतप्त असतां पीडा होते, व स्निग्ध आसतां त्यांची वृद्धि होत्ये. हा मरीचि वर्ग ८. शक [ म्लेंच्छ ] यवन, दरद, पारद [ रानटी लोक ], कांबोज [ कंबोज देशांतील लोक ], तपस्वी, बनवासी, यांचा वसिष्ठ तप्त असतां नाश, व किरणयुक्त असतां वृद्धि होत्ये. ९.

अंगिरसो ज्ञानयुता धीमंतो ब्राह्मणाश्च निर्दिष्टाः ॥
अत्रेः कांतारभवा जलजान्यंभोनिधिः सरितः ॥ १० ॥

अर्थ-ज्ञानयुक्त, बुद्धिमान, ब्राह्मण यांस अंगिराऋषि संतप्त व स्निग्ध असतां अशुभ व शुभ होतें. अरण्यांमध्यें झालेले, उदकापासून झालेलीं द्रव्यें, समुद्र व नद्या यांस अत्रीऋषि तप्त असतां दुःख व स्निग्ध असतां सुख होतें. १०.

रक्षः पिशाचदानवदैत्यभुजंगाः स्मृताः पुलस्त्यस्य ॥
पुलहस्य तु मूलफलं क्रतोस्तु यज्ञाः सयज्ञभृतः ॥ ११ ॥

अर्थ—राक्षस, पिशाच, दानव, दैत्य, सर्प, यांस पुलस्त्यऋषि पीडित असतां दुःख व स्निग्ध असतां सुख होतें. मूलें, फलें यांस पुलहऋषि तप्त असतां दुःख व स्निग्ध असतां सुख होतें. यज्ञ व यज्ञ करणारे यांस क्रतुऋषि तप्त असतां दुःख व स्निग्ध असतां सुख होतें. ११.

---

## अथ ग्रहभक्तयः ।

प्राङ्नर्मदार्धशोणोड्रवंगसुह्माः कलिंगवाल्हीकाः ।
शकयवनमगधशबरप्राग्ज्योतिषचीनकांबोजाः ॥ १ ॥
मेकलकिरातविटकावहिरंतः शैलजाः पुलिंदाश्च ।
द्रविडानां प्रागर्धं दक्षिणकूलं च यमुनायाः ॥ २ ॥
चंपोदुंबरकौशांबिचेदिविंध्याटवीकलिंगाश्च ।
पुंड्रागोलांगूलश्रीपर्वतवर्धमानाश्च ॥ ३ ॥
इक्षुमतीत्यथतस्करपारतकांतारगोपबीजानां ।
तुषधान्यकटुकतरुकनकदहनविषसमरशूराणां ॥ ४ ॥

भेषजभिषक्चतुष्पदकृषिकरनृपहिंस्रयायिचौराणां ।
व्यालारण्ययशोयुततीक्ष्णानां भास्करः स्वामी ॥ ५ ॥

अर्थ–नर्मदा नदीचें पूर्वेकडील अर्ध, शोणनद, उंड्र, वंग, सुह्म, कलिंग, बाल्हीक, शक, यवन, मगध, शबर, प्राग्ज्योतिष, चीन, कांबोज, मेकल, किरात, विटक, पर्वतांतील व पर्वतांजवळील देश, पुलिंद, द्रविड देशांचें पूर्वार्ध, यमुनेचें दक्षिणतीर, चंप, उदुंबर, कौशांबी नगरी, विंध्य पर्वताची अटवी [अरण्य], कलिंग, पुंड्र, गोलांगूल [ वानरवि० ], श्रीपर्वत, वर्धमान, इक्षुमती, तस्करदेश, पारतजन, अरण्य, गोप ( गाई राखणारे ) , बीजें, तुषधान्य ( साळी, ), कटुद्रव्य [ मिरी, मिरची इ० ], वृक्ष, सुवर्ण, अग्नि, विष, युद्धकुशल, औषध, वैद्य, पशु, शेतीलोक, राजे, हिंसा करणारे, प्रवाशी, चोर, सर्प, अरण्य [ ओसाड प्रदेश ], यशस्वी, तीक्ष्ण [ निंबादि कडु पदार्थ ], या सर्वांचा सूर्य स्वामी होय. १—५.

गिरिसलिलदुर्गकोशलभरुकच्छसमुद्ररोमकतुषाराः ।
वनवासितंगणहलस्त्रीराज्यमहार्णवद्वीपाः ॥ ६ ॥
मधुररसकुसुमफलसलिललवणमणिशंखमौक्तिकाब्जानां ।
शालियवौषधिगोधूमसोमपाक्रंदविप्राणां ॥ ७ ॥
सितसुभगतुरगरतिकरयुवतिचमूनाथभोज्यवस्त्राणां ।
शृंगिनिशाचरकर्षकयज्ञविदां चाधिपश्चंद्रः ॥८ ॥

अर्थ–गिरिदुर्ग [ डोंगरी किल्ले ], सलिलदुर्ग [पाण्यांतील किल्ले], कोशल, भरुकच्छ, समुद्र, रोमन, तुषार, वनवासी, तंगण, स्त्रीराज्य, महासागर [दक्षिणसमुद्र], द्वीप, मधुररस, पुष्पें, फलें, उदक, लवण, मणि, शंख, मौक्तिक, जलोत्पन्न [ कमलादिक], शाली, यव, औषधि, गहूं, सोमप [ याज्ञिक ], आक्रंद [ शत्रू पाठीस लागलेला असा राजा ], ब्राह्मण, शुभ्र, सर्वजनप्रिय, अश्व, रतिकर ( कामी ), स्त्री, सेनापति, भोज्य [अन्नादि भक्षणीय पदार्थ], वस्त्रें, शृंगारयुक्त प्राणी, निशाचर, शेतीलोक, यज्ञसूत्र जाणणारे, यांचा चंद्र स्वामी होय. ६—८.

शोणस्य नर्मदाया भीमरथायाश्च पश्चिमार्धस्थाः ।
निर्विंध्यावेत्रवतीसिप्रागोदावरीवेणा–॥ ९ ॥
मंदाकिनीपयोष्णीमहानदीसिंधुमालतीपाराः ।
उत्तरपांड्यमहेंद्राविंध्यमलयोपगाश्चोलाः ॥ १० ॥
द्रविडविदेहांध्राश्मकभासापुरकौंकणाः समंत्रिषिकाः ।
कुंतलकेरलदंडककांतिपुरम्लेच्छसंकरजाः ॥ ११ ॥
( नासिक्यभोगवर्धनविराटविंध्याद्रिपार्श्वगादेशाः ।
ये च पिबंति सुतोयां तापीं ये चापि गोमतीसलिलं ॥ १२॥ )
नागरकृषिकरपारतहुताशनार्जीविशस्त्रवार्तानां ।
अटविकदुर्गकर्वटवधकनृशंसावलिप्तानां ॥ १३ ॥
नरपतिकुमारकुंजरदांभिकडिंभाभिघातपशुपानां ।
रक्तफलकुसुमविद्रुमचमूपगुडमद्यतीक्ष्णानां ॥ १४ ॥

कोशभवनाग्निहोत्रिकधात्वाकरशाक्यभिक्षुचौराणां ।
शठदीर्घवैरबव्हाशिनां च वसुधासुतोधिपतिः ॥ १५॥

अर्थ–शोणनद, नर्मदा, भीमरथीनदी यांच्या पश्चिम भागचे देश, निर्विंध्या, वेत्रवती, सिप्रा, गोदावरी, वेणा, गंगा, पयोष्णी, महानदी, सिंधु, मालती, पारा, ह्या सर्व नद्या, उत्तरपांड्यदेशस्थ जन, महेंद्र पर्वत, विंध्य, मलय, या पर्वतांवरील लोक, चोल, द्रविड, विदेह, आंध्र, अश्मक, भास, पुर, कोंकण, समंत्रिषिक, कुंतल, दंडकारण्य, कांतिपुर, म्लेच्छ, संकरजाति, नासिक, भोगवर्धन, विराटनगरी व विंध्याद्रि पर्वताचे दोहों बाजूंचे देश, तापी व गोमती या नद्यांचें पाणी पिणारे ( त्याच्या कांठीं राहणारे ), नगरांत रहाणारे कृषिकर, पारत, सुवर्णकारादि अग्निजीवि, शस्त्रवृत्ति, अरण्यवासी, किल्ला, कर्वटजन, वधरत, घातक, पापी कार्यांच्यां ठायीं, अस्थिर, राजे, बाल, हत्ती, दांभिक, डिंभ ( शास्त्रावांचून चाललेले ), युद्धांत घात करणारा किंवा बालघातक, पशुपालक, रक्तफल, रक्तपुष्प, पोंवळें, सेनापति, गुड, मद्य, तीक्ष्ण ( निंबादि ), कोशभवन ( राजगृह ), अग्निहोत्री, गैरिकादि व सुवर्णादि धातु यांचें स्थान, शाक्य [ रक्तपट ], संन्यासी, चोर, शठ ( परकार्यविमुख ), दीर्घद्वेषी, फार खाणारा, या सर्वांचा भौम स्वामी होय. ९—१५

लौहित्यः सिंधुनदः सरयूर्गंभीरिका रथाव्हा च ।
गंगाकौशिक्याद्याः सरितो वैदेहकांबोजाः ॥ १६ ॥
मथुरायाः पूर्वार्धं हिमवद्गोमंतचित्रकूटस्थाः ।
सौराष्ट्रसेतुजलमार्गपण्यबिलपर्वताश्रयिणः ॥ १७
उदपानयंत्रगांधर्वलेख्यमणिरागगंधयुक्तिविदः ।
आलेख्यशब्दगणितप्रसाधकायुष्यशिल्पज्ञाः ॥ १८ ॥
चरपुरुषकुहकजीवकशिशुकविशठसूचकाभिचाररताः ।
दूतनपुंसकहास्यज्ञभूततंत्रेंद्रजालज्ञाः ॥ १९ ॥
आरक्षकनटनर्तकघृततैलस्नेहबीजतिक्तानि ।
व्रतचारिरसायनकुशलवेसराश्चंद्रपुत्रस्य ॥ २० ॥

अर्थ—लौहित्यनद, सिंधुनद, सरयू, गंभीरिका, रथाव्हा गंगा, कौशिकी, विशाखा, सरस्वती, चंद्रभागा ह्या नद्या; वैदेहजन, कांबोज जन, मथुरेचें पूर्वार्ध, हिमालय, गोमंत, ( गोमित पर्वत), चित्रकूट या पर्वतांवर रहाणारे लोक; सौराष्ट्रजन, सेतूनें व जलमार्गानें जाणारे व्यापारी, गुहेंत राहणारे पर्वतवासी, उदकपान, ( तडागवाप्यादिक ), यंत्र, गायन, लिहिणें, रत्नपरीक्षा, रंगयुक्ति, गंधयुक्ति, या सर्वांतें, जाणणारे, चितारीपण, व्याकरणशास्त्र, गणित, यांचें साधन करणारे, आयुष्य, व शिल्प यांतें जाणणारे, गुप्त बातमीदार, गारुडादि कपटानें उपजीवन करणारा, बाल, कवि, शठ [ परकार्यविमुख ], दुर्जन, जारणमरणादि जाणता, जासूद, नपुंसक, उपहास ( थट्टा ) करणारे, भूततंत्रज्ञ, पिशाचें स्वाधीन ठेवणारे, इंद्रजाल ( गारुड विद्या ) इत्यादि जाणणारे आरक्षक [ पहारेकरी ], नट, नर्तक, घृत, तैल, तेल काढण्याचीं फलें, निंबादि कडू पदार्थ, व्रतचारी ( ब्रह्मचारी प्रभृति ), रसायन करणारे, वेसर [ खेचर ] या सर्वांचा बुध स्वामी होय. १६—२० .

सिंधुनदपूर्वभागो मथुरापश्चार्धभरतसौवीराः ।
स्रुघ्नोदीच्यविपाशासरिच्छतद्रूरमठशाल्वाः ॥ २१ ॥
त्रैगर्तपौरवांबष्ठपारतावाटधानयौधेयाः
सारस्वतार्जुनायनमत्स्यार्धग्रामराष्ट्राणि ॥ २२॥

हस्त्यश्वपुरोहितभूपमंत्रिमांगल्यपौष्टिकासक्ताः
कारुण्यसत्यशौचव्रतविद्यादानधर्मयुताः ॥ २३
पौरमहाधनशब्दार्थवेदविदुषेभिचारनीतिज्ञाः ।
मनुजेश्वरोपकरणं छत्रध्वजचामराद्यं च ॥ २४ ॥
शैलेयकमांसीतगरकुष्टरससैंधवानि वल्लीजं ॥
मधुररसमधूच्छिष्टानि चोरकश्चेति जीवस्य ॥ २५ ॥

अर्थ–सिंधुनदाचा पूर्वभाग, मथुरेचें पश्चार्ध, भरतजन, सौवीर, स्रुघ्न, हे देश; उत्तर दिशेस राहणारे लोक, विपाशानदी, शतद्रुनदी, रमठजन, शाल्व, त्रैगर्त, पौरव, आंबष्ट, पारत, वाटधान, यौधेय, सारस्वत, आर्जुनायन, मत्स्यजन, हत्ती, घोडा, राजपुरोहित, राजा, प्रधान, विवाह, मौंजी, इत्यादि; मांगल्यकार्य, व पौष्टिक, कर्में यांच्या ठायीं जे आसक्त ते; दया, सत्य, शौच, व्रत, विद्या, दान, धर्म, यांणीं युक्त; पौर (नागरिक लोक), महाधन [ ईश्वर ], वैय्याकरण, अर्थज्ञ [ पंडित ], वेदवेत्ते, नीतिज्ञ, राजोपकरण ( शस्त्रोयोगादि), छत्र, ध्वज, चामर, इत्यादि, सुगंधिद्रव्य, जटामांसी, रस, सैंधव, मुद्गादिवल्लीजधान्य, मधुररस, मेण, चोरक ( सुगंधिद्रव्य ), या सर्वांचा स्वामी गुरु होय. २१ –२५.

तक्षशिलमार्तिकावतबहुगिरिगांधारपुष्कलावतकाः ।
प्रस्थलमालवकैकयदाशार्णोशीनराः शिबयः ॥ २६ ॥
ये च पिबंति वितस्तामिरावतीं चंद्रभागसरितं च ।
रथरजताकरकुंजरतुरगमहामात्रधनयुक्ताः ॥ २७ ॥
सुरभिकुसुमानुलेपनमणिवज्रविभूषणांबुरुहशय्याः ।
वरतरुणयुवतिकामोपकरणमृष्टान्नमधुरभुजः ॥ २८ ॥
उद्यानसलिलकामुकयशःसुखौदार्यरूपसंपन्नाः ।
विद्वदमात्यवणिग्जनघटकृच्चित्रांडजास्त्रिफलाः ॥ २९ ॥
कौशेयपट्टकंबलपत्रौर्णिकरोध्रपत्रचोचानि ।
जातीफलागरुवचापिप्पल्यश्चंदनं च भृगोः ॥ ३० ॥

अर्थ-तक्षशिलानगरी, मार्तिकावत देश, बहुत आहेत पर्वत ज्यामध्यें, अशा गांधार देशांतील जन, पुष्कलावतक, प्रस्थल, मालव, कैकय, दाशार्ण, उशीनर, शिबि हे देश; वितस्ता, इरावती, चंद्रभागा, या नद्यांचें जे उदक पितात ते [ त्याच्या कांठीं राहणारे] रथ, रजत, (हिऱ्यांच्या खाणी) हत्ती, अश्व, महामात्र [ महात,] धनवान्, सुगंधित द्रव्य; पुष्पें, अनुलेखन [गंधादि], पद्मराग दि मणि, हिरे, अलंकार, कमल, शय्या वर [ प्रधान ], तरुण, स्त्री, कामोपकरण, (विलासायोग्य जे सुगंध पुष्पादि पदार्थ ते) व मधुर भोजन करणारे, उद्यान बागा], उदक, कामीपुरुष, यश, सुख, औदार्य, स्वरूप, यांणीं युक्त, विद्वान् प्रधान, सावकार, कुंभार, नानाप्रकारचे पक्षी, त्रिफला कौशेयपट्ट ( रेशमाचें वस्त्र ), कंबल, पत्रौर्णिक ( धुतलेलें रेशमी वस्त्र ), लोध्र, पत्र ( तमालपत्र ) चोच [ दालचिनी ], जायफळ, अगरू, वेखंड, पिंपळी, चंदन, या सर्वांचा स्वामी शुक्र होय. २६।२७।२८।२९।३०.

आनर्तार्बुदपुष्करसौराष्ट्राभीरशूद्रैरवतकाः ॥
नद्या यस्मिन्देशे सरस्वती पश्चिमो देशः ॥ ३१ ॥

कुलभूमिजाः प्रभासं विदिशावेदस्मृतीमहीतटजाः ॥
खलमलिननीचतैलिकविहीनसत्वोपहतपुंस्त्वाः ॥ ३२ ॥
बंधनशाकुनिकाशुचिकैवर्तविरूपवृद्धसौकरिकाः ॥
गणपूज्यस्खलितव्रतशबरपुलिंदार्थपरिहीनाः ॥ ३३ ॥
कटुतिक्तरसायनविधवयोषितो भुजगतस्करमहिष्यः ॥
खरकरभचणकवातुलनिष्पावाश्चार्कपुत्रस्य ॥ ३४ ॥

अर्थ--आनर्त, अर्बुद, पुष्कर, सौराष्ट्र, आभीर, शूद्र, रैवतक, या देशांतील लोक; जेथें सरस्वती नदी गुप्त झाली तो देश, पश्चिम देश, कुरुदेशस्थ जन, प्रभास क्षेत्र, विदिशा, वेदस्मृति ह्या नद्यांच्या तीरीं झालेले लोक दुर्जन, मलिन, नीच, तेली, निःसत्व, नंपुसक, बंधनस्थ, शाकुनिक ( पक्षिघातक ), अपवित्र कर्मरत, कैवर्त ( कोळी ), विरूप, वृद्ध, डुकरें बाळगणारे, समुदायांत मुख्य, चलितनियम, शवर, पुलिंद [म्लेच्छ], द्रव्यहीन ( दरिद्री ), कटु ( निंबादि ), तिक्त (मरीच्यादि), रसायन, विधवा स्त्रिया, सर्प, चोर, म्हैस, गर्दभ, उंट, चणे, वातुल ( चंवळ्ळ वगैरे वातुल पदार्थ ),निष्पाव ( पावटे ) यांचा स्वामी शनि होय, ३१।३२।३३।३४.

गिरिशिखरकंदरदरीविनिविष्टाम्लेच्छजातयः शूद्राः ॥
गोमायुभक्षशूलिकवोक्काणाश्वमुखविकलांगाः ॥ ३५ ॥
कुलपांसनहिंस्रकृतघ्नचौरानिःसत्यशौचदानाश्च ॥
खरचरनियुद्धवित्तीव्ररोषगर्भाशया नीचाः ॥ ३६ ॥
उपहतदांभिकराक्षसनिद्रावहुलाश्च जंतवः सर्वे ।
धर्मेण च संत्यक्ता माषतिलाश्चार्कशशिशत्रोः ॥ ३७ ॥

अर्थ-पर्वतांचें शिखर, कंदर ( दरी ), गुहा, यांमध्यें राहणारे; म्लेच्छजाति, शूद्र, कोल्हा खाणारे, त्रिशूल हत्यार बाळगणारे, वोक्काण, अश्वमुख, अंगहीन, कुलास कलंक लावणारे, हिंसा करणारे, कृतघ्न ( अनुपकारी ), चोर, सत्यरहित, अशुचि, कृपण, गर्दभ, गुप्त बातमीदार, बाहुयुद्ध जाणणारे, फार रागीट, गर्भस्थ, नीच, कुत्सित, दांभिक, राक्षस, बहुत निद्रायुक्त प्राणी, धर्मरहित, माष, तिल, या सर्वांचा राहु स्वामी होय. ३५।३६।३७.

गिरिदुर्गपल्हवश्वेतहूणचोलावगाणमरुचीनाः ॥
प्रत्यंतधनिमहेच्छव्यवसायपराक्रमोपेताः ॥ ३८ ॥
परदारविवादरताः पररंध्रकुतूहलामदोत्सिक्ताः ॥
मूर्खाधार्मिकविजिगीषवश्च केतोः समाख्याताः ॥ ३९ ॥

अर्थ-पर्वतावरील किल्ले, पल्हव, श्वेत, हूण, चोल, अवगाण, मरु, चीन हे देश; प्रत्यंत ( म्लेच्छदेश ), धनवान् मोठी इच्छा करणारे, उद्योगी, पराक्रमी, परस्त्रीरत, वादरत, परच्छिद्रानें आनंद पावणारे, मत्त, मूर्ख, धर्मरहित, जिंकण्याची इच्छा करणारे, या सर्वांचा केतु स्वामी होय. ३८।३९.

उदयसमये यः स्निग्धांशुर्महान्प्रकृतिस्थितो ।
यदि च न हतो निर्घातोल्कारजोग्रहमर्दनैः ॥
स्वभवनगतः स्वोच्चप्राप्तः शुभग्रहवीक्षितः ।
स भवति शिवस्तेषां येषां प्रभुः परिकीर्तितः ॥ ४० ॥

अर्थ–जो ग्रह उदयकालीं निर्मल किरण, विस्तीर्णबिंब, स्वभावस्थित असा असून जर निर्घात (तुफानी वारा), उल्का (वीज), रज [धूळ] व ग्रहयुद्ध यांणीं ताडित नसेल, स्वगृहीं किंवा स्वोच्चीं असेल व शुभग्रहांनीं दृष्ट असेल तर तो ग्रह ज्यांचा स्वामी सांगितला त्यांस शुभकारक होतो. ४०.

अभिहितविपरीतलक्षणैः क्षयमुपगच्छतितत्परिग्रहः ॥
डमरभयगदातुराजनानरपतयश्च भवंति दुःखिताः ॥ ४१ ॥

अर्थ–वरील श्लोकांत ग्रहांचीं जीं लक्षणें लिहिलीं आहेत तद्विपरीत ग्रहांचीं लक्षणें असलीं तर त्याचें फळ वाईट होतें. शस्त्ररहित कलह, भीति, रोग, यांहीं युक्त लोक होतील व राजेही अत्यंत दुःखित होतील. ४१.

यदि न रिपुकृतं भयं नृपाणां स्वसुतकृतं नियमादमात्यजं वा ॥
भवति जनपदस्य चाप्यवृष्ट्यागमनमपूर्वपुराद्रिनिम्नगासु ॥ ४२ ॥

अर्थ—जर राजांस शत्रुकृत भय होणार नाहींतर, स्वपुत्रकृत किंवा प्रधानकृत भय निश्चयानें होईल. देशास अवर्षणाचें भय झाल्यामुळें सर्व लोक पूर्वी न पाहिलेल्या नगर, पर्वत, नदी यांच्याठाईं गमन करतील म्हणजे दुष्काळामुळें देशोदेशीं जातील. ४२.

---

# अथ ग्रहयुद्धम् ।

## (संहितेवरून).

युद्धं यथा यदा वा भविष्यदादिश्यते त्रिकालज्ञैः ॥
तद्विज्ञानं करणे मया कृतं सूर्यसिद्धांतात् ॥ १ ॥

अर्थ—त्रिकालज्ञ (भूत, भविष्य, वर्तमान, जाणणारे) ऋषि, ज्या कालीं ज्या प्रकारानें होणारें तारांग्रहांचें युद्ध सांगतात, त्याचें ज्ञान (साधन) करणें (गणितस्कंधीं) सूर्यसिद्धांतानुसार मी सांगितलें. १.

वियति चरतां ग्रहाणामुपर्युपर्यात्ममार्गसंस्थानां ॥
अतिदूरात् दृग्विषये समतामिव संप्रयातानां ॥ २॥
आसन्नक्रमयोगाद्भेदोल्लेखांशुमर्दनासव्यः ॥
युद्धं चतुःप्रकारं पराशराद्यैर्मुनिभिरुक्तं ॥ ३ ॥

अर्थः—आकाशांत फिरणारे, एकावर दुसरा अशा प्रकारें आपल्या मार्गांत राहणारे व अति दुरून दृष्टिगोचर समत्वातें (बरोबरीतें) प्राप्त झालेले जे भौमादि ग्रह, त्यांचें फार निकट क्रमयोगानें भेद, उल्लेख अंशुमर्दन, अपसव्य, या चार प्रकारचें युद्ध पराशरादि ऋषींनीं सांगितलें. १ किरणानें किरणाचें मर्दन म्हणजे जेथें दोन्हीं ग्रह एकच दिसतात तें भेदयुद्ध. २ एका ग्रहानें दुसऱ्या ग्रहाच्या बिंबाचा स्पर्श केला तें उल्लेखयुद्ध, ३ अतिनिकट ग्रहांचे किरण परस्पर हन्यमान (ताडित) दिसतात तें अंशुमर्दन युद्ध. ४ बरोबर होऊन डाव्या अंगानें जाणें तें अपसव्य युद्ध. २।३.

भेदे वृष्टिविनाशो भेदः सुहृदां महाकुलानां च ॥
उल्लेखे शस्त्रभयं मंत्रिविरोधः प्रियान्नत्वं ॥ ४ ॥

अंशुविरोधे युद्धानि भूभृतां शस्त्ररुक् क्षुदवमर्दाः ॥
युद्धे चाप्यपसव्ये भवंति युद्धानि भूपानां ॥ ५ ॥

**अर्थ**--भेदसंज्ञक युद्ध झालें तर अवर्षण, मित्रांचा, परस्पर व महाकुलीनांचा परस्पर भेद होतो. उल्लेख सं० युद्ध झालें तर शस्त्रभय, प्रधानांचा विरोध, दुर्भिक्ष हीं होतात. अंशुविरोध सं० [अंशुमर्दन सं०] युद्ध झालें तर राजांचीं युद्धें, शस्त्र, रोग, क्षुधा यांपासून अति पीडा हीं होतात. अपसव्ययु ीं राजांचीं युद्धें होतात. ४।५.

रविराक्रंदो मध्ये पौरः पूर्वे परे स्थितो यायी ॥
पौरा बुधगुरुरविजा नित्यं शीतांशुराक्रंदः ॥ ६ ॥
केतुकुजराहुशुक्रा यायिन एते हता ग्रहा हन्युः ॥
आक्रंदयायि पौरान् जयिनो जयदाः स्ववर्गस्य ॥ ७ ॥

**अर्थः**--सूर्य खमध्यभागीं असतां आक्रंदसंज्ञक, पूर्वेकडे अ० पौरसं० होत. पश्चिमेकडे अ० यायी संज्ञक होतो. बुध, गुरु, शनि हे नित्य पौरसंज्ञक होत. चंद्र नित्य आक्रंद सं० होय. केतु, भौम, राहु, शुक्र, हे यायीसं० होत. हे ग्रह आक्रंदादिसंज्ञक ग्रहांतें मारतात. त्या युद्धांत ज्यांचा जय होतो ते आपल्या वर्गाचा जय करितात. ६।७.

पौरे पौरेण हते पौराः पौरान् नृपान् विनिघ्नंति ॥
एवं याय्याक्रंदौ नागरयायीं ग्रहाश्चैव ॥ ८ ॥

**अर्थ**-पौरग्रह, पौरग्रहानें हत असतां, नगरसंबंधीं लोक आपल्या राजाचा नाश करतील. असेंच यायी ग्रह आक्रंद ग्रहानें हत अ० येणाऱ्या राजाचा नाश होतो. नागर ह्म० पौरग्रह यायी ग्रहानें हत अ० नगरच्या राजाचा नाश होतो, याप्रकारें जाणावें. ८.

दक्षिणदिक्स्थः परुषो वेपथुरप्राप्य संनिवृत्तोणुः ॥
अधिरूढो विकृतो निष्प्रभो विवर्णश्च यः स जितः ॥ ९ ॥

**अर्थः**--दक्षिणदिशेस राहणारा, परुष [ खरखरीत ], कंपित, दुसऱ्या ग्रहाजवळ न जातां मागें फिरला ( वक्रगति झाला ), बारीक झालेला, अधिरूढ ( दुसऱ्या ग्रहानें आक्रांत ), विकार पावलेला, तेजहीन झालेला, विवर्ण [ वर्णरहित ], असा जो ग्रह तो जित [ जिंकलेला ] असें जाणावें. ९.

उक्तविपरीतलक्षणसंपन्नो जयगतो विनिर्दिष्टः ॥
विपुलः स्निग्धो द्युतिमान् दक्षिणदिक्स्थोऽपि जययुक्तः ॥ १० ॥

**अर्थः**--पूर्वश्लोकोक्त लक्षणांहून विपरीत लक्षणसंपन्न जो ग्रह त्याचा जय झाला असें समजावें. तसाच जो ग्रह विपुल ( मोठें ) बिंब, निर्मल, तेजस्वी तो ग्रह दक्षिण दिशेस असला तरी जयानें युक्त असें जाणावें. ( असें बहुधा शुक्राचें होतें, ) १०.

द्वावपि मयूखपृक्तौ विपुलौ स्निग्धौ समागमे भवतः ॥
तत्रान्योन्यप्रीतिर्विपरीतावात्मपक्षघ्नौ ॥ ११ ॥

**अर्थः**--दोघेही ग्रह समागमामध्यें स्वच्छ किरणांनीं युक्त, विस्तीर्ण बिंब, निर्मल असे असतील तेथें दोघांची प्रीति आहे असें समजावें. याहून विपरीत अ० आपल्या पक्षाचा नाश करणारे होतात. ११.

युद्धं समागमो वा यद्यव्यक्तौ तु लक्षणैर्भवतः ॥
भुवि भूभृतामपि तथा फलमव्यक्तं विनिर्देश्यं ॥ १२ ॥

अर्थः-ग्रहाचें परस्परयुद्ध किंवा समागम पूर्वोक्त लक्षणांहीं जर अस्पष्ट होतील तर भूमीवर राजांसही तसेंच अस्पष्ट फल सांगावें. १२.

गुरुणा जिते वनिसुते बाल्हीकायायिनोऽग्निवार्त.श्च ॥
शशिजेन शूरसेनाः कलिंगसाल्वाश्च पीड्यते ॥१३ ॥
सौरेणारे विजिते जयंती पौराः प्रजाश्च सीदंति ॥
कोष्टागारम्लेच्छक्षत्रियतापश्च शुक्रजिते ॥ १४ ॥

अर्थ-गुरूनें मंगळ जिंकला अ० बाल्हीक देशांतील लोक, मार्गस्थ, अग्निजीवी [ सुवर्णकारादिक ] यांस पीडा होते. बुधानें मंगळ जिंकला अ० शूरसेन, कलिंग, साल्व, या देशांत रहाणाऱ्या लोकांस पीडा होते. शनैश्वरानें मंगळ जिंकला अ० नागरिक लोकांचा जय व प्रजांस पीडा होते. शुक्रानें मंगळ जिंकला अ० कोष्टागार, म्लेच्छ, क्षत्रिय यांस ताप ( दुःख ) होतें. १३।१४.

भौमेन हते शशिजे वृक्षसरित्तापसाश्मकनरेंद्राः ॥
उत्तरदिक्स्थाः क्रतुदीक्षिताश्च संतापमायांति ॥ १५ ॥
गुरुणा बुधे जिते म्लेच्छशूद्रचौरार्थयुक्तपौरजनाः ॥
त्रैगर्तपार्वतीयाः पीड्यंते कंपते च मही ॥ १६ ॥
रविजेन बुधे ध्वस्ते नाविकयोधाब्जसधनगर्भिण्यः ॥
भृगुणा जितेऽग्निकोपः सस्यांबुदयायिविध्वंसः ॥ १७ ॥

अर्थः—भौमानें बुध जिंकला असतां वृक्ष, नद्या, तपस्वी, अश्मकजन, राजे, उत्तर दिशेस राहणारे लोक, यज्ञ करणारे या सर्वांस दुःख होतें. गुरूनें बुध जित अ० म्लेच्छ, शूद्र, चोर धनवान्, नगरवासी लोक, त्रिगर्त देशांतील लोक, पर्वतवासी लोक या सर्वांस पीडा होते व भूमिकंपही होतो. शनीनें बुध ध्वस्त [ पराजित ] केला असतां नावाडी, योद्धे जलजप्राणी, द्रव्यवान् सगर्भ स्त्रिया यांस पीडा होते. शुक्रानें बुध जित अ० अग्निकोप होतो. धान्यें, मेघ, पांथस्थ यांचा नाश होतो. १५-१७.

जीवे शुक्राभिहते कुलूतगांधारकैकया मद्राः ॥
साल्वा वत्सा वंगा गावः सस्यानि नश्यंति ॥ १८ ॥
भौमेन हते जीवे मध्यो देशो नरेश्वरा गावः ॥
सौरेण चार्जुनायनवसातियौधेयाशिबिविप्राः ॥ १९ ॥
शशितनयेनापि जिते बृहस्पतौ म्लेच्छसत्यशस्त्रभृतः ॥
उपयांति मध्यदेशश्च संक्षयं यच्च भक्तिफलं ॥ २० ॥

अर्थः-बृहस्पति शुक्रानें जिंकला असतां कुलूत, गांधार, कैकय, मद्र, साल्व, वत्स, वंग, हे देश; गाई, धान्यें, यांचा नाश होतो. भौमानें बृहस्पति जित अ० मध्यदेश म्ह० हिमालय व विंध्याद्रि [ सातपुडा ] यांचा मध्यभाग, राजे गाई यांस पीडा होते. शनीनें बृहस्पति जित अ० अर्जुनायन लोक, वसाति योद्धे, शिबिदेशस्थ लोक, ब्राह्मण यांचा नाश होतो. बुधानें बृहस्पति जित अ० म्लेच्छ, सत्यवादी, शस्त्रें धारण करणारे, मध्यदेश हे सर्व नाश पावतात व जें गुरूचें पूर्वोक्त भक्तिफल तेंही नाश पावतें. १८।२०.

शुक्रे बृहस्पतिहते यायी श्रेष्ठो विनाशमुपयाति ॥
ब्रह्मक्षत्रविरोधः सलिलं च न वासवस्त्यजति ॥ २१ ॥

कोशलकलिंगवंगावत्समात्स्याश्च मध्यदेशयुताः ॥
महतीं व्रजंति पीडां नपुंसकाः शूरसेनाश्च ॥ २२ ॥
कुजविजिते भृगुतनये बलमुख्यवधो नरेंद्रसंग्रामाः ॥
सौम्येन पार्वतीयाः क्षीरविनाशोऽल्पवृष्टिश्च ॥ २३ ॥
रविजेन सिते विजिते गणमुख्याः शस्त्रजीविनः क्षत्रं ॥
जलजाश्च निपीड्यंते सामान्यं भक्तिफलमन्यत् ॥ २४ ॥

अर्थ-बृहस्पतीनें शुक्र जित अ० पांथस्थ, श्रेष्ठजन, यांचा नाश होतो. ब्राह्मण, क्षत्रिय यांस उपद्रव होतो व अवर्षणही होतें. कोशल, कलिंग, वंग, वत्स, मत्स्य, मध्यदेश या देशांतील लोकांस महान् पीडा होत्ये. नपुंसक, शूरसेनदेशस्थ लोक यांसही पीडा होत्ये. भौमानें शुक्र जिंकला असतां सेनापतीचा वध व राजांचीं युद्धें होतात. बुधानें शुक्र जिंकला असतां पर्वतवासी लोकांचा व गाईच्या दुधाचा नाश होतो व अल्पवृष्टि होत्ये. शनीनें शुक्र जिंकला अ० गणश्रेष्ठ, शस्त्रवृत्ति, क्षत्रिय, जलोद्भव प्राणी या सर्वांस पीडा होत्ये व जे पूर्वोक्त भक्तिफल तें विपरीत होतें. २१-२४.

असिते सितेन निहतेऽर्घवृद्धिरहिविहगमानिनां पीडा ।
क्षितिजेन टंकणांध्रोड्रकाशिवाह्लीकदेशानां ॥ २५ ॥
सौम्येन पराभूते मंदेऽगवणिग्विहंगपशुनागाः ।
संताप्यंते गुरुणा स्त्रीबहुलामहिषकशकाश्च ॥ २६ ॥

अर्थः—शुक्रानें शनि जिंकला अ० अर्घवृद्धि [ द्रव्यांची वृद्धि ] होत्ये. सर्प, पक्षी, अभिमानी लोक यांस पीडा होत्ये. भौमानें शनि जित अ० टंकण, आंध्र उंड्र, काशि, बाल्हीक या देशांस पीडा होत्ये. बुधानें शनि जित अ० अंगदेशस्थ लोक, व्यापारी, पक्षी, पशु, हत्ती, यांस पीडा होत्ये. गुरूनें शनि जिंकला अ० स्त्रीबहुल देश, महिषक व शक यांस पीडा होत्ये. २५।२६.

अयं विशेषोऽभिहितो हतानां कुजज्ञवागीशसितासितानां ।
फलंतु वाच्यं ग्रहभक्तितोऽन्यद्यथा तथा घ्नंति हताः स्वभक्तीः ॥ २७ ॥

अर्थ--युद्धामध्यें जिंकलेले जे भौम, बुध, गुरु, शुक्र, शनि, यांचा हा पूर्वोक्त विशेष सांगितला, इतर जें फल तें पूर्वाध्यायोक्त ग्रहभक्तीवरून सांगावें. तें असें कीं, ज्या प्रकारानें ग्रहांचा पराजय होईल तसा स्वभक्तींचा नाश होईल. २७.

---

## अथ शशिग्रहसमागमः ॥

भानां यथा संभवमुत्तरेण यातो ग्रहाणां यदि वा शशांकः ।
प्रदक्षिणं तच्छुभकृन्नराणां याम्ये न यातो न शिवः शशांकः ॥ १ ॥

अर्थः--चंद्र नक्षत्रांच्या किंवा ग्रहांच्या यथा संभव [ समीपस्थांच्या ] उत्तरेकडून जाईल तर तें प्रदक्षिण गमन होय. हें मनुष्यांस शुभकारक होय. चंद्र दक्षिणेकडून गेला तर तो अशुभ होय. १.

चंद्रमा यदि कुजस्य यात्युदक् पार्वतीयबलशालिनां जयः ।
क्षत्रियाः प्रमुदिताः स यायिनो भूरि धान्यमुदिता वसुंधरा ॥ २ ॥

अर्थः--जर चंद्र भौमाच्या उत्तरेकडून जाईल तर पर्वतवासी लोकांचा व बलिष्ठ राजांचा जय होईल. पांथस्थ व क्षत्रिय आनंदित होतील. पृथ्वीवर बहुत धान्य होईल. २.

उत्तरतः स्वसुतस्य शशांकः पौरजयाय सुभिक्षकरश्च ।

सस्यचयं कुरुते जनहार्दिकोशचयं च नराधिपतीनां ॥ ३ ॥

अर्थ-चंद्र, बुधाच्या उत्तरेकडून जाईल तर नगरस्थ राजांचा जय व सुभिक्षही होईल. धान्याची वृद्धि, लोकांस संतोष, राजांचा कोश [ जामदारखाना ] यांची वृद्धि करितो. ३.

बृहस्पतेरुत्तरगे शशांके पौरद्विजक्षत्रियपंडितानां ।

धर्मस्य देशस्य च मध्यमस्य वृद्धिः सुभिक्षं मुदिताः प्रजाश्च ॥ ४ ॥

अर्थ--चंद्र, बृहस्पतीच्या उत्तरेकडून जाईल तर, नागरिक जन, ब्राह्मण, क्षत्रिय, पंडित, धर्म, मध्यदेश यांची वृद्धि, सुभिक्ष, सर्व, प्रजांस आनंद हीं होतो. ४.

भार्गवस्य यदि यात्युदक् शशी कोशयुक्तगजवाजिवृद्धिदः ।

यायिनां च विजयो धनुष्मतां सस्यसंपदपि चोत्तमा तदा ॥ ५ ॥

अर्थ--चंद्र शुक्राच्या उत्तरेकडून जाईल तर, भांडार, गज, अश्व, यांची वृद्धि होत्ये. शत्रु जिंकण्याची इच्छा करणारे व धनुर्धारी, यांचा जय होतो. धान्यसंपत्तिही उत्तम होत्ये. ५.

रविजस्य शशीप्रदक्षिणं कुर्याच्चेत्पुरभूभृतां जयः ।

शकबाल्हिकसिंधुपल्हवामुद्भाजो यवनैः समन्विताः ॥ ६ ॥

अर्थ--चंद्र, शनीच्या उत्तरेकडून जाईल तर, नगरस्थ राजांचा जय होईल. शक [ यवन विशेष ], बाल्हिक, सिंधुदेशातील लोक, पल्हव, यवन, यांस आनंद होतो ६.

येषामुदग्गच्छति भग्रहाणां प्रालेयरश्मिर्निरुपद्रवश्च ।

तद्द्रव्यपौरेतरभक्तिदेशान् पुष्णाति याम्ये न निहंतितानि ॥ ७ ॥

अर्थ --ज्या नक्षत्रांच्या व ग्रहांच्या उत्तरेकडून उत्पातरहित चंद्र जाईल, त्या नक्षत्र ग्रहांचीं प्रागुक्त द्रव्यें, नागरिक लोक, मार्गस्थ लोक, पूर्वोक्त भक्तिदेश यांतें तो पुष्ट करील. तोच दक्षिणेकडून जाईल तर त्यांचा नाश करील. ७.

शशिनि फलमुदक्स्थे यद्ग्रहस्योपदिष्टं भवति तदपसव्ये सर्वमेव प्रतीपं ।

इति शशिसमवायाः कीर्तिता भग्रहाणां न खलु भवति युद्धं साकमिंदोर्ग्रहर्क्षैः ॥ ८ ॥

अर्थ—चंद्र, ग्रहांच्या उत्तरेकडे अ०, जें फल सांगितलें तें सर्व दक्षिणेकडे अ० विपरीत होतें. याप्रकारें-करून नक्षत्रें व ग्रह यांचें चंद्राबरोबर समागम सांगितले. ग्रह व नक्षत्रें यांबरोबर चंद्राचें युद्ध कधींच होत नाहीं. ८.

---

## ॥ अथमेघगर्भलक्षणं ॥

अन्नं जगतः प्राणाः प्रावृट्कालस्य चान्नमायत्तं ॥

यस्मादतः परीक्ष्यः प्रावृट्कालः प्रयत्नेन ॥ १ ॥

अर्थ—जगताचे प्राण अन्न आहे. तें अन्न वर्षाकालाच्या स्वाधीन आहे यास्तव प्रावृट् ( वर्षा ) कालाची प्रयत्नानें परीक्षा करावी. १.

तल्लक्षणानि मुनिभिर्यानि निबद्धानि तानि दृष्ट्वेदं ॥
क्रियते गर्गपराशरकाश्यपवात्स्यादिरचितानि ॥ २ ॥

**अर्थः**– ह्या वर्षाकालाचीं लक्षणें वसिष्ठादि ऋषींनीं जीं बद्ध तीं व गर्ग-पराशर-काश्यप-वात्स्य इत्याकांनीं रचित जीं तींही पाहून हें वृष्टकाललक्षण करितों. २.

दैवविदवहितचित्तो द्युनिशं यो गर्भलक्षणे भवति ॥
तस्य मुनेरिव वाणी न भवति मिथ्यांबुनिर्देशे ॥ ३ ॥

**अर्थ**—जो दैववित् ( जोतिषी ) गर्भलक्षणाच्या ठाईं रात्रंदिवस एकाग्रचित्त होतो त्याची वाणी वृष्टि सांगणाविषयीं ( पर्जन्य कधीं पडेल तें सांगण्याविषयीं ) ऋषीप्रमाणें खोटी होत नाहीं. ३.

किंवातः परमन्यच्छास्त्रं ज्यायोस्ति यद्विदित्वैव ॥
प्रध्वंसीन्यपि काले त्रिकालदर्शी कलौ भवती ॥ ४ ॥

**अर्थः**–या गर्भलक्षणशास्त्राहून किंवा ज्योतिःशास्त्राहून दुसरें शास्त्र श्रेष्ठ काय आहे ? जें समजूनच सर्व शास्त्रांचा नाश करणार अशा कलियुगामध्येंही तो समजणारा पुरुष भूतभविष्यवर्तमान हे त्रिकाळ पाहणारा होतो.

केचिद्वदंति कार्तिकशुक्लांतमतीत्य गर्भदिवसाः स्युः ॥
न तु तन्मतं बहूनां गर्गादीनां मतं वक्ष्ये ॥ ५ ॥

**अर्थ**—कार्तिक शुक्ल पौर्णिमेपुढें ( वद्य प्रतिपदेपासून ) गर्भ दिवस होतात असें कोणी ( सिद्धरोमादि ) आचार्य म्हणतात; परंतु तें बहुतांचें मत नाहीं. यास्तव गर्गादि बहुऋषिमत सांगतों. ५.

मार्गशिरशुक्लपक्षप्रतिपत्प्रभृतिक्षपाकरेषाढां ॥
पूर्वां वासमुपगते गर्भाणां लक्षणं ज्ञेयं ॥ ६ ॥

**अर्थ**–मार्गशीर्ष शुक्ल प्रतिपदेपासून ज्या दिवशीं चंद्र पूर्वाषाढा नक्षत्रीं असेल त्या दिवसापासून गर्भाचें लक्षण जाणावें. ६.

यन्नक्षत्रमुपगते गर्भश्चंद्रे भवेत्स चंद्रवशात् ॥
पंच नव ते दिनशते तत्रैव प्रसवमायाति ॥ ७ ॥

**अर्थ**—ज्या नक्षत्रीं चंद्र प्राप्त होऊन जो गर्भ होतो तो १९५ दिवसांनंतर त्याच नक्षत्रास चंद्र येईल तेव्हां प्रसूति पावतो. ७.

सितपक्षभवाः कृष्णे शुक्ले कृष्णा द्युसंभवा रात्रौ ॥
नक्तं प्रभवाश्चाहनि संध्या जाताश्च संध्यायां ॥ ८ ॥

**अर्थ**–शुक्लपक्षीं झालेले गर्भ १९५ दिवसानीं कृष्णपक्षीं प्रसव पावतात. कृष्णपक्षीं झालेले गर्भ शुक्लपक्षीं दिवसास झालेले रात्रीस, रात्रीस झालेले दिवसास, प्रातःसंध्येस झालेले सायंसंध्येस, सायंसंध्येस झालेले प्रातःसंध्येस प्रसव पावतात. ८.

मृगशीर्षाद्या गर्भा मंदफलाः पौषशुक्लजाताश्च ॥
पौषस्य कृष्णपक्षेण निर्दिशेच्छ्रावणस्य सितं ॥ ९ ॥
माघसितोत्था गर्भा श्रावणकृष्णे प्रसूतिमायांति ॥
माघस्य कृष्णपक्षेण निर्दिशेद्भाद्रपदशुक्लं ॥ १० ॥
फाल्गुनशुक्लसमुत्था भाद्रपदस्यासितेविनिर्देश्याः ॥
तस्यैव कृष्णपक्षोद्भवास्तु ये तेऽश्वयुक् शुक्ले ॥ ११ ॥

चैत्रसितपक्षजाताः कृष्णेऽश्वयुजस्य वारिदा गर्भाः ॥
चैत्रासितसंभूताः कार्तिकशुक्लेऽभिवर्षंति ॥१२॥

अर्थ-मार्गशीर्ष शुक्लपक्षीं झालेले गर्भ अल्प फल देतात. तसेंच पौष शुक्लपक्षीं झालेलेही गर्भ अल्प फल देतात. ( या गर्भलक्षणीं शुक्लप्रतिपदादि अमावास्यांत महिने जाणावे. ) पौषकृष्णांत जें गर्भधारण झालें, त्यांचा पर्जन्य श्रावणशुक्लांत पडतो. माघशुक्लांत झालेले गर्भाचा पर्जन्य श्रावणकृष्णांत पडतो. माघकृष्णांतले गर्भाचा पर्जन्य भाद्रपदशुक्लांत पडतो. फाल्गुनशुक्लांतल्या गर्भाचा पर्जन्य भाद्रपदकृष्णांत पडतो. फाल्गुनकृष्णांतल्या गर्भाचा पर्जन्य आश्विनशुक्लांत पडतो. चैत्रशुक्लांतल्या गर्भाचा पर्जन्य आश्विनकृष्णांत पडतो. चैत्रकृष्णपक्षांतल्या गर्भाचा पर्जन्य कार्तिकशुक्लपक्षांत पडतो. ९-१२.

पूर्वोद्भूताः पश्चादपरोत्थाः प्राग्भवंति जीमूताः ।
शेषास्वपि दिक्ष्वेवं विपर्ययो भवति वायोश्च ॥ १३ ॥

अर्थ—पूर्वेकडे उत्पन्न झालेले मेघ पश्चिमेकडून येतील व पश्चिमेकडे झालेले मेघ पूर्वेकडून येतील. याप्रमाणेंच अन्य दिशांचाही व्यत्यय जाणावा. तसाच वायूचाही व्यत्यय जाणावा. गर्भधारणीं पूर्वेकडील वायु असला तर पर्जन्यसमयीं पश्चिमेकडील होईल असें जाणावें. १३.

ह्लादिमृदूदक्शिवशक्रदिग्भवो मारुतो वियद्विमलं ।
स्निग्धसितबहुलपरिवेषपरिवृतौ हिममयूखार्कौ ॥ १४ ॥
पृथुबहुलस्निग्धघनं घनसूचीक्षुरकलोहिताभ्रयुतं ।
काकांडमेचकाभं वियद्विशुद्धेंदुनक्षत्रं ॥ १५ ॥
सुरचापमंद्रगर्जितविद्युत्प्रतिसूर्यकाः शुभा संध्या ।
शशिशिवशक्राशास्थाः शांतरवाः पक्षिमृगसंघाः ॥ १६ ॥
विपुलाः प्रदक्षिणचराः स्निग्धमयूखा ग्रहा निरुपसर्गाः ॥
तरवश्च निरुपसृष्टांकुरा नरचतुष्पदा हृष्टाः ॥ १७ ॥
गर्भाणां पुष्टिकराः सर्वेषामेवयोऽत्र तु विशेषः ॥
स्वर्तुस्वभावजनितो गर्भविवृद्धौ तमभिधास्ये ॥ १८ ॥

अर्थः—आनंदकारक, मृदु (सुखस्पर्श) उत्तर, ईशानी, पूर्व या दिशांकडून वायु सुटेल ; आकाश निर्मल होईल ; चंद्र सूर्य स्निग्ध, श्वेत, कृष्णवर्ण अशा परिवेषांनीं [ खळ्यांनीं ] वेष्टित होतील. विस्तीर्ण काळे स्निग्ध अशा मेघांनीं युक्त आकाश होईल. सूच्याकार क्षुराकार मेघानें अथवा तांबड्या मेघानें युक्त आकाश होईल. कावळ्याच्या अंड्यासारखा, अथवा मोराचे कंठासारखा वर्ण, चंद्र व नक्षत्रें स्वच्छ ज्यामध्यें असें आकाश होईल प्रातःसंध्या किंवा सायंसंध्या, इंद्रधनुष्य, मधुर मेघशब्द, वीज, एककालीन द्वितीय सूर्य यांहीं युक्त होईल ; पक्षी व अरण्यपशु यांचे समुदाय हे उत्तर, ईशानी, पूर्व या दिशांस असून मधुरशब्द करतील. ग्रह विस्तीर्ण बिंबांचे, सव्य फिरणारे ह्म० नक्षत्रांचें उत्तर मार्गानें फिरणारे, स्निग्ध किरण व उपद्रवरहित असे असतील चांगल्या पल्लवांनीं युक्त वृक्ष होतील ; मनुष्य व चतुष्पाद प्राणी आनंदित होतील. हीं पूर्वोक्त लक्षणें होतील तेव्हां गर्भाची पुष्टि होईल. येथें गर्भवृद्धीविषयीं स्वऋतुस्वभावानें उत्पन्न झालेला विशेष पुढें सांगतों. १४।१८.

पौषे समार्गशीर्षे संध्यारागोंबुदाः सपरिवेषाः ।
नात्यर्थं मृगशीर्षे शीतं पौषेऽतिहिमपातः ॥ १९ ॥

माघे प्रबलोवायुस्तुषारकलुषद्युतीरविशशांकौ ।
अतिशीतं सघनस्य च भानोरस्तोदयौ धन्यौ ॥ २० ॥

फाल्गुनमासे रूक्षश्चंडः पवनोऽभ्रसंप्लवाः स्निग्धाः ॥
परिवेषाश्चासकलाः कपिलस्ताम्रोरविश्च शुभः ॥ २१ ॥

पवनघनवृष्टियुक्ताश्चैत्रे गर्भाः शुभाः सपरिवेषाः ॥
घनपवनसलिलविद्युत्स्तनितैश्च हिताय वैशाखे ॥ २२ ॥

**अर्थ**–मार्गशीर्ष व पौष या मासीं संध्याराग ( प्रातःसायंसंध्यासमयीं आरक्त होणें ), चंद्र सूर्यांस खळें, मेघ; व मार्गशीर्षमासीं थोडी थंडी, पौषमासीं बहुत थंडी; माघमासीं बहुत वायु, हिमकांति ( थंड तेज ) सूर्य, कलुषद्युति ( मलिन कांति ) चंद्र, बहुत थंडी, मेघयुक्त सूर्याचे अस्तोदय शुभ होत. फाल्गुनमासीं कठिण व मोठा वायु, सजल मेघोद्भव, सूर्यचंद्रांस मध्यें तुटलेलीं खळीं, पिंगट व ताम्रवर्ण सूर्य शुभ होय. चैत्रमासीं चंद्रसूर्यांस खळीं व वायु मेघवृष्टि यांहीं युक्त गर्भ शुभ होत. वैशाखमासीं मेघ, वायु, वृष्टि, वीज, गर्जित हीं शुभ होत. १९।२०।२१।२२.

मुक्तारजतनिकाशास्तमालनीलोत्पलांजनाभासः ॥
जलचरसत्वाकारा गर्भेषु घनाः प्रभूतजलाः ॥ २३ ॥
तीव्रदिवाकरकिरणाभितापिता मंदमारुता जलदाः ॥
रुषिता इव धाराभिर्विसृजंत्यंभः प्रसवकाले ॥ २४ ॥

**अर्थ**–मोतीं व रुपें यांसारखें पांढरें, तमालवृक्ष, नील कमल, काजळ यांसारखे काळे, जलचर ( मासे व कांसवें ) या प्राण्यांच्या आकाराचे, असे मेघ गर्भामध्यें बहुत उदक धारण करितात. अत्यंत तप्त सूर्यकिरणांनीं फार तापलेले व अल्प वायूनें युक्त, असे गर्भकालीं जे मेघ असतात, ते प्रसवकालीं १९५ दिवसांनंतर, रागें, भरल्यासारखें मोठ्या धारांनीं उदक सोडितात. [ अतिवृष्टि करितात. ] २३।२४.

गर्भोप घातलिंगान्युल्काशनिपांशुपातदिग्दाहाः ॥
क्षितिकंपखपुरकीलककेतुग्रहयुद्धनिर्घाताः ॥ २५ ॥
रुधिरादिवृष्टिवैकृतपरिघेंद्रधनूंषि दर्शनं राहोः ॥
इत्युत्पातैरेभिस्त्रिविधैश्चान्यैर्हतो गर्भः ॥ २६ ॥

**अर्थ**—उल्का [ आकाशांतून अग्निरूप तारा पडतो तो] वीज, रजोवृष्टि, दिशेचा दाह, भूमिकंप, गंधर्वनगर, तामसकीलक केतु [शेंडेनक्षत्र], ग्रहांचें युद्ध. मेघगर्जना, रक्तादि वृष्टिविकार, परिघ [वक्ष्यमाण] इंद्रधनुष्य, चंद्रसूर्यग्रहण हीं गर्भनाशाचीं चिन्हें होत. यांहींकरून अन्य व त्रिविध उत्पातांहींकरून गर्भ नष्ट झाला असें सांगावें. २५।२६.

स्वर्तुस्वभावजनितैः सामान्यैर्यैश्च लक्षणैर्वृद्धिः ॥
गर्भाणां विपरीतैस्तैरेव विपर्ययो भवति ॥ २७ ॥

**अर्थ**–पूर्वोक्त ऋतुस्वभावजनित जीं सामान्यलक्षणें, त्यांहींकरून गर्भांची वृद्धि होते. व तींच लक्षणें विपरीत झालीं तर विपर्यय [ गर्भनाश ] होतो २७.

भद्रपदाद्वयविश्वांबुदैवपैतामहेष्वथर्क्षेषु ।
सर्वेष्वृतुषु विवृद्धो गर्भो बहुतोयदो भवति ॥ २८ ॥

**अर्थ**--पूर्वाभाद्रपदा, उत्तराभाद्रपदा, उत्तराषाढा, पूर्वाषाढा, रोहिणी या पांच नक्षत्रांच्या ठाई सर्व ऋतूंमध्यें [ मार्गशीर्षादिमासीं संध्यारागादि लक्षणांनीं ] वाढलेला गर्भ बहुत वृष्टि देणारा होतो. २८.

शतभिषगाश्लेषार्द्रास्वातिमघासंयुतः शुभो गर्भः ॥
पुष्णाति बहून् दिवसान् हंत्युत्पातैर्हतास्त्रिविधैः ॥ २९ ॥

**अर्थ**—शततारका, आश्लेषा, आर्द्रा, स्वाती, मघा, या नक्षत्रीं, झालेला गर्भ शुभ होय. तो गर्भ बहुत दिवस वृष्टि करितो. तोच गर्भ त्रिविध उत्पातांनीं हत झाल्यास आपण नाश पावतो. २९.

मृगमासादिष्वष्टौ षट्षोडशविंशतिश्चतुर्युक्ता ॥
विंशतिरथदिवसत्रयमेकतमर्क्षेण पंचभ्यः ॥ ३० ॥

**अर्थ**--शततारकादि पूर्वश्लोकोक्त पांच नक्षत्रांतून कोणत्याही नक्षत्रीं मार्गशीर्षमासीं गर्भधारणं झालें तर त्याची वृष्टि आठ दिवस होईल. पौषमासीं गर्भधारण झालें तर सहा दिवस, माघमासीं १६ दिवस, फाल्गुनमासीं २४ दिवस, चैत्रमासीं २०दिवस, वैशाखमासीं ३ दिवस वृष्टि होईल. हे वृष्टिदिवस १९५ दिवस गेल्यानतर, असें जाणावें. ३०.

क्रूरग्रहसंयुक्ते करकाशनिमत्स्यवर्षदा गर्भाः ॥
शशिनि रवौ वा शुभसंयुतेक्षिते भूरिवृष्टिकराः ॥ ३१ ॥

**अर्थ**—गर्भनक्षत्र पापग्रहानें युक्त असलें तर गारा, वीज, मत्स्य यांहीं युक्त अशी वृष्टि होत्ये. चंद्र किंवा सूर्य, शुभग्रहानें युक्त किंवा दृष्ट असला तर त्या गर्भाची बहुत वृष्टि होत्ये. ३१.

गर्भसमयेऽतिवृष्टिर्गर्भाभावायनिर्निमित्तकृता ॥
द्रोणाष्टांशेभ्यधिके वृष्टे गर्भः स्रुतो भवति ॥३२॥

**अर्थ**–गर्भधारणकालीं, [ प्रायोग्रहणां० अ० २९ श्लो० २० ] इत्यादि निमित्तावांचून अतिवृष्टि होईल तर त्या गर्भाचा नाश होतो. द्रोण (२००पलें.) पल (४तोळे.) द्रोणाचा आठवा हिसा २५पलें (१००तोळे) याहून अधिक वृष्टि झाली तर गर्भस्राव झाला असें जाणावें. ३२.

गर्भः पुष्टः प्रसवे ग्रहोपघातादिभिर्यदि न वृष्टः ॥
आत्मीयगर्भसमये करकामिश्रंददात्यंभः ॥ ३३ ॥

**अर्थः**-जो गर्भ, धारणकालीं पुष्ट होऊन १९५ दिवसानंतर, वृष्टिप्रतिबंधक ग्रहाच्या योगानें अथवा उत्पाताच्या योगानें, वर्षला नाहीं, तो आपल्या दुसऱ्या गर्भग्रहणकालीं गारांनीं मिश्रित उदक देतो. [ वृष्टि होत्ये. ] ३३.

काठिन्यं याति यथा चिरकालधृतं पयः पयस्विन्याः ॥
कालातीतं तद्वत्सलिलं काठिन्यमुपयाति ॥ ३४ ॥

**अर्थ**–जसें बहुत दिवस ओंटींत राहिलेलें गाईचें दूध कठिन होतें तसें वृष्टिकाल अतिक्रांत करून राहिलेलें उदक कठिनत्व पावतें. [ गारा होतात]. ३४.

पंचनिमित्तैः शतयोजनं तदर्धार्धमेकहन्यातः ॥
वर्षति पंचसमंताद्रूपेणैकेनयो गर्भः ॥ ३५ ॥

**अर्थ**—वायु, वृष्टि, वीज, गर्जना, अभ्र या पांचही निमित्तांनीं युक्त जो गर्भ, आसमंताद्भागीं शंभर योजनें वृष्टि करितो. चार निमित्तांनीं ५० योजनें, तीन निमित्तांनीं २५ योजनें, दोन निमित्तांनीं १२॥ योजनें, एक निमित्तानें ५ योजनें आसमंताद्भागीं भूमीवर वृष्टि करितो. ३५.

द्रोणः पंचनिमित्ते गर्भे त्रीण्याढकानि पवनेन ॥
षड्विद्युतानवाभ्रैः स्तनितेन द्वादशप्रसवे ॥ ३६ ॥

अर्थ--पंचनिमित्तांनीं युक्त गर्भ असतां, द्रोणपरिमित वृष्टि होत्ये. वायूनें युक्त गर्भ असतां तीन आढक वृष्टि होत्ये. विजेनें युक्त गर्भ असतां सहा आढक वृष्टि होत्ये. अभ्रानीं ९ आढक वृष्टि. गर्जितानें १२ आढक वृष्टि होत्ये. आढकाचें प्रमाण अ० २३ श्लोक २ यांत सांगितलें आहे. ३६.

पवनसलिलविद्युद्गर्जिताभ्रान्वितोयः ।
स भवति बहुतोयः पंचरूपाभ्युपेतः ॥
विसृजति यदि तोयं गर्भकालेति भूरि ।
प्रसवसमयमित्वा शीकरांभः करोति ॥ ३७ ॥

अर्थ—वायु, उदक, वीज, गर्जना, अभ्र, यांहीं युक्त जो गर्भ तो पंचरूपयुक्त बहुत जल देणारा होतो. गर्भ कालीं बहुत वृष्टि होईल तर प्रसवसमय प्राप्त होईल. त्या वेळीं बारीक बिंदूची वृष्टि होत्ये. ३७.

---

## ॥ अथ धारणाध्यायः ॥

ज्येष्ठसितेऽष्टम्याद्याश्चत्वारो वायुधारणा दिवसाः ॥
मृदुशुभपवनाः शस्ताः स्निग्धघनस्थगितगगनाश्च ॥ १ ॥

अर्थ–ज्येष्ठशुक्लपक्षीं अष्टम्यादि चार दिवशीं वायुधारण होतें. त्या दिवशीं, मृदु [ सुखस्पर्श ]व उत्तर, ईशानी, पूर्व, या दिशांकडील वायु प्रशस्त होत. तसेंच त्यादिवशीं स्निग्ध [ रखरखीत नव्हत ] अशा मेघांनीं आच्छादित आकाश असेल तर, ते दिवस प्रशस्त [ शुभ ] होत. १.

तत्रैव स्वात्याद्ये वृष्टे भचतुष्टये क्रमान्मासाः
श्रावणपूर्वा ज्ञेयाः परिस्रुता धारणास्ताः स्युः ॥ २ ॥

अर्थ--ज्येष्ठशुक्लपक्षींच स्वात्यादि ४ नक्षत्रीं वृष्टि झाली तर अनुक्रमानें श्रावणादि चार महिन्यांमध्यें वृष्टि होत नाहीं. ( ज्येष्ठशुक्लपक्षीं स्वातीनक्षत्रीं वृष्टि झाली तर श्रावणमासीं वृष्टि होत नाहीं. विशाखा न० भाद्रपद मासीं, अनुराधा न० आश्विन मासीं, ज्येष्ठा न० कार्तिक मासीं वृष्टि होत नाहीं ). गर्भस्राव झाला असें समजावें. २

यदि ताः स्युरेकरूपाः शुभास्ततः सांतरास्तु न शिवाय ॥
तस्करभयदाः प्रोक्ताः श्लोकाश्चाप्यत्र वासिष्ठाः ॥ ३ ॥

अर्थः—जर त्या पूर्वोक्त धारणा चारही दिवशीं एकसारख्या होतील तर शुभ होत व सांतरा (एकसारख्या ) न होतील तर अशुभ होय. चोरभय देणाऱ्या होतात. याविषयीं वसिष्ठऋषींचे श्लोक सांगतो. ३.

सविद्युतः सपृषतः सपांशूत्करमारुताः ॥
सार्कचंद्रपरिच्छन्ना धारणाः शुभधारणाः ॥ ४ ॥
यदा तु विद्युतः श्रेष्ठाः शुभाशाप्रत्युपस्थिताः ॥
तदापि सर्वसस्यानां वृद्धिं ब्रूयाद्विचक्षणः ॥ ५ ॥

सपांशुवर्षाः सापश्च शुभा बालक्रिया अपि ॥
पक्षिणां सुस्वरावाचः क्रीडा पांशुजलादिषु ॥ ६ ॥
रविचंद्रपरिवेषाः स्निग्धा नात्यंतदूषिताः ॥
वृष्टिस्तदापि विज्ञेया सर्वसस्याभिवृद्धये ॥ ७ ॥
मेघाः स्निग्धाः संहताश्च प्रदक्षिणगतिक्रियाः ॥
तदा स्यान्महती वृष्टिः सर्वसस्यार्थसाधिका ॥ ८ ॥

**अर्थ**--विजेनें सहित, जलबिंदुयुक्त, धुळीच्या समुदायानें युक्त जो वायु त्याणें सहित, सूर्यचंद्रास जें मेघांचें आच्छादन त्याणें युक्त अशा ज्या धारणा त्या शुभ होत. उत्तर, ईशानी, पूर्व या दिशांकडे श्रेष्ठ वीज चमकेल तर सर्व धान्यांची वृद्धि होईल. धूळ व उदक याणी मुलांची क्रीडा; पक्ष्यांचे सुस्वर शब्द व त्यांची धूळ, उदक यांमध्यें क्रीडा; सूर्यचंद्रास स्निग्ध व फार अशुभ नव्हत अशीं खळीं, इत्यादि झालें असतां सर्व धान्यांची वृद्धि करणारी अशी वृष्टि होईल, असें जाणावें. मेघ स्निग्ध दाट असून प्रदक्षिणगति म्ह० पूर्वेस असून दक्षिणेस जाणें, दक्षिणेहून पश्चिमेस, पश्चिमेहून उत्तरेस, उत्तरेहून पूर्वेस असे जातील तर सर्व धान्यांची दायक अशी महान् वृष्टि होईल असें जाणावें. ४।५।६।७।८.

---

## अथ गर्भधारणा ।

( मयूरचित्रकावरून. )

मूलमारभ्य याम्यांतं यदा भं वातसाभ्रकं ॥
रौद्रमारभ्य वातांतं तदा वर्षति वासवः ॥ १ ॥

अर्थ.–पौष मासांतील मूळ चांद्र नक्षत्रापासून रेवती नक्षत्रापर्यंत अभिजितसह जीं १० नक्षत्रें यांपैकीं ज्या ज्या नक्षत्रीं आकाशांत ढग येतील किंवा वारा सुटेल तर आर्द्रा महानक्षत्रापासून स्वाती महानक्षत्रांपर्यंत जीं १० नक्षत्रें यांत क्रमानें पाऊस पडेल. १.

धनराशिगते सूर्ये मूलमारभ्य चिंतयेत् ॥
गर्भाधानं ततो वृष्टिः षष्टि मासे हि सार्धके ॥ २ ॥

अर्थ–धन राशीस सूर्य गेल्यानंतर जें मूळ दिनक्षत्र येईल, तेव्हांपासून हा विचार पहावा. वर सांगितल्याप्रमाणें ज्या नक्षत्रीं योग होईल, त्या नक्षत्राची गर्भधारणा झाली असें समजावें. तेव्हांपासून ६॥ महिन्यांनीं पाऊस पडेल. २.

मूलर्क्षेहि यदा गर्भो भवत्यार्द्रा च वर्षति ॥
पूर्वाषाढे तथादित्यमुतरायां तदा गुरुः ॥ ३ ॥
श्रावणे सार्पभं चैव वासवे पितृभं तथा ॥
वरुणे भाग्यभं चैव पूर्वाषाढेर्यमा खलु ॥ ४ ॥
हस्तो वर्षत्युत्तरायां रेवत्यां वार्धकिस्तथा ॥
एतद्धर्मं समासेन मयोक्तं चिंतयेत्सुधीः ॥ ५ ॥

अर्थ–मूळ दिन नक्षत्रावर गर्भधारणा झाली तर आर्द्रा महानक्षत्राचा पाऊस पडेल. असेच २ पूर्वाषाढाला पुनर्वसु, ३ उत्तराषाढाला पुष्य. ४ श्रवणास आश्लेषा, ५ धनिष्ठाला मघा, ६ शततारकाला पूर्वा, ७ पूर्वाभाद्रपदाला उत्तरा, ८ उत्तराभाद्रपदाला हस्त, ९ रेवतीला चित्रा, याप्रमाणें थोडक्यांत गर्भधारण कसें होतें हें सांगितलें त्याचा बुद्धिमानांनीं विचार करावा. ५.

तुरगर्क्षे यदा गते भानुर्यदि मेघः प्रवर्षति ॥
मूलोद्भवं तथा गर्भं वादेश्यं दैवचिंतकैः ॥ ६ ॥

अर्थ–अश्विनी नक्षत्रास सूर्य गेला असतांनां जर पाऊस पडेल तर मूलादि नक्षत्रीं गर्भधारणा झाल्यामुळें आर्द्रादि महानक्षत्रीं पाऊस पडेल. असें जें सांगितलें तें प्रत्ययास येईल किंवा येणार नाहीं असें ज्योतिष्यांनीं विचार करून सांगावें. ६.

भरण्यादिस्थिते भानौ जलं वर्षति वारिदः ॥
पुष्टिर्भवति गर्भाणां प्रोक्तानां नात्र संशयः ॥ ७ ॥

अर्थ—भरणी आदिकरून नक्षत्रीं सूर्य असतानां जर पाऊस पडेल तर मागें जे गर्भ राहिले असें सांगितलें त्या त्या गर्भांची खात्रीनें वाढ होईल असें खात्रीनें सांगावें. ७.

## गर्भपातगर्भधारणनक्षत्रलक्षणम् ।

### प्रमाण दुसरें—मयूरचित्रकावरून.

मूलाद्येषु दशोन्मितेषु रविभेऽभ्रांबुपातोदये– ॥
श्चेत्स्यात्तर्हि शिवर्क्षतो रवियुजां गर्भो दशानां भवेत् ।
गर्भाहाच्छरनंदभूमितदिने वृष्टिस्तु मेषे रवौ ।
चंद्राढ्ये दशकेऽश्वितोंबुपतने स्याद्गर्भपातो बुधैः ॥

अर्थ—मूल आदिकरून अभिजितसह जीं १० दहा नक्षत्रें त्यांस सूर्य गेला असतांना जर ढग आले पाऊस पडला, अथवा वीज चमकली तर आर्द्रा नक्षत्रापासून सूर्य नक्षत्रांची गर्भधारणा झाली असें समजावें. ज्या दिवशीं गर्भधारणा होईल त्या दिवसापासून १९५ दिवशीं वृष्टि होईल. मेषराशीस सूर्य गेल्यानंतर ज्या दिवशीं अश्विनीं दिवस नक्षत्र असेल त्या दिवसापासून १० दिवसांत जर ढग आले, पाऊस पडला, अथवा वीज चमकली तर आर्द्रादिकरून १० दहा नक्षत्रांचा गर्भपात झाला असें समजावें.

---

## अथ प्रवर्षणाध्यायः ॥

ज्यैष्ठ्यां समतीतायां पूर्वाषाढादिसंप्रवृष्टेन ।
शुभमशुभं वाच्यं परिमाणं चांभसस्तज्ज्ञैः ॥ १ ॥

अर्थ–ज्येष्ठ शुद्ध पौर्णिमा अतिक्रांत झाल्यावर, पूर्वाषाढादि सर्व नक्षत्रीं, जी वृष्टि होईल तिचें उदक मोजून शुभ किंवा अशुभ सांगावें. १.

हस्तविशालं कुंडकमधिकृत्यांबुप्रमाणनिर्देशः ।
पंचाशत्पलमाढकमनेनमिनुयाज्जलं पतितं ॥ २ ॥

**अर्थ**—एक हात व्यासाचे तोंडाचें वर्तुल पात्र करून तें पावसांत ठेवावें व आंत जें पाणी जमेल त्यावरून उदकप्रमाण सांगावें. पन्नास पळें ह्मणजे एक आढक ( चार तोळ्याचें एक पल ) ४ आढकांचा एक द्रोण होतो. २.

येन धरित्रीमुद्रा जनिता वा बिंदवस्तृणाग्रेषु ।
वृष्टेन तेन वाच्यं परिमाणं वारिणः प्रथमं ॥३॥

**अर्थ**-धुरळा मात्र मरेल किंवा गवतावर बिंदु दिसतील अशी वृष्टि पूर्वाषाढादि ज्या नक्षत्रीं प्रथम होईल. त्या नक्षात्रानें उदकाचे प्रमाण लोकांमध्यें सांगावें. गर्भधारण झालें पुढें वायु धारणही होऊन, या वर्षणकालीं वृष्टि झाली नाहीं तर पुढें प्रसवकालीं ही वृष्टि होत नाहीं ३.

केचिद्यथाभिवृष्टं दशयोजनमंडलं वदंत्यन्ये ॥
गर्गवसिष्ठपराशरमतमेतत् द्वादशान्नपरं ॥ ४ ॥

**अर्थ**--प्रवर्षणकालीं कोणत्याही प्रदेशीं वृष्टि झाली तर वर्षाकालीं पूर्वाषाढादि नक्षत्रीं चांगली वृष्टि होत्ये असें कश्यपादि ऋषि ह्मणतात. दहा योजने मंडलावर प्रवर्षणकालीं वृष्टि झाली तर वर्षाकालीं शुभ वृष्टि होत्ये असें देवलादि ऋषि ह्मणतात. बारा योजनें मंडलाहून अधिक वृष्टि प्रवर्षणकालीं झाली ह्मणजे वर्षाकालीं शुभ वृष्टि होईल असें गर्ग, वसिष्ठ, पराशर ह्मणतात; परंतु याहून कमी नसावी असेंही ह्मणतात. ४.

येषु च भेष्वभिवृष्टं भूयस्तेष्वेव वर्षति प्रायः ॥
यदि नाप्यादिषु वृष्टं सर्वेषु तदा त्वनावृष्टिः ॥ ५ ॥

**अर्थ**-ज्या पूर्वाषाढादि नक्षत्रीं वर्षणकालीं वृष्टि होत्ये त्याच नक्षत्रीं वर्षाकालीं पुनः बहुतकरून वृष्टि होत्ये. जर पूर्वाषाढादि नक्षत्रीं वर्षणकालीं वृष्टि झाली नाहीं तर वर्षाकालीं अनावृष्टि होत्ये. ( पर्जन्य पडत नाहीं.) ५

हस्ताप्यसौम्यचित्रापौष्णधनिष्ठासुषोडशद्रोणाः ॥
शतभिषगैंद्रस्वातिषु जत्वारः कृत्तिकासु दश ॥६॥
श्रवणे मघानुराधाभरणीमूलेषु दशचतुर्युक्ताः ॥
फल्गुन्यां पंचकृतिः पुनर्वसौ विंशति द्रोणाः ॥ ७ ॥
ऐंद्राग्नाख्ये वैश्वे च विंशतिः सार्पभेदशत्र्याधिकाः ॥
आहिर्बुध्न्यार्यम्णप्राजापत्येषु पंचकृतिः ॥ ८ ॥
पंचदशाजे पुष्ये च कीर्तितावाजि भेदशब्दौ च ॥
रौद्रेऽष्टादशकथिता द्रोणा निरुपद्रवेष्वेषु ॥ ९ ॥

**अर्थ**:-हस्त, पूर्वाषाढा, मृगशीर्ष, चित्रा रेवती, धनिष्ठा या नक्षत्रीं १६ द्रोण; शततारका, ज्येष्ठा, स्वाती या नक्षत्रीं ४ द्रोण; कृतिका नक्षत्रीं १० द्रोण; श्रवण, मघा, अनुराधा, भरणी, मूल या नक्षत्रीं १४ द्रोण; पूर्वा नक्षत्रीं २५ द्रोण; पुनर्वसु नक्षत्रीं २० द्रोण; विशाखा, उत्तराषाढा या नक्षत्रीं २० द्रोण; आश्लेषा नक्षत्रीं १३ द्रोण; उत्तराभाद्रपदा, उत्तरा, रोहिणी या नक्षत्रीं २५ द्रोण; पूर्वाभाद्रपदा, पुष्य या नक्षत्रीं १५ द्रोण; अश्विनी नक्षत्रीं १० द्रोण; आर्द्रा नक्षत्रीं १८ द्रोण याप्रमाणें प्रवर्षणकालीं तीं तीं नक्षत्रें उपद्रवरहित असलीं ह्मणजे वृष्टि होत्ये. ९.

रविरविसुतकेतुपीडिते भे क्षितितनयत्रिविधाद्भुता हते च ।
भवति हि न शिवं न चापि वृष्टिः शुभसहिते निरुपद्रवे शिवं च ॥१०॥

अर्थः-सूर्य, शनि, राहू, केतु यांणीं नक्षत्रपीडित असतां ह्मणजे हे त्या नक्षत्रास असतां, तसेंच भौम व त्रिविध उत्पात यांणीं नक्षत्र ताडित असतां कल्याण होत नाहीं व वृष्टीही होत नाहीं. बुध, गुरु, शुक्र या शुभ ग्रहांनीं युक्त व उत्पातरहित नक्षत्र असल्यास कल्याण व वृष्टि हीं होतात. १०.

---

## अथ रोहिणीयोगः ।

कनकशिलाचयविवरजतरुकुसुमासंगिमधुकरानुरुते ॥
बहुविहगकलहसुरयुवतिगीतमंद्रस्वनोपवने ॥ १ ॥
सुरनिलयशिखरि शिखरे बृहस्पतिर्नारदाय यानाह ॥
गर्गपराशरकाश्यपमयाश्चयान् शिष्यसंघेभ्यः ॥ २ ॥
तानवलोक्य यथावत्प्राजापत्येंदुसंप्रयोगार्थान् ॥
स्वल्पग्रंथेनाहं तानेवाभ्युद्यतो वक्तुं ॥ ३ ॥

अर्थ-सुवर्णमय पाषाणसमुदायांच्या विवरामध्यें झालेलें जे वृक्ष त्यांच्या पुष्पांवर बसणारे जे भ्रमर त्यांचा शब्द आहे ज्यामध्यें अशा व नानाप्रकारच्या पक्ष्यांचा आलाप व देवस्त्रियांच्या ( अप्सरांच्या ) गायनाचा जो मधुर स्वर यांणीं युक्त आहेत बागा ज्यामध्यें, अशा मेरुपर्वताच्या शिखरावर बृहस्पति, नारदातें जे योग सांगत झाला, ते व गर्ग पराशर, काश्यप, मय हे ऋषि शिष्यसमुदायांस जे योग सांगते झाले त्या रोहिणी व चंद्र यांच्यां योगातें, यथाशास्त्र अवलोकन करून, या थोडक्या ग्रंथानें मी त्या योगांच्या फलातें सांगतों. १-३.

प्राजेशमाषाढतमिस्रपक्षे क्षपाकरेणोपगतं समीक्ष्य ॥
वक्तव्यमिष्टं जगतोऽशुभं वा शास्त्रोपदेशाद्ग्रहचिंतकेन ॥ ४ ॥
योगो यथा नागत एव वाच्यः स धिष्ण्ययोगः करणे मयोक्तः ॥
चंद्रप्रमाणद्युतिवर्णमार्गैरुत्पातवातैश्च फलं निगाद्यं ॥ ५ ॥

अर्थ-आषाढकृष्णपक्षीं रोहिणीनक्षत्र चंद्रानें युक्त होतें तें पाहून दैवज्ञानें जगताचें शुभाशुभ सांगावें. हा धिष्ण्ययोग मी पंचसिद्धांतिकेमध्यें सांगितला आहे तो पाहून त्याचें फल चंद्राचें प्रमाण, कांति, वर्ण, मार्ग, उत्पात, वायु, यांहींकरून सांगावें. ४-५.

पुरा दुदग्धत्पुरतोऽपि वा स्थलं त्र्यहोषितस्तत्र हुताशतत्परः ॥
ग्रहान्सनक्षत्रगणान्समालिखेत्सधूपपुष्पैर्बलिभिश्च पूजयेत् ॥ ६ ॥
सरत्नतोयौषधिभिश्चतुर्दिशं तरुप्रवालापि हितैः सुपूजितैः ॥
अकालमूलैः कलशैरलंकृतं कुशास्तृतं स्थंडिलमावसेत् द्विजः ॥७॥

अर्थः—नगराच्या उत्तरेस किंवा पूर्वेस जें स्थल असेल तेथें तीन दिवस राहून, उपोषित होत्साता, हवनतत्पर ब्राह्मणानें नक्षत्रांसहित ग्रह काढून धूप, पुष्प, बलि यांहींकरून त्यांची पूजा करावी. रत्नें, उदकें, औषधि यांहींसहित व वृक्षपल्लवांनीं आच्छादित, उत्तम पूजित कांळीं बुडें नाहींत अशा चार दिशांस ठेवलेल्या कलशांनीं सुशोभित व दर्भांनीं आच्छादित अशा स्थंडिलाजवळ ब्राह्मणानें वसावें. ६-७.

अलाभ्यमंत्रेण महाव्रतेन बीजानि सर्वाणि निधाय कुंभे ॥
स्नाप्यानि चामीकरदर्भतोयैर्होमोमरुद्वारुणसौम्यमंत्रैः ॥८॥

अर्थ-नंतर महाव्रतनामक मंत्रानें सर्व बीजांचें अभिमंत्रण करून तीं कुंभामध्यें ठेवावीं; आणि त्या कुंभांत सुवर्ण, दर्भ यांहीं युक्त उदक घालावें. नंतर वायु वरूण, सोम यांच्या मंत्रानीं अग्नींत होम करावा. ८.

श्लक्ष्णांपताकामसितां विदध्याद्दंडप्रमाणां त्रिगुणोच्छ्रितां च ॥

आदौ कृते दिग्ग्रहणे नभस्वान् ग्राह्यस्तया योगगते शशांके ॥ ९ ॥

अर्थ-बारीक वस्त्राची काळी चार हात पताका, बारा हात लांब काठावर बांधून उभारावी. प्रथमच [ आरंभींच ] दिशासाधन करावें, नंतर रोहिणीचा चंद्राशीं योग ज्यावेळीं होईल त्यावेळीं त्या पताकावें वायु कोणत्या दिशेस जातो तो पहावा. ९.

तत्रार्धमासाः प्रहरैर्विकल्प्यावर्षानिमित्तं दिवसास्तदंशैः ॥

सव्येन गच्छन् शुभदः सदैव यस्मिन्प्रतिष्ठा बलवान् स वायुः ॥१०॥

अर्थः-त्या रोहिणी योगीं, प्रहरांनीं अर्धमास व प्रहरांशांनीं दिवस, वर्षाऋतूमध्यें पर्जन्यासाठीं योजावें. वायु सव्य गेला तर निरंतर कल्याणकारक होतो. जो वायु स्थिर राहतो तो बलवान् यास्तव त्यावरून शुभाशुभ सांगावें. ( त्याचें तात्पर्य ) रोहिणी योग आषाढ कृष्णपक्षीं ज्या दिवशीं अहोरात्रीं होईल त्या दिवशीं सूर्योदयापासून एक प्रहरपर्यंत जर शुभ ( चांगला वारा वाहील तर श्रावणाच्या पहिल्या पक्षीं चांगली वृष्टि होत्ये. द्वितीय प्रहरीं वाहील तर दुसऱ्या पक्षीं. तिसऱ्या प्रहरीं भाद्रपदाचा प्र. पक्षीं ४ प्रहरीं भा. २ पक्षीं रात्रीच्या प्र. प्रहरीं अश्विनाचा प्र पक्षीं. दु. प्र. द्वि. पक्षीं, तिसऱ्या प्रहरीं कार्तिकाचा प्र. पक्षीं, चतुर्थ प्र. द्वि. पक्षीं शुभवृष्टि होत्ये. यांत अशुभ वायु वाहिला तर या मार्गी अनावृष्टि होत्ये. यावरूनच त्रैराशिकानें दिवसही जाणावे. १०.

वृत्ते तु योगेऽङ्कुरितानि यानि संतीह बीजानि धृतानि कुंभे ।

येषां तु योंशोऽङ्कुरितस्तदंशस्तेषां विवृद्धिं समुपैति नान्यः ॥११॥

अर्थ-रोहिणी योग होऊन गेल्यावर कुंभामध्यें पूर्वं स्थापित बीजांतून जीं अंकुरित होतील त्यांची वृद्धि होत्ये. अन्यांची होत नाहीं. ११.

शांतपक्षिमृगराविताद्दिशो निर्मलं वियदनिंदितोऽनिलः ।

शस्यते शशिनि रोहिणीयुते मेघमारुतफलानि वच्म्यतः ॥१२॥

अर्थः--चंद्राचा रोहिणीयोग झाला असतां, त्यावेळीं पक्षी व अरण्यपशु यांच्या मधुर शब्दांनीं युक्त दिशा, निर्मल आकाश, शुभवायु ही प्रशस्त होत. मेघ व वायु यांचीं फलें यापुढें सांगतों. १२.

क्वचिदसितसितैः सितैः क्वचिच्च क्वचिदसितैर्भुजगैरिवांबुवाहैः ।

वलितजठरपृष्टमात्रदृश्यैः स्फुरिततडिद्रसनैर्वृतं विशालैः ॥१३॥

विकसितकमलोदरावदातैररुणकरद्युतिरंजितोपकंठैः ।

छुरितमिववियद्घनैर्विचित्रैर्मधुकरकुंकुमकिंशुकावदातैः ॥१४॥

अर्थ-कोठें श्वेतकृष्ण, कोठें श्वेत, कोठें काळेच असे, वलित उदर व पृष्ठ हींच आहेत दृश्य ज्यांची असे, चंचल विद्युल्लता ह्याच आहेत जिव्हा ज्यांच्या असे मोठ्या सर्पासारख्या मेघांनीं व्याप्त व प्रफुल्लित कमलोदरासारखे श्वेत आरक्त किरणकांतीनें तांबडे आहेत समीप भाग ज्यांचे असे, भ्रमर, कुंकुम, पळस, यांसारख्या वर्णाचे चित्रवर्ण मेघांनीं रंजित असें आकाश इ इ. १३-१४.

असितघननिरुद्धमेव वा चलिततडित्सुरचापचित्रितं ॥

द्विपमहिषकुलाकुलीकृतं वनमिव दावपरीमंबरं ॥ १५ ॥

अर्थ—कृष्णमेघांनीं व्याप्त, चंचल वीज व इंद्रधनुष्य यांणीं चित्रित, असें आकाश हें गज, महिष (गवे) यांच्या समुदायांनीं व्याप्त केलेलें व वणव्यानें व्याप्त अरण्यासारखें दिसतें. १५.

अथवांजनशैलशिलानिचयप्रतिरूपधरैः स्थगितं गगनं ॥
हिममौक्तिकशंखशशांककरद्युतिहारिभिरंबुधरैरथवा ॥ १६ ॥

अर्थ--अथवा आकाश कज्जलपर्वताच्या पाषाणसमूहासारख्या काळ्या मेघांनीं आच्छादित अथवा बर्फ, मोत्यें, शंख, चंद्रकिरण यांच्या कांतीतें हरण करणाऱ्या ह्या० श्वेतमेघांनीं व्याप्त असेल. १६.

तडिद्धेमकक्षैर्बलाकाग्रदंतैः स्रवद्वारिदानैश्चलत्प्रांतहस्तैः ॥
विचित्रेंद्रचापध्वजोच्छ्रायशोभैस्तमालालिनीलैर्वृतं चाब्दनागैः ॥१७॥

अर्थ-वीजच आहे सुवर्णमय मध्यबंधन रज्जु ज्यांस असे, बगळेपक्षी हेच आहेत बाहेरचे दांत ज्याला असे, पडणारें उदक हेंच आहे मदोदक ज्यांला असे, चंचल जे प्रांत ( शेवटचे ) भाग तेच आहेत शुंडादंड ज्यांचे असे, चित्रवर्ण जीं इंद्रधनुष्यें तींच जे उंच ध्वज त्यांणीं शोभित असे, तमालवृक्ष व भ्रमर यांसारखे नीलवर्ण असे मेघ हेच हत्ती यांहीं आकाश व्याप्त असेल. १७.

संध्यानुरक्ते नभसि स्थितानामिंदीवरश्यामरुचां घनानां ॥
वृंदानि पीतांबरवेष्टितस्य कांतिं हरेश्चोरयतां यदा वा ॥ १८ ॥

अर्थः-संध्यासमयीं आरक्त आकाशामध्यें राहिलेले, नील कमलासारखी श्याम आहे कांति ज्यांची अशा मेघांचे समुदाय, पीतांबरानें वेष्टित अशा नारायणाच्या कांतीतें हरण करतात काय असे ज्या आकाशामध्यें असतील. १८.

सशिखिचातकदर्दुरनिःस्वनैर्यदि विमिश्रितमंद्रपटुस्वनाः ॥
खमवतत्य दिगंतविलंबिनः सलिलदाः सलिलौघमुचः क्षितौ ॥१९॥

अर्थ—मोर, चातक, बेडूक यांच्या शब्दांनीं मिश्रित, मधुर व सुंदर असे शब्द करणारे मेघ जरं आकाशामध्यें विस्तृत होऊन चहूंकडे जातील तर ते बहुत वृष्टि करतील. १९

निगदितरूपैर्जलधरजालैस्त्र्यहमवरुद्धं द्व्यहमथवाहः ॥
यदि वियदेवं भवति सुभिक्षं मुदितजना च प्रचुरजला भूः ॥२०॥

अर्थः—पूर्वी सांगितल्या स्वरूपाच्या मेघांनीं तीन दिवस किंवा दोन दिवस अथवा एक दिवस जर आकाश व्याप्त असेल तर सुभिक्ष, लोकांस आनंद, बहुत उदक हीं होतील. २०.

रूक्षैरल्पैर्मारुताक्षिप्तदेहैरुष्ट्रध्वांक्षप्रेतशाखामृगाभैः ॥
अन्येषां वा निंदितानां सरूपैर्मूकैश्चाब्दैर्नो शिवं नापि वृष्टिः ॥२१॥

अर्थ-रुक्ष, अल्प, वायूनें पसरलेले, उंट, काक, प्रेत, वानर यांसारखे अथवा अन्य मार्जारराक्षसादि निंदितांसारखे, मूक ( गर्जनारहित ) अशा मेघांनीं कल्याण होत नाहीं व वृष्टिही होत नाहीं. २१.

विगतघने वा वियति विवस्वानमृदुमयूखः सलिलकृदेवं ॥
सर इव फुल्लं निशि कुमुदाढ्यं खमुडुविशुद्धं यदि च सुवृष्ट्यै ॥ २२ ॥

अर्थ-मेघरहित आकाशामध्यें कठोर किरणांचा सूर्य वृष्टि करणारा होतो. रात्रीस चंद्रिकायुक्त कमलांनीं युक्त, प्रफुल्लित सरोवरासारखें, स्वच्छ नक्षत्रांनीं युक्त आकाश जर दिसेल तर उत्तम वृष्टि होय. २२.

पूर्वोद्भूतैः सस्यनिष्पत्तिरब्दैराग्नेयाशासंभवैरग्निकोपः ॥
याम्ये सस्यं क्षीयते नैर्ऋतैर्धं पश्चाज्जातैः शोभना वृष्टिरब्दैः ॥२३॥

वायव्योत्थैर्वातवृष्टिः क्वचिच्च पुष्टा वृष्टिः सौम्यकाष्ठासमुत्थैः ॥
श्रेष्ठं सस्यं स्थाणुदिक्संप्रवृद्धैर्वायुश्चैवं दिक्षु धत्ते फलानि ॥ २४ ॥

अर्थ—पूर्व दिशेकडे उत्पन्न झालेल्या मेघांनीं धान्यसंपत्ति होते. आग्नेयीस उत्पन्न झालेल्या मेघांनीं अग्निकोप होतो. दक्षिणेचे मेघांनीं धान्यनाश होतो. नैर्ऋतीचे मेघांनीं अर्ध्या धान्याचा नाश होतो. पश्चिमेचे मेघांनीं चांगली वृष्टि होते. वायव्यदिशेचे मेघांनीं वातयुक्त वृष्टि क्वचित् होते. उत्तर दिशेचे मेघांनीं परिपूर्ण वृष्टि होते. ईशानीचे मेघांनीं उत्तम धान्य होतें. याप्रमाणेंच वायूचींही दिशापरत्वें फलें होतात. २३–२४.

उल्का निपातास्तडितोऽशनिश्च दिग्दाहनिर्घातमहीप्रकंपाः ॥
नादा मृगाणां सपतत्रिणां च ग्राह्या यथैवांबुधरास्तथैव ॥ २५ ॥

अर्थ—उल्का, वीज, अशनी, ( यांचीं लक्षणें पुढें सांगावयाचीं आहेत. ) या त्रिहींचे निपात, दिग्दाह, निर्घात, भूमिकंप, पक्षी व अरण्यपशु यांचे शब्द या सर्वांचीं फलें मेघांप्रमाणें दिशापरत्वें घ्यावीं. २५.

नामांकितैस्तैरुदगादिकुंभैः प्रदक्षिणं श्रावणमासपूर्वैः ॥
पूर्णैः समासः सलिलस्य दाता स्रुतैरवृष्टिः परिकल्प्यमूनैः ॥ २६ ॥

अर्थः—उदगादि नामांकित जे पूर्वोक्त चार कुंभ त्यांहीं प्रदक्षिण श्रावणादि चार मासांचीं फलें सांगावीं. ज्या महिन्याचा कुंभ उदकपूर्ण असेल त्यांत वृष्टि होईल. ज्याचा पूर्ण नसेल त्यांत वृष्टि होणार नाहीं. याप्रमाणें जितके कमी झाले असतील तशी वृष्टि स्वबुद्धीनें सांगावी. चारही कुंभ पूर्ण असतील तर चारही मासांत पूर्ण वृष्टि होईल. २६.

अन्यैश्च कुंभैर्नृपनामचिन्हैर्देशांकितैश्चाप्यपरैस्तथैव ॥
भग्नैः स्रुतैर्न्यूनजलैः सपूर्णैर्भाग्यानि वाच्यानि यथानुरूपं ॥ २७ ॥

अर्थः—तेथें दुसरे, राजनामांकित व देशनामांकितही पूर्ण कुंभ ठेवावे. त्यांतून ज्यांचे फुटतील त्यांस फार अशुभ. पाझरतील तर उपद्रव, न्यूनजल होतील तर किंचित् अशुभ पूर्ण असतील तर शुभ याप्रमाणें यथायोग्य फलें सांगावीं. २७.

दूरगो निकटगोऽथवा शशी दक्षिणे पथि यथा तथा स्थितः ॥
रोहिणी यदि युनक्ति सर्वथा कष्टमेव जगतो विनिर्दिशेत् ॥ २८ ॥

अर्थ—चंद्र, दुरून, जवळून किंवा दक्षिणभागीं राहून जर रोहिणीचा योग करील तर लोकांस दुर्भिक्षादि अशुभ होतें. २८.

स्पृशन्नुदग्याति यदा शशांकस्तदा सुवृष्टिर्बहुलोपसर्गाः ॥
असंस्पृशन्योगमुदक्समेतः करोति वृष्टिं विपुलां श्रियं च ॥ २९ ॥

अर्थ—चंद्र ज्या काळीं रोहिणीला दक्षिणेकडून स्पर्श करून उत्तरेस जातो त्याकाळीं उत्तम वृष्टि व बहुत उपद्रव होतात. जेव्हां रोहिणीला स्पर्श न करून उत्तरेकडून जाईल तेव्हां बहुत वृष्टि होईल व लोकांस लक्ष्मीप्राप्त होईल. २९.

रोहिणीशकटमध्यसंस्थिते चंद्रमस्यशरणीकृता जनाः ॥
क्वापि यांति शिशुयाचिताशनाः सूर्यतप्तपिठरांबुपायिनः ॥ ३० ॥

अर्थ—चंद्र, रोहिणीच्या शकटभागीं (शकटभेद करून) राहिला असतां, रक्षणकर्ता नसल्यामुळें लोक देशोदेशीं जातात व बालकांसाठीं अन्न मागणारे व सूर्यानें तापविलेलें भांड्यांतील पाणी पिणारे असे लोक होतात. म्हणजे उदक नाहींसें होतें. ३०.

उदितं यदि शीतदीधितिः प्रथमं पृष्ठत एति रोहिणी ॥
शुभमेव तदा स्मरातुराः प्रमदाः कामिवशे च संस्थिताः ॥ ३१

अर्थ–अगोदर उदयास पावलेल्या चंद्राच्या मागून, रोहिणीचा उदय होईल तर शुभ होय. त्या काळीं कामानें पीडित स्त्रिया कामी पुरुषांच्या स्वाधीन राहतील. ३१.

अनुगच्छति पृष्ठतः शशी यदि कामी वनितामिव प्रियां ॥
मकरध्वजबाणपीडिताः प्रमदानां वशगास्तदा नराः ॥ ३२ ॥

**अर्थ**—जसा कामी पुरुष आवडत्या स्त्रीच्या मागून जातो तसा, चंद्र रोहिणीच्या मागून उदय पावेल तर त्या वर्षी कामबाणांनीं पीडित असे पुरुष स्त्रियांच्या स्वाधीन होतील.

आग्नेय्यां दिशि चंद्रमा यदि भवेत्तत्रोपसर्गो महान् ।
नैर्ऋत्यां समुपद्रुतानि निधनं सस्यानि यांतीतिभिः ॥
प्राजेशानिलदिक्स्थिते हिमकरे सस्यस्य मध्यश्चयो ।
याते स्थाणुदिशं गुणाः सुबहवः सस्यार्घवृध्द्यादयः ॥३३॥

अर्थः—रोहिणीच्या आग्नेयी दिशेस चंद्र असेल तर, त्या वर्षी फार उपद्रव होईल. रोहिणीच्या नैर्ऋतीस असल तर धान्यें अतिवृष्ट्यादि उपद्रवांनीं युक्त होऊन, नाश पावतील. वायव्येस असेल तर, धान्याची वृद्धि मध्यम होईल. ईशानीस असेल तर धान्याची वृद्धि व स्वस्ताई इत्यादिक बहुत गुण होतील. ३३.

ताडयेद्यदि च योगतारकामावृणोति वपुषा यदाऽपि वा ।
ताडने भयमुशंति दारुणं छादने नृपवधोऽगनाकृतः ॥ ३४ ॥

अर्थः–चंद्र योगताराते ( नक्षत्राच्या सर्व तारांमध्यें जी तेजस्वी व मोठी असेल ती योगतारा ) ताडन करील ह्मणजे एका टोंकानें स्पर्श करील तर मोठें भय होईल व शरीरानें ( बिंबानें ) आच्छादन करील तर राजाचा वध स्त्रीचे हातून होईल. ३४.

गोप्रवेशसमयेऽग्रतो वृषो याति कृष्णपशुरेव वा पुरः ।
भूरि वारि शवले तु मध्यमं नो सितेंबुपरिकल्पना परैः॥ ३५॥

**अर्थः**––गाई वनांतून येऊन, गृहप्रवेशसमयीं ( संध्याकाळीं ) पुढें बैल जाईल अथवा काळा पशु जाईल तर त्यावर्षी बहुत वृष्टि होईल. काळा-पांढरा पशु जाईल तर मध्यम वृष्टि होईल. पांढरा पशु जाईल तर वृष्टि होणार नाहीं. इतर वर्णाचा पशु जाईल तर किंचित् किंचित वृष्टि होईल. ३५. हा श्लोक या प्रकरणांत आहे ह्मणून, रोहिणी योगाचे दिवशीं या श्लोकांत सांगितल्याप्रमाणें होईल तर त्यांचीं तशीं फळें समजावीं.

दृश्यते न यदि रोहिणीयुतश्चंद्रमा नभसि तोयदावृते ।
रुग्भयं महदुपस्थितं तदा भूश्च भूरिजलसस्यसंयुता ॥ ३६ ॥

अर्थः––मेघांनीं आच्छादित झाल्यामुळें रोहिणीयुक्त चंद्र दृष्टिगोचर होणार नाहीं तर त्यावर्षी मोठें रोगभय होईल व उदक धान्य यांहीं युक्त भूमि होईल असें सांगावें. ३६.

---

## अथ स्वातियोगः

यद्रोहिणीयोगफलं तदेव स्वातीवषाढासहिते च चंद्रे ॥
आषाढशुक्ले निखिलं विचिंत्यं योऽस्मिन्विशेषस्तमहं प्रवक्ष्ये ॥ १ ॥

अर्थः–चंद्ररोहिणी योगाचें जें फल सांगितलें तेंच स्वाती व पूर्वाषाढा या नक्षत्रीं चंद्र असतां आषाढ शुक्ल पक्षीं पहावें. त्याहून यांत जो विशेष तो मी सांगतों. १.

स्वातौ निशांशे प्रथमेऽभिवृष्टे सस्यानिसर्वाण्युपयांति वृद्धिं ॥
भागे द्वितीये तिलमुद्गमाषा ग्रैष्मं तृतीयेऽस्ति न शारदानि ॥ २ ॥
वृष्टेऽन्हि भागे प्रथमे सुवृष्टिस्तद्वत् द्वितीये तु सकीटसर्पा ॥
वृष्टिस्तु मध्या परभागवृष्टे निच्छिद्रवृष्टिर्द्युनिशं प्रवृष्टे ॥ ३ ॥

अर्थ–आषाढशुक्लपक्षीं जेव्हां स्वातींत चंद्र जाईल, त्या दिवशीं रात्रींच्या प्रथम भागीं वृष्टि होईल तर सर्व धान्यांची वृद्धि होईल. रात्रीच्या द्वितीय भागीं वृष्टि होईल तर तिल, मूग, उडीद हीं धान्यें होतील. तृतीयभागीं वृष्टि होईल तर ग्रैष्म ( उन्हाळीं धान्यें ) होतील. शरदृतूंतील धान्यें होणार नाहींत. २. दिवसाच्या प्रथमभागीं वृष्टि झाली तर उत्तम वृष्टि होते. द्वितीय भागीं झाली तर उत्तम वृष्टि होते; परंतु कृमि, सर्प हे होतात. तृतीय भागीं वृष्टि झाली तर मध्यम वृष्टि होते. स्वातियोगीं रात्रंदिवस वृष्टि झाली तर, ( पावसाळीं ) निर्दोष वृष्टि होते. ३.

सममुत्तरेण तारा चित्रायाः कीर्त्यते अपांवत्सः ॥
तस्यासन्ने चंद्रे स्वातेर्योगः शिवो भवति ॥ ४ ॥

अर्थ––चित्रा नक्षत्राच्या समभागीं उत्तरेकडे किंवा किंचित तिर्कस उत्तरेकडे जें नक्षत्र दिसतें त्याला अपांवत्स असें ह्मणतात. त्याजवळ चंद्र येईल तर तो स्वातीयोग शुभ होतो. ४.

सप्तम्यां स्वातियोगे यदि भवति हिमं माघमासांधकारे ।
वायुर्वा चंडवेगः सजलजलधरो वाऽपि गर्जत्यजस्रं ॥
विद्युन्मालाकुलं वा यदि भवति नभो नष्टचंद्रार्कतारं ।
विज्ञेया प्रावृडेषा मुदितजनपदा सर्वसस्यैरुपेता ॥ ५ ॥

अर्थ––माघकृष्ण सप्तमीस स्वातीयोग असून त्या दिवशीं बर्फ पडेल अथवा मोठा वारा सुटेल अ॰ सजलमेघ निरंतर गर्जना करील अ॰ विजांच्या मालांनीं व्याप्त आकाश होईल अ॰ चंद्र, सूर्य नक्षत्रें दिसणार नाहींत तर त्या वर्षी लोक आनंदित होतील व सर्व धान्यांनीं युक्त वर्षाकाल होईल असें समजावें. ५.

तथैव फाल्गुने चैत्रे वैशाखस्यासितेऽपि वा ॥
स्वातीयोगं विजानीयादाषाढे च विशेषतः ॥ ६ ॥

अर्थ-तसेंच फाल्गुन, चैत्र वैशाख यांच्या कृष्णपक्षीं स्वातीयोगाची फलें जाणावीं; परंतु आषाढामध्यें विशेषेंकरून जाणावीं ६.

## ॥ अथ आषाढीयोगः ॥

आषाढ्यां समतुलिताधिवासितानामन्येद्युर्यदधिकतामुपैति बीजं ।
तद्वृद्धिर्भवति न जायते यदूनं मंत्रोऽस्मिन्भवति तुलाभिमंत्रणाय ॥१॥

अर्थः—उत्तराषाढा नक्षत्रास चंद्र असेल त्यादिवशीं [ आषाढी पौर्णिमेस किंवा किंचित् मागें पुढें ] बरोबर मोजून ठेविलेलीं जीं सर्व बीजें, त्यांतून दुसऱ्या दिवशीं जें बीज अधिक होईल त्याची वृद्धि त्या वर्षी होते व जें कमी होईल तें उत्पन्न होत नाहीं. या तुलाभिमंत्रणाचा मंत्र आहे, त्यानें तराजूचें अभिमंत्रण करावें. १.

स्तोतव्या मंत्रयोगेन सत्या देवी सरस्वती ।
दर्शयिष्यसि यत्सत्यं सत्ये सत्यव्रताह्यसि ॥ २ ॥
येन सत्येन चंद्रार्कौ ग्रहा ज्योतिर्गणास्तथा ॥
उत्तिष्ठंतीह पूर्वेण पश्चादस्तं व्रजंति च ॥ ३ ॥
यत्सत्यं सर्ववेदेषु यत्सत्यं ब्रह्मवादिषु ॥
यत्सत्यं त्रिषु लोकेषु तत्सत्यमिह दृश्यतां ॥४॥
ब्रह्मणो दुहितासि त्वमादित्येति प्रकीर्तिता ।
काश्यपी गोत्रतश्चैव नामतो विश्रुता तुला ॥५॥

अर्थ–या योगमंत्रानें सत्या जी सरस्वती देवी तिची स्तुति करावी. हे सत्ये तूं सत्यव्रता आहेस यास्तव खरें तें दाखीव. ज्या सत्यानें चंद्र, सूर्य, ग्रह नक्षत्र, समुदाय, हे पूर्वेकडे उदय पावतात व पश्चिमेकडे अस्त पावतात; व जें सत्य सर्व वेदांमध्यें व जें सत्य ब्रह्मवादीयांमध्यें व त्रैलोक्यामध्यें जें सत्य तें सत्य येथें दाखवावें. हे देवी, तूं ब्रह्माची कन्या आहेस. आदित्या असें तुला ह्मणतात. काश्यप गोत्र तुझें आहे व तुझें नांव तुला असें प्रसिद्ध आहे. २–५.

क्षौमं चतुःसूत्रकसंनिबद्धं षडंगुलं शिक्यकवस्त्रमस्याः ।
सूत्रप्रमाणं च दशांगुलानि षडेवकक्षोऽभयशिक्यमध्ये ॥६॥

अर्थ—या तुलेचें ( तराजूचें ) वस्त्र ( पारडें ) तागाचें किंवा सणाचें सहा अंगुळें असावें व तें चार सूत्रांनीं बद्ध असावें. तीं सूत्रें दहा अंगुळें असावीं व त्या दोन पारड्यांच्या मध्यभागीं सहा आंगळें कक्षा [ धरावयाची दोरी ] असावी. ६.

याम्ये शिक्ये कांचनं संनिवेश्यं शेषद्रव्याण्युत्तरेंवूनि चैव ।
तोयैः कौप्यैः स्यंदिभिः सारसैश्च वृष्टिर्हीना मध्यमा चोत्तमा च ॥७॥

अर्थ --सुवर्ण मोजावयाचें असल्यास तें दक्षिण पारड्यांत ठेवावें. अन्य द्रव्यें उत्तर पारड्यांत ठेवावीं ; व जलही तसेंच मोजावें. त्यांत कूपोदक जर अधिक होईल तर अत्यल्पवृष्टि, झऱ्याचें उदक अधिक होईल तर मध्यमवृष्टि, तळ्याचें उदक अधिक होईल तर उत्तम वृष्टि होईल असें जाणावें. तीनही उदकें कमी झालीं तर अनावृष्टि होईल. ७.

दंतैर्नागागोहयाद्याश्च लोम्ना हेम्ना भूपाः सिक्थकेन द्विजाद्याः ।
तद्वद्देशावर्षमासादिशश्च शेषद्रव्याण्यात्मरूपस्थितानि ॥८॥

अर्थ—हस्तिदंताचे वजनाप्रमाणें हत्ती अधिक किंवा कमी होतील हें जाणावें. तसेंच ज्या प्राण्यांस लोंकर आहे त्यांची ऱ्हासवृद्धि लोंकरीचे वजनानें समजावी. राजे सुवर्णानें, ब्राह्मणादि मेणानें व देशाच्या व पुढें येणारीवर्षें, मास, दिशा यांच्या मेणाच्या प्रतिमा करून, त्या मेणानें व अन्य जे धान्यादिपदार्थ असतील त्यांचें प्रत्यक्षच वजन करून त्यावरून क्षय वृद्धि समजावी. ८.

हैमी प्रधाना रजतेन मध्या तयोरभावे खदिरेण कार्या ॥
विद्धः पुमान् येन शरेण सा वा तुलाप्रमाणेन भवेद्वितस्तिः ॥ ९ ॥

अर्थ–ती तुला [ दांडी ] सुवर्णाची मुख्य; रजताची मध्यम; हीं दोनही न मिळत तर खैराची करावी. ज्या बाणानें पुरुषाचा वेध झाला त्या बाणाची तुला करावी. त्या तुलेचें प्रमाण, वितस्ति १२ अंगुळें लांब असावें. ९.

हीनस्य नाशोऽभ्यधिकस्य वृद्धिस्तुल्येन तुल्यं तुलितं तुलायां ॥
एततुलाकोशरहस्यमुक्तं प्राजेशयोगेऽपि नरो विदध्यात् ॥१०॥

**अर्थः**–तुलेमध्यें मोजलेलें द्रव्य पूर्वापेक्षां कमी होईल तर त्याचा नाश, वृद्धि होईल तर वृद्धि, बरोबर होईल तर मध्यम, त्या वर्षी तें द्रव्य होतें. हें तुलादिव्यरहस्य रोहिणीयोगींही पहावें. १०.

स्वातावषाढास्वथ रोहिणीषु पापग्रहा योगगता न शस्ताः ॥
ग्राह्यं तु योगद्वयमप्युपोष्य यदाऽधिमासो द्विगुणीकरोति ॥ ११ ॥

**अर्थः**-स्वाती, उत्तराषाढा, रोहिणी या नक्षत्रीं चंद्रयोगकालीं तेथें पापग्रह असतील तर शुभ नव्हे. ज्या वर्षी आषाढ अधिक असेल त्यावर्षी पूर्वाषाढा व रोहिणी हें योगद्वय दोनही महिन्यांत पहावें. ११.

त्रयोपि योगाः सदृशाः फलेन यदा तदा वाच्यमसंशयेन ॥
विपर्यये यत्त्विह रोहिणीजं फलं तदेवाभ्यधिकं निगद्यं ॥ १२ ॥

**अर्थः**—ह्या तीनही योगांचें फल जर सारखें येईल तर निःसंशय फल सांगावें. आणि जर भिन्नभिन्न फलें येतील तर रोहिणीचें फल तेंच अधिक सांगावें. १२.

निष्पत्तिरग्निकोपो वृष्टिर्मंदाथ मध्यमा श्रेष्ठा ॥
बहुजलपवनापुष्टा शुभा च पूर्वादिभिः पवनैः ॥ १३ ॥

**अर्थः**—रोहिणीयोगीं पूर्वादि आठ दिवसाच्या वायूचीं धान्यनिष्पत्यादि फलें होतात. झं० पूर्वेचा वारा असेल तर सर्व धान्यें होतील. आग्नेयीचा अ० अग्निकोप, दक्षिणेचा अ० अल्प, नैर्ऋतीचा अ० मध्यम, पश्चिमेचा अ० चांगली, वायव्येचा अ० वृष्टि व वायु बहुत होतील, ईशानीचा वायु अ० तर शुभ अशी वृष्टि होईल. १३.

वृत्तायामाषाढ्यां कृष्णचतुर्थ्यामजैकपादर्क्षे ॥
यदि वर्षति पर्जन्यः प्रावृट् शस्ता नचेन्न ततः ॥ १४ ॥

**अर्थः**-आषाढी पौर्णिमा झाल्यानंतर कृष्णपक्षीं चतुर्थीस पूर्वाभाद्रपदा नक्षत्रीं पर्जन्यवृष्टि होईल तर, वर्षाकाल शुभ होतो व त्या दिवशीं वृष्टि न झाली तर वर्षाकाल अशुभ होय. १४.

आषाढ्यां पौर्णिमास्यां तु यद्यैशानोऽनिलो भवेत् ॥
अस्तं गच्छति तीक्ष्णांशौ सस्यसंपत्तिरुत्तमा ॥ १५ ॥

**अर्थः**—आषाढ शुद्ध पौर्णमासीस सूर्य अस्तास जातेवेळीं ईशानी दिशेचा वारा सुटेल तर धान्य उत्तम उत्पन्न होईल. १५.

---

## अथ वातचक्राध्यायः

( हा वातचक्राध्याय आचार्यकृत नव्हे, कारण पूर्वाध्यायांतील तेराव्या श्लोकानें वायु सांगितला आहे, परंतु विस्तार यांत आहे यास्तव येथें व्याख्या करतों असें टीकाकार म्हणतात )

पूर्वः पूर्वसमुद्रवीचिशिखरप्रस्फालनाघूर्णित- ।
श्चंद्रार्कांशुसटाभिघातकलितो वायुर्यदाकाशतः ॥
नैकांतस्थितनीलमेघपटलां शारद्यसंवर्धितां ॥
वासंतोत्कटसस्यमंडिततलां विद्यात्तदा मेदिनीं ॥ १ ॥

**अर्थ**–आषाढपौर्णमासीस पूर्वसमुद्राच्या लाटा हलिवण्यानें कंपित असा, चंद्र सूर्यकिरण हेच मानेवरील केंस, यांच्या ताडनानें मिश्रित असा पूर्वदिशेचा वारा जर आकाशांत वाहील तर सर्वत्र वृष्टि होऊन शरदृतूंतील धान्यें व वसंतऋतूंतील धान्यें पृथ्वीवर होतील. १.

यदाग्नेयो वायुर्मलयशिखरास्फालनपटुः ।
प्लवत्यस्मिन्योगे भगवतिपतंगे प्रवसति ॥
तदा नित्योद्दीप्ता ज्वलनशिखरालिंगिततला ।
स्वगात्रोष्मोच्छ्वासैर्वमति वसुधा भस्मनिकरं ॥ २ ॥

**अर्थ**–या आषाढीयोगीं सूर्यास्तसमयीं मलयपर्वताच्या शिखराचे ताडन करणारा वारा आग्नेयीकडून वाहील तर नित्य तप्त, अग्निशिखांनीं आलिंगित अशी भूमि स्वशरीरांतून निघालेले जे ऊभे [ वाफ ] त्यांहींकरून बहुत भस्मातें ओकते ( सर्व जळून भस्म होतें. ) २.

तालीपत्रलतावितानतरुभिः शाखामृगान्नर्तयन् ।
योगेऽस्मिन्प्लवति ध्वनन्सुपरुषो वायुर्यदा दक्षिणः ॥
सर्वोद्योगसमुन्नताश्च गजवत्तालांकुशैर्वेष्टिताः ।
कीनाशा इवमंदवारिकणिकान्मुंचंति मेघास्तदा ॥ ३ ॥

**अर्थ**–या आषाढीयोगी, सूर्यास्तसमयीं ताडपत्रें वेलींचा विस्तार व वृक्ष यांहींकरून वानरांतें नाचविणारा शब्द करणारा, फार कठीण असा दक्षिण वारा सुटेल तर सर्व उद्योगांनीं उन्नत व हत्तीसारखे ताडवृक्षरूप अंकुशांनीं रुद्ध वानरासारखे मेघ अल्प उदकाचे कण सोडतात [ अल्पवृष्टि होते ]. ३.

सूक्ष्मैलालवलीलवंगनिचयान् व्याघूर्णयन्सागरे ।
भानोरस्तमये प्लवत्यविरतो वायुर्यदा नैर्ऋतः ॥
क्षुत्तृष्णामृतमानुषास्थिशकलप्रस्तारभारच्छदा ।
मत्ता प्रेतवधूरिवोग्रचपला भूमिस्तदा लक्ष्यते ॥ ४ ॥

**अर्थ**—आषाढीयोगीं सूर्यास्तीं बारीक एलची, रायआवळी, लवंग यांच्या समुदायांतें समुद्रामध्यें घांपविणारा असा निर्ऋति दिशेकडील वारा सुटेल तर क्षुधा तृषा यांहीं मेलेल्या मनुष्यांच्या अस्थि शकलांचा जो बहुत विस्तार तोच आहे परिधानीय वस्त्र जिला अशी भूमि प्रेतस्त्रीसारखी मत्त व तीव्रचापल्ययुक्त अशी होते क्षु० अन्न पाणी नाहीं यास्तव बहुत लोक मरतात. ४.

यदारेणूत्पातैः प्रविकटसटाटोपचपलः प्रवातः पश्चार्धे दिनकरकरापातसमये ॥
तदा सस्यापेताप्रवरनृवराबद्धसमरा धरास्थाने स्थानेप्ववितरवसामांसरुधिरा ॥ ५ ॥

**अर्थ**—आषाढीयोगीं, सूर्यास्तसमयीं धूळ उडविणारा अत्यंत चपल असा वायु पश्चिमेकडून वाहील तर पृथ्वीवर धान्यें होतील. श्रेष्ठ मनुष्यांचीं युद्धें होऊन जागोजाग वसा मांस, रक्त, यांहीं युक्त भूमि होईल. ( बहुत युद्धें होतील ). ५.

आषाढी पर्वकाले यदि किरणपतेरस्तकालोपपत्तौ ।
वायव्योवृद्धवेगः प्लवति घनरिपुः पन्नगादानुकारी ॥
जानीयाद्वारिधाराप्रमुदितमुदितां मुक्तमंडूककंठां ।
सस्योद्भासैकचिन्हां सुखबहुलतया भाग्यसेनामिवोर्वीं ॥ ६ ॥

**अर्थ**--आषाढीपौर्णिमासीस सूर्यास्तसमयीं फार वेगवान्, मेघांचा शत्रु [ उडविणारा ] गरुडासारखा ( वेगानें जाणारा ) असा वायव्यदिशेकडून वारा सुटेल तर उदकधारांनीं अत्यंत आनंदित, बेडकांच्या शब्दांनीं युक्त व बहुत सुखानें धान्य होण्याचीं चिन्हें समजलीं आहेत जिचीं, अशी भूमि भाग्ययुक्त सेनेचेपरी शोभते, असें जाणावें. ६

मेरुग्रस्तमरीचिमंडलतले ग्रीष्मावसाने रवौ ।
वात्यामोदिकदंबगंधसुरभिर्वायुर्यदा चोत्तरः ॥
विद्युद्भ्रांतिसमस्तकांतिकलनामत्तास्तदा तोयदा ।
उन्मत्ता इव नष्टचंद्रकिरणां गां पूरयंत्यंबुभिः ॥ ७ ॥

**अर्थ**--आषाढीपौर्णमासीस सूर्यास्तकालीं अत्यंत सुगंधी, कदंब पुष्पांच्या सुगंधानें सुवासित वायु, उत्तरेकडून वाहील तर, विजांच्या भ्रमणानें सर्व तेजांचें आकलन [ आकार ज्ञान ] करणारे व मत्तमेघ उन्मत्तासारखे चंद्रकिरण न दिसणाऱ्या भूमीते उदक धारानीं पूर्ण करितील [विजा फार लवून अतिवृष्टि होईल.] ७.

ऐशानो यदि शीतलोऽमरगणैः संसेव्यमानो भवेत् ।
पुन्नागागुरुपारिजातसुरभिर्वायुः प्रचंडध्वनिः ॥
आपूर्णोदकयौवना वसुमती संपन्नसस्याकुलाः ।
धर्मिष्ठाः प्रणतारयोनृपतयो रक्षंति वर्णास्तदा ॥ ८ ॥

**अर्थ**—आषाढ पौर्णमासीस सूर्यास्तकालीं, शीतल, देवांनीं घेण्याजोगा, पुन्नाग [सुरंगीचें झाड] कृष्णागरु पारिजातक यांच्या पुष्पानीं सुगंधित मोठा शब्द करणारा असा वायु ईशानीकडून सुटेल तर उदकपूर्ण, धान्ययुक्त, अशी भूमि होईल. धर्मिष्ट, शरण येणारे आहेत शत्रु ज्यांस, असे राजे ब्राह्मण दि चारही वर्णांचें रक्षण करतील. ८.

---

# अथ सद्योवर्षणं।

वर्षाप्रश्ने सलिलनिलयंराशिमाश्रित्य चंद्रो ।
लग्नं यातो भवति यदि वा केंद्रगः शुक्लपक्षे ॥
सौम्यैर्दृष्टः प्रचुरमुदकं पापदृष्टोल्पमंभः ।
प्रावृट्काले सृजति न चिराचंद्रवद्भार्गवोऽपि ॥ १ ॥

**अर्थ**—पर्जन्याविषयीं प्रश्न केल्यास कर्क, मकर, मीन या जल राशीस चंद्र असून तें प्रश्नलग्न असेल अथवा लग्नापासून शुक्लपक्षीं केंद्रीं चंद्र असेल आणि त्यावर शुभ ग्रहाची दृष्टि असेल तर, वर्षाकालीं शीघ्र बहुत वृष्टि होईल व पापग्रहाची दृष्टि असेल तर अल्पवृष्टि होईल असें सांगावें. चंद्रासारखा शुक्रही होय, म्हणजे शुक्र जलराशीस असून लग्नीं असेल अथवा शुक्लपक्षीं केंद्रीं असेल व तो शुभग्रह दृष्ट असेल तर बहुत वृष्टि, पापदृष्ट असेल तर अल्पवृष्टि वर्षाकालीं होते. १.

आर्द्रद्रव्यं स्पृशति यदि वा वारितत्संज्ञकं वा ।
तोयासन्नो भवति यदि वा तोयकार्योन्मुखो वा ॥
प्रष्टा वाच्यः सलिलमचिरादस्ति निःसंशयेन ।
पृच्छाकाले सलिलमिति वा श्रूयते यत्र शब्दः ॥ २ ॥

**अर्थ**–पर्जन्यप्रश्नकालीं, प्रश्न करणारा रसयुक्त वस्तुविशेषास स्पर्श करील अथवा उदक किंवा जल नावाच्या पदार्थांचा (क्षीर, पय, नागरमोथा, इत्यादि शब्दवाच्य पदार्थांस) स्पर्श करील अ० उदकाजवळ असेल, अ० जलकार्य करीत असेल तर पर्जन्य लवकर पडेल असें निःसंशय सांगावें. अ० प्रश्नकाळीं उदकवाचक शब्द श्रवण होतील तर पर्जन्य शीघ्र निःसंशय पडेल असें सांगावें. २.

उदयशिखरिसंस्थो दुर्निरीक्ष्योऽतिदीप्त्या ।
द्रुतकनकनिकाशः स्निग्धवैडूर्यकांतिः ॥
तदहनि कुरुतेऽम्भस्तोयकाले विवस्वान् ।
प्रतपति यदि वोच्चैः खंगतोतीव तीक्ष्णं ॥ ३ ॥

**अर्थ**—सूर्य उदयपर्वतावर असतां अति तेजानें पाहवेना असा होईल व पातळ सुवर्णासारखा व निर्मळ वैडूर्य मण्याच्या कांतीसारखा होईल तर वर्षाकालीं त्या दिवशीं वृष्टि होईल, अथवा आकाशमध्यभागीं जाऊन अत्यंत ताप करील तर त्या दिवशीं वृष्टि होईल. ३.

विरसमुदकं गोनेत्राभं वियद्विमला दिशो ।
लवणविकृतिः काकांडाभं यदा च भवेन्नभः ॥
पवनविगमः पोप्लूयंते झषाः स्थलगामिनो ।
रसनमसकृन्मंडूकानां जलागमहेतवः ॥ ४ ॥

**अर्थः**–उदकाची गोडी जाईल. गाईच्या नेत्रांसारखें किंवा कावळ्याच्या अंड्यासारखें [ श्वेतनील ] आकाश होईल. दिशा स्वच्छ होतील मिठामध्यें कांट्यासारखा विकार होईल. वायूचा निरोध होईल. मासे भूमीवर जाण्याच्या इच्छेनें उड्या मारतील. बेडूक वारंवार शब्द करतील तर हीं सर्व शीघ्र पर्जन्य येण्याचीं लक्षणें होत. ४

मार्जारा भृशमवनिं नखैर्लिखंतो लोहानां मलनिचयः सविस्रगंधः ।
रथ्यायां शिशुनिचिताश्च सेतुबंधाः संप्राप्तं जलमचिरान्निवेदयंति ॥५॥

**अर्थ**—मांजरें नखांनीं भूमि खणतील. लोखंडाचा मल ( तांब ) यास अपक्व मांसासारखा गंध येईल, मार्गामध्यें मुलें पूल बांधतील तर शीघ्र वृष्टि होईल असें समजावें. ५.

गिरयोंजनपुंजसन्निभा यदि वा वाष्पनिरुद्धकंदराः ।
कृकवाकुविलोचनोपमाः परिवेषाः शशिनश्च वृष्टिदाः ॥ ६ ॥

**अर्थः**-पर्वत काजळाच्या राशींसारखे काळे दिसतील अथवा त्यांच्या कंऱ्यानें युक्त होतील; अथवा कोंबड्याच्या नेत्रांसारखे ( लाल ) चंद्राचे परिवेष ( खळीं ) होतील तर वृष्टि शीघ्र होईल. ६.

विनोपघातेन पिपीलिकानामंडोपसंक्रांतिरहिव्यवायः ।
द्रुमाधिरोहश्च भुजंगमानां वृष्टेर्निमित्तानि गवां प्लुतं च ॥ ७ ॥

**अर्थ**–उपद्रवावांचून मुंग्या आपलीं अंडीं दुसऱ्या जागीं नेतील. सर्प मैथुन करतील व झाडांवरही चढतील. गाई उड्या मारतील. हीं सर्व कारणें शीघ्र वृष्टीचीं होत. ७.

तरुशिखरोपगताः कृकलासा गगनतलस्थितदृष्टिनिपाताः ॥
यदि च गवां रविवीक्षणमूर्ध्वं निपतति वारि तदा न चिरेण ॥ ८ ॥

**अर्थः**—सरडे वृक्षाग्रीं जाऊन आकाशाकडे पाहतील, बैल तर सूर्याकडे पाहतील, तर शीघ्र वृष्टि होईल.

नेच्छंति विनिर्गमं गृहाद्धुन्वंति श्रवणान् खुरानपि ॥
पशवः पशुवच्च कुर्कुरा यद्यंभः पततीति निर्दिशेत् ॥ ९ ॥

**अर्थ**–गवादि पशु घरांतून बाहेर जाण्याची इच्छा करणार नाहींत व कान, पाय कांपवितील तसेंच कुत्रेही करतील तर शीघ्र वृष्टि होईल असें सांगावें. ९.

यदा स्थिता गृहपटलेषु कुर्कुरा रुवन्ति वा यदि विततं दिवोन्मुखः ॥
दिवा तडिद्यदि च पिनाकिदिग्भवा तदा क्षमा भवति समापि वारिणा ॥१०॥

**अर्थ**--कुत्रे गृहसमुदायामध्यें किंवा घरावर उभे राहून शब्द करतील अथवा आकाशाकडे पाहून तोंड पसरून शब्द करतील अथवा ईशान्येकडे दिवसास वीज चमकेल तर पृथ्वी जलमय होऊन उंच सखल दिसणार नाहीं. १०.

शुककपोतविलोचनसंनिभो मधुनिभश्च यदा हिमदीधितिः ।
प्रतिशशी च यदा दिवि राजते पतति वारि तदा न चिराद्दिवः ॥११॥

**अर्थ**–कीर व कवडा यांच्या नेत्रासारखा (तांबूस) अ. मधासारखा चंद्र दिसेल किंवा आकाशामध्यें एक चंद्र असून दुसरा चंद्र दिसेल तर लवकर वृष्टि होईल. ११.

स्तनितं निशि विद्युतो दिवा रुधिरनिभा यदि दंडवत्स्थिताः ।
पवनः पुरतश्च शीतलो यदि सलिलस्य तदा गमो भवेत् ॥१२॥

**अर्थ**—रात्री गर्जना होतील, दिवसास रक्तासारख्या आरक्त व दंडासारख्या वरखाली विजा चमकतील. पूर्वेकडून थंड वारा वाहील तर वृष्टि लवकर होईल. १२.

वल्लीनां गगनतलोन्मुखाः प्रवालाः स्नायंते यदि जलपांशुभिर्विहंगाः ।
सेवंते यदि च सरीसृपास्तृणाग्राण्यासन्नो भवति तदा जलस्य पातः ॥१३॥

**अर्थः**–वेलींचे नवपल्लव ऊर्ध्वगमन करतील उदक व धुरळा यांमध्यें पक्षी स्नान करतील. सर्प तृणाग्रां-वर चढतील, जलवृष्टि जवळ आली [ शीघ्र वृष्टि होईल ] असें समजावें. १३.

मयूरशुकचाषचातकसमानवर्णा यदा जपाकुसुमपंकजद्युतिमुषश्च संध्याघनाः ।
जलोर्मिनगनक्रकच्छपवराहमीनोपमाः प्रभूतपुटसंचया न तु चिरेण यच्छंत्यपः ॥१४

**अर्थ**—मयूर, शुक, चाष, चातक या पक्षांच्या वर्णासारखे नीलवर्ण, जास्वंदीचें पुष्प व आरक्त कमल यासारखें लोहितवर्ण, उदकांतील भोंवरे, सुसर, कांसव, सूकर, मत्स्य यांच्या आकृतीसारख्या आकारांचे असे संध्यासमयीं मेघ दाट असतील तर लवकरच वृष्टि होईल. १४.

पर्यंतेषु सुधाशशांकधवला मध्येंजनालित्विषः ।
स्निग्धा नैकपुटाः क्षरज्जलकणाः सोपानविच्छेदिनः ॥
माहेंद्रिप्रभवाः प्रयांत्यपरतः प्राक् चांबुपाशोद्भवा ।
ये ते वारिमुचस्त्यजंति न चिरादंभः प्रभूतं भुवि ॥१५॥

**अर्थः**—आसमंताद्भागीं अमृत व चंद्र यांसारखे श्वेत आणि मध्यभागीं काजळ व भ्रमर यांसारखे काळे असें निर्मल, दाट, वारीक उदक बिंदु सोडणारे, शिडीच्या पायऱ्यासारखे एकावर एक असे राहणारे, पूर्वेस उत्पन्न होऊन पश्चिमेकडे जाणारे अथवा पश्चिमेस उत्पन्न होऊन पूर्वेस जाणारे असे जे मेघ ते भूमीवर बहुत उदकवृष्टि लवकरच करतात. १५.

शक्रचापपरिघप्रतिसूर्या रोहितोथतडितः परिवेषाः ।
उद्गमास्तसमये यदि भानोरादिशेत्प्रचुरमंबु तदाशु ॥१६॥

अर्थ-सूर्याच्या उदयास्तकालीं इंद्रधनुष्य, परिघ ( अभ्ररेषा ), एककालीं दोन सूर्य, रोहित [ वक्ष्यमाण ] वीज, खळें, हीं जर होतील तर शीघ्र जलवृष्टि होईल असें सांगावें. १६,

यदि तित्तिरपत्रनिभं गगनं मुदिताः प्रवदंति च पक्षिगणाः ।
उदयास्तमये सवितुर्द्युनिशं विसृजंति घना नचिरेण जलं ॥१७॥

अर्थ-सूर्योदयास्तकालीं तित्तिरपक्षाच्या पक्षासारखें [ विचित्रवर्ण ] आकाश होईल, पक्षिसमुदाय आनंदानें शब्द करतील, तर रात्रंदिवस जलवृष्टि होईल. ( उदयकालीं दिवावृष्टि, अस्तकालीं रात्रौ वृष्टि असें यथासंख्य जाणावें ). १७.

यद्यमोघकिरणाः सहस्रगोरस्तभूधरकरा इवोच्छ्रिताः ।
भूसमं च रसते यदांबुदस्तन्महद्भवति वृष्टिलक्षणं ॥१८॥

अर्थ-सूर्याचे अमोघ किरण अस्त पर्वताच्या हस्तासारखे दीर्घ होतील. ( अस्तकालीं किरण लांब गेलेले दिसतील ). मेघ भूमीबरोबर [ जवळ ] शब्द करील तर तें शीघ्रवृष्टीचें महान् लक्षण होय. १८.

प्रावृषि शीतकरो भृगुपुत्रात्सप्तमराशिगतः शुभदृष्टः ।
सूर्यसुतान्नवपंचमगो वा सप्तमगश्च जलागमनाय ॥ १९ ॥

अर्थः-वर्षाकालीं चंद्र शुक्रापासून सातव्या राशीस असेल आणि त्यावर शुभ ग्रहाची दृष्टि असेल अथवा चंद्र शनीपासून ९।५।७ इतक्या राशीस असेल आणि त्यावरही शुभग्रहाची दृष्टि असेल तर पर्जन्यवृष्टि होईल.

प्रायो ग्रहाणामुदयास्तकाले समागमे मंडलसंक्रमे च ।
पक्षक्षये तीक्ष्णकरायनांते वृष्टिर्गतेऽर्के नियमेन चार्द्रां ॥ २० ॥

अर्थ-ग्रहांचे उदय व अस्त यावेळीं, भौमादि ग्रहांचा चंद्राशीं संयोग होईल त्यावेळीं, भरण्यादि सहा मंडलें शुक्रचारामध्यें सांगितली त्यांच्या प्रवेशसमयीं, अमावस्या व पौर्णिमा यांचे अंतीं, सूर्याच्या दक्षिणोत्तर अंतीं, सूर्य आर्द्रा नक्षत्रीं जातेवेळीं, या सर्वकाळीं बहुतकरून नियमानें वृष्टि होत्ये. २०

समागमे पतति जलं ज्ञशुक्रयोर्ज्ञजीवयोर्गुरुसितयोश्च संगमे ॥
यमारयोः पवनहुताशजं भयं न दृष्टयोरसहितयोश्च सद्ग्रहैः ॥ २१ ॥

अर्थ—बुध व शुक्र, बुध व गुरु, गुरु व शुक्र-यांचा योग झाला असतां बहुतकरून नियमानें वृष्टि होत्ये. तसेंच शनि व भौम यांचा योग झाला असतां वायु व अग्नि यांचे भय होते, परंतु शुभग्रहांनीं दृष्ट किंवा युक्त असतील तर होणार नाहीं. २१.

अग्रतः पृष्ठतो वापि ग्रहाः सूर्यावलंबिनः ।
यदा तदा प्रकुर्वंति महीमेकार्णवामिव ॥ २२ ॥

अर्थः-सूर्याच्या पुढें किंवा मागें बहुत ग्रह येतील तर त्यावेळीं सर्व पृथ्वी जलमय होईल. २२.

---

## ॥ मेघवृष्टिः ॥

( प्रश्नवैष्णवावरून प्रश्नाविषयीं विचार. )

सहस्ररश्मेर्मिथुनप्रवेशे शशांकवाचस्पतिशुक्रसौम्यैः ।
मीनाश्वकन्यामिथुनस्थितैः स्यात्तदा सुवृष्टिः सकलान्नकर्त्री ॥ १ ॥

**अर्थ**-सूर्य मिथुन राशीला ज्या वेळीं प्रवेश करील त्या वेळेस चंद्र, गुरू, शुक्र आणि बुध हे मान, कर्क, कन्या आणि मिथुन या राशीला असतील तर सुवृष्टि होऊन संपूर्ण धान्यें उत्तम तऱ्हेचीं येतील. १.

सहस्ररश्मेर्मिथुनप्रवेशे शुक्रज्ञयोः कर्कवृषस्थयोश्च ।
चंद्रे झषे देवगुरौ कुमार्यां विपर्ययाद्वापि तदा सुवृष्टिः ॥ २ ॥

**अर्थ**-सूर्य मिथुनाला ज्यावेळीं येईल त्यावेळीं शुक्र, बुध हे दोघे कर्क व वृषभ या राशीला असतील तर आणि चंद्र मीन राशीला असून कन्या राशीला गुरु असेल तर, किंवा मीन राशीला गुरु व वृषभ राशीला चंद्र असेल तर सुवृष्टि होऊन सकल धान्यें उत्तम तऱ्हेचीं पिकतील. २.

सहस्ररश्मेर्मिथुनप्रवेशे ज्ञशुक्रयोर्मेषनृयुग्मसंस्थयोः ।
चंद्रज्ययोश्चापगयोश्च पापैस्तुलालिसिंहोपगतैः सुवृष्टिः ॥ ३ ॥

**अर्थ**--मिथुनेला सूर्य ज्यावेळीं प्रवेश करील त्या वेळेस शुक्र, बुध हे दोघे मेष व मिथुन या राशीला असून चंद्र व गुरु हे धन राशीला असतील तर आणि संपूर्ण पापग्रह तूल, सिंह आणि वृश्चिक या राशीला असतील तर सुवृष्टि होऊन धान्यें उत्तम तऱ्हेचीं येतील असें सांगावें ३.

सहस्ररश्मेर्मिथुनप्रवेशे माहेयसूर्यात्मजसैंहिकेयैः ।
मीनाश्च कन्यामिथुनास्थितैश्च तदाल्पवृष्टिः प्रियमन्नमुर्व्याम् ॥ ४ ॥

**अर्थ**--मिथुनेला सूर्य ज्यावेळीं प्रवेश करील त्या दिवशीं त्यावेळीं मंगळ, शनि आणि राहु हे मीन, कन्या व मिथुन या राशीला असतील तर अल्पवृष्टि होऊन पृथ्वीवर उत्तम धान्यें पिकतील. ४.

सहस्ररश्मेर्मिथुनप्रवेशे मंदारयोः कर्कवृषस्थयोश्चेत् ।
द्विदेहभस्थे दनुजे विशेषात्तदाल्पवृष्टिः प्रियमन्नमुर्व्यां ॥५॥

**अर्थ**--सूर्य मिथुनेला ज्यावेळीं येईल त्या वेळेस मंगळ व शनि हे दोघे कर्क आणि वृषभ या राशीला असून शुक्र द्विस्वभाव राशीला असेल तर अल्पवृष्टि होऊन पृथ्वीवर धान्यें उत्तम तऱ्हेचीं पिकतील. ५.

शुभाशुभैर्ग्रहैर्मिश्रैः फलं मिश्रं प्रजायते ।
सूर्ये क्रूरान् गुरुः पश्येत्तदा वृष्टिश्च मध्यमा ॥६॥

**अर्थ**-मिथुनप्रवेशसमयीं शुभाशुभ ग्रह लग्नीं असतील तर मिश्र फल होईल. आणि सूर्य क्रूर ग्रहानें युक्त असेल तर वृष्टि होणार नाहीं. आणि तो सूर्य गुरूनें दृष्ट असेल तर मध्यम वृष्टि होईल. ६.

आषाढमासासितपक्षरोहिणीं प्रदक्षिणं चेत्कुरुते निशाकरः ।
तदा सुवृष्टिः शुभमन्नसंपदो विपर्ययादन्नमहर्घता भवेत् ॥७॥

**अर्थ**-आषाढमासाच्या कृष्णपक्षामध्यें चंद्राला परिवेष [ खळें ] पडून त्या परिवेषाच्या अभ्यंतरीं रोहिणी नक्षत्र असेल तर, चांगली वृष्टि होऊन धान्य स्वस्त होईल. आणि आषाढ मासाच्या कृष्ण पक्षांत चंद्र व रोहिणी नक्षत्र यांस परिवेष्टन झाल्यास सुवृष्टि होणार नाहीं. आणि धान्याची महर्घता होईल, ७.

पूर्वाषाढारेवतीहस्तसार्पादित्यस्वल्पां वृष्टिमन्नं महर्घं ।
मंदः कुर्यात् स्वर्क्षतुंगास्थितश्चाभीष्टां वृष्टिं भूरि सस्यं समर्घम् ॥८॥

**अर्थ**--आषाढ कृष्ण पक्षांत पूर्वाषाढा, रेवती, हस्त, आश्लेषा आणि पुनर्वसु या नक्षत्रांपैकीं कोणत्याही नक्षत्राला शनि असेल तर अल्प वृष्टि होऊन धान्य महाग होईल. आणि तो शनि स्वक्षेत्रगत, स्वांशगत, उच्चगत, किंवा स्वोच्चांशगत असेल तर वृष्टि उत्तम तऱ्हेची होऊन धान्य पुष्कळ होईल. ८.

तुलालिगोमीनकुलीरकुंभमृगाः सतोया ।विजलाश्च शेषाः ।
जलात्मकौ शुक्रविधू कुजार्कसौरा विशुष्का ज्ञगुरू विमिश्रौ ॥९॥

अर्थः—तूळ, वृश्चिक, वृषभ, मीन, कर्क, कुंभ, आणि मकर या जलराशी, बाकीच्या निर्जल राशी असें समजावें, आणि शुक्र व चंद्र हे दोघे जलग्रह समजावे; आणि मंगळ, शनि व रवि हे निर्जल ग्रह समजावे; आणि गुरु व बुध हे दोघे मिश्रग्रह आहेत असें समजावें. ९.

पूर्णे जलर्क्षे शुभदृष्टयुक्ते केन्द्रे हिमांशावचिरात्सुवृष्टिः ।
तद्वत्सिते शीतकरे त्रिकोणे लग्ने यदा याति तदा च वृष्टिः ॥१०॥

अर्थ—प्रश्नकालीं पूर्णचंद्र केंद्रीं असून तो जलराशीला असेल तर, आणि तो शुभ ग्रहांनीं युक्त किंवा दृष्ट असेल तर, लवकर वृष्टि होईल; आणि शुक्र जलराशीला असून केंद्रीं असेल तर, आणि तो शुभ ग्रहांनीं दृष्ट किंवा युक्त असून चंद्र लग्नीं किंवा त्रिकोणस्थानीं असेल तर, वृष्टि लौकर होईल असें सांगावें. १०.

सौम्या जलर्क्षोपगतास्तृतीये केंद्रे द्वितीये च सिते च पक्षे ॥
वृष्टिः प्रभूता भवतीह शीघ्रं सर्वैः शुभैरंबुभगैर्विशेषात् ॥ ११ ॥

अर्थ–संपूर्ण शुभग्रह जलराशीला असून ते प्रथम, द्वितीय, तृतीय, चतुर्थ, सप्तम आणि दशम या स्थानांपैकीं कोणत्याही स्थानीं असतील तर, आणि शुक्र पक्ष असेल तर लवकर सुवृष्टि होईल. आणि संपूर्ण शुभ ग्रह जलराशीला असून चतुर्थस्थानीं असतील तर, आणि शुक्र पक्ष असेल तर, लवकर विशेष वृष्टि होईल असें सांगावें. ११.

सौम्याश्चतुर्थे शुभवृष्टिदाः स्युः पापाश्च दुर्भिक्षभयाय तुर्ये ॥
कुजेंदुशुक्रैरुदये सुवृष्टिः शुक्रेंदुमंदैस्तनुगैश्च तद्वत् ॥ १२ ॥

अर्थ—सर्व शुभग्रह चतुर्थस्थानीं असतील तर सुवृष्टि होईल; आणि सर्व पापग्रह चतुर्थस्थानीं असतील तर, दुर्भिक्ष व भय उत्पन्न होईल; आणि तनुभवनीं मंगळ, चंद्र आणि शुक्र हे तिघे असतील तर, वृष्टि लवकर होईल; किंवा तनुभवनीं शुक्र, शनि आणि चंद्र हे तिघे असतील तर, सुवृष्टि होईल. १२.

लग्ने यदा स्युः शनिभौमसूर्या बलेन युक्ता विजलर्क्षसंस्थाः ॥
दुर्भिक्षमन्नप्रियमार्तिपीडां कुर्युः सुभिक्षं शुभखेचराश्च ॥ १३ ॥

अर्थः-लग्नीं शनि, मंगळ आणि सूर्य हे तीन ग्रह असून बलिष्ठ असतील तर, आणि हे ग्रह जलराशीला नसतील तर, दुर्भिक्ष होईल; आणि लोकांस अत्यंत पीडा होईल; आणि तनुस्थानीं शुभग्रह असून बलिष्ठ असतील तर, आणि ते जलराशीला असतील तर, वृष्टि होईल, सुभिक्ष होईल, आणि लोकांस पीडा होणार नाहीं. १३.

शनैश्चराद्धर्मसुतास्तसंस्थः शुक्रात्स्मरस्थः शुभवीक्षितश्च ॥
चंद्रः प्रकुर्यात्सलिलं च सूर्यं प्रविष्टमाना खचरा जलाय ॥ १४ ॥

अर्थः–शनिपासुन नवमस्थानीं चंद्र असुन तो शुक्रापासून सप्तमस्थानीं असेल, म्हणजे शनीपासून शुक्र तृतीयस्थानीं असेल तर, आणि त्या चंद्रावर शुभग्रहांच्या दृष्टी असतील तर, वृष्टि होईल; किंवा शनीपासुन चंद्र पंचमस्थानीं अथवा सप्तमस्थानीं असून तो चंद्र शुक्रापासून सप्तमस्थानीं असेल तर, आणि त्यावर शुभग्रहांची दृष्टि असेल तर, वृष्टि होईल; आणि कोणताही ग्रह अस्तंगत झाला असतां वृष्टि होण्याचा संभव आहे असें समजावें. १४. [अस्मिन्श्लोकार्थे नियमो नास्ति ।]

आर्द्रं जलाव्हं द्रववस्तुसंस्पृशेज्जलोपविष्टः सलिलार्थमुद्यतः ॥
पानीयशब्दं प्रवदेच्च पृच्छकस्तदा सुवृष्टिं सहसा तदादिशेत् ॥ १५ ॥

**अर्थ**—प्रश्नकालीं पृच्छक जलाला स्पर्श करीत असेल तर, किंवा आर्द्र वस्तूला स्पर्श करील तर वृष्टि होईल. आणि प्रश्न करणारा जलामध्यें असून प्रश्न करील तर, वृष्टि लवकर होईल. किंवा प्रश्न करणारा उदक आणण्य करितां हातामध्यें कुंभ घेऊन निघालेला असेल, विचारणाराच्या मुखांतून जलवाचक शब्द निघतील तर, वृष्टि लवकर होईल असें सांगावें. १५.

पीताभ्रसंध्यां परिघं सुचापं स्निग्धाब्दवृक्षं घनमेघवृंदं ॥
पूर्वोत्तरेशानजलेशदिक्षु सौदामिनीं वीक्ष्य वदेत्सुवृष्टिं ॥ १६ ॥

**अर्थ**—सूर्योदयकालीं किंवा सूर्यास्तकालीं आकाश पीतवर्णाचे दिसत असेल तर, वृष्टि लवकर होईल; आणि रवीला किंवा चंद्राला परिवेष [ खळें ] पडेल तर, वृष्टि होईल; आणि आकाशांत इंद्रधनुष्य पडेल किंवा आकाशामध्यें कृष्णवर्ण मेघांचा समुदाय असेल आणि वृक्ष सतेज दिसतील तर, वृष्टि लवकर होईल; किंवा पूर्व ईशान्य, उत्तर आणि पश्चिम या दिशांपैकीं कोणत्याही दिशेला वीज होत असतील तर शीघ्रवृष्टि होईल. १६.

कृशानुकाष्ठाप्रभवाग्रविद्युत्सद्यो निहन्याज्जलवृष्टिमुल्वणां ॥
नैर्ऋत्ययाम्यप्रभवा च तद्वत्समीरकाष्ठाप्रभवा च वृष्टिदा ॥ १७ ॥

**अर्थः**—आग्नेय दिशेला मोठी वीज उत्पन्न झाली तर, वृष्टि होत असली तरी तिचा नाश करील; आणि नैर्ऋत्य किंवा दक्षिण या दिशेपासून वीज उत्पन्न झाली असतां मोठा वारा सुटल्यामुळें अल्प वृष्टि होईल. १७.

स्निग्धा घना जलधरा दिवि पौषयुक्ता यस्यां तिथौ निशि दिनेऽथ भवंति यावत् ॥
तस्यां तिथौ भुवि भवेन्नभसोसिताद्बै वृष्टिः पयोदसमयेंऽबुदवृंदतुल्या ॥ १८॥

**अर्थः**—पौषमासीं ज्या तिथीला रात्रीं किंवा दिवसा कृष्णवर्णाचे मेघ आकाशामध्यें दिसतील त्याच तिथीला वर्षाकालीं ते मेघ भूमीवर वृष्टि करतील. १८.

चंद्रार्कयोः सप्तमगौसितार्की सुखेऽष्टमेवापि तथा विलग्नात् ॥
द्वितीयदुश्चिक्य गतौ तथा च वर्षासु वृष्टिं प्रवदेन्नराणाम् ॥ १९॥

**अर्थः**—वर्षाकालाचें वृष्टिविषयीं चंद्र आणि रवि हे ज्या स्थानीं असतील त्या स्थानापासून सप्तमस्थानीं शुक्र किंवा शनि असेल अथवा दोन्ही ग्रह त्याच स्थानीं असतील तर वृष्टि होईल अथवा लग्नापासून दुसऱ्या किंवा तिसऱ्या स्थानीं शुक्र किंवा शनि असेल अथवा दोघे एके ठिकाणीं त्याच स्थानीं असतील तर वृष्टि होईल.

सौम्या जलराशिस्थास्तृतीयधनकेंद्रगाः सिते पक्षे ॥
चंद्रे वाप्युदयगते जलराशिस्थे वदेद्वर्षम् ॥ २० ॥ [ब. पं.]

**अर्थः**-प्रश्नकालावरून वृष्टि केव्हां होईल? कर्क, मीन, मकर आणि कुंभ या जलराशीला शुभ ग्रह असून शुक्ल पक्षी प्रश्न केला असेल तर, वृष्टि होईल, हा पूर्वोक्त योग जलराशीचा असून ३।२।१।४।७।१० या स्थानीं शुभग्रह असतील तर अथवा जलराशीचें लग्न असून त्या स्थानीं चंद्र असेल तर प्रश्नकर्त्याला सुवृष्टि होईल म्हणून सांगावें. २०.

---

## कुत्रे मोठ्यानें रोदन करतील तर महान् वृष्टियोग.

उच्चैः स्वराः स्युस्तृणकूटसंस्थाः प्रासादवेश्मोत्तमसंस्थिता वा ।
वर्षासु वृष्टिं कथयंति तीव्रामन्यत्र मृत्युं दहनं रुजश्च ॥ १ ॥

**अर्थ**-कुत्रे गवताचा गंज, देवालय, मुख्य गृह यांवर राहून उचस्वरानें रोदनशब्द वर्षाकालीं करतील तर महान वृष्टि होईल, अन्य ऋतूंत करतील तर मृत्यु, अग्नि, रोग यांचें भय होईल. ॥ १ ॥

## कुत्रे वर्षाकालीं वृष्टि बंद झाली असतां पाण्यांत राहून फिरतील तर वृष्टियोग.

प्रावृट्कालेऽवग्रहेंभोवगाह्य प्रत्यावृत्तैरेचकैश्वाप्यभीक्ष्णं ।
आधुन्वंतो वा पिबंतश्च तोयं वृष्टिं कुर्वन्त्यंतरे द्वादशाहात् ॥ २ ॥

अर्थ–कुत्रे, वर्षाकालीं अवर्षण ( वृष्टि बंद झाली ) असतां पाण्यांत राहून बाजूनीं सभोंवते फिरतील तर पाणी हालवतील व पितील तर १२ दिवसांत पर्जन्य पडेल. २.

## गाईस, माशा व कुत्री यांनीं रोधिलीं तर लवकर पर्जन्यलक्षण.

अकारणे क्रोशति चेदनर्थो भयाय रात्रौ वृषभः शिवाय ।
भृशं निरुद्धा यदि मक्षिकाभिस्तदाशुवृष्टिं सरमात्मजैर्वा ॥ १ ॥

अर्थ–गाय कारणावांचून ( वासरूं, पाणी, गवत, यांवाचून ) शब्द करील तर अनर्थ होईल. रात्रीस शब्द करील तर भय होईल. बैल रात्रीस शब्द करील तर कल्याण होईल. गाई मक्षिकांनीं अथवा कुत्र्यांनीं अत्यंत रोधिली तर, शीघ्र बहुत पर्जन्यवृष्टि होईल. १.

## कावळ्याच्या घरट्यावरून वृष्टिलक्षण जाणणें.

नीडे प्राक्शाखायां शरदि भवेत्प्रथमवृष्टिरपरस्यां ।
याम्योत्तरयोर्मध्या प्रधानवृष्टिस्तरोरुपरि ॥ १ ॥
शिखिदिशि मंडलवृष्टिर्नैरृत्यां शारदस्य निष्पत्तिः ।
परिशेषयोः सुभिक्षं मूषकसंपत्तु वायव्ये ॥ २ ॥

अर्थ—कावळ्याचा घरटा वृक्षाच्या पूर्वेकडील अथवा पश्चिमेकडील खांदीवर असेल तर शरदृतूमध्यें ( आश्विन, कार्तिक ) प्रथम पर्जन्य होईल. दक्षिण व उत्तर या दिशांकडे असेल तर भाद्रपद व आश्विन यांत पर्जन्य होईल. झाडाच्या शेंड्यावर असेल तर श्रावणादि चारही महिन्यांत पर्जन्य होईल. आग्नेयी दिशेस असेल तर कोठें कोठें पर्जन्य होईल, निर्ऋतीस असेल तर शरदृतूतील धान्यें होतील. वायव्य व ईशानीकडे असेल तर सुभिक्ष होईल. वायव्येस असेल तर उंदिरादिकांची वृद्धिही होईल. २

वैशाखे निरुपहते वृक्षे नीडः सुभिक्षशिवदाता ।
निंदितकंटकिशुष्केष्वसुभिक्षभयानि तद्देशे ॥ ३ ॥

अर्थः–वैशाखमासीं निरुपद्रव झाडावर कावळा घरटा करील तर सुभिक्ष व कल्याण होईल. बाभंट, काट्यांचा, शुष्क अशा झाडावर घरटा करील तर महागाई व भयेंहीं त्या देशांत होतील.

## वृष्टिलक्षणयोगः

स्थलसलिलचराणां व्यत्ययो मेघकाले प्रचुरसलिलवृष्ट्यै शेषकाले भयाय ।
मधुभवनविलीनं तत्करोत्याशुशून्यं मरणमपि निलीना मक्षिका मूर्ध्नि नीला ॥

अर्थ–वर्षाकालीं जमिनीवरील प्राणी बकरे वगैरे पाण्यांत जातील व पाण्यांतील प्राणी मासे वगैरे जमिनीवर येतील तर बहुत पर्जन्य होईल. अन्य कालीं भय होईल. मधमाशांचें पोळें घरावर बसेल तर तें घर मनुष्यरहित होईल. ती माशी मस्तकीं नीळवर्ण असेल तर प्राण्यास मृत्युही करील. १

## मुंग्यांचें अंड्यावरून वृष्टिलक्षणयोग.

विनिक्षिपंत्यः सलिलेंडकानि पिपीलिका वृष्टिनिरोधमाहुः ।
तरुस्थलं वापि नयंति निम्नाद्यदा तदा ताः कथयंति वृष्टिं ॥ १ ॥

अर्थ–मुंग्या उदकामध्यें अंडी ठेवतील तर पर्जन्य बंद होईल असें सांगतात, सखल भूमीपासून झाडावर किंवा उंच प्रदेशावर नेतील तर पर्जन्य होईल असें त्या सांगतात. १

# ॥ अथ वृष्टिवैकृतं ॥

दुर्भिक्षमनावृष्ट्यामतिवृष्ट्यां क्षुद्भयं सपरचक्रं ।
रोगोह्यनृतुभवायां नृपतिवधोनभ्रजातायां ॥१॥

अर्थ—अवर्षण झ.लें असतां दुर्भिक्ष होतें. अतिवृष्टि झाली तर दुर्भिक्ष व शत्रु यांचें भय होतें. वर्षाऋतुवांचून अन्य ऋतूंत अतिवृष्टि होईल तर रोगभय होतें, अभ्र नसून अतिवृष्टि होईल तर राजाचा वध होतो. १.

शीतोष्णविपर्यासे नो सम्यगृतुषु संप्रवृत्तेषु ।
षण्मासाद्राष्ट्रभयं रोगभयं दैवजनितं च ॥२॥

अर्थ--शिशिरादिक ऋतु गणितागत प्रवृत्त झाले नसतां, थंडी व उष्णता यांचा विपर्यास म्हणजे शिशिरऋतूंत उष्णता व ग्रीष्म ऋतूंत थंडी असें झालें तर सहा महिन्यांनीं राष्ट्रभय व दैवकृत रोगभयही होतें. २.

अन्यर्तौ सप्ताहं प्रबंधवर्षे प्रधाननृपमरणं ।
रक्ते शस्त्रोद्योगो मांसास्थिवसादिभिर्मरकः ॥३॥
धान्यहिरण्यत्वक्फलकुसुमाद्यैर्वर्षितैर्भयं विंद्यात् ।
अंगारपांशुवर्षे विनाशमायाति तन्नगरम् ॥४॥

अर्थ—वर्षाऋतूवांचून इतर ऋतूमध्यें सात दिवस अति वृष्टि होईल तर मुख्य राजास मृत्यु होतो. रक्तवृष्टि होईल तर युद्धभय होतें. मांस, अस्थि, मज्जा, घृत, तैल इत्यादिकांची वृष्टि होईल तर लोकमरण होतें. धान्य, सुवर्ण, वृक्षसाली, फलें, पुष्पें, पानें इत्यादिकांची वृष्टि होईल तर भय होतें. अंगार [ निखारे किंवा कोळसे ], धूळ यांची वृष्टि झाली तर जेथें वर्षाव होईल त्या नगराचा नाश होतो. ४.

उपला विना जलधरैर्विकृता वा प्राणिनो यदा वृष्टाः ।
छिद्रं वाप्यतिवृष्टौ सस्यानामीतिसंजननं ॥५॥

अर्थ--मेघावांचून उपला [ गारा ] वर्षाव होईल अथवा विकारयुक्त गर्दभ, उष्ट्र, अश्व, मार्जार, कोल्हे इत्यादि प्राण्यांची वृष्टि होईल अथवा अतिवृष्टि होईल अथवा अतिवृष्टि होत असतां मध्यें अवर्षण होईल तर धान्यास उपद्रव उत्पन्न होतो. ५.

( क्षीरघृतक्षौद्राणां दध्नो रुधिरोष्णवारिणां वर्षे ॥
देशविनाशो ज्ञेयोऽसृग्वर्षे चापि नृपयुद्धं ॥६॥ )

अर्थः—( दुग्ध, घृत, मध, दधि, रक्त, उष्णोदक यांचा वर्षाव होईल तर देशनाश जाणावा. रक्तवर्षाव झाला तर राजांचें युद्धही होतें. ६. )

यद्यमलेऽर्के छाया न दृश्यते दृश्यते प्रतीपा वा ।
देशस्य तदाशुमहद्भयमायातं विनिर्देश्यं ॥७॥

अर्थः—स्वच्छ सूर्य असून छाया दिसणार नाहीं अथवा छाया प्रतिकूल ( पूर्वेस सूर्य असतां पश्चिमेस छाया असावयाची ती पूर्वेकडेच ) असेल, तर देशास महद्भय होईल असें जाणावें. ७.

व्यभ्रे नभसींद्रधनुर्दिवा यदा दृश्यतेऽथवा रात्रौ ।
प्राच्यामपरस्यां वा तदा भवेत् क्षुद्भयं सुमहत् ॥८॥

अर्थः—अभ्ररहित आकाशामध्यें दिवसा किंवा रात्रीं पूर्वेकडे किंवा पश्चिमेकडे इंद्रधनुष्य ज्याकालीं दिसेल त्या कालीं मोठें दुर्भिक्षभय होईल. ८.

सूर्येंदुपर्जन्यसमीरणानां यागः स्मृतो वृष्टिविकारकाले ।
धान्यान्नगो कांचनदक्षिणाश्च देयास्ततः शांतिमुपैति पापं ॥९॥

अर्थः—सूर्य, चंद्र, पर्जन्य, वायु यांचे प्रीत्यर्थ पर्जन्यविकारकालीं याग [ होम ] करावा. आणि धान्य, अन्न, गाय सुवर्ण यांची दक्षिणा ब्राह्मणास द्यावी; तेणेंकरून पाप ( अशुभ ) शांति ( नाश ) होते. ९.

## पर्जन्यलक्षण, नाडी व त्यांचे स्वामी. ( मु० माला )

कृशानुभात्सप्तसु नाडिकासु लिखेत्क्रमादुत्क्रमतः पुनः पुनः ।
नाडीत्रिकं पूर्वमिहातिगर्हितं मध्या तु मध्या शुभदं ततस्त्रिकं ॥१॥
चंडवातशिखिसौम्यनीरदात्यंबुदामृतकरीति नाडिकाः ।
सौरिसूर्यकुजजीवभार्गवज्ञेंदवस्तदधिपा यथाक्रमं ॥२॥

अर्थः—कृत्तिकानक्षत्रापासून क्रमानें व व्युत्क्रमानें चार आवृत्तींनीं नक्षत्रें लिहून एकेका कोष्टकीं चार चार नक्षत्रें येतील अशीं सात कोष्टकें करावीं. एकेकांत अनुक्रमें सात नाडींचीं नांवें लिहावीं. पूर्वींच्या तीन निंद्य आणि चवथी मध्यम त्यापुढें तीन शुभदायक असें जाणावें. नाडीचीं नांवें चंड, वात, शिखि, सौम्य, नीरदा, अत्यंबुदा, अमृतकरी यांचे स्वामी क्रमानें शनि, सूर्य, भौम, गुरु, शुक्र, बुध आणि चंद्र असें जाणावें.

### ॥ अथ सप्तनाडीचक्रं ॥

| नामानि. | चंडनाडी. | वातनाडी | अग्निनाडी. | सौम्यनाडी. | नीरनाडी. | जलनाडी. | अमृतनाडी. |
|---|---|---|---|---|---|---|---|
| नक्षत्राणि २८. | कृत्तिका. | रोहिणी. | मृग. | आर्द्रा. | पुनर्वसु. | पुष्य. | आश्लेषा. |
| | विशाखा. | स्वाती | चित्रा. | हस्त. | उत्तरा. | पूर्वा. | मघा. |
| | अनुराधा. | ज्येष्ठा. | मूळ. | पूर्वाषाढा. | उत्तराषाढा. | अभिजित्. | श्रवण. |
| | भरणी. | अश्विनी | रेवती. | उत्तराभाद्रपदा. | पूर्वाभाद्रपदा. | शततारका. | धनिष्ठा. |
| स्वामिनः | शनिः. | रविः | मंगळः | गुरुः | शुक्रः | बुधः | चंद्रः |
| फलानि. | निर्जला | | | मध्यमा | सजला | | |

## कोठें ग्रह असतां पर्जन्य कसा पडतो.

खेटाः शनिद्युमणिभूसुतनाडिकासु ॥
द्व्याद्या भवंत्यनिलतापकरा न वृष्ट्यै ॥ ३ ॥
देवेज्यदैत्यगुरुविच्छशिनाडिकास्थाः ॥
कुर्वंति नूनमधिकोत्तरवृष्टिसृष्टिं ॥ ४ ॥
यत्रैकनाड्यां बहवो नभोगास्तत्र स्थितः शीतकरः सुवृष्ट्यै ॥
तत्रापि चेज्जीवकुजाख्यनाड्यां चंद्रस्तदा वारिमयी मही स्यात् ॥५॥

अर्थ—शनि रवि भौम यांच्या नाडींत दोन, तीन किंवा अधिक ग्रह असतील तर वायु आणि उन्हाळा करतील, वृष्टि करणार नाहींत. गुरु शुक्र, बुध व चंद्र यांच्या नाडींत दोन तीन इत्यादिक ग्रह असतील तर चवथे- नाडीपासून पुढचे पुढचे नाडीस असलेले अधिक चांगली वृष्टि करतील. एका नाडीस बहुत ग्रह असून तेथें

चंद्र असेल तर उत्तम वृष्टि होईल. त्यापेक्षांही भौम गुरुयुक्त नाडींत चंद्र असेल तर उदकपरिपूर्ण पृथ्वी होईल. ३।४।५.

## चंद्रावरून वृष्टीचें लक्षण.

केवलैर्यदि शुभैरशुभैर्वा विध्यते शशधरः स न वृष्टे ॥
क्रूरसौम्यखचरैश्च विमिश्रैर्विध्यते यदि तदा बहु वृष्टिः ॥ ६ ॥

अर्थ—नुसत्या शुभग्रहांनीं किंवा अशुभानीं विद्ध किंवा युक्त चंद्र वृष्टि करीत नाहीं. पापशुभमिश्र ग्रहांनीं जर विद्ध व युक्त आहे तर पुष्कळ वृष्टि करितो. ६.

## खनाडिस्थ सर्व ग्रह व भौम सर्व नाडींचीं फलें देतो

एकोऽपि खेटो निजनाडिकास्थः फलं तदा यच्छति नाडिकोत्थं ।
सर्वासु नाडीषु गतः कुजस्तु ददाति नाडीसदृशं फलं सदाः ॥ ७ ॥

अर्थ—एकही ग्रह आपल्या नाडींत असेल तर नाडींचें फल देतो. कोणत्याही नाडीस भौम असेल तर त्या नाडीचें फल असेल त्याप्रमाणें देतो. ७.

## चंद्रावरून विशेष.

यस्य नाड्यां पूर्णश्चंद्रस्तेन दृष्टो युतो यदि ।
करोति वृष्टिं भूपृष्ठे जलनाड्यां विशेषतः ॥ ८ ॥

अर्थ—ज्या ग्रहाच्या नाडींत पूर्णचंद्र असेल त्या ग्रहानें युक्त किंवा दृष्ट असेल तर भूपृष्ठावर वृष्टि करितो. जलनाडींत विशेष करतो. ८.

## सतत वृष्टीचें चंद्रावरून लक्षण.

विद्धश्चंद्रश्चंद्रनाड्यां त्रिचतुःपंचभिर्ग्रहैः ॥
एकत्रिसप्तदिवसान् क्रमाद्वृष्टिं प्रयच्छति ॥ ९ ॥
एवमर्धं तदर्धं वा फलं नाड्योर्ज्ञशुक्रयोः ॥
सौम्यादिप्वखिलैर्विद्धस्तितर्कार्कधृतीः क्रमात् ॥ १० ॥

अर्थ——चंद्र आपल्या नाडींत ३।४।५ ग्रहांनीं विद्ध असेल तर क्रमानें १।३।७ दिवस सारखी वृष्टि करील विद्ध चंद्र बुधाच्या नाडींत असतां दिवस अर्धा, दीड, साडेतीन अशा क्रमानें वृष्टि करतो. असाच शुक्राच्या नाडींत असतां पाव, पाऊण, पावणेदोन दिवस क्रमानें वृष्टि समजावी. सौम्या पासुन चार नाडींमध्यें सर्व ग्रहांनीं विद्ध चंद्र असतां क्रमानें ३।६।१२।१८ दिवस वृष्टि निरंतर होईल. १०.

## दुसरें लक्षण.

निर्जलापि जलदा शुभाधिकोऽधिका तु जलदापि निर्जला ॥
नाडिका खलयुतातिवृष्टिदा चेच्छुभान्वितजलांशका भवेत् ॥ ११ ॥

अर्थ——चंड, वात, शिखि, त्या नाडी निर्जल आहेत. तरी त्यांस पापाहून शुभग्रह अधिक असतील तर वृष्टि होईल. आणि जलदा नाडीचे ठायीं पापग्रह अधिक असतील तर त्या निर्जल होतात. पापग्रहांनीं युक्त नाडी शुभ ग्रहान्वित असून जलांशगा म्हणजे जलचर राशिनवांशगत जे समस्त ग्रह त्यांणीं युक्त असेल तर अति वृष्टि होईल. ११.

## बुध, शुक्र, गुरु, चंद्र, योगानें वृष्टि.

वर्षासु बुधशुक्रेज्याश्चंद्रयुक्ता यदा तदा ॥
तदा तदा वृष्टियोगो जलनाड्यां विशेषतः ॥१२॥

अर्थ—वर्षाकालीं बुध, शुक्र, गुरु हे चंद्रानें युक्त असतील त्या त्या वेळीं वृष्टियोग होतो. आणि हेच ग्रह चंद्रानें युक्त जलनाडीस असतां विशेषेंकरून वृष्टि होते. १२.

## सर्व ग्रहांवरून वृष्टि लक्षण

ग्रहोऽस्तमुदय मार्गं वक्रं योगं भसंक्रमं ॥
करोति जलनाडीस्थो वृष्टिं भौमो विशेषतः ॥१३॥

अर्थ— कोणताही ग्रह जलनाडींत असून अस्त, उदय, मार्गी आणि वक्री असे योग जेव्हां येतील किंवा त्याचें राश्यंतर किंवा नक्षत्रांतर होईल तर त्यावेळीं तो वृष्टि करितो. त्यांत भौम विशेषेंकरून वृष्टि करितो. १३.

## नाडीचक्र प्रशंसा

चलतु कदाचित् ग्रहणं चलतु कदाचित् ग्रहोदयोस्तो वा ॥
न पुनर्नाडीचक्रे वृष्टिरवृष्टिः स्वरोदयोद्दिष्टा ॥ १४ ॥

अर्थ—कदाचित् ग्रहण चलन पावेल, ग्रहांचे उदयास्तही चलन पावतील, परंतु स्वरोदयशास्त्र अवलोकन करून ही नाडीचक्रांची वृष्टि किंवा अवृष्टि सांगितलेली चलन पावणार नाहीं. १४.

## पुनः वृष्टिलक्षण.

पंचसप्तनवमो रविपुत्राद्वृष्टिसृष्टिमाधिकां कुरुतेऽब्जः ॥
सप्तमो यदि विधुर्भृगुपुत्राद्वृष्टिकृद्भवति सद्ग्रहदृष्टः ॥ १५ ॥

अर्थः—शनीपासून पांच, सात किंवा नववा चंद्र अधिक वृष्टि करितो व शुक्रापासून सातवा असतांही करतो; परंतु तो शुभग्रहांनीं अवलोकित असला ह्मणजे वृष्टि होते १५.

## सामान्यतः वृष्टिलक्षण.

वर्षाकाले यदा चंद्रशुक्रौ क्रूरेक्षितान्वितौ
तदा मेघोल्पवृष्टिः स्यादेतत् सामान्यतः फलं ॥ १६॥

अर्थ-पर्जन्यकाळीं जेव्हां चंद्र आणि शुक्र हे क्रूर ग्रहांनीं युक्त किंवा दृष्ट असतात तेव्हां मेघ अल्प वृष्टि करतो हें सामान्यतः फल जाणावें १६.

## रविमध्ययोग.

यथा यथा सन्निहितौ ज्ञशुक्रौ तथा तथा वृष्टिकरौ प्रदिष्टौ ॥
अंतर्गतस्तीक्ष्णकरस्तयोश्चेत्करोत्यवृष्टिं रविमध्ययोगः ॥ १७ ॥

अर्थ—जसे जसे बुध शुक्र एका राशीस असून फार जवळ जवळ येत जातील तसे तसे वृष्टि चांगली करणारे होतात. त्यांच्यामध्यें रवि आला ह्मणजे रविमध्ययोग होऊन वृष्टीचा नाश करतो. १७.

## स्त्रीपुरुषयोगावरून वृष्टिलक्षण.

स्त्रीसंज्ञमार्द्रादशकं चतुष्टयं क्लीबं पुमाख्यानि ततश्चतुर्दश ॥
वृष्टिर्यदार्केंदुभयोः समागमः स्त्रीपुंसयोरेव तदान्यथा तु न ॥ १८ ॥

अर्थ—आर्द्रापासून दाहा नक्षत्रें स्त्रीसंज्ञक आहेत त्यापुढें चार नक्षत्रें नपुंसक आणि त्यापुढें चवदा नक्षत्रें पुरुषसंज्ञक आहेत. जेव्हां सूर्यनक्षत्र आणि चंद्रनक्षत्र यांतून एक स्त्री व एक पुरुष असा योग होईल तेव्हां वृष्टि होते. अन्यथा असतां होणार नाहीं. १८.

## चंद्रसूर्यनक्षत्रावरून वृष्टिलक्षण.

दस्रात्त्रिदस्रशरनंदकृतद्विभूमिभूमींदुभानि शशिनस्तरणेः क्रमेण ।।
स्यात्सूर्ययोर्युतिरवृष्टिकरीतथेंद्वोश्चेदुर्दिनाय शशिभानुमतोस्तु वृष्टचै ।।१९।।

अर्थ–अश्विनीपासून अनुक्रमानें चंद्राचीं तीन, रवीचीं दोन, चंद्राचीं पांच, रवीचीं नऊ, चंद्राचीं चार, रवीचीं दोन, चंद्राचें एक, रवीचें एक आणि चंद्राचें एक अशीं पुनः पुनः जाणावीं, ( चंद्राचीं अश्विनी, भरणी, कृत्तिका, आर्द्रा, पुनर्वसु, पुष्य, आश्लेषा, मघा, पूर्वाषाढा, उत्तराषाढा, अभिजित, श्रवण, पूर्वाभाद्रपदा, रेवती. रवीचीं रोहिणी, मृग, पूर्वा, उत्तरा, हस्त, चित्रा, स्वाती, विशाखा, अनुराधा, ज्येष्ठा, मूळ, धनिष्ठा, शततारका, उत्तराभाद्रपदा ). सूर्यनक्षत्र आणि दिवसनक्षत्र हीं दोन्ही रवीचींच आलीं तर वृष्टि होत नाहीं. दोन्ही चंद्राचीं आलीं तर बहुत अभ्रें मात्र येतील. एक सूर्याचें आणि एक चंद्राचें असीं आलीं असतां उत्तम वृष्टि होईल असें जाणावें. १९.

## अथ रोहिणीचक्र.

मेषार्कदिननक्षत्राद्ब्धौ युग्मं तटे द्वयं ।।
गिरावेकं द्वयं संधौ साभिजिद्गणना भवेत् ।। १ ।।

अर्थः–मेष राशीस सूर्य ज्या दिवशीं येईल त्यावेळीं जें चंद्रनक्षत्र असेल तेथपासून अभिजित्सह नक्षत्राची गणना करावयाची ती खाली लिहिल्याप्रमाणें—

सिंधौ द्वयं द्वयं दद्यादन्यत्रैकैकमेव च ।।
चत्वारः सागरास्तत्र संधयः चाष्टसंख्यया ।। २ ।।
शृंगाणि तत्र चत्वारि तटान्यष्टौ स्मृतानि च ।।
रोहिणी पतिता यत्र ज्ञेयं तत्र शुभाशुभं ।। २ ।। व० प्र० ग्रं०

अर्थः—कोष्टकरूपानें रोहिणीचक्र खाली दाखवितों. उदाहरण, शके १८३७ चैत्र कृष्ण १४ भौमवार दिननक्षत्र उत्तराभाद्रपदा घ. १५-५६ सह रेवती, अश्विनीमेषेर्कः घ २९ प. ७

| | | | | |
|---|---|---|---|---|
| संधि कृत्तिका. | तट भरणी. | समुद्र अश्विनी रेवती. | तट उत्तराभाद्रपदा. | संधि पूर्वाभाद्रपदा |
| पर्वत रोहिणी. | | | | पर्वत शततारका |
| संधि मृग. | | | | संधि धनिष्ठा. |
| तट आर्द्रा. | | | | तट श्रवण. |
| समुद्र पुनर्वसु, पुष्य | | | | समुद्र उत्तराषाढा, अभिजित. |
| तट आश्लेषा. | | | | तट पूर्वाषाढा. |
| संधि मघा. | | | | संधि अनुराधा. |
| पर्वत पूर्वा. | तट हस्त | समुद्र चित्रा स्वाती | तट विशाखा | पर्वत ज्येष्ठा. |
| संधि उत्तरा. | | | | संधि मूळ. |

## अथ रोहिणीचक्राचीं फलें.

यदा पयोनिधिस्थलं गतं विरिंचिभं तदा ॥
अतीव वर्षणं भवेत्समस्तधान्यवर्धनं ॥ ४ ॥ क०
यदि विधिधिष्ण्यं भवति तटस्थं ॥
बहुजलवृष्टिर्धनकणवृद्धिः ॥ ५ ॥ क०
रोहिणीनामनक्षत्रं पर्वतस्थं यदा भवेत् ॥
खंडवृष्टिस्तदाज्ञेया सर्वसस्यविनाशनं ॥ ६ ॥ क०
संधिसंस्थं यदा ब्राह्मं नक्षत्रं जायते तदा ॥
खंडवृष्टिस्तु विज्ञेया सर्वधान्यात्ययो भवेत् ॥ ७ ॥क०
जाता जलप्रदस्यैषा चंद्रस्य परमप्रिया
समुद्रऽति महावृष्टिस्तटे वृष्टिश्च शोभना ॥ ८ ॥ व० प्र० ग्रं०
पर्वते बिंदुमात्रा च खंडवृष्टिश्च संधिषु ॥
संधौ वणिग्गृहे वासः पर्वते कुंभकृद्गृहे ॥ ९ ॥ व० प्र० ग्रं०
मालाकारगृहे सिंधौ रजकस्य गृहे तटे ॥
इति रोहिणीनिर्णयः । वर्षप्रबोधग्रंथे ॥

अर्थ-रोहिणी नक्षत्र समुद्रावर पडलें असतां पाऊस अतिशय पडेल व सर्व धान्यें जोरानें येतील. रोहिणी नक्षत्र तटावर पडेल तर पाऊस पुष्कळ पडेल. धन व धान्य लोकांजवळ पुष्कळ होईल. रोहिणी नक्षत्र पर्वतावर पडलें तर पाऊस खंडवृष्टीनें पडेल ( कोठें कोठें पुष्कळ पडेल व कोठें मुळींच पडणार नाहीं ). ( व. प्र. ग्रंथांत बिंदुमात्रा च असें ह्मटलें आहे ह्मणजे अगदी अल्प वृष्टि होईल. ) सर्व धान्यें नाश पावतील. रोहिणी नक्षत्र संधीवर ज्यावेळीं पडेल त्यावेळीं केव्हां केव्हां [ खंडवृष्टीनें ] क्वचित् पाऊस पडेल. व सर्व पिकें नाश पावतील. संधीचे राहण्याचें ठिकाण वाण्याचे येथें आहे. पर्वताचे कुंभाराचे गृहांत आहे. समुद्रांच राहण्याचे ठिकाण माळ्याचे गृहांत आहे. व तटाचे राहण्याचें ठिकाण परटाचे गृहांत आहे. याप्रमाणें फलें जाणावीं. ४---९.

---

## अथ सर्पचक्रम् ।

चक्रं लिखेत् सर्पशरीरतुल्यं त्रयं त्रयं चाश्विभतोऽत्र देयं ।
प्रत्येकनाड्यां नवभानि संति साध्यं त्रिनाड्यान्वितचक्रमेवम् ॥१॥

चक्रम्

| | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| अ | आ | पु | उ | ह | ज्ये | मू | श | पू |
| भ | मृ | पु | पू | चि | अ | पू | ध | उ |
| कृ | रो | आ | म | स्वा | वि | उ | श्र | रे |

**अर्थ**--सर्पाच्या शरीराकृतीप्रमाणें चक्र लिहावें व या चक्रांत अश्विनी नक्षत्रापासून तीन तीन नक्षत्रें लिहावीं आणि याप्रमाणें सर्व नक्षत्रें लिहिलीं असतां प्रत्येक नाडीमध्यें नऊ नऊ नक्षत्रें येतात. याप्रमाणें तीन नाडी घेऊन हें चक्र साधावें.

यान्यूर्ध्वनाड्यां नवभानि संति स्वर्गं गतानि प्रवदंति तानि ॥
भूमिप्रयातानि च मध्यगानि पातालयातानि गतान्यधश्च ॥ २ ॥

**अर्थः**-सर्पचक्रांतील वरील नाडीमध्यें जीं नऊ नक्षत्रें येतील तीं स्वर्गांतील नऊ नक्षत्रें समजावीं, व जीं नऊ नक्षत्रें मधील नाडीमध्यें येतील तीं पृथ्वीवरील नक्षत्रें समजावीं आणि जीं नऊ नक्षत्रें खालील नाडीमध्यें येतील तीं पातालांतील नक्षत्रें समजावीं.

चेदेकनाड्यामशुभाः शुभाश्च ग्रहास्तदा वृष्टिकरा भवंति ॥
स्वर्गाख्यनाड्यां यदि पापखेटाः पातालनाड्यां च शुभा न वृष्टिः ॥३॥

**अर्थ**-एका नाडीमध्यें जर शुभ व अशुभ ग्रह आले तर पाऊस पडतो. पापग्रह स्वर्गनाडीमध्यें व ऊर पाताल नाडीमध्यें शुभग्रह आले असतां पाऊस पडणार नाहीं.

पातालस्था यदा क्रूराः स्वर्गस्थाश्च शुभग्रहाः ॥
न मुंचंति जलं मेघा वर्षाकाले तदा भुवि ॥४॥

**अर्थ**—पापग्रह पातालनाडीमध्यें व ऊर शुभग्रह स्वर्गनाडींत आले असतां पाऊस पडत नाहीं.

---

# अथ परिवेषलक्षणम् ।

समूर्च्छिता रवींद्वोः किरणाः पवनेन मंडलीभूताः ॥
नानावर्णाकृतयस्तन्वभ्रे व्योम्नि परिवेषाः ॥ १ ॥

**अर्थः**-पसरलेले, वायूनें वर्तुळ झालेले, अनेक रंगाचे व अनेक आकारांचे सूर्यचंद्रांचे किरण थोड्या अभ्रानें युक्त अशा आकाशामध्यें दिसतात ते परिवेष होत. १.

ते रक्तनीलपांडुरकापोताभ्राभशबलहरिशुक्लाः ॥
इंद्रयमवरुणनिर्ऋतिश्वसनेशपितामहाग्निकृताः ॥ २ ॥

**अर्थः**-ते रक्तादिवर्ण परिवेष इंद्रादिकृत होत. म्हणजे रक्तवर्ण परिवेष इंद्रकृत, नीलवर्ण यमकृत, ईषत्-शुक्लवर्ण वरुणकृत, काळा पांढरा निर्ऋतिकृत, मेघवर्ण वायुकृत, कृष्णश्वेत शिवकृत, हरिद्वर्ण ब्रह्मकृत, शुभ्रवर्ण अग्निकृत, याप्रकारें परिवेष जाणावे. २.

धनदः करोति मेचकमन्योन्यगुणाश्रयेण चाप्यन्ये ॥
प्रविलीयते मुहुर्मुहुरल्पफलः सोऽपि वायुकृतः ॥ ३ ॥

—**अर्थ**--कुबेर मयूरकंठाच्या रंगासारखा परिवेष करितो. अन्यही इंद्रादि देव परस्परांच्या वर्णांचा आश्रय करितात. यास्तव ते परिवेष अनेकवर्ण दिसतात. जो परिवेष वारंवार नाहींसा होतो, तो वायुकृत अल्प फल देणारा होय. ३.

चापशिखिरजततैलक्षीरजलाभः स्वकालसंभूतः ॥
अविकलवृत्तः स्निग्धः परिवेषः शिवसुभिक्षकरः ॥ ४ ॥

अर्थः-संपूर्णवृत्त, निर्मल, नीलादिवर्णाचा परिवेष शिशिरादि ऋतूंमध्यें कल्याण व सुभिक्षकारक होय. उ. नीलवर्ण शिशिरऋतूंत, विचित्रवर्ण वसंतांत शुक्लवर्ण ग्रीष्मांत तैलवर्ण वर्षाऋतूंत, दुग्धवर्ण शरदृतूत, उदकवर्ण हेमंतऋतूंत हे वर्ण ह्या ऋतूंत शुभ होत. ४.

सकलगगनानुचारी नैकाभः क्षतजसंनिभो रूक्षः ॥
असकलशकटशरासनशृंगाटकवत्स्थितः पापः ॥ ५ ॥

अर्थ-सर्व आकाशामध्यें फिरणारा [ उदयापासून अस्तापर्यंत राहणारा, ] अनेकवर्ण, रक्तासारखा, रखरखीत, तुटलेला, गाडा व धनुष्य व चतुष्पथ [ चवाठा ] यांसारखा परिवेष अशुभ होय ५.

शिखिगलसमेतिवर्षं बहुवर्णे नृपवधो भयं धूम्रे ।
हरिचापनिभे युद्धान्यशोककुसुमप्रभे चापि ॥६॥

अर्थः-मयूरकंठसदृश परिवेष असतां अतिवृष्टि होते. बहुतवर्णाचा अ० राजवध, धूम्रवर्ण अ० भय, इंद्रधनुष्यासारखा व अशोकपुष्पासारखा अ० युद्धें हीं होतात. ६.

वर्णेनैकेन यदा बहुलः स्निग्धः क्षुराभ्रकाकीर्णः ।
स्वर्तौ सद्यो वर्षं करोति पीतश्च दीप्तार्कः ॥७॥

अर्थ—शिशिरादि ऋतूंमध्यें चाषादि वर्ण [ श्लोक ४ ] परिवेष जर एक वर्णाचा, काळा, स्निग्ध सुऱ्या-सारखा अभ्रांनीं व्याप्त, असा असेल तर तत्काळ ( त्याच दिवशीं ) वृष्टि होत्ये व जो पीतवर्ण व ज्यांत तप्तसूर्य असाही परिवेष तत्काल वृष्टि करितो. ७.

दीप्तविहंगमृगरुतः कलुषः संध्यात्रयोत्थितोतिमहान् ।
भयकृत्तडिदुल्काद्यैर्हतो नृपं हंति शस्त्रेण ॥८॥

अर्थः—ज्या परिवेषकालीं सूर्याभिमुख राहून पक्षी व अरण्यपशु रोदन शब्द करितात, तो गढूळ उदय, मध्यान्ह अस्त या तीन संध्यासमयीं उत्पन्न झालेला, अति विस्तीर्ण असा परिवेष भयकारक होय. वीज व उल्का व त्रिविध उत्पात यांणीं ताडित असा परिवेष शस्त्रानें राजाचा वध करितो. ८.

प्रतिदिनमर्कहिमांश्वोरहर्निशं रक्तयोर्नरेंद्रवधः ।
परिविष्टयोरभीक्ष्णं लग्नास्तमयस्थयोस्तद्वत् ॥९॥

अर्थः-प्रतिदिवशीं दिवसरात्रीं आरक्त व परिवेषयुक्त सूर्यचंद्र असतील तर राजवध होतो, तसेच परि-वेषयुक्त चंद्रसूर्य वारंवार राजाच्या जन्मलग्नीं किंवा सप्तमस्थानीं असतील तर त्या राजाचा वध होतो. ९.

सेनापतेर्भयकरो द्विमंडलो नातिशस्त्रकोपकरः ।
त्रिप्रभृतिशस्त्रकोपं युवराजभयं नगररोधं ॥१०॥

अर्थ-दोन मंडलांचा परिवेष सेनापतीस भय करितो, व फार शस्त्रभय करीत नाहीं. तीन चार इत्यादि मंडलांचा परिवेष शस्त्रभय, युवराज ( राजा असतां राज्यकारभार करणारा राजपुत्र ) यास भय व नगरास रोध शत्रूकडून करितो. १०.

वृष्टिस्त्र्यहेण मासेन विग्रहो वा ग्रहेंदुभनिरोधे ।
होराजन्माधिपयोर्जन्मर्क्षे वा शुभो राज्ञः ॥११॥

अर्थ-तीन चार इत्यादि मंडळांचा परिवेष झाला तर तीन दिवसांनीं वृष्टि होत्ये. ग्रह, चंद्र व नक्षत्र यांचा परिवेषानें निरोध झाला तर युद्ध होतें. राजाचें जन्मलग्न व जन्मराशि यांचे स्वामी व जन्मनक्षत्रही परि-वेषानें रोधिलीं तर राजास अशुभ होय. ११.

परिवेषमंडलगतो रवितनयः क्षुद्रधान्यनाशकरः ।
जनयति च वातवृष्टिं स्थावरकृषिकृन्निहंता च ॥१२॥
भौमे कुमारबलपतिसैन्यानां विद्रवोऽग्निशस्त्रभयं ।
जीवे परिवेषगते पुरोहितामात्यनृपपीडा ॥१३॥
मंत्रिस्थावरलेखकपरिवृद्धिश्चंद्रजे सुवृष्टिश्च ।
शुक्रे यायिक्षत्रियराज्ञीपीडाप्रियं चान्नं ॥१४॥
क्षुदनलमृत्युनराधिपशस्त्रेभ्यो जायते भयं केतौ ।
परिविष्टेगर्भभयं राहौ व्याधिर्नृपभयं च ॥१५॥

अर्थ—परिवेषमंडळांत शनि असेल तर क्षुद्र धान्य [ कांग इ० ] यांचा नाश होतो. वातयुक्त वृष्टि होते. वृक्षादि स्थावर व शेतीलोक यांचा नाश होतो. १२. परिवेषगत भौम असतां बालक, सैन्यपति, सैन्यें हीं दुःखी होतात. व शस्त्रभय होतें. परिवेषगत बृहस्पति अ० पुरोहित, प्रधान, राजे यांस पीडा होते. १३. परिवेषगत बुध अ० प्रधान, वृक्ष, लेखक यांची वाढ होते व उत्तम पर्जन्यही होतो, परिवेषगत शुक्र असतां यायी ( प्रवासी ), क्षत्रिय, राजस्त्री यास पीडा व दुर्भिक्ष हीं होतात. १४. परिवेषगत केतु अ० दुर्भिक्ष, अग्नि, मृत्यु, राजा, शस्त्र, यांपासून भय होतें. परिवेषगत राहु अ० गर्भभय, रोग, राजभय हीं होतात. १५

युद्धानि विजानीयात्परिवेषाभ्यंतरे द्वयोर्ग्रहयोः ॥
दिवसकृतः शशिनो वा क्षुदवृष्टिभयं त्रिषु प्रोक्तं ॥ १६ ॥
याति चतुर्षु नरेंद्रः सामात्यपुरोहितो वशं मृत्योः ॥
प्रलयमिव विद्धि जगतः पंचादिषु मंडलस्थेषु ॥ १७ ॥

अर्थः—सूर्याच्या अथवा चंद्राच्या परिवेषामध्यें दोन तारा ग्रह असतील तर युद्धें होतील, व तीन ग्रह असतील तर दुर्भिक्ष, अवर्षण यांचें भय होईल. सूर्यचंद्रांच्या परिवेषांमध्यें चार ग्रह असतील तर प्रधान व उपाध्याय यांसहवर्तमान राजा मृत्युवश होतो. पांच, सहा ग्रह सूर्यचंद्रपरिवेषमंडलस्थ असतील तर सर्व जगतास प्रलयाप्रमाणें दुःख होईल. १६।१७.

ताराग्रहस्य कुर्यात्पृथगेव समुत्थितो नरेंद्रवधं ॥
नक्षत्राणामथवा यदि केतोर्नोदयो भवति ॥ १८ ॥

अर्थ—चंद्रसूर्यांवांचून निराळाच भौमादि ग्रहांस किंवा नक्षत्रास परिवेष उत्पन्न होईल. तर राजाचा वध होतो. केतूदय झाला तर त्याचें मात्र फल होतें. तारा, ग्रह व नक्षत्र यांचें वर सांगितलेलें परिवेषफल होत नाहीं. १८.

विप्रक्षत्रियविट्शूद्रहा भवेत्प्रतिपदादिषु क्रमशः ॥
श्रेणीपुरकेशानां पंचम्यादिष्वशुभकारी ॥ १९ ॥
युवराजस्याष्टम्यां परतस्त्रिषु पार्थिवस्य दोषकरः ॥
पुररोधो द्वादश्यां सैन्यक्षोभस्त्रयोदश्यां ॥ २० ॥
नरपतिपत्निपीडां परिवेषोभ्युत्थितश्चतुर्दश्यां ॥
कुर्यात्तु पंचदश्यां पीडां मनुजाधिपस्यैव ॥ २१ ॥

**अर्थ**—प्रतिपदादि चार तिथींस परिवेष दिसेल तर अनुक्रमानें ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र यांचा नाश होतो. पंचमीस एक जातीच्याच लोकांचा, षष्ठीस नगराचा, सप्तमीस जामदारखान्याचा नाश होतो.१९ अष्टमीस युवराजाचा, नवमी, दशमी, एकादशी या तीन तिथींस राजाचा नाश होतो. द्वादशीस परिवेष होईल तर नगरास वेढा पडेल. त्रयोदशीस होईल तर सैन्यांत अस्वस्थता होईल. २०. चतुर्दशीस परिवेष होईल तर राजस्त्रियेचा व पौर्णिमेस राजाचाच नाश होतो. २१.

नागरिकाणामभ्यंतरस्थिता यायिनां च मध्यस्था ।
परिवेषमध्यरेषा विज्ञेयाक्रंदसाराणां ॥२२॥
रक्तश्यामो रूक्षश्च भवति येषां पराजयस्तेषां ।
स्निग्धः श्वेतो द्युतिमान् येषां भागो जयस्तेषां ॥२३॥

**अर्थ**—तीन वर्णांच्या परिवेषाच्या तीन रेषा दिसतात. त्यांमध्यें आंतील रेषा नगरसंबंधीं राजांची, बाह्य रेषा यायी ( मार्गस्थ ) राजांची, मध्यरेषा आक्रंदसारांची ( दुःखित राजांची ) होय. २२. ज्यांची रेषा रक्त, श्याम, रूक्ष असेल त्यांचा पराजय व ज्यांची स्निग्ध, श्वेत, प्रकाशित असेल त्याचा जय होतो. २३.

---

## ॥ अथ इंद्रायुधलक्षणं ॥

सूर्यस्य विविधवर्णाः पवनेन विघट्टिताः कराः साभ्रे ।
वियति धनुः संस्थाना ये दृश्यंते तदिंद्रधनुः ॥१॥

**अर्थ**—वायूनें अवरुद्ध, अनेक रंगाचे सूर्यकिरण, मेघयुक्त आकाशांमध्यें धनुष्याकार दिसतात तें इंद्रधनुष्य होय. १.

केचिदनंतकुलोरगनिःश्वासोद्भूतमाहुराचार्याः ।
तद्यायिनां नृपाणामभिमुखमजयावहं भवति ॥२॥

**अर्थ**-अनंतनामक नागराजांच्या कुलांतील सर्पांच्या निःश्वासापासून इंद्रधनुष्य उत्पन्न होतें; असें कोणी काश्यपादि आचार्य ह्मणतात. तें इंद्रधनुष्य शत्रूवर गमन करणाऱ्या राजांस सन्मुख असेल तर पराजयकारक होतें. २.

अच्छिन्नमवनिगाढं द्युतिमत्स्निग्धं घनं विविधवर्णं ।
द्विरुदितमनुलोमं च प्रशस्तमंभः प्रयच्छति च ॥३॥

**अर्थ**—तें इंद्रधनुष्य अखंड, भूमीस लागलेलें, तेजस्वी, सुकांति, दाट, नानाप्रकारच्या रंगांनीं युक्त एकाखालीं एक असें दुसरें मार्गस्थ राजाच्या पृष्ठभागीं राहिलेलें, असें असेल तर तें शुभ व उदकही देतें. ३.

विदिगुद्भूतं दिक् स्वामिनाशनं व्यभ्रजं मरककारि ।
पाटलपीतकनीलैः शस्त्राग्निक्षुत्कृता दोषाः ॥४॥

**अर्थः**—इंद्रधनुष्य विदिशेस उत्पन्न होईल तर त्या दिशेच्या राजाचा नाश करितें. अभ्र नसून इंद्रधनुष्य होईल तर मृत्यु होईल. पाटल, पीत, नील हे वर्ण असतील तर अनुक्रमानें शस्त्र, अग्नि, दुर्भिक्ष यांचें भय होतें. ४.

जलमध्येनावृष्टिर्भुवि सस्यवधस्तरौ स्थिते व्याधिः ।
वाल्मीके शस्त्रभयं निशि साचिववधाय धनुरैंद्रं ॥५॥

अर्थ — इंद्रधनुष्य जलांमध्यें दिसेल तर अवर्षण, भूमीवर दिसेल तर धान्यनाश, वृक्षावर दिसेल तर रोगभय, वल्मिक ( वारुळ ) यावर दिसेल तर शत्रुभय, रात्रीं दिसेल तर प्रधानवध हीं होतात. ५.

वृष्टिं करोत्यवृष्ट्यां वृष्टिं वृष्ट्यां निवारयत्यैंद्र्यां ।
पश्चात्सदैववृष्टिं कुलिशभृतश्चापमाचष्टे ॥६॥

अर्थः—पाऊस नसतां पूर्वेकडे इंद्रधनुष्य दिसेल तर वृष्टि होईल. वृष्टि होत असतां दिसेल तर वृष्टि बंद होईल. पश्चिमेकडे इंद्रधनुष्य दिसेल तर वृष्टि होते. ६.

चापं मघोनः कुरुते निशायां आखंडलायां दिशि भूपपीडां ।
याम्यापरोदक्प्रभवंनिहन्यात्सेनापतिं नायकमंत्रिणौ च ॥७॥

अर्थ-इंद्रधनुष्य रात्रीं पूर्वेकडे दिसल तर राजास पीडा होते. दक्षिणेस दिसेल तर सेनापतीचा नाश होतो. पश्चिमेकडे दिसेल तर श्रेष्ठ पुरुषाचा नाश होतो. उत्तरेकडे दिसेल तर प्रधानाचा नाश होतो. ७.

निशि सुरचापं सितवर्णाद्यं जनयति पीडां द्विजपूर्वाणां ।
भवति च यस्यां दिशि तद्देश्यं नरपतिमुख्यं न चिराद्धन्यात् ॥८॥

अर्थः-इंद्रधनुष्य रात्रीं श्वेत, रक्त, पीत व कृष्ण या चार वर्णाचें दिसेल तर अनुक्रमानें ब्राह्मणादि चार वर्णांस पीडा करितें, व ज्या दिशेकडे दिसतें त्या दिशेकडील मुख्य राजाचा शीघ्र नाश होतो. ८.

---

## अथ सस्यजातकं ॥

वृश्चिकवृषप्रवेशे भानोर्ये वादरायणेनोक्ताः ॥
ग्रीष्मशरत्सस्यानां सदसद्योगाः कृतास्त इमे ॥ १ ॥

अर्थ—वृश्चिक व वृषव या राशींस सूर्याच्या प्रवेशावरून ह्मणजे या संक्रांति होतात त्या वेळेवरून अनुक्रमें ग्रीष्म ( उन्हाळी ) धान्यें व शरत् ( पावसाळी ) धान्यें यांचे शुभाशुभयोग वादरायणाचार्यांनें जे सांगितले ते हे मी वक्ष्यमाण केले आहेत. १.

भानोरलिप्रवेशे केंद्रैस्तस्माच्छुभग्रहाक्रांतैः ॥
वलवद्भिः सौम्यैर्वा निरीक्षितैर्ग्रैष्मिकविवृद्धिः ॥ २ ॥

अर्थ—सूर्याच्या वृश्चिकप्रवेशकालीं वृश्चिकलग्नापासून केंद्रस्थानीं ( १।४।७।१० ) शुभग्रह असतील अ० बलिष्ठ शुभग्रहांनीं सूर्य दृष्ट असेल तर ग्रीष्मसंबंधीं धान्याची वृद्धि होते. [ अक्षीण चंद्र, बुध, गुरु, आणि शुक्र हे शुभग्रह होत. स्वगृहीं, स्वोचीं, स्वमित्रगृहीं जो ग्रह असेल तो बलिष्ठ. )

अष्टमराशिगतेर्के गुरुशशिनोः कुंभसिंहसंस्थितयोः ॥
सिंहघटसंस्थयोर्वा निष्पत्तिर्ग्रैष्मसस्यस्य ॥ ३ ॥

अर्थः—वृश्चिक राशीस सूर्य, गुरु कुंभीं, सिंहाचा चंद्र, अथवा गुरु कुंभीचा चंद्र असे असतील तर ग्रीष्म धान्यें उत्पन्न होतील. ६

अर्कात्सिते द्वितीये बुधेऽथवा युगपदेव वा स्थितयोः ॥
व्ययगतयोरपि तद्वन्निष्पत्तिरतीव गुरुदृष्ट्या ॥ ४ ॥

अर्थ—वृश्चिकस्थ सूर्यापासून दुसरा शुक्र किंवा बुध असेल अथवा दोन्हेही दुसरे असतील तर, अगर वृश्चिकस्थ रवीपासून शुक्र बारावा किंवा बुध बारावा किंवा दोन्हेही बारावे असतील तर ग्रीष्म धान्यांची निष्पत्ति होईल. रवीवर गुरूची दृष्टि असेल तर फारच चांगली ग्रीष्मधान्यनिष्पत्ति होईल. ४.

शुभमध्येऽलिनि सूर्याद्गुरुशशिनोः सप्तमे परा संपत् ॥
अल्यादिस्थे सवितरि गुरौ द्वितीयेर्धनिष्पत्तिः ॥ ५ ॥

अर्थ–शुभमध्यगत वृश्चिकस्थ रवीपासून सप्तमस्थानीं गुरु व चंद्र हे असतील तर, धान्यनिष्पत्ति उत्तम होईल. [ वृश्चिकस्थ रवि व त्यापासून दुसरा, शुक्रबुधांतून एक व दुसरा बारावा असे असतील तर, तो रवि शुभमध्यगत होतो, ] वृश्चिकाच्या आरंभीं रवि व त्यापासून दुसरा गुरु असेल तर धान्यनिष्पत्ति अर्धी होते. ५.

लाभहिबुकार्थयुक्तैः सूर्यादलिगात्सितेंदुशशिपुत्रैः ॥
सस्यस्य परा संपत् कर्मणि जीवे गवां चाग्र्या ॥ ६ ॥

अर्थः––वृश्चिकस्थ रवीपासून अकरावा शुक्र, चवथा चंद्र, दुसरा बुध, असे असतील तर, धान्याची उत्तम संपत्ति होते. पूर्वोक्त योग असून, त्यांत दहावा गुरु असेल तर गाईंचीही उत्तम संपत्ति होते म्हणजे धान्यही होऊन दुग्ध बहुत होतें, ५.

कुंभगुरुर्गविशशिःसूर्योऽलिमुखे कुजार्कजौ मकरे ॥
निष्पत्तिरस्ति महती पश्चात्परचक्ररोगभयं ॥ ७ ॥

अर्थः–कुंभाचा गुरु, वृषभाचा चंद्र, वृश्चिकाच्या प्रथमांशीं सूर्य, भौम व शनि हे मकर राशीस असे ग्रह असतील तर धान्याची उत्पत्ति चांगली होईल; परंतु पुढें शत्रुचक्र व रोग यांचें भय होतें. ७.

मध्ये पापग्रहयोः सूर्यः सस्यं विनाशयत्यलिगः ॥
पापः सप्तमराशौ जातं जातं विनाशयति ॥ ८ ॥

अर्थ––वृश्चिकस्थ सूर्य. मंगळ व शनि या पापग्रहांच्या मध्यें असेल तर धान्याचा नाश होतो. वृश्चिकापासून मंगळ व शनि यांतून एक सप्तम असेल तर धान्य उत्पन्न झालें तरी त्याचा नाश होईल. ८.

अर्थस्थाने क्रूरः सौम्यैरनिरीक्षितः प्रथमजातं ॥
सस्यं निहंति पश्चादुप्तं निष्पादयेद्व्यक्तं ॥ ९ ॥

अर्थ–वृश्चिकापासून द्वितीयस्थानीं पापग्रह असेल, आणि त्यावर शुभग्रहांची दृष्टि नसेल तर प्रथम झालेलें धान्य नाश पावतें. नंतर पेरलेलें धान्य चांगलें उत्पन्न होतें ९.

जामित्रकेंद्रसंस्थौ क्रूरौ सूर्यस्य वृश्चिकस्थस्य ॥
सस्यविपत्तिं कुरुतः सौम्यैर्दृष्टौ न सर्वत्र ॥ १० ॥

अर्थ–वृश्चिकाला सूर्य आल्यापासून मंगळ, शनि या पापग्रहांतून एक सप्तमस्थानीं व दुसरा १।४।१० या स्थानीं असे असतील तर धान्य नाश होतें, परंतु त्या पापग्रहांवर शुभग्रहांची दृष्टि असेल तर सर्व देशांमध्यें धान्यनाश होणार नाहीं. ( क्वचिद्देशीं होईल. ) १०.

वृश्चिकसंस्थादर्कात्सप्तमषष्ठोपगौ यदा क्रूरौ ।
भवति तदा निष्पत्तिः सस्यानामर्घपरिहानिः ॥ ११ ॥

अर्थः—वृश्चिकाला सूर्य आल्यापासून भौम, शनि या पापग्रहांतून एक सातवा व एक सहावा असे असतील तर, धान्यनिष्पत्ति चांगली होईल. परंतु मूल्याची हानि होईल, ह्मणजे महागाई होईल. ११.

विधिनानेनैव रविर्वृषप्रवेशे शरत्समुत्थानां ।
विज्ञेयः सस्यानां नाशाय शिवाय वा तज्ज्ञैः ॥१२॥

अर्थ—या पूर्वोक्त प्रकारानेंच सूर्य वृषभराशीस जाईल त्या वेळेवरून शरदृतूंत उत्पन्न होणाऱ्या धान्यांचा नास किंवा वृद्धि हीं सस्यजातक समजणाऱ्या पंडितांनीं जाणावीं. १२.

त्रिषु मेषादिषु सूर्यः सौम्ययुतो वीक्षितोऽपि वा विचरन् ।
ग्रैष्मिकधान्यं कुरुते समर्घमुभयोपयोग्यं च ।

अर्थ—सूर्य मेषादि तीन राशीस बुध, गुरु, आणि शुक्र यांनीं युक्त किंवा दृष्ट असेल तर ग्रीष्मऋतूंतील धान्यें समर्घ [ स्वस्त ] व इहलोकीं बंधुवर्गास आणि परलोकीं धर्मार्थ योग्य अशीं होतील. १३.

कार्मुकमृगघटसंस्थः शारदसस्यस्य तद्वदेवरविः ।
संग्रहकाले ज्ञेयो विपर्ययः क्रूरदृग्योगात् ॥१४॥

अर्थ—धन, मकर, कुंभ या राशीस सूर्य, सौम्यग्रहयुक्त किंवा दृष्ट असतां शरदृतूंतील धान्याचें फळ, ग्रीष्मऋतूंतील धान्याचें फल पूर्वीप्रमाणें सांगितलें त्याप्रमाणेंच पहावें. हें फल धान्य संग्रहकालीं पहावें; परंतु पापग्रहाच्या दृष्टियोगानें विपर्यय होतो ह्मणून महागाई होते. धान्यविक्रय कालीं विपर्ययच शुभ होय. १४.

---

## ॥ अथ द्रव्यनिश्चय ॥

ये येषां द्रव्याणामधिपतयो राशयः समुद्दिष्टाः ॥
मुनिभिः शुभाशुभार्थं तानागमतः प्रवक्ष्यामि ॥१॥

अर्थ—ज्या द्रव्यांचे स्वामी जे मेषादि राशि, कश्यपादि ऋषींनीं द्रव्यांच्या शुभाशुभार्थ ( स्वस्त महागाईच्या ज्ञानार्थ ) सांगितले; ते शास्त्रावरून सांगतो. १.

वस्त्राविककुतपानां मसूरगोधूमरालकयवानां ॥
स्थलसंभवौषधीनां कनकस्य च कीर्तितो मेषः ॥२

अर्थ—वस्त्र, आविक ( कंबल इ० ), कुतप [ रानमेंढ्याच्या लोकरीचें वस्त्र, शाल इ. ] मसूर, गोधूम, देवदाराचा चीक ( राळ ) यव, जलरहित भूमीवर झालेल्या औषधी, सुवर्ण यांचा स्वामी मेष राशि होय. २.

गवि वस्त्रकुसुमगोधूमशालियवमहिषसुरभितनयाः स्युः ॥
मिथुनेऽपि धान्यशारदवल्लीशालूककर्पासाः ॥ ३ ॥

अर्थ—वस्त्र, पुष्प, गोधूम, शालि ( भात ) यव, महिष, बैल, यांचा स्वामी वृषभराशि होय. धान्य. शरदृतूमध्यें झालेले पदार्थ वेली व कमलकंद, कापूस, यांचा स्वामी मिथुनराशि होय. ३.

कर्किणि कोद्रवकदलीदूर्वाफलकंदचोचानि ॥
सिंहे तुषधान्यरसाः सिंहादीनां त्वचः सगुडाः ॥ ४ ॥

अर्थ—हरीक, केळी, दूर्वा, जायफळादि सर्व फळें कंद, तमालपत्र, दालचिनी, वृक्षांच्या साली, नारळ, यांचा स्वामी कर्कराशि होय. तुषधान्यें (शाली), मधुर, आंबट, खारट, कडू, तिखट, तुरट हे षड्विध रस. सिंह, व्याघ्र, मार्जार इत्यादिकांचीं कातडीं, गूळ यांचा स्वामी सिंहराशि होय. ४.

षष्ठेतसीकलायाः कुलत्थगोधूममुद्गनिष्पावाः ॥
सप्तमराशौ माषा गोधूमाः सर्षपाः सयवाः ॥ ५ ॥

अर्थ—जवस, वाटाणे, कुळीथ, गहू, मूग पावटे यांचा स्वामी कन्या राशि होय. उडीद, गहूं मोहरी, सातु, यांचा स्वामी तुळराशि होय. ५.

अष्टमराशाविक्षुः सैक्यं लोहान्यजाविकं चापि ॥
नवमे तु तुरगलवणांवरास्त्रतिलधान्यमूलानि ॥ ६ ॥

अर्थ—ऊंस, सैक्य ( सिंचनानें झालेलें वल्लीफलादि ) लोह, बकरा, मेंढा यांचा स्वामी वृश्चिक राशि होय. अश्व, मीठ, वस्त्र, आयुधें, ( धनुष्यबाण इ. ) तीळ, धान्य, ह्मणजे कोथिंबीर, मुळे यांचा स्वामी धनु राशि होय.

मकरे तरुगुल्माद्यं सैक्येक्षुसुवर्णकृष्णलोहानि ॥
कुंभे सलिलजफलकुसुमरत्नचित्राणि रूपाणि ॥ ७ ॥

अर्थः-वृक्ष, गुल्म ( कांडें नसून मुळापासून फुटणारा तरु ह्मणजे झुडूप ), वल्ली, सिंचनानें होणार ऊंस, सुवर्ण,, काळें लोखंड, यांचा स्वामी मकरराशि होय. उदकानें झालेलें फल, पुष्प, रत्न, नानाप्रकारचीं रत्नें यांचा स्वामी कुंभराशि होय. ७.

मीने कपालसंभवरत्नान्यंबूद्भवानि वज्राणि ॥
स्नेहाश्च नैकरूपा व्याख्याता मत्स्यजातं च ॥ ८ ॥

अर्थ—गजकपालोत्पन्न मोत्यें व शुक्तिसंभव मोत्यें, हिरे, नानाप्रकारचीं तेलें, मत्स्यापासून झालेलीं मौक्तिकादिकें यांचा स्वामी मीन राशि होय. ८.

राशेश्चतुर्दशार्थायसप्तनवपंचमास्थितो जीवः ॥
व्येकादशदशपंचाष्टमेषु शशिजश्च वृद्धिकरः ॥ ९ ॥
षट्सप्तमगो हानिं वृद्धिं शुक्रः करोति शेषेषु ॥
उपचसंस्थाः क्रूराः शुभदाः शेषेषु हानिकराः ॥ १० ॥

अर्थ—कोणत्याही राशीपासुन ४।१०।२।११।७।९।५ यास्थानीं बृहस्पति असेल तर त्या राशीच्या द्रव्याची वृद्धि होत्ये. २।११।१०।५।८ या स्थानीं बुध असेल तर वृद्धि होत्ये. ९।६।७ या स्थानीं शुक्र असला तर हानि होते. याहून अन्य स्थानीं असतील तर वृद्धि होत्ये. ३।६।१०।११ या स्थानीं सूर्य, भौम, आणि शनि हे असतील तर वृद्धि होत्ये, आणि अन्य स्थानीं असतील तर हानि होत्ये. १०.

राशेर्यस्य क्रूराः पीडास्थानेषु संस्थिता बलिनः ।
तत्प्रोक्तद्रव्याणां महर्घता दुर्लभत्वं च ॥ ११ ॥

अर्थ—ज्या राशीच्या पीडास्थानीं ( १।२।४।५।७।८।९।१२ या स्थानीं ) बलिष्ट ( स्वगृहीं, स्रोचीं, मित्रगृहीं, स्वनवांशीं, राहिलेले ) पापग्रह असतील तर त्या राशींची पूर्वोक्त द्रव्यें महाग व दुर्मिळ होतील. ११

इष्टस्थाने सौम्या बलिनो येषां भवंति राशीनां ॥
तद्द्रव्याणां वृद्धिः सामर्थ्यमदुर्लभत्वं च ॥ १२ ॥

अर्थ-ज्या राशींच्या पूर्वोक्त ( शुभस्थानीं श्लोक ११० ) बलिष्ट गुरु व शुक्र व बुध, हे असतील तर त्या राशींच्या द्रव्याची वृद्धि होऊन तीं स्वस्त व सुलभ होतात. १२

गोचरपीडायामपि राशिर्बलिभिः शुभग्रहैर्दृष्टः ॥
पीडां न करोति तथा क्रूरैरेवं विपर्यासः ॥१३ ॥

अर्थ--राशीपासून गोचरीं अशुभस्थानी ग्रह असेल आणि त्यावर बलिष्ट शुभग्रहांची दृष्टि असेल तर तशी पीडा करणार नाहीं. पापग्रहांची दृष्टि असेल तर शुभाचें अशुभ फल होतें.१३.

---

## ॥ कित्येक वस्तूंचे अधिपति ( प्रश्नवैष्णवावरून. )

ऊर्णेभनालीतिलचर्मकृष्णवस्त्वायसानां महिषस्य चार्किः ॥
सिद्धार्थगोधूमयवेक्षवानां सवाजिकर्पूरगवां गुरुश्च ॥ १ ॥

अर्थः-काळी लोंकर, हत्ती, कस्तूरी, तीळ, कातडें, लोखंड, आणि म्हैस इत्यादि कृष्ण वस्तूंचा अधिपति शनि आहे. पांढऱ्या मोहऱ्या, गहूं, सातु, इक्षुरस, गूळ, काकवी, घोडा, कापूर आणि गाय यांचा अधिपति गुरु आहे. १.

रविश्च मुक्तामणिहेमताम्रक्षौमास्त्रचर्मेभरदादिकानां ॥
मुक्तेक्षुशंखांडजवस्तुरूप्यसितांबराणां लवणस्य चंद्रः ॥ २ ॥

अर्थः-आरक्त मोतीं, रत्नें, सुवर्ण, आरक्त रेशमी वस्त्रें, आणि हस्तिदंत यांचा अधिपति सूर्य आहे, श्वेतेक्षु, शंख, अंडजवस्तु, रुपें, श्वेतवस्त्रें. श्वेतमौक्तिक, आणि मीठ यांचा अधिपति चंद्र आहे. २.

मसूरताम्रारुणधातुशस्त्रप्रवालकाचाजपतिः कुजः स्यात् ॥
स्नेहाम्लकांस्यान्नविचित्रवस्त्ररूप्यांबुजानां स्फटिकस्य शुक्रः ॥ ३ ॥

अर्थः-मसूर, ताम्र, आरक्तधातु, शस्त्र, प्रवाळ, कांच आणि मेंढे यांचा अधिपति मंगळ आहे. तेल, आम्लपदार्थ, कांस्य, अन्न, विचित्र वस्त्रें, कमल आणि स्फटिक यांचा अधिपति शुक्र आहे. ३.

सुगंधवस्त्रद्विदलान्नपक्षिहरिन्मणीनां प्रभुरिंदुजः स्यात् ॥
कोद्दालकंगूतिललोहमेषच्छागोष्ट्रवाराहखरस्य राहुः ॥ ४ ॥

अर्थ-सुगंधी पदार्थ, वस्त्रें, द्विदलधान्यें, पक्षी आणि हरिन्मणी, (पाच वगैरे) यांचा अधिपति बुध आहे कोद्दाल, कंगु, ( राळा ) तीळ, लोखंड, मेंढरूं बोकड, उंट, डुक्कर, आणि गाढव यांचा अधिपति राहु आहे असें सांगावें. ४.

---

## ॥ अथ अर्घकांडं ॥

अतिवृष्ट्युल्कादंडान्परिवेषग्रहणपरिधिपूर्वांश्च ॥
दृष्ट्वामावास्यायामुत्पातान् पूर्णमास्यां च ॥१॥
ब्रूयादर्घविशेषान्प्रतिभासं राशिषु क्रमात्सूर्ये ॥
अन्यतिथावुत्पाता ये ते डमरातये राज्ञां ॥२॥

अर्थ—अतिवृष्टि, उल्का, दंड, परिवेष, ग्रहण, परिधि इत्यादि उत्पात, अमावास्येस किंवा पौर्णिमेस पाहून, धान्यादिकांचें सुभिक्ष किंवा दुर्भिक्ष प्रतिमासीं सूर्यचारावरून सांगावें. अन्य तिथीस जे उत्पात होतील ते राजास शस्त्रकलह ( युद्ध ) पीडा देतात. २.

मेषोपगते सूर्ये ग्रीष्मजधान्यस्य संग्रहं कुर्यात् ॥
वनमूलफलस्य वृषे चतुर्थमासे तयोर्लाभः ॥३॥

अर्थ--मेष राशीस सूर्य असतां, अमावास्येस व पौर्णिमेस श्लोक १ व २ यांत सांगितलेलें उत्पात होतील तर ग्रीष्म ऋतूंत पिकणाऱ्या धान्याचा संग्रह करावा. वृषभास सूर्य असतां वनोत्पन्न मूलफलांचा संग्रह करावा. ते पदार्थ पुढें महाग होऊन त्या दोहोंच्याहि व्यापारांत चार महिन्यांनीं लाभ होतो. ३.

मिथुनस्थे सर्वरसान् धान्यानि च संग्रहं समुपनीय ॥
षष्ठे मासे विपुलं विक्रीणन् प्राप्नुयाल्लाभं ॥४॥

अर्थ–मिथुनराशीस सूर्य असतां सर्व मधुरादि रस व धान्यें यांचा संग्रह करून सहाव्या महिन्यांत विक्रय केला तर बहुत लाभ होतो. ४.

कर्किण्यर्के मधुगंधतैलघृतफाणितानि विनिधाय ॥
द्विगुणा द्वितीयमासे लब्धिर्हीनाधिके छेदः ॥५॥

अर्थ—कर्क राशीस सूर्य असतां मध, सुगंधि द्रव्यें, तेल, तूप, काकवी किंवा गूळ हीं घ्यावीं. त्यांची दुसऱ्या महिन्यांत विकल्पानें दुपटी होते; परंतु कमजास्त काळ झाला तर तूट येते. ५.

सिंहे सुवर्णमणिचर्मवर्मशस्त्राणि मौक्तिकं रजतं ॥
पंचममासे लब्धिर्विक्रेतुरतोन्यथा छेदः ॥६॥

अर्थ–सिंहराशीस सूर्य असतां सुवर्ण, हीरकादि मणी, चर्म, कवच, शस्त्रें, मोत्यें, रुपें हीं घ्यावीं. त्यांचा लाभ विकणारास पांचव्या महिन्यांत होतो. इतर काळीं तोटा होतो. ६.

कन्यागते दिनकरे चामरखरकरभवाजिनां क्रेता ॥
षष्टे मासे द्विगुणं लाभमवाप्नोति विक्रीणन् ॥७॥

अर्थ—कन्या राशीस सूर्य असतां चंवऱ्या, गर्दभ, उंट, अश्व हीं घ्यावीं. तीं सहाव्या महिन्यांत विकणारास दुप्पट लाभ होतो. ७.

तौलिनि तांतवभांडं मणिकंबलकाचपीतकुसुमानि ॥
आदद्याद्धान्यानि च षण्मासात् द्विगुणिता वृद्धिः ॥८॥

अर्थः–तूळ राशीस सूर्य असतां तांतवभांड ( तंतुनिर्मित जें गोधडी इ. ), मणि, कंबल, काच, पीतवर्ण पुष्पें, धान्यें हीं घ्यावीं. त्यांची सहा महिन्यांनीं व्यापारांत दुप्पट वृद्धि होते. ८.

वृश्चिकसंस्थे सवितरि फलकंदकमूलविविधरत्नानि ॥
वर्षद्वयमुषितानि द्विगुणं लाभं प्रयच्छन्ति ॥९॥

अर्थ--वृश्चिक राशीस सूर्य असतां फलें, कंद [ सुवर्ण इ. ], मूल [ औषधी मुळें ] नानाप्रकारचीं रत्नें, हीं दोन वर्षे ठेवून विकलीं तर दुप्पट लाभ होतो. ९.

चापगते गृण्हीयात्कुंकुमशंखप्रवालकाचानि ॥
मुक्ताफलानि च ततो वर्षार्धात् द्विगुणतां याति ॥१०॥

अर्थ–धनुराशीला सूर्य असतां कुंकुम, शंख, पोंवळीं, काच, मोत्यें, फलें, घ्यावीं; त्या व्यापारानें सहा महिन्यांत दुपटी होते. १०.

मृगघटगे गृण्हीयाद्दिवाकरे लोहभांडधान्यानि ॥
स्थित्वा मासं दद्याल्लाभार्थी द्विगुणमाप्नोति ॥ ११ ॥

अर्थ--मकर व कुंभ या राशींस सूर्य असता लोखंडी पात्रें व धान्यें हीं घ्यावीं. तीं एक महिना ठेऊन विकावी त्यांत दुप्पट लाभ होतो. ११.

सवितरि झषमुपयाते मूलफलं कंदभांडरत्नानि ॥
संस्थाप्य वत्सरार्धं लाभकमिष्टं समाप्नोति ॥ १२ ॥

अर्थ--मीनराशींस सूर्य असतां मूलें, फळें, कंद, नानाप्रकारचीं भांडीं, रत्नें हीं घेऊन ठेवावीं. सहा महिन्यांनीं विकणाराच्या इच्छेप्रमाणें लाभ होतो. १२.

राशौ राशौ यस्मिन् शिशिरमयूखः सहस्रकिरणो वा ॥
युक्तोधिमित्रदृष्टस्तत्रायं लाभकोद्दिष्टः ॥ १३ ॥

अर्थः-( पौर्णिमेस किंवा अमावास्येस उत्पात झाले तर पूर्वोक्त वस्तुसंग्रह सांगितला.) ज्या ज्या राशींस चंद्र किंवा सूर्य हे मित्रानें युक्त व अधिमित्रानें दृष्ट असतील तर तेथें हा पूर्वोक्त लाभ होतो. अन्यत्र होत नाहीं.

सवितृसहितः संपूर्णो वा शुभैर्युतवीक्षितः ।
शिशिरकिरणः सद्योर्घस्य प्रवृद्धिकरः स्मृतः ॥
अशुभसहितः संदृष्टो वा हिनस्त्यथवा रविः ।
प्रतिगृहगतान् भावान् बुध्वा वदेत्सदसत्फलं ॥ १४ ॥

अर्थ-चंद्र सूर्यरहित [अमावास्येस] किंवा संपूर्ण [पौर्णिमेस] असून शुभ ग्रहांनीं युक्त किंवा दृष्ट असेल तर तत्काल मूल्याची वृद्धि होते. तसाच चंद्र पापग्रहांनीं युक्त किंवा दृष्ट असेल तर मूल्याचा नाश होतो. अथवा सूर्य शुभग्रहांनीं युक्त किंवा दृष्ट असेल तर वृद्धि होते, व पापग्रहानीं युक्त किंवा दृष्ट असेल तर नाश होतो. या प्रकारें सर्व भाव [राशि] जाणून शुभ किंवा अशुभ फल सांगावें. १४.

---

## नऊ पौर्णिमांच्या फलांचा विचार.

[ वर्षप्रबोधावरून. ]

चैत्रस्य पौर्णिमास्यां हि निर्मलं गगनं शुभम् ॥
तद्दिने ग्रहणं तारापातभूकंपवृष्टयः ॥ १ ॥
रजोवृष्टिः परीवेषः विद्युत्केतूदयादिना ॥
उत्पाते न च संग्राह्यं धान्यं धातुव्ययादितः ॥ २ ॥
विक्रये सप्तमे मासे भाद्रे द्विगुणलाभदम् ॥
वैशाख्यामीदृशे चिन्हे कार्पासस्य महर्घता ॥ ३ ॥
गोधूममुद्गमाषादेः संग्रहो लाभकारणम् ॥
विक्रीयाद्द्विगुणेत्वेन मासे भाद्रपदे भवेत् ॥ ४ ॥
ज्येष्ठस्य पूर्णिमानभ्रा शुभाय कथिता बुधैः ॥
वृष्ट्या वा परिवेषेण तस्यां धान्यस्य संग्रहः ॥ ५ ॥

तुर्ये मासेऽथवा पौषे लाभस्तस्यान्नविक्रयात् ॥
आषाढी निर्मला ज्येष्ठा वार्दलाच्छादिता शुभा ॥ ६ ॥
नैर्मल्याद्धान्यसंग्राहः पंचमे मासि लाभदः ॥
श्रावणी निर्मला श्रेष्ठा साभ्रत्वे धान्यसंग्रहः ॥ ७ ॥
विक्रयाद्घृततैलादेः लाभो मासतृतीयके ॥
पूर्णा भाद्रपदी शुभ्रा शुभा धान्यस्य विक्रयात् ॥ ८ ॥
अश्विनी निर्मला पूर्णा शुभाय वर्दिलोदये ॥
धान्यस्य संग्रहं कुर्याच्चैत्रे वै लाभदा महान् ॥ ९ ॥
साभ्रायां माघपूर्णायां धान्यसंग्रह इष्यते ॥
विक्रेयः सप्तमे मासे तस्य लाभाय संभवेत् ॥१०॥
फाल्गुनी पूर्णिमा साभ्रा सवृष्टिर्वा सगर्जना ॥
धान्यसंग्रहणान्मासे सप्तमे लाभदायिनी ॥११॥

**अर्थ**—चैत्री पौर्णिमेच्या दिवशीं आकाश निरभ्र असेल तर शुभ समजावें. आणि त्या दिवशीं ग्रहण, तारापात, भूकंप, वृष्टि, चंद्रसूर्याला परिवेष [खळें] आणि त्या दिवशीं वीज चमकेल, धूमकेतूचा उदय होईल इत्यादि उत्पातापैकीं एखादा उत्पात दृष्टीस पडेल तर धान्य व धातूचा संग्रह करून तो सातव्या महिन्यांत अथवा भाद्रपदमासीं विकावा म्हणजे दुप्पट लाभ होईल. वैशाख पौर्णिमेच्या दिवशीं वरील प्रमाणेंच एखादा उत्पात दृष्टीस पडेल तर कापूस महाग होईल. गहू, मूग, उडीद यांचा संग्रह केला असतां त्याची विक्री भाद्रपद महिन्यांत केली म्हणजे दुप्पट लाभ होईल. ज्येष्ठी पौर्णिमेच्या दिवशीं आकाश निरभ्र असेल तर तें शुभ समजावें. आणि त्याच दिवशीं वरील उत्पातापैकीं एखादा उत्पात दृष्टीस पडेल तर धान्यसंग्रह करावा म्हणजे चौथे महिन्यांत अथवा पौष महिन्यांत विक्री केली असतां लाभ होईल. आषाढी पौर्णिमेच्या दिवशीं आकाश आभ्राच्छादित असुन वारा सुटेल तर शुभ समजावा व त्या दिवशीं आकाश निरभ्र असून वारा वाहणार नाहीं आणि वरील उत्पातापैकीं एकादा उत्पात दृष्टीस पडेल तर धान्यसंग्रह करावा. आणि तो पांचव्या महिन्यांत विकावा. म्हणजे लाभ होईल.

श्रावणी पौर्णिमेच्या दिवशीं आकाश निर्मळ असेल तर शुभ समजावें. आणि त्या दिवशीं आकाश आभ्राच्छादित असून वादळ होईल व वरील उत्पातापैकीं एकादा उत्पात दृष्टीस पडेल तर धान्यसंग्रह करावा, व तूप तेल, इत्यादिकांची खरेदी करून ती तिसऱ्या महिन्यांत विकली म्हणजे मोठा लाभ होईल. भाद्रपद पौर्णिमेचे दिवशीं निरभ्र आकाश असेल तर शुभ समजावें, आणि धान्याची विक्री करावी. आश्विनी पौर्णिमेला निर्मळ आकाश असेल तर तें शुभ समजावें आणि त्या दिवशीं अभ्रें येऊन वादळ होईल व वरील उत्पातापैकीं एकादा उत्पात दृष्टीस पडेल तर धान्याचा संग्रह करून तो चैत्रमासीं विकला असतां मोठा लाभ होईल. माघी पौर्णिमेच्या दिवशीं आकाश आभ्राच्छादित असून वादळ होईल आणि वरील उत्पातापैकीं एखादा उत्पात दृष्टीस पडेल तर धान्यसंग्रह करावा. आणि सातवे मासीं विक्री केली असतां मोठा लाभ होईल. फाल्गुनी पौर्णिमेच्या दिवशीं आकाश आभ्राच्छादित असून पर्जन्यवृष्टि, मेघगर्जना वादळ व वरील उत्पातापैकीं एखादा उत्पात दृष्टीस पडेल तर धान्यसंग्रह करून तें सातवे महिन्यांत विकलें असतां लाभ होईल.

# अथ वृत्तिशतकांतील धान्य, धातू, जनावरें यांची समर्घता, समता आणि महर्घता या विषयांचें ज्ञानाबद्दल.

शालिवहान शक चालू असलेला घेऊन त्यांत धान्याचे आणि मासाचे ध्रुवक मिळवावे. आणि त्या मिळवणीस तीनीनें भागून १ उरल्यास स्वस्ताई. २ उरल्यास समता. शून्य उरल्यास महागाई याप्रमाणें सांगावें.

## मासध्रुवकांक.

१ चैत्र १४; २ वैशाख १६; ३ ज्येष्ठ १८; ४ आषाढ २०; ५ श्रावण २२; ६ भाद्रपद २५; ७ आश्विन १; ८ कार्तिक ३; ९ मार्गशीर्ष ५; १० पौष ८; ११ माघ १०; १२ फाल्गुन ११; याप्रमाणें मासापुढचे अंक ध्रुवकाचे जाणावे.

## धान्य ध्रुवकांक.

१ जोंधळा ४५; २ गहूं ४३; ३ हरभरे४५; ४ साळ ८१; ५ तांदूळ७२; ६ हरीक५२; ७ राळे११; ८ मूग ४७; ९ उडीद ५०; १० जवस ६४; ११ तीळ ५०; १२ मोहऱ्या ३६; १३ कर्डयी ५५; १४ तुरी ७४; १५ वोवा ३८; १६ जिरे ५४; १७ हळद ६०; १८ तंबाकू ४; १९ कापूस १०९; २० सुपारी ३०; २१ तेल ५६; २२ तूप ८१; २३ साखर ८१; २४ गूळ ७९; २५ खजूर २४; २६ मद्य २८; २७ मंजिष्ठा ४; २८ हिंग २३; २९ मीठ ४०; ३० लाख ६; ३१ कापूर ११०; ३२ कुंकू १०; ३३ रेशीम ४२; ३४ सूत ९५; ३५ वस्त्र ५८. धान्यापुढें दिलेले अंक ध्रुवकाचे जाणावे.

## धातूंचे ध्रुवकांक.

१ सोनें १८०; २ चांदी ( रुपें ) ८८; ३ तांबे १३०; ४ पितळ ३६; ५ कांसे १०१; ६ लोह ५४; ७ कथिल ४२; धातूंपुढें दिलेले अंक ध्रुवकांचे समजावे.

मूळ संस्कृत वाक्यें सोपीं असल्यानें ती न देतां त्याचें मराठीं भाषांतर वर आह्मीं दिलें आहे.

## जनावरांचे ध्रुवकांक.

१ घोडा १०; २ बैल ४५; ३ गाय ९; ४ हैस ३०; ५ एडका ३५; ६ बोकड ३८; इत्यादि जनावरांचे ध्रुवकांक त्यांच्या पुढें दिले आहेत.

याप्रमाणें मास, धान्य, धातू व जनावरें यांचे ध्रुवकांक त्या त्या पुढें दिले आहेत. शक, मास, धान्य या ३ नीं ध्रुवकांचे एकीकरण करून ३ नीनें भागावें, भागून जें लब्ध उरेल त्याचें फल १ उरेल तर समर्घता, २ उरेल तर समता, शून्य राहील तर महर्घता याप्रमाणें फलें जाणावीं.

## मतांतरे धान्यमासादिध्रुवकाः

शाकं मासध्रुवैर्युक्तं धान्यं ध्रुवकसंयुतं ॥
त्र्याप्तं त्वेकसमर्घं च द्वौ साम्यं त्रिर्महर्घता ॥१॥
धान्यध्रुवकाः । यावनालरसावेदाः ४६ गोधूमदहनाः शराः ५३ ।
चणका युगवेदाश्च ४४ तंदुलस्याकृतिर्भवेत् ॥२॥
मुद्गानामद्रिवेदाश्च ४७ माषाणां शून्यमार्गणाः ५०॥
गुडस्यांकरसाश्चैव ६९ तैलस्यांकशरास्तथा ५९ ॥३॥
घृतंतु शून्यवन्हिश्च ३० कार्पासाशून्यमंककाः १० ॥
संक्रांतिऋक्षं तिथिवारमिश्रं धान्यं च मिश्रं भजते च रामैः ।
एके समर्घं समता द्वितीये शून्ये महर्घं मुनयो वदंति ॥

---

## ॥ संक्रांतिमासध्रुवकाः ॥

शक्रो १४ नृपो १६ धृति १८ श्चैव विंशत्या २० कृतिरेव च २२ ॥
तत्वेंदु २५।१ वन्हि ३ बाणाद्री ५।७ अंकरुद्रा ९।११ स्त्वनुक्रमात् ॥१॥

अर्थ—चालू शक, मासध्रुवक, धान्यध्रुवक, या ३ चे अंक एकत्र करून ३ नें भागून जें शेष राहील त्याप्रमाणें फल जाणावें. १ राहिल्यास समर्घता, २ उरल्यास समता, शून्य शेष राहिल्यास महर्घता. याप्रमाणें फलें जाणावीं.

१ जोंधळा ४६ ; २ गहूं ५३; ३ हरभरे ४४, ४ तांदूळ २२; ५ मूग ४७; ६ उडीद ५०; ७ गूळ ६९, ८ तेल ५९, ९ तप ३०; १० कापूस ९० याप्रमाणें धान्यध्रुवक जाणावें.

१ मेषसंक्रमण मासाचा ध्रुवक १४ ; २ वृषभाचा १६; ३ मिथुनाचा १८; ४ कर्काचा २०; ५ सिंहाचा २२; ६ कन्येचा २५; ७ तूळेचा १; ८ वृश्चिकाचा ३; ९ धनूचा ५, १० मकराचा ७; ११ कुंभाचा ९; १२ मीनसंक्रमणमासाचा ११ हे ध्रुवकांक मेषादि संक्रमणमासाचे जाणावें.

संक्रांतिमास ध्रुवक, संक्रांत ज्या दिवशीं निघेल त्या दिवसाची तिथि, दिननक्षत्र आणि वार एकत्र करून त्यांत धान्याचा ध्रुवकांक मिळवून जी बेरीज येईल त्यास ३ नीनें भागून शेष एक उरल्यास समर्घता होईल. दोन शेष उरल्यास समता राहील. शून्य शेष राहील तर महर्घता होईल.

## ॥ क्रयविक्रयादि विचारः ॥

फान्हा कवीश्वरनंदन [ गोविंदकवीश्वरेण ] निर्मितं.

क्रेता लग्नपतिर्मतो यदि भवेल्लग्नं बलाढ्यं तदा ॥
ग्राह्यं वस्तुभवेदिहातिशयितो लाभोऽथ लाभेश्वरः ॥
विक्रेता कथितोऽथ लाभभवनं चेत्स्याद्बलाढ्यं तदा ॥
विक्रेतव्यमिदं त्वयेति कथयेल्लाभो भवेद्विक्रयात् ॥१॥

अर्थ—एखादा पदार्थ यावेळीं विकत घ्यावा किंवा घेऊं नये अथवा विकावा कां विकूं नये, असा व्यापारदृष्ट्या प्रश्न ज्यावेळीं होईल किंवा मनांत येईल त्यावेळची लग्नकुंडली मांडावी व तिजवरून विचार ठरवावा.

लग्नाचा जो अधिपति असेल तो विकत घेणारा समजावा व एकादश स्थानाचा जो अधिपति तो विकणारा समजावा.

लग्न बलयुक्त असतांना पदार्थ विकत घ्यावा व एकादश स्थान बलयुक्त असतांना पदार्थ विकावा म्हणजे फायदा होईल असें समजावें.

विलग्नगे वीर्ययुते समर्घं बलेन हीने तनुभे महर्घं ॥
महर्घता वित्तपतौ बलाढ्ये समर्घता निर्बलवित्तनाथे ॥२॥

अर्थः—लग्न बलयुक्त असेल तर स्वस्ताई होईल व निर्बल असेल तर महागाई होईल. धनस्थानचा म्हणजे द्वितीय स्थानचा अधिपति बलयुक्त असला तर महागाई होईल व निर्बली असल्यास स्वस्ताई होईल. २.

पश्येल्लग्नपतिर्यदा तनुगृहं ग्राह्यं तदा व्यत्यये ॥
न ग्राह्यं बलवांस्तु यावदुदयस्तावत्समर्घं भवेत् ॥
यावल्लग्नपतिर्ग्रहांतरगतो तावन्महर्घं मतं ॥
लग्नं यच्छुभनाथवीक्षितयुतं ज्ञेयं बलाढ्यं हि तत् ॥३॥

**अर्थ**—लग्नेशाची लग्नावर दृष्टि असेल तेव्हां पदार्थ विकत घ्यावा अन्यथा घेऊं नये.

लग्नेश बलवान् असून तो जोपर्यंत उदित असेल तोपर्यंत सवंगाई टिकेल व जोपर्यंत लग्नपति अस्तंगत राहील तोपर्यंत महागाई टिकेल.

लग्न शुभग्रहानें ( चंद्र, बुध, गुरु, शुक्र ) अथवा लग्नस्वामीनें युक्त किंवा दृष्ट असेल तर तें लग्न बलाढ्य समजावें. ३.

तत्रापि प्रवदन्ति लग्नमुदितं केंद्राणि यस्य ग्रहैः ॥
सौम्यैर्युक्तनिरीक्षितानि विपरीतं चेत्तु तन्निर्बलं ॥
किं च स्वामिबले बलाढ्यमुदितं लग्नं यदा निर्बलो ॥
लग्नेशोऽत्र विलग्नसंस्थितबलाधिक्ये तदिष्टं बलि ॥४॥

**अर्थः**—त्याचप्रमाणें ज्या लग्नाचीं केंद्रें ह्मणजे १।४।७।१० हीं स्थानें शुभग्रहांनीं अधिष्ठित किंवा दृष्ट असतील तर तें लग्नही बलाढ्य आहे असें समजावें व याच्या उलट जे असेल ते निर्बली समजावें. आणि लग्न स्वामी बलाढ्य असेल तर व लग्नीं बलवान् ग्रह असतील तरी बलवान् लग्न समजावें. ४.

ज्ञेया वस्तुमहर्घतातिबलिनो चेल्लाभलाभेश्वरौ ।
तौ चस्तोबलर्जिताविहसमर्घत्वं भवेद्वस्तुनः ॥
मिश्रत्वे समता यदा तु सवितुः स्यात्पूर्वसंक्रातितः ।
संक्रातिस्त्रिमिते दिने श्रुतिमिते धिष्ण्ये समर्घं तदा ॥५॥

**अर्थः**—लाभस्थान व लाभाधिपति अतिबलवान् असतील तर वस्तु महाग होईल आणि ते हीनबली असतील तर सवंगाई होईल. मिश्र असतील तर समता राहील. पूर्वसंक्रमणापासून दुसरें संक्रमण जर तिसरे अगर चौथे नक्षत्रावर होईल तर सवंगाई होईल असें समजावें. ५,

यदि तु संक्रमणं सवितुर्भवेत्प्रथमसंक्रमतस्त्रितयोडुनि ।
भवति पंचमकेऽथ चतुर्थके दिवसके कथितात्र महर्घता ॥ ६ ॥

**अर्थ**—कोणत्याही एका राशींतून दुसऱ्या राशींत सूर्याची संक्रान्ति ज्या नक्षत्रीं अगर ज्या वारीं होईल त्या नक्षत्रापासून तिसऱ्या नक्षत्रीं व त्या वारापासून पांचव्या किंवा चवथ्या वारीं जर त्या पुढची संक्रान्ति होईल तर महागाई होईल.

तद्वर्षलग्नं यल्लग्ने मीनान्मेषे व्रजेद्रविः ।
मेषसंक्रमणादग्रे यामावास्याथ पूर्णिमा ॥ ७ ॥
तत्प्रवेशविलग्नस्य नाथो वर्षविलग्नपः ।
उभौ केंद्रगतौ तौचेच्छुभदृष्टौ तदा भवेत् ॥ ८ ॥
स्वकीय राशिवस्तूनां समर्घत्वमसंशयं ।
क्रूरदृष्टौ यदा तौ स्याद्राशिवस्तुमहर्घता ॥ ९ ॥
चंद्रार्कौ केंद्रगौ सौम्यदृष्टौ ब्रूतो समर्घताम् ।
सुवर्णरौप्ययोस्तौ तु यदा पणफरस्थितौ ॥ १० ॥
क्रूरदृष्टौ तदा ब्रूतः स्वर्णरौप्यमहर्घताम् ।
शुक्रोऽत्र शनिवज्ज्ञेयो भानुवच्चंद्रनंदनः ॥ ११ ॥

अर्थ-मेष संक्रमण ज्या लग्नावर निघेल तेंच वर्षलग्न होतें. मेषसंक्रांत निघाल्यानंतर पुढील पौर्णिमेचा अगर अमावास्येचा प्रवेश ज्या लग्नावर होईल त्या लग्नाचा अधिपति व वर्षलग्नाधिपति हे उभयतां जर केंद्रीं असून शुभग्रहांनीं अवलोकित असतील तर त्यांचे स्वकीय राशिसंबंधीं जे पदार्थ असतील ते सवंग होतील. आणि जर ते पापग्रहांनीं दृष्ट असतील तर महाग होतील. चंद्रसूर्य हे केंद्रांत शुभग्रह दृष्ट असतील तर सोनें च चांदी सवंग होईल आणि ते ३।५।८।११ या स्थानीं असून अशुभ दृष्ट असतील तर सोनें चांदी महाग होईल यांत संशय नाहीं. शुक्राचें फल शनिप्रमाणें व बुधाचें फल रविप्रमाणें समजावें.

## तिथिप्रकरणें.

पूर्णिमा मासनक्षत्राद्यदि हीना समाधिका ।
समर्घत्वं समार्घत्वं महर्घत्वं क्रमात्तदा ॥ १२ ॥

अर्थः-( आमच्या महिन्यांचीं नांवें नक्षत्रावरून पडली आहेत.. मासनक्षत्र पौर्णिमेच्या दिवशीं असतेच असें नाहीं त्याविषयींही मागें सांगितलेंच आहे ) पण ज्या पौर्णिमेस मासनक्षत्र असेल त्या पौर्णिमेचे फल या श्लोकांत सांगितले आहे. नक्षत्रापेक्षा पौर्णिमा जर कमी असेल तर सवंगाई होईल. दोन्हीही सारखी असतील तर धारण आहे तशी कायम टिकेल; व जर नक्षत्रापेक्षा पौर्णिमा अधिक असेल तर त्या महिन्यांत महागाई होईल. १२.

---

## समर्घप्रश्नाविषयीं विचार.

(प्रश्नवैष्णवावरून.)

मेषे वृषे च मिथुने शुभदृष्टियुक्तोऽन्नं ग्रैष्मिकं सुसुलभं त्वभयं पृथिव्यां ॥
सूर्यो धनुर्मृगघटेषु च शारदान्नं कुर्यात्समर्घमशुभैः सहितो महार्घं ॥१॥

अर्थ-सूर्य मेष, वृषभ, आणि मिथुन राशीचा अंत्य म्हणजे कर्क राशीला प्रवेश करीपर्यंत शुभ ग्रहांनीं दृष्ट किंवा युक्त असेल तर ग्रीष्म ऋतूंमध्यें उत्पन्न होणारीं धान्यें स्वस्त होतील; आणि धनु राशीला प्रवेश करून मीन राशीला जाईपर्यंत तो शुभ ग्रहांनीं दृष्ट किंवा युक्त असेल तर, शरदृतूंमध्यें उत्पन्न होणारीं धान्यें स्वस्त होतील; आणि तो सूर्य कर्केला प्रवेश करीपर्यंत तो पापग्रहांनीं दृष्ट किंवा युक्त असेल तर, ग्रीष्म ऋतूतील धान्यें महाग होतील; आणि तोच रवि मीन राशीला प्रवेश करीपर्यंत पापग्रहांनीं युक्त किंवा दृष्ट असेल तर, शरदृतूंतील धान्यें महाग होतील. १.

यस्यां त्वमायामथ पूर्णमास्यां चंद्रः शुभैर्दृष्टयुतो न पापैः ॥
तस्मिंश्च मासे कुरुते समर्घं महर्घकं पापयुतेक्षितश्च ॥२॥

अर्थ--ज्या मासांमध्यें पौर्णिमेला आणि अमावास्येला चंद्र शुभग्रहांनीं युक्त किंवा दृष्ट असून तो पापग्रहांनीं युक्त किंवा दृष्ट नसेल तर, त्या महिन्यांत संपूर्ण धान्यें स्वस्त होतील; आणि ज्या महिन्यांत पौर्णिमेला आणि अमावास्येला चंद्र पापग्रहांनीं युक्त किंवा दृष्ट असेल आणि तो शुभग्रहांनीं युक्त किंवा दृष्ट नसेल तर, त्या मासांमध्यें संपूर्ण धान्यें महाग होतील; आणि ज्या मासांमध्यें पौर्णिमेला आणि अमावास्येला चंद्र शुभग्रहांनीं दृष्ट किंवा युक्त असेल त्या मासांत संपूर्ण धान्यें महाग होणार नाहींत व स्वस्तही होणार नाहींत असें सांगावें. २.

लग्ने बलाढ्ये निजनाथसौम्यैर्युक्तेक्षिते केंद्रगतैः शुभैश्च ॥
सर्वं समर्घं विबले विलग्ने केंद्रेषु पापैः सकलं महर्घं ॥३॥

**अर्थ**--प्रश्नकालीं तनुभवन बलाढ्य असून स्वकीय स्वामी आणि शुभग्रह यांनीं दृष्ट किंवा युक्त असेल तर, आणि केंद्रीं संपूर्ण शुभग्रह असतील तर सर्व प्रकारचीं धान्यें स्वस्त होतील; आणि तनुभवन निर्बली असून शुभग्रहांनीं युक्त किंवा दृष्ट नसेल तर आणि संपूर्ण पापग्रह केंद्रस्थानीं असतील तर, सर्व धान्यें महाग होतील.

स्वोच्चे स्वभे मित्रगृहे विलग्ने यावद्दिनैस्तिष्ठति सौम्यखेटः ॥
तत्तुल्यमासैः सकलं समर्घं वर्णानुगं तस्य च वस्तु भूयः ॥४॥

**अर्थ**--उच्चीचा, स्वक्षेत्रीचा, मित्रक्षेत्रीचा शुभग्रह लग्नीं जितके दिवस राहील तत्तुल्य मासपर्यंत संपूर्ण धान्यें स्वस्त होतील, त्यांमध्येंही तनुभवनी असणाचा शुभ ग्रहाचा जो वर्ण (रंग) असेल त्या वर्णाचीं धान्यें विशेष स्वस्त होतील. ४.

क्रूरेक्षितः शत्रुगृहे विलग्ने यावद्दिनैस्तिष्ठति पापखेटः ॥
तत्संख्यमासैः सकलं महर्घं वर्णानुगं वस्तु च तस्य भूयः ॥५॥

--**अर्थ**--शत्रुक्षेत्रीं असणारा कोणताही पापग्रह अन्य क्रूर ग्रहांनीं अवलोकित असून तनुभवनीं असेल तर, आणि तो पापग्रह तनुभवनीं जितके दिवस राहील तत्तुल्यमासपर्यंत संपूर्ण धान्यें महाग होतील, त्यांमध्येंही तनुभवनी असणाऱ्या पापग्रहाचा जो वर्ण असेल त्या वर्णाच्या वस्तू विशेष महाग होतील असें सांगावें. ५.

---

## वार्षिक शुभाशुभ फलज्ञानाविषयीं विचार.

### ( प्रश्नवैष्णवावरून. )

राकाकुहूशशिपभास्वदजप्रवेशलग्नेश्वराः शुभखगैर्युतवीक्षिताश्चेत् ॥
तद्वत्सरे जगति सौख्यमलं प्रकुर्युः पापार्दिता गदनरेंद्रभयं प्रजानां ॥१॥

**अर्थ**-चैत्री अमावास्येला चंद्र ज्या राशीला असतो त्या राशीचा अधिपति आणि चंद्र, व मेष राशीला ज्यावेळीं सूर्य प्रवेश करील त्यावेळचें जें लग्न ( या लग्नास जगल्लग्न असें ह्मणतात ) त्याचा अधिपति, हे तिघे शुभग्रहांनीं युक्त किंवा दृष्ट असतील तर, त्या वर्षामध्यें मनुष्यास सौख्य उत्तम लागेल, आणि अमावास्येचा चंद्र, व तो ज्या राशीला असतो त्या राशीचा अधिपति आणि मेषसंक्रमण ज्यावेळीं होईल त्या वेळचें जें लग्न त्याचा अधिपति असे तिघे पापग्रहांनीं पीडित असतील तर, लोकांना रोग उत्पन्न होतील आणि राजापासून भय उत्पन्न होईल.

मेषप्रवेशोदयतः खरांशोः केंद्रेषु पापोद्गुपत्तीत्थशाले ॥
पापगृहैर्दृष्टयुते च तस्मिन्वर्षे गदार्तिः प्रियमन्नमुर्व्यां ॥२॥

**अर्थ**--सूर्य मेष राशीला ज्यावेळीं प्रवेश करील त्या वेळच्या लग्नकुंडलीमध्यें केंद्रस्थानीं पापग्रह असून लग्नाधिपति अष्टमाधिपतीशीं इत्थशालयोग करीत असेल तर आणि लग्नाधिपति पापग्रहांनीं युक्त किंवा दृष्ट असेल तर त्या वर्षामध्यें लोकांना रोग उत्पन्न होतील आणि धान्य महाग होईल. २.

भानोर्मेषप्रवेशोदयभवनपतिः सद्ग्रहः स्वोच्चसंस्थः ॥
स्वर्क्षस्थो वापि केंद्रे शुभगगनचरैर्दृष्टयुक्तो बलाढ्यः ॥३॥
तस्मिन्वर्षे प्रकुर्याज्जगति शुभसुखं भूरि सस्यं सुवृष्टिं ॥
क्रूरः क्रूरार्दितो वा दिशति नृपभयं कष्टमन्नं महर्घं ॥४॥

अर्थ–सूर्य मेषराशीला ज्यावेळीं प्रवेश करील त्या वेळच्या लग्नकुंडलीमध्यें तनुभवन शुभग्रहाचें असून तो शुभग्रह स्वोच्चगत किंवा स्वक्षेत्रगत असेल तर, आणि तो केंद्रीं असून शुभग्रहांनीं दृष्ट किंवा युक्त असेल तर त्या वर्षामध्यें संपूर्ण लोकांना सौख्य लागेल आणि सुवृष्टि होऊन धान्यें उत्तम पिकतील. आणि जगल्लग्नाधिपति क्रूरग्रह असून क्रूरग्रहांनीं पीडित असेल तर, त्या वर्षामध्यें लोकांना राजभय व कष्ट होतील आणि धान्यें महाग होतील. ४.

## प्रत्येक मनुष्याच्या संबंधानें वार्षिक शुभाशुभफलज्ञानाविषयीं विचार.

( प्रश्नवैष्णवारून )

जन्मोदयाद्भास्वदजप्रवेशलग्नं हि यद्भावगतं शुभान्वितं ॥
तद्भाववृद्धिं प्रकरोति तस्मिन्वर्षे नृणां पापयुतं तदन्यथा ॥ १ ॥
जन्मोदये देहसुखं धनेर्थलाभस्तृतीये च कुटुंबवृद्धिः ॥
तुर्ये सुहृत्सौख्यमथात्मजाप्तिः पुत्रेऽथ षष्ठेरिपराजयः स्यात् ॥ २ ॥

अर्थ—जन्मलग्नापासून जगल्लग्न ज्या भावीं येईल त्या भावावर शुभग्रहांची दृष्टि असेल किंवा तें शुभ ग्रहांनीं युक्त असेल, आणि तें स्वस्वामियुक्त किंवा स्वस्वामिदृष्ट असेल तर, त्या वर्षामध्यें त्या भावाची वृद्धि होईल; आणि तो भाव पापग्रहांनीं युक्त किंवा दृष्ट असेल तर त्या भावाचा नाश होईल; जसें, जन्मलग्न आणि जगल्लग्न हें एकच असून तें स्वस्वामीनें दृष्ट किंवा युक्त असेल; आणि तें शुभग्रहांनीं युक्त किंवा दृष्ट असेल तर त्या वर्षी त्या मनुष्यास देहसौख्य उत्तम तऱ्हेचें लागेल; आणि जन्मलग्नापासून धनभवनीं जगल्लग्न असेल तर, त्या वर्षी द्रव्यलाभ विशेष होईल; आणि जन्मलग्नापासून तृतीयस्थानीं जगल्लग्न येईल तर, कुटुंबवृद्धि होईल, आणि अधिक पराक्रम होऊन सेवकजनाची वृद्धि होईल; आणि जन्मलग्नापासून चतुर्थस्थानीं जगल्लग्न येईल तर मित्र, ग्राम, चतुष्पद आणि स्वगृह, माता यांपासून उत्तम तऱ्हेचें सौख्य लागेल; आणि जन्मलग्नापासून पंचमस्थानीं जगल्लग्न असून तें शुभग्रहांनीं युक्त किंवा दृष्ट असेल आणि तें स्वस्वामीनें दृष्ट किंवा युक्त असेल तर त्या वर्षामध्यें संतान प्राप्त होईल; किंवा गर्भधारणा होईल; आणि विद्यावृद्धि होईल; जन्मलग्नापासून षष्ठस्थानीं जगल्लग्न येईल तर; या वर्षामध्यें शत्रूचा पराभव, मातुलसौख्य, रोगनाश, चतुष्पदापासून भयाभाव, आणि बंधनाभाव याप्रमाणें फलें होतील. १–२.

स्त्रीसौख्याप्तिर्भवति मदने मृत्युरुग्भीश्च रंध्रे ॥
धर्मार्थाप्तिस्तपसि दशमे वित्तसौख्यास्पदाप्तिः ॥ ३ ॥
लाभे लाभः सुखधनचयो दुःखदारिद्र्यमंत्ये ॥ ४ ॥

अर्थ—जन्मलग्नापासून सप्तमस्थानीं जगल्लग्न असून तें शुभग्रहांनीं दृष्ट किंवा युक्त असेल आणि स्वस्वामीनें युक्त किंवा दृष्ट असेल तर, त्या वर्षांत स्त्रीसौख्य उत्तम तऱ्हेचें लागेल; आणि जन्मलग्नापासून अष्टमस्थानीं जगल्लग्न येईल तर, मृत्यु येईल किंवा रोगभय होईल; आणि जन्मलग्नापासून नवमस्थानीं जगल्लग्न येईल तर, त्या वर्षामध्यें भाग्योदय, प्रवासामध्यें सौख्य, सत्तीर्थस्नान आणि धर्मवृद्धि इत्यादि शुभ फलें होतील; आणि जन्मलग्नापासून दशमस्थानीं जगल्लग्न येईल तर, विशेष अधिकार प्राप्ति, द्रव्यलाभ, राजापासून सन्मान, आणि व्यापारादि वृद्धि, याप्रमाणें फलें होतील. आणि जन्मलग्नापासून लाभस्थानीं जगल्लग्न येईल तर, सर्वप्रकारचीं सुखें लागतील, आणि व्यापारादिकापासून धनप्राप्ति होईल; आणि जन्मलग्नापासून द्वादशस्थानीं जगल्लग्न येईल तर, मनुष्यास नानाप्रकारचीं दुःखें प्राप्त होतील; आणि दारिद्र्य येईल; पूर्वोक्त विचारामध्यें जगल्लग्न पापग्रहांनीं पीडित असेल तर, पूर्वोक्त फलें होणार नाहींत; आणि तें शुभ पापग्रहांनीं दृष्ट किंवा युक्त असेल तर, मिश्र फलें होतील; आणि षष्ठ अष्टम आणि द्वादश या स्थानीं असेल तर विपरीत फल समजावें.

---

# मयूरचित्रकस्थग्रहयोगजन्यफलें. ।

ऐंद्रनक्षत्रगावेतौ यदि सूर्यमहीसुतौ ।
मासं महर्घतां यांति धान्यानि स्वस्थतां पुनः ॥ १ ॥

अर्थः—सूर्य व मंगळ ज्यावेळीं ज्येष्ठा नक्षत्रास येतील त्यावेळीं एक महिनाभर सर्व धान्याची महागाई होईल. एक महिन्यानंतर पुन्हां धान्याची स्वस्ताई होईल ह्मणजे पूर्ववत् धान्य राहील. १.

भानुकेतू च भरणीं मृगं वा यदि संस्थितौ ।
लवणं महर्घतां याति सिंधुदेशोद्भवं बिडं ॥ २ ॥

अर्थ--सूर्य व केतु यांचा जर भरणी किंवा मृगनक्षत्रास योग होईल तर मीठ व सैंदेलोण महाग होईल. २.

बुधशुक्रमहीपुत्रा भौजंगर्क्षे समाश्रिताः ।
नंदंति लोकाः सुखिनः सुभिक्षं जनयंति च ॥ ३ ॥

अर्थः--बुध, शुक्र व मंगळ हे जर आश्लेषा नक्षत्रास येतील तर लोकांना सुख व आनंद होईल आणि धारण स्वस्त होईल. ३.

अनुराधां गतः सौरिर्ज्येष्ठायां च बृहस्पतिः ।
पश्चिमस्यां तदा युद्धं प्रजानाशं प्रयांति च ॥ ४ ॥

अर्थ—अनुराधानक्षत्रीं शनि व ज्येष्ठानक्षत्रीं गुरु याप्रमाणें येतील तर पश्चिमदिशेला युद्ध होईल व प्रजेची प्राणहानि होईल. ४.

मूले मंदो बुधः स्वात्यां मघायां चंद्रमा स्थितः ।
संग्रहे सर्व धान्यानां लाभो भवति नान्यथा ॥ ५ ॥

अर्थ-मूळनक्षत्रीं शनि, स्वातीस बुध, व मघास चंद्र, याप्रमाणें योग आला असतां धान्य खरेदी करून ठेविलें ह्मणजे त्यापासून फायदा होईल. ५.

श्रवणर्क्षे यदा क्रूरो ग्रहः कश्चित्स माश्रितः ॥
अन्नं महर्घतां याति गोधूमाश्च विशेषतः ॥ ६ ॥

अर्थ-श्रवणनक्षत्रास एखादा पापग्रह आला असतां सर्व धान्यें व विशेषेंकरून गहूं महाग होतील. ६.

विश्वभे च गतो मंदः सप्तमर्क्षे यदा रविः ॥
तदा जलविनाशः स्यात्प्रजानां कदनं महत् ॥ ७ ॥

अर्थ-उत्तराषाढानक्षत्राला शनि व तेथपासून सातव्या ह्मणजे रेवतीनक्षत्राला सूर्य असे आले असतां विहिरींचें वगैरे पाणी आटून जाईल व लोकांत मोठें भांडण ( युद्ध ) होईल. ७.

वासवर्क्षे यदा सौरिर्भूमिपुत्रेण संयुतः ॥
न वर्षन्ति जलं मेघाः सस्यहानिश्च जायते ॥ ८ ॥

अर्थः—ज्येष्ठानक्षत्राला शनि व मंगळ आले असतां पाऊस पडणार नाहीं व धान्य पिकणार नाहीं. ८.

वारुणे च यदा जीवश्चित्रायां धरिणीसुतः ॥
नाशं यान्ति च गोधूमाः सर्वसस्यमहर्घता ॥९॥

अर्थ—शततारका नक्षत्रास गुरु व चित्रास मंगळ असे आले असतां गव्हाचें पिक होणार नाहीं सर्व धान्याची महागाई होईल. ९.

भानुर्भौमोभृगुश्चैव शनिक्षेत्रं समाश्रिताः ॥
यदा निशात्पतिस्तत्र तदा दुर्भिक्षतो भयम् ॥ १० ॥

अर्थ—रवि, मंगळ, शुक्र व चंद्र असे मकर किंवा कुंभराशीस आले असतां दुष्काळ पडेल. १०.

मिथुनर्क्षे सूर्यपुत्रो राहुर्वा यदि संस्थितः ॥
दुर्भिक्षं जायते तत्र पश्चिमायां नृपक्षयः ॥ ११ ॥

अर्थ—मिथुनराशीस शनि किंवा राहू येईल तेव्हां दुष्काळ पडेल व पश्चिम दिशेस राजे लोकांचा नाश होईल. ११.

वृषे राहुर्यदा भौमः षष्ठे मासे महद्भयम् ॥
भवेत्तत्र न संदेहस्तदा दुर्भिक्षपीडनम् ॥ १२ ॥

अर्थ—वृषभराशीस राहु व मंगळ आले असतां सहाव्या महिन्यांत मोठें अरिष्ट उत्पन्न होईल. व दुष्काळामुळें लोकांस त्रास होईल. १२.

रविराहुमहिपुत्राः शशिशुक्रशनैश्चराः ।
एकराशिंगता ह्येते तदा पृथ्वी भयाकुला ॥१३॥
पूर्वदेशे महापीडा नृपाणां संक्षयो महान् ।
प्रजानाशो व्याधिभयं तस्मिन्काले न संशयः ॥१४॥

अर्थः—सूर्य, राहू, मंगळ, चंद्र, शुक्र आणि शनि हे सर्व एका राशीस आले असतां सर्व पृथ्वी भयानें पीडित होईल. पूर्वेकडील देशांत मोठी पीडा होईल राजे लोकांचा व इतर लोकांचा नाश होईल व रोगाची भीति होईल यांत संशय नाहीं. १३–१४.

सूर्यचंद्रारमंदाश्च राहुचंद्रसुतौ यदा ॥
एकराशिंगता ह्येते दक्षिणस्यां भयप्रदाः ॥१५॥

अर्थः—सूर्य, चंद्र, मंगळ, शनि. राहु, आणि बुध हे सर्व एका राशीस आले असतां दक्षिण दिशेस भय उत्पन्न होईल. १५.

एकराशिंगता ह्येते कुजार्कशनिराहवः ।
शुक्रो गुरुश्च तत्रैव तदा भयविवर्धकाः ॥ १६ ॥
उत्तरे छत्रभंगः स्यान्नात्र कार्या विचारणा ।
रविचंद्रकुजा जीवो मंदश्चंद्रसुतो यदा ॥१७॥
समाश्रिता ह्येकराशिं तदा पृथ्वी भयाकुला ।
राज्ञां नाशो व्याधिभयं प्रजानां संक्षयो महान् ॥ १८ ॥

अर्थः—मंगळ, शनि व राहू एका राशीस असतां तेथें गुरु व शुक्र यांचा योग होईल तर सर्वत्र भीति उत्पन्न होईल व उत्तर देशांत एका राजाचा नाश होईल याविषयीं संशय धरण्याचें कारणच नाहीं. सूर्य, चंद्र, मंगळ, गुरु, शनि हे सर्व एका राशीस आले असतां सर्व पृथ्वी भयानें त्रासून जाईल, राजांचा नाश होईल व लोकांत रोगाची भीति उत्पन्न होऊन त्यांचा फार नाश होईल. १६–१८.

कुजश्च जीवशुक्रौ च यदैकत्रसमाश्रिताः ॥
भयं व्याधिं प्रकुर्वंति सर्वधान्यमहर्घताम् ॥१९॥

अर्थ—मंगळ, गुरु आणि शुक्र जेव्हां एके ठिकाणीं एका राशीस येतील तेव्हां ते सर्वत्र भीति व रोग उत्पन्न करतील आणि सर्व धान्यें महाग होतील. १९.

कुजार्कचन्द्रजीवाश्च सिंहराशिं समाश्रिताः ।
छत्रभंगः प्रजानाशो भयभीता च मेदिनी ॥२०॥

अर्थ—मंगळ, सूर्य, चन्द्र व गुरु हे सिंह राशीस गेले असतां एकाद्या राज्याचा नाश होईल. लोकांचा क्षय होईल. आणि सर्व पृथ्वी भयानें गांजून जाईल. २०.

एकराशौ गता ह्येते सौम्यशुक्रदिनाधिपाः ।
सर्वधान्यमहर्घत्वं मेघाः स्वल्पजलप्रदाः ॥२१॥

अर्थ—बुध, शुक्र व रवि हे एका राशीस असतील तर सर्व धान्यें महाग होतील व पाऊस थोडा पडेल. २१.

एकनक्षत्रगा ह्येते तदा भयविवर्धकाः ।

अर्थः-[ बुध, शुक्र रवि ] जर एका नक्षत्रास आले असतील तर सर्वत्रांस भीति वाढवतील.

यदा जीवयुतो मंदो जीवाद्वा सप्तमे स्थितः ।
तदा पूजा विनश्यंति भूयश्चान्नपरिक्षयः ॥ २२ ॥

अर्थ—शनि व गुरु एका राशीस येतील अथवा गुरूपासून सातव्या स्थानीं शनि येईल तर पूजेचा विनाश होईल. व अन्नाचा ऱ्हास होईल. २२.

कर्कमीनमृगस्त्रीषु शनिभौमौ यदा स्थितौ ।
तदा युद्धाकुला पृथ्वी धनधान्यविवर्जिता ॥ २३ ॥

अर्थ—शनि व मंगळ, कर्क, मीन, मकर व कन्या या राशींस आले तर पृथ्वीवर रणें माजतील व धनधान्यांचा नाश होईल. २३.

मिथुनस्थो धनुर्मीनराशौ मंदः समाश्रितः ।
तदा भूपा विनश्यंति पृथ्वी शोणितपूरिता ॥ २४ ॥

अर्थः—शनि, मिथुन, धनु, किंवा मीन राशीस आला असतां राजांचा नाश होईल व पृथ्वीवर रक्ताचे पाट वहातील. २४.

रविशुक्रसुराचार्या यदैकत्रसमाश्रिताः ।
राज्यभ्रंशः प्रजानाशः सर्वसस्यमहर्घता ॥ २५ ॥

अर्थः—सूर्य, शुक्र, व गुरु हे एका राशीस येतील तर एखादा राजा पदच्युत होईल. लोकांची हानि होईल व धान्यें महाग होतील. २५.

रविभार्गवभौमाश्च राशिमेकं समाश्रिताः ।
घृततैलमसूरान्नमहर्घं स्यान्महद्भयम् ॥ २६ ॥

अर्थः–सूर्य, शुक्र व मंगळ हे एका राशीस येतील तर तूप, तेल, मसुरा महाग होतील व मोठी भीति उत्पन्न होईल. २६.

मेषे शनैश्चरो भानुर्गवो भूमिजस्तथा ।
दुर्भिक्षं च प्रजापीडा तदा पृथ्वी भयाकुला ॥४५॥

अर्थ—मेषराशीस शनि, रवि, शुक्र व मंगळ असे आले असतां दुष्काळ पडेल. लोकांना त्रास होऊन सर्व पृथ्वी भयानें त्रस्त होईल. ४५.

वृषे भानुः कुजः सौरिस्तदा युद्धं समादिशेत् ।
न वर्षंति जलं मेघा दुर्भिक्षं लोकपीडनं ॥४६॥

अर्थ—वृषभ राशीस रवि, मंगळ आणि शनि आले असतां लढाई होईल. पाऊस पडणार नाहीं, दुष्काळ पडेल आणि प्रजेला त्रास होईल. ४६.

मीनराशिगते मंदे कर्कटस्थे बृहस्पतौ ।
तुलाराशिगते भौमे तदा दुर्भिक्षमादिशेत् ॥४७॥

अर्थः—मीनराशीला शनि, कर्केस गुरु, तूळराशीस मंगळ असा योग आला असतां दुष्काळ पडेल. ४६.

भूमिपुत्रा हि भृगवस्तुलाराशिसमाश्रिताः ।
तदा युद्धं महाघोरं राज्ञां चैव परस्परं ॥४८॥

अर्थ—तूळराशीस मंगळ राहु व शुक्र असे आले असतां राजे लोकांत आपापसांत मोठी लढाई होईल.

चंद्रभार्गवधरासुता यदा मीनराशिमुपयांति वै तदा ।
दुर्लभं भवति सर्वधान्यकं वारिदश्च न जलं प्रमुंचति ॥४९॥

अर्थ—मीन राशीस चंद्र, शुक्र आणि मंगळ असे आले असतां सर्व धान्यें दुर्भिळ होतील. पाऊस पडणार नाहीं. ४५.

गुरुयुक्तः शनिर्वक्रं करोति च यदा तदा ॥
नवमे मासि गोधूमतिलतैलमहर्घता ॥५०॥

अर्थः—वक्रीचा शनि आणि गुरु हे दोघे एका राशीस आल्यापासून नवव्या महिन्यांत गहूं, तिळ आणि तेल हें महाग होईल. ५०.

गुरुशुक्रावेकराशिंगतौ दुर्भिक्षदुःखदौ ।
युद्धदौ शनिमाहेयौ तदा दुर्भिक्षकारकौ ॥५१॥

अर्थ—गुरु आणि शुक्र एका राशीस आले असतां दुष्काळ पडेल आणि लोकांस दुःख होईल. तसेंच शनि आणि राहु हे एका राशीस आल्यास लढाई होईल आणि दुष्काळ पडेल. ५१.

यदा शुभग्रहः कश्चिदतिचारं करोति च ॥
तदा नृपक्षयं याति दुर्भिक्षं चात्र दारुणं ॥५२॥

अर्थ—कोणता एखादा शुभग्रह अतिचार करील ( ह्मणजे एका राशींतून दुसऱ्या राशींत नियमित कालापेक्षां अल्पकलांत जें त्वरित गमन होतें. ) तेव्हां राजाचा नाश होईल व मोठा भयंकर दुष्काळ पडेल ५२.

अतिचारं ग्रहः पापो यदा कश्चित्समाश्रितः ॥
तदा नंदंति राजानो धनधान्ययुताः प्रजाः ॥५३॥

अर्थ—पापग्रहाचा अतिचार होईल तर राजांना आनंद होऊन लोकांत धनधान्य विपुल होईल. ५३.

यद्यतीचारगो मंदो वक्रीभूतोंगिरःसुतः ॥
राजानस्तत्र नंदंति धनधान्याकुला धरा ॥५४॥

**अर्थ**—शनि अतिचार करणारा व गुरु वक्रीचा असा योग आला असतां राजांना आनंद होऊन पृथ्वीवर धनधान्य विपुल होईल. ५४.

यदा क्रूरग्रहो वक्री शुभोतीचारमागतः ।
तदा भवति दुर्भिक्षं राज्ञां वैरं परस्परं ॥ ५५ ॥

**अर्थ**—पापग्रह वक्रीचा असून एखाद्या सौम्य ग्रहाचा अतिचार होईल तर दुष्काळ पडेल व राजे लोकांत एकमेकांशीं शत्रुत्व होईल. ५५.

यस्मिन्मासे पौर्णिमायां यदा वर्षति वारिदः ।
गोधूमघृतधान्यानां तस्मिन्मासे महर्घता ॥ ५६ ॥

**अर्थः**—कोणत्या तरी एखाद्या महिन्यांत पौर्णिमेचें दिवशीं पाऊस पडेल तर त्या महिन्यांत गहूं, तूप व धान्यें यांची महर्घता होईल. ५६.

यदा मलिम्लुचे मासि भौमो राश्यन्तरं व्रजेत् ।
गुरुर्वा महतीवृष्टिरथवा लोकसंक्षयः ॥ ५७ ॥

**अर्थ**—अधिक महिन्यांत मंगळ किंवा गुरु एका राशींतून दुसऱ्या राशीस जातील तर अति पर्जन्यवृष्टि होईल, किंवा लोकांचा नाश होईल. ५७.

कार्तिके मार्गशीर्षे वा संक्रांतौ वारिवर्षणम् ।
तदा समर्घता पौषे सस्यवृद्धिस्तु मध्यमा ॥ ५८ ॥

**अर्थ**—कार्तिक व मार्गशीर्ष या महिन्यांत ज्या दिवशीं सूर्यसंक्रमण होईल त्या दिवशीं जर पाऊस पडेल तर सवंगाई होईल व पौषमासांतील संक्रांतीचे दिवशीं पाऊस पडेल तर धान्यें मध्यम निपजतील. ५८.

गुरुशुक्रारशशिजा यदैकत्र समाश्रिताः
घातयोगो विजानीयात्पांशुवृष्टिस्तदा भवेत् ॥ ५९ ॥

**अर्थ**—गुरु, शुक्र मंगळ आणि बुध एका राशीस आले असतां त्या योगास घातयोग ह्मणतात. असा योग आला ह्मणजे धुळींचा पाऊस पडतो. ५९.

पंचमसप्तगस्यात्क्षोणीसुतो याति तथारिगेहे ॥
दिग्दाहयोगो मुनिना प्रादिष्टो योगोक्तमोल्कायतनादियोगः ॥६०॥

**अर्थः**—सूर्यापासून पांचव्या किंवा सातव्या स्थानीं चंद्र व मंगळ शत्रुगृहांत, असा योग येईल तेव्हां चहूंकडे ज्वाळा झाल्यासारख्या दिसतील. ६०.

उपप्लवाः सप्तमगो महीजो महीसुतात्पंचमगो यदाज्ञः ॥
बुधाद्विधुः स्याच्च चतुष्टये च भूकंपयोगः कथितो विधिज्ञैः ॥६१॥

**अर्थः**—रवीपासून सातव्या स्थानीं मंगळ व मंगळापासून पंचमस्थानीं बुध व बुधापासून चवथ्या स्थानांत चंद्र असा योग येईल तेव्हां धरणीकंप होईल व उत्पात होतील. ६१.

## ॥ एषां योगानां फलं ॥

मेषे वृषे कुलीरेर्के यदोत्पाता भवंति च ।
दक्षिणस्यां तदा युद्धं प्रजाः क्षुद्भयपीडिताः ॥१॥

अर्थ—मेष, वृषभ आणि कर्क या राशीस सूर्य आला असतां उत्पात होतील आणि दक्षिण भागाला लढाई होईल व लोक भुकेनें पीडित होतील. १.

मिथुनेर्केन्ननाशस्याद्विंध्ये सिंहलकेभयं ।
मद्रदेशस्य नाशः स्यात्कुम्भेर्के शस्य पीडनं ॥ २ ॥

अर्थ—मिथुन राशीस रवि गेला असतानां जर हे उत्पात झाले तर विंध्याटवी व सिंहलद्वीप या प्रदेशांत धान्यास रोग उत्पन्न होऊन नाश पावेल कुंभेस रवि गेला असतानां जर उत्पात झाले तर मद्रासेकडील प्रदेशाची फार हानि होईल व धान्यास कीटकादि पीडा होऊन नाश पावेल. २.

कान्यकुब्जे महापीडा कन्यकानां वृषे रवौ ।
वृश्चिके च मृगे सूर्ये दुर्भिक्षं नर्मदातटे ॥३॥

अर्थ-वृषभास रवि गेला असतांना उत्पात होतील तर कान्यकुब्ज या देशांतील मुलींना फार त्रास होईल व वृश्चिक आणि मकर राशीस सूर्य गेला असतांना उत्पात होतील तर नर्मदाकिनाऱ्याला दुष्काळ पडेल. ३.

तौलिन्यर्के च दुर्भिक्षं देशभंगोऽथ पिंगले ।
धनुष्यर्के विनश्यंति देशाः कालिंजरादयः ॥४॥

अर्थः-तूळराशीस सूर्य गेला असतांना उत्पात होतील तर पिंगल देशांत दुष्काळ पडेल व राज्यनाश होईल. धनुराशीस सूर्य गेला असतांना उत्पात होतील तर कालिंजर देशाचा विनाश होईल. ४,

शुक्रस्यास्तंगते देव पूज्येतूदयमागते ।
संचरत्यवनी सूनौ वृष्टिर्मंदे त्रिधा मता ॥५॥

अर्थ-शुक्राचा अस्त गुरूचा उदय, मंगळ आणि शनि मार्गी झालेले असे तिन्ही योग असतील तर वृष्टी होईल. ५.

यदा कर्कस्य संक्रांतिरथवा मकरस्य च ।
भवत्यर्कार्कि भौमानां वारे दुःखप्रदामता ॥६॥

अर्थ—कर्कसंक्रमण किंवा मकरसंक्रमण रवि, शनि व भौम या वारीं झालें असतां तें लोकांना दुःखकारक होतें. ६.

दिवादेति यदागस्त्यस्तदा भयकरः स्मृतः ।
दुर्भिक्षं व्याधिजनको लोकानां नात्र संशयः ॥७॥

अर्थ-अगस्तीचा उदय दिवसा झाला असतां सर्व लोकांना भीति व रोगराई उत्पन्न होऊन दुष्काळ पडेल यांत संशय नाहीं. ७.

---

# अथ विवाहप्रकरणांतील वधूवरसंमेलन.

हेतुर्धर्मार्थकामानां भार्या सच्छील-शालिनी ॥
विवाहकाल-शुद्ध्या तच्छीलं तस्माद्ब्रवीमितां ॥ १ ॥

अर्थः-जी भार्या स्वधर्मानें वागेल, तिच्या सहवासानें पतीचे धर्म, अर्थ आणि काम हे तीन पुरुषार्थ सिद्ध होतात. तें भार्येचें स्वधर्मानें वागणें, विवाहाचा काल शुद्ध असल्यानें घडतें यास्तव विवाहकालाची शुद्धि सांगतों. १.

सापिंड्यगोत्रप्रवरान्वयानां शुद्धिं बुधेन प्रथमं विचिंत्य ॥
चिंत्यानि वैवाहिकसाधनानि तदन्यथात्वं यदनर्थहेतुः ॥ २ ॥

**अर्थ**–विद्वानानें विवाहाविषयीं प्रथम सापिंड्य ( पिढ्या ), गोत्र, प्रवर आणि कुळ यांची शुद्धता पाहून नंतर वैधव्ययोग इत्यादि पुढें सांगण्याचीं जीं विवाहसाधनें यांचा विचार करावा, याचें कारण सापिंड्यादिकांची शुद्धि नसेल तर त्यापासून अनर्थ प्राप्त होणार आहे. २.

## मुहूर्तचिंताप्रश्न.

जन्मस्थं च विलोक्य बाल्यविधवायोगं विधायव्रतं ।
सावित्र्या उत पैप्पलं हि सुतया दद्यादिमां वा रहः ॥
सल्लग्नेऽच्युतमूर्तिपिप्पलघटैः कृत्वा विवाहं स्फुटं ।
दद्यात्तां चिरजीविनेऽत्र न भवेद्दोषः पुनर्भूभवः ॥ ३ ॥

**अर्थ**—कन्येच्या जन्मकाळीं वैधव्यसूचक योग आहे किंवा नाहीं याचा विचार करून तो योग असल्यास कन्येकडून सावित्रीचें अथवा पीयूषधारेंत लिहिलेलें अश्वत्थाचें व्रत करावावें. नंतर ती कन्या उत्तम मुहूर्तावर दीर्घायुषी वरास द्यावी. अथवा एकांती विष्णुमूर्ति किंवा पिंपळ यद्वा कुंभ यांशीं त्या कन्येचा विवाह करून मग तिचा वर लिहिल्याप्रमाणें विवाह करावा; असें केल्यानें तिला पुनर्विवाहाचा दोष नाहीं. ३.

## ते वैधव्ययोग (स्फुट).

जन्मलग्नादष्टमस्थे क्रूरे गगनगामिनि ॥
वैधव्यमाप्नुयात्कन्येत्युक्तं बृहति जातके ॥ ४ ॥

**अर्थः**–जिच्या जन्मलग्नापासून अष्टम स्थानीं क्रूर ग्रह आहे ती कन्या वैधव्य पावत्ये असे बृहज्जातकांत सांगितलें आहे. ४.

## मुहूर्त–गणपत्यनुसारी.

तनुमृतिव्ययबंधुमदेकुजे नृमृतिदा दुहिता वधुहा पुमान् ॥
यदि गुणा बहवः सनदोषकृद्यदुभयोरशुभः स इहापि न ॥ ५ ॥

**अर्थ**––जिच्या जन्मकाळीं लग्न, अष्टम, द्वादश, चतुर्थ आणि सप्तम ह्या स्थानांत मंगळ आहे ती कन्या वराचा नाश करते. याचप्रमाणें वरास मंगळ असेल तर तो कन्येचा नाश करतो; परंतु जर घटित पाहतां उभयतांचे गुण सत्ताविसांवर येतील अथवा दोघांसही वर लिहिल्याप्रमाणें मंगळ असेल तर मंगळाचा दोष नाहीं. ५.

## मुहूर्तमार्तंड

मंदारार्कदिनेऽवुपाग्निफणिभं भद्रातिथिश्चेदिहो- ।
द्भूता सा विषकन्यकाथ तनुगौ सौम्यौ रिपुक्षेत्रगौ ॥
एकः क्रूर इहोद्भवाप्यऽथ तनौ सौरी रविः पुत्रगो ।
धर्मस्थो धरणीसुतोयमपरो योगोऽपि तज्जाविषम् ॥६॥

**अर्थः**–द्वितीया, सप्तमी आणि द्वादशी ह्या तिथीस शनि, मंगळ व रवि ह्यांचा वार असून शततारका, कृत्तिका आणि आश्लेषा ह्यांतील नक्षत्र असेल तर, ह्या योगावर झालेली कन्या विषकन्या जाणावी; किंवा तिच्या जन्मलग्नीं शुभग्रह दोन असून ते आपल्या शत्रूच्या क्षेत्रीं आहेत व तेथेंच एक पापग्रह आहे अशा योगावर उत्पन्न झालेली ही विषकन्या समजावी. २ अथवा जिच्या जन्मलग्नीं शनि, पंचम स्थानीं रवि आणि नवम स्थानीं मगळ ह्या योगावर जन्म झालेली ही विषकन्या होय. ६.

## मूलानुसारी (स्फुट).

मूलाद्यात्रिपदोद्भवस्तु जनकं पत्न्या निहंतीदृशी ।
कन्या पुंजनकं निहंति भुजगांत्यांघ्रित्रयोत्थो वरः ।
भार्याया जननीं तथाविधवधूः पत्युः प्रसूं घातयेत् ।
राधांत्यांघ्रिभवौ मिथोऽनुजननौ नारीपुमांसौ हतः ॥७॥

अर्थः--मूलनक्षत्राच्या प्रथम तीन पादांत उत्पन्न झालेला वर पत्नीच्या जनक पित्याचा नाश करितो. अशीच वधू असेल तर ती वराच्या जनक पित्याचा नाश करिते. आश्लेषा नक्षत्राच्या द्वितीय पादापासून तीन चरणावर उत्पन्न झालेला पुरुष भार्येच्या सख्ख्या मातेचा नाश करितो. तशीच वधू असल्यास ती पतीच्या सख्ख्या मातेचा नाश करिते. विशाखेच्या चतुर्थ पादांत उत्पन्न झालेली वधू किंवा वर, परस्परांच्या कनिष्ठ भगिनीचा आणि कनिष्ठ भ्रात्यांचा नाश करितात. ७.

ज्येष्ठर्क्षोत्थवरः स्त्रियाः प्रथमजौ हन्यात्सुतापुत्रका ।
वीदृग्या दुहिता निहंति पुरुषस्यैतावथेदृक्फलं ॥
ज्येष्ठांत्यांघ्रिभवत्व एव जगदुः केचित्परे तूचिरे ।
पुंसो न व्रतबंधनात्परमदोऽत्राचारमेवाश्रयेत् ॥८॥

अर्थ—ज्येष्ठानक्षत्रावर उत्पन्न झालेला वर स्त्रीची वडील बहीण आणि वडील भाऊ यांचा नाश करितो. अशीच जी कन्या ती वराचे वडील वहिणीचा व वडील भावाचा नाश करिते. कोणी असें ह्मणतात कीं, वर लिहिलेलें ज्येष्ठा नक्षत्राचें फळ, ज्येष्ठानक्षत्राच्या चतुर्थ चरणावर उत्पन्न झालेल्या वधूवरांपासूनच होतें, तेव्हां प्रथम तीन चरणांस दोष नाहीं. कोणी ऋषी असें ह्मणतात कीं, हें मूळ, आश्लेषा, विशाखा आणि ज्येष्ठा या नक्षत्रांचे वर लिहिल्याप्रमाणें वराकडून वधूपक्षाकडे व्हावयाचें जें फल तें पुरुषाचें उपनयन झाल्यावर जन्मांतर झाल्यामुळें होत नाहीं. तेव्हां या मतभेदाची व्यवस्था आचाराच्या अनुसारें करावी. ८.

कुलं च शीलं च वयश्च रूपं विद्यां च वित्तं च सनाथतां च ।
एतान् गुणान् सप्त परीक्ष्य देया कन्या बुधैः शेषमचिंतनीयम् ॥९॥

अर्थः—कुल, स्वभाव, आणि चांगली वागणूक; वय, रूप, विद्या, धन व धनिकांचा आश्रय ह्या सात गुणांची परीक्षा करून कन्या द्यावी. इतर गुणांचा विचार करणें आवश्यक नाहीं. ९.

## विवाहवृंदावन

आर्चितं वचनमुन्नतं मनो निर्विशेषसुखदं वपुर्दृशाम् ।
अस्ति चेदघपराङ्मुखी मतिर्लक्षणैः किमपरैर्नृयोषिताम् ॥१०॥

अर्थ--भाषण सुशोभित, मन उदार, रूप मनुष्यांच्या दृष्टीस संतोषकारक आणि पापभीति इतके गुण जर वर आणि वधू यांस असतील तर इतर लक्षणें पाहण्याची आवश्यकता नाहीं. १०.

## आपस्तंबसूत्रानुसारी ।

यस्मिन्पंचजने मनः सनयने संतोषमृच्छेत्तथा ।
कन्यायामपि यत्र तत्र सकला ऋद्धिर्भवेदित्यतः ॥
नान्यल्लक्षणमाद्रियेत किमपीत्याहुर्बुधाः केचने ।
त्यापस्तंबमते तु गोत्रऋषिसापिंड्याकुलानि त्यजेत् ॥ ११ ॥

अर्थ—ज्या पुरुषाची आणि ज्या कन्येची आकृति पाहिल्यानें नेत्रांस व मनास संतोष होतो तेथें सर्व सिद्धि आहे; यास्तव इतर लक्षणांचा विचार करणें नको असें कोणी ऋषी ह्मणतात. हा आपस्तंबानें सांगितलेला प्रकार केला तरी गोत्र, प्रवर, पिढ्या आणि कुलशुद्धि यांचा विचार केलाच पाहिजे. ११.

## पारिजातांत बृहस्पति.

द्विजन्मकालवत्कृत्वा शांतिं सर्वगते गुरौ ।
विवाहश्चापि कर्तव्यो गृहस्थाश्रमशोभनः ॥१२॥

अर्थ–कन्येच्या विवाहकालीं गुरु अनुकूल नसेल तर उपनयनप्रकरणीं लिहिल्याप्रमाणें शांति करून विवाह करावा ह्मणजे त्या विवाहाचे योगानें गृहस्थाश्रम उत्तम होतो. १२.

सप्ताब्दात्पंचवर्षेषु स्वोच्चस्वर्क्षगतो यदि ।
अशुभोऽपि शुभं दद्याच्छुभदर्क्षेषु किं पुनः ॥१३॥

अर्थ–सप्तम वर्षानंतर पांच वर्षेपर्यंत जर गुरु आपल्या उच्चस्थानीं किंवा स्वराशीस ह्मणजे कर्क, धनु, व मीन राशीवर असेल तर तो कन्येच्या जन्मराशीपासून अनिष्ट स्थानीं असला तरी चांगलें फल देतो. मग इष्ट स्थानीं असला तर चांगलें फल देईल हें अर्थसिद्धच आहे. १३.

सर्वत्रापि शुभं दद्याद्द्वादशाब्दात्परं गुरुः ।
पंचषष्ठाब्दयोरेव शुभगोचरता मता ॥१४॥

अर्थ—बारा वर्षानंतर कन्येचा विवाह करणें प्राप्त झाल्यास गुरु अनिष्ट स्थानीं असला तरी त्यापासून अशुभ फल होत नाहीं. कन्येचा विवाह पांचवें किंवा साहवें वर्षी करणें असेल तर मात्र गुरुबल असल्यावांचून करूंच नये. १४.

पुंसो भानुस्त्रिषष्ठाये शनिभौमौ च शोभनौ ।
अन्यत्र शांतिमेतेषां कृत्वा कर्म समारभेत् ॥१५॥

अर्थ–वराच्या विवाहकालीं त्याच्या जन्मराशीपासून ३।६ व ११ या स्थानीं रवि, शनि व मंगळ हे शुभदायक होतात. यांहून अन्य स्थानीं असल्यास त्याबद्दल शांति करून विवाहास आरंभ करावा. १५.

## मूलानुसारी.

विवाहवृंदावनकार आह नावश्यकं चंद्रबलं वरस्य ।
अयुग्मवर्षे पुरुषेण कार्यः पाणिग्रहः कश्यप इत्युवाच ॥१६॥

अर्थ—विवाहवृंदावन ग्रंथकर्ता ह्मणतो कीं, वरास चंद्रबळ अवश्य पाहिजे असें नाहीं. पुरुषानें आपला विवाह विषम वर्षी करावा असें कश्यप संहितेंत आहे. १६.

## पीयूषधारेंत वसिष्ठ.

जन्मभं जन्मधिष्ण्येन नामधिष्ण्येन नामभम् ॥
व्यत्ययेन यदा योज्यं दंपत्योर्निधनप्रदम् ॥१७॥

अर्थ—जन्मनक्षत्राशीं जन्मनक्षत्राचें आणि नामनक्षत्राशीं नामनक्षत्राचें घटीत पहावें. जर जन्मनक्षत्राशीं नामनक्षत्राचें घटीत पाहून विवाह केला तर वधुवरांस मरणदायक होतो. १७.

## पटलमार.

यद्भकूटं द्विपक्षाभ्यां सगुणं स्यात्तदुत्तमम् ।
एकेन मध्यमं हीनं केऽप्याहुस्तदभावतः ॥१८॥

अर्थ--जन्मनक्षत्र आणि नामनक्षत्र या दोहोंपासून घटक पाहिलें असतां दोहीं पक्षीं जर गुण फार येतील तर तें उत्तम. जर एकीकडे गुण फार व एकीकडे अल्प येतील तर तें मध्यम. जर दोन्ही पक्षांत थोडे गुण येतील तर तें घटित हीन असें जाणावें. १८.

## विवाहवृंदावन.

जन्मलग्नमिदमंगमंगिनां मेनिरे मन इतींदुमंदिरम् ।
सौहृदं तु मनसोर्नदेहयोर्मेलकस्तदयमिंदुगेहयोः ॥१९॥

अर्थ-जन्मलग्न हें मनुष्यांच्या शरीरासारखें आहे आणि जन्मराशि हा मनुष्यांच्या मनाप्रमाणें आहे. वधूवरांचें घटित पाहणं परस्परांच्या प्रीतिसाठींच आहे. ती प्रीति परस्परें मनाची असते, शरीरांची असत नाहीं. यास्तव घटित पाहणें तें जन्मराशीपासूनच पहावें. १९.

## मुहूर्तमाला.

वर्णो वश्यं तारायोनिर्ग्रहमित्रता च गणशुद्धिः ।
राश्योः कूटं नाडीत्यष्टावेते गुणाधिकाः क्रमशः ॥२०॥

अर्थ-वर्ण, वश्य, तारा, योनि, ग्रहमैत्री, गण, राशिकूट आणि नाडी हीं आठ कूटें क्रमानें एकोत्तर गुण आहेत. २०.

## ज्योतिर्निबंधानुसारी.

यद्वा योनेश्चतुष्कं हि पश्येच्छूद्रादिजातिषु ।
यद्वा विप्रे मैत्र्यनाड्यौ शूद्रादेर्दूरवर्णकौ ॥२१॥

अर्थ—अथवा शूद्रादि जातीमध्यें योनीपासून चार कूटेंच पहावीं. यद्वा ब्राह्मणांत ग्रहमैत्री आणि नाडी हीं दोनच पहावीं. व शूद्रादिकांत दूरकूट आणि वर्णकूट हींच दोन पहावीं. २१.

## मुहूर्तचिंतामणि.

द्विजा झषालिकर्कटास्ततो नृपा विशोंघ्रिजाः ।
वरस्य वर्णतोधिका वधूर्न शस्यते बुधैः ॥२२॥

अर्थ--मीन, वृश्चिक, आणि कर्क हे तीन राशी ब्राह्मणसंज्ञक आहेत. त्यांच्या पुढील एक एक राशि क्षत्रियसंज्ञक, त्यांच्यापुढील एक एक राशि वैश्यसंज्ञक व त्यांच्या पुढील एक एक राशि शूद्रसंज्ञक आहेत. याप्रमाणें वधूवरांच्या राशीवरून वर्णाचा विचार पाहतां वराच्या वर्णाहून वधूचा वर्ण उत्तम असेल तर तो प्रशस्त नाहीं. २२.

हित्वा मृगेंद्रं नरराशिवश्याः सर्वे तथैषां जलजाश्च भक्ष्याः ॥
सर्वेपि सिंहस्य वशे विनालिं ज्ञेयं नराणां व्यवहारतोन्यत् ॥२३॥

अर्थ--नरराशि म्हणजे मिथुन, कन्या, तुला, धनु राशींचें पूर्वार्ध आणि कुंभ यास सिंहावांचून इतर वश आहेत. तसेंच जलज म्ह० मकर राशीचें उत्तरार्ध, कर्क व मीन ये नरराशींस भक्ष्य आहेत. वृश्चिकावांचून इतर सर्व राशि सिंहास वश आहेत. तेव्हां अर्थात सिंह आणि वृश्चिक यांचें शत्रुत्व आहे. याशिवाय राशींचें मित्रत्वादिक लोकव्यवहारावरून पहावें. २३.

## मुहूर्तमाला.

तारा कूटं वरभात् कन्याभं वरभमत्र कन्याभात् ॥
गणयेन्नवभिस्तष्टे त्रिपंचसप्तोन्मितं न शुभं ॥२४॥

अर्थ–वरनक्षत्रापासून वधूचें नक्षत्र आणि वधूनक्षत्रापासून वराचें नक्षत्र अशीं दोन्ही पृथक् मोजून नवांनीं भागलीं असतां शेष अंक जर तीन किंवा पांच अथवा सात राहतील तर प्रशस्त नव्हेत त्यास ताराकूट असें ह्मणावें. २४.

## मुहूर्तचिंतामणि.

अश्विन्यंबुपयोर्हयो निगदितः स्वात्यर्कयोः कासरः ।
सिंहोवस्वजपाद्भयोः समुदितो याम्यांत्ययोः कुंजरः ॥
मेषो देवपुरोहितानलभयोः कर्णांबुनोर्वानरः ।
स्याद्वैश्वाभिजितोस्तथैव नकुलश्चांद्राब्जयोन्योरहिः ॥२५॥
ज्येष्ठा मित्रभयोः कुरंग उदितो मूलार्द्रयोःश्वा तथा ।
मार्जारो दितिसार्पयोरथमघाभाग्यर्क्षयोरुंदुरुः ॥
व्याघ्रो द्वीशभचित्रयोरपि च गौर्बुध्न्यार्यमेशर्क्षयो– ।
र्योनिः पादगयोः परस्परमहावैरं भयोन्योस्त्यजेत् ॥२६॥

अर्थ––अश्विनी आणि शततारका यांची योनि अश्व, स्वाती हस्त यांची महिष; धनिष्टा आणि पूर्वाभाद्रपदा यांची सिंह, भरणी व रेवती यांची हत्ती, पुष्य आणि कृत्तिका यांची मेंढा, श्रवण व पूर्वाषाढा यांची वानर, उत्तराषाढा अभिजित् यांची मुंगुस, मृग व रोहिणी यांची सर्प, ज्येष्ठा आणि अनुराधा यांची हरण, मूळ व आर्द्रा यांची श्वान, पुनर्वसु आणि आश्लेषा यांची मांजर, मघा व पूर्वाफा० यांची उंदीर, विशाखा, व चित्रा यांची व्याघ्र, उत्तराभाद्रपदा व उत्तरा फाल्गुनी यांची वृषभ, अशा ह्या १४ योनी आहेत. यांमध्यें अश्व महिष, सिंह हत्ती, मेंढा वानर, मुंगुस सर्प, हरण श्वान, मांजर उंदीर व्याघ्र ' वृष०, ह्या ७,युग्मांत परस्पर महा वैर आहे. यास्तव यांचा तात्पर्य करावा. २५–२६.

## पारिजातानुसारें.

एकयोन्यां शुभं विद्याद्भिन्नयोन्यां तु मध्यमम् ।
अधमं शत्रुयोन्यां स्यान्महावैरे न कर्हिचित् ॥२७॥

अर्थ–वधूवरांची योनि एक असल्यास उत्तम, भिन्न योनि असून भिन्नता किंवा उदासीनता असेल तर मध्यम, शत्रुत्व असल्यास अधम, महावैर असेल तर विवाह कधींही करूं नये. २७.

मित्राणि द्युमणेः कुजेज्यशशिनः शुक्रार्कजौ वैरिणौ ।
सौम्यश्चास्य समो विधोर्बुधरवी मित्रे न चास्य द्विषत् ।
शेषाश्चास्य समाः कुजस्य सुहृदश्चंद्रेज्यसूर्या बुधः ॥
शत्रुः शुक्रशनी समौ च शशभृत्सूनोः सिताहस्करौ ॥२८॥
मित्रे चास्य रिपुः शशी गुरुशनिक्ष्माजाः समागीष्पते-
र्मित्राण्यर्ककुजेंदवो बुधसितौ शत्रू समः सूर्यजः ॥

शुक्रस्यैनिबुधौ हितौ शशिरवी शत्रूकुजेज्यौ समौ ।
पंगोः सौम्यसितौ हितौ शशिरविक्ष्माजा द्विषोन्यः समः ॥२९॥

ह्या दोन श्लोकांचा अर्थ लिहिण्यानें विस्तार फार होतो यास्तव संक्षेपानें कोष्टक देतों.

| ० | रवि | चंद्र | मंगळ | बुध | गुरु | शुक्र | शनि |
|---|---|---|---|---|---|---|---|
| मित्र | चं. मं. गु. | बु. र. | र. चं. गु | शु. र. | र. चं. मं | श. बु. | बु. शु. |
| शत्रु | शु. श. | ० | बु. | चं. | बु. शु. | चं. र. | र. चं. मं. |
| सम | बु. | मं. गु. शु. श. | शु. श. | गु. श. मं. | श. | मं. गु. | गु. |

२८।२९.

## मुहूर्तमाला.

देवगणः श्रुतिमित्रांत्येज्यादित्याश्विहस्तमृगवाताः ।
नृगणो द्रुहिणशिवांतकपूर्वोत्तरमन्यभानि यातुगणः ॥३०॥

अर्थ-श्रवण, अनुराधा, रेवती, पुष्य, पुनर्वसु, अश्विनी, हस्त, मृग, आणि स्वाति ह्या नक्षत्रांचा देवगण आहे. रोहिणी, आर्द्रा, भरणी, तीन पूर्वा व तीन उत्तरा ह्या नऊ नक्षत्रांचा मनुष्यगण आहे. कृत्तिका, आश्लेषा मघा, चित्रा, विशाखा, ज्येष्ठा, मूळ, धनिष्ठा आणि शततारका ह्या नक्षत्रांचा राक्षसगण आहे. ३०.

प्रीतिर्गणैक्ये दंपत्योर्मध्या देवमनुष्ययोः ।
देवराक्षसयोर्वैरं मृत्युर्मानवरक्षसोः ॥३१॥

अर्थ-वधुवरांचा एक गण असल्यास परस्परांची प्रीति असते. एकाचा देवगण आणि एकाचा मनुष्यगण असेल तर प्रीति मध्यम असते, एकाचा देवगण व एकाचा राक्षसगण असल्यास परस्परांचा वैरभाव असतो. एकाचा मनुष्यगण आणि एकाचा राक्षसगण असेल तर मरणफल जाणावें. ३१.

स्त्रीराशेः पतिराशिश्चेद्द्वादशः पंचमोष्टमः ।
व्यत्ययो वा तदानैःस्व्यमप्रजस्त्वं मृतिः क्रमात् ॥३२॥

अर्थ--वधूच्या राशीपासून वराचा राशि अथवा वराच्या राशीपासून वधूचा राशि बारावा किंवा पांचवा यद्वा आठवा असेल तर निर्धनत्व, अपुत्रत्व आणि मरण हीं तीन फलें क्रमानें जाणावीं. ३२.

## ज्योतिर्निबंधांत.

मकरे कर्कटे चैव कुंभे सिंहे तथैव च ।
परस्परं सप्तमे च वैधव्यं तु विनिर्दिशेत् ॥३३॥

अर्थ-- मकर आणि कर्क हें युग्म अथवा कुंभ व सिंह हें युग्म वधूवरांचें असल्यास परस्पर समसप्तक असूनही वैधव्य प्राप्त होतें. ३३.

## ज्योतिर्निबंधांत बृहस्पति.

एकराशौ पृथक्धिष्ण्ये पृथग्राशौ तथैकभे ।
गणनाडी नृदूरत्वं ग्रहवैरं न चिंतयेत् ॥३४॥

अर्थ--जर वधूवरांचा राशि एक असून नक्षत्र निराळें असेल किंवा दोघांचें नक्षत्र एक असतां राशि वेगळे असतील तर ग्रहवैर, ग्रहशुद्धि, एकनाडी आणि नृदूर ( हीं दोन पुढें सांगण्याचीं आहेत ) ह्या चहूंचाही दोष नाहीं. ३४.

## ( त्यांतही विशेष ) पारिजातांत गर्ग.

एकराशौ द्विनक्षत्रे कृत्तिकायाम्यतारके ।
धनिष्ठाशततारे च पुष्याश्लेषे च वर्जयेत् ॥३५॥

**अर्थ**—मागें वधूवरांचा राशि एक असून नक्षत्रभेद असल्यास दोष नाहीं असें लिहिलें; परंतु तीं भिन्न नक्षत्रें भरणी, कृत्तिका, धनिष्ठा, शततारका, पुष्य आणि आश्लेषा यांहून इतर असावीं. हीं सहा असल्यास वर्ज्य करावीं. ३५.

## मुहूर्तमाला.

द्वितीयं वरनक्षत्रं वधूनक्षत्रतो यदि ।
वरस्य मरणाय स्यात्कथितं ब्रह्मयामले ॥३६॥

**अर्थः**—वधूवरांचे राशि भिन्न असोत किंवा एक असोत जर वधूच्या नक्षत्रापासून वराचें नक्षत्र दुसरें असेल तर वरास मरण प्राप्त होईल. असें ब्रह्मयामलांत सांगितलें आहे. ३६.

## पीयूषधारेंत जगन्मोहन.

एकर्क्षे चैकराशौ च विवाहस्त्वशुभः स्मृतः ।
संकोचे तु तदा कार्यो भिन्नः पादो यदा तयोः ॥३७॥

**अर्थः**—वधूवरांचा राशि एक असून नक्षत्रही एक असल्यास विवाह करणें अशुभकारक आहे. कदाचित् अन्य वधूचा किंवा अन्य वराचा लाभ नसेल तर वधूचा व वराचा नक्षत्रचरण वेगळा असल्यास विवाह करावा. ३७.

## पारिजात पीयूषधारानुसारी.

पादे भिन्नेऽप्युज्झेद्धान्येतान्याश्विनैंद्रमूलानि ।
चित्राषाढाफल्गुनियुगादितींद्वृक्षपाशिशिखिभानि ॥३८॥

**अर्थः**—वधूवरांचें नक्षत्र एक असून चरणभेद असतांही अश्विनी, ज्येष्ठा, मूळ, चित्रा, पूर्वाषाढा, उत्तराषाढा, पूर्वाफल्गुनी, पुनर्वसु, मृग, शततारका आणि कृत्तिका हीं बारा नक्षत्रें वर्ज्य करावीं. ह्मणजे याहून इतर नक्षत्र एक असून चरणभेद असेल तर विवाह करण्यास बाध नाहीं. ३८.

## ज्योतिर्निबंधांत.

भवनद्वययुक्तर्क्षे पूर्वं पुंसां शुभावहम् ॥
पश्चाद्भागे तथा स्त्रीणां व्यत्ययस्तु विनाशकृत् ॥३९॥

**अर्थ**—वधूवराचें एक नक्षत्र असून राशि दोन असल्यास व वराचा राशि पूर्वी असेल तर शुभदायक होतो; विपरीत असेल तर विनाशकारक जाणावा ३९.

ज्येष्ठार्यम्णेशनीराधिपभयुगयुगंदस्रभं चाद्यनाडी
पुष्येंदुत्वाष्ट्रमित्रांतकवसुजलभं भाग्यबुध्नये च मध्या ॥
वाय्वग्निव्यालविश्वोडुयुगयुगमथो पौष्णभं चांतिमा स्यात्-
दंपत्योरेकनाड्यां परिणयनमसन्मध्यनाड्यां तु मृत्युः॥४०॥

**अर्थः**—ज्येष्ठा, मूळ, उत्तराफल्गुनी, हस्त, आर्द्रा, पुनर्वसु, शततारका, पूर्वाभाद्रपदा, आणि आश्विनी हीं नऊ नक्षत्रें आद्यनाडींत आहेत. पुष्य, मृग, चित्रा, अनुराधा, भरणी, धनिष्ठा, पूर्वाषाढा, पूर्वाफल्गुनी, व

उत्तराभाद्रपदा हीं नऊ नक्षत्रें मध्यनाडींत आहेत. स्वाति, विशाखा, कृत्तिका, रोहिणी, आश्लेषा, मघा, उत्तराषाढा. श्रवण आणि रेवती हीं नऊ नक्षत्रें अंत्यनाडींत आहेत. ह्या तिहींतून एकीमध्यें ज्या वधूवरांचीं नक्षत्रें असतील त्यांचा विवाह करणें अशुभ आहे. मध्यनाडींत असल्यास मृत्यु प्राप्त होतो. ४०.

## मुहूर्तमाला

अकौचटतपायाः शोवर्गाः पंचमवैरिणाम् ॥
तार्क्ष्यौ तु सिंहश्वाद्याखुमृगावीनामनुक्रमात् ॥४१॥

अर्थः--अ आ इ ई उ ऊ ऋ ॠ ऌ ॡ ए ऐ ओ औ हा अवर्ग गरुडाचा, क ख ग घ ङ हा कवर्ग मांजराचा, च छ ज झ ञ हा चवर्ग सिंहाचा, ट ठ ड ढ ण हा टवर्ग श्वानाचा, त थ द ध न हा तवर्ग सर्पाचा, प फ ब भ म हा पवर्ग उंदिराचा, य र ल व हा यवर्ग हरणाचा, आणि श ष स ह हा शवर्ग मेंढ्याचा, असे हे आठ वर्ग असून त्यांत आपआपल्या पासून प्रत्येकाचें पंचमांशीं वैर आहे. ४१.

वर्गैक्ये प्रेमदंपत्योर्वैरे वैरं समे समम् ॥
प्राच्यैर्नामादिवर्णाभ्यां वर्गकूटमितीरितम् ॥४२॥

अर्थ--वधूवरांच्या व्यावहारिक नांवांचीं प्रथम अक्षरें एका वर्गांत असल्यास त्यांचें परस्पर प्रेम असतें, तीं अक्षरें वैरवर्गांत ह्मणजे परस्पर पंचमवर्गांत असलीं तर त्याचा परस्पर वैरभाव असतो. तींच अक्षरें स्ववर्ग आणि पंचमवर्ग यांहून इतरवर्गांत असतील तर त्यांचीं परस्पर ममता असते. असें हें वर्गकूट पूर्वदेशीय विद्वान लोकांनीं सांगितलें आहे. ४२.

## ज्योतिर्निबंधांत.

स्त्रीधिष्ण्याद्वरभं दूरं कन्यादूरं शुभावहम् ।
व्यस्तं नृदूरमशुभं वश्यत्वात्तदपीष्टदम् ॥४३॥

अर्थ--वधूच्या नक्षत्रापासून वराचें नक्षत्र दूर असलें ह्मणजे त्यास कन्यादूर ह्मणावें. तें शुभदायक आहे. वराच्या राशीपासून कन्येचा राशि दूर असल्यास त्याला नृदूर ह्मणावें. तें शुभदायक नाहीं. परंतु मागें वश्यकूटांत लिहिल्याप्रमाणें परस्पर वश्यता असेल तर तेंही शुभदायक होतें. ४३.

## नारद.

स्त्रीधिष्ण्यादाद्यनवके स्त्रीदूरमतिनिंदितं ।
द्वितीये मध्यमं श्रेष्ठं तृतीये नवके नृभम् ॥४४॥

अर्थ--वधूच्या नक्षत्रापासून नऊ नक्षत्रांमध्यें वराचें नक्षत्र असल्यास तें नृदूर फार वाईट. दाहाव्या नक्षत्रापासून अठराव्यापर्यंत असेल तर तें नृदूर मध्यम. एकोणिसाव्या नक्षत्रापासून पुढें असलें ह्मणजे उत्तम. ४४

## अथकूटापवादाः

## पीयूषधारेंत अत्रि.

योनैरभावे नोद्वाहः स तु कार्यो वियोगदः ।
राशिर्वश्यं च यद्यस्तिकारयेन्न तु दोषभाक् ॥४५॥

अर्थ--योनिकूटांत वैर किंवा महावैर असल्यास विवाह करूं नये. कारण स्त्रीपुरुषांचा वियोग होतो. परंतु राशिकूट आणि वश्यकूट हीं दोन उत्तम असतील तर विवाह करण्यास बाध नाहीं. ४५.

### ज्योतिर्निबंधांत

सदसद्राशिकूटेऽपि योनिवैरं न दोषकृत् ॥

यदिस्यादबलायोनेः पुंसो योनिर्बलीयसी ॥४६॥

अर्थ--राशिकूट कसेंही असलें तरी जर पुरुषाची योनि कन्येच्या योनीपेक्षां बलिष्ठ [उदा. पुरुषाची योनि व्याघ्र व स्त्रीची योनि वृषभ याप्रमाणें ] असेल तर योनिवैराचा दोष नाहीं. ४६.

योनिवैरं सदा त्याज्यं स्त्रीपुंसोर्भिन्नलिंगयोः ॥

एकलिंगजयोः प्रोक्तं मध्यमं नातिदोषदम् ॥४७॥

अर्थ--वधूवरांचीं नक्षत्रें भिन्न लिंगाची असल्यास योनिवैर वर्ज्य करावें. जर तीं नक्षत्रें एकलिंगाची असतील तर मध्यम असल्यामुळें फारसें वाईट नाहीं. ४७.

आग्नेयं मृत्युभं पूफातथोपांत्यद्वयं पृथक् ॥

मैत्राप्याभिजिदेषु स्त्रीयोनिः शेषेषु नुः स्मृता ॥४८॥

अर्थ—कृत्तिका, भरणी, पूर्वाफाल्गुनी, पूर्वाभाद्रपदा, उत्तराभाद्रपदा, मैत्र अनुराधा,रेवती, चित्रा, मृग, पूर्वाषाढा आणि अभिजित या नक्षत्रांची योनि स्त्रीलिंगी आहे. इतर नक्षत्रांची योनि पुल्लिंगी जाणावी. ४८.

### पीयूषधारेंत वसिष्ठ

राशिनाथे विरुद्धेऽपि सबलांशकाधिपौ ।

तन्मैत्र्येऽपि च कर्त्तव्यं दंपत्योः शुभमिच्छता ॥४९॥

अर्थ—वधूवरांच्या राशीचे स्वामी परस्परशत्रु असतांही जर अंशपती सबलअसून परस्परें मित्र असतील तर विवाह करणें शुभप्रद आहे. ४९.

### पारिजातानुसारी.

स्त्रीदूरं नाडिभेदश्च राशिकूटं शुभं यदि ।

राशीशमैत्र्यभावेऽपि विवाहो न हि दोषकृत् ॥५०॥

अर्थ--कन्यादूर, नाडीभेद, आणि राशीकूट उत्तम, हीं तीन असल्यास ग्रहमैत्री नसतांही विवाह करण्यास दोष नाहीं. ५०.

### पीयूषधारेंत अत्रि.

राशीशयोः सुहृद्भावे मित्रत्वे वांशनाथयोः ॥

गणादिदौष्ट्येऽप्युद्वाहः पुत्रपौत्रप्रवर्धनः ॥५१॥

अर्थ--राशिस्वामींची किंवा अंशस्वामींची परस्पर मित्रता असेल तर गणादिदोष असतांही विवाह केल्यानें पुत्रपौत्रांची वृद्धि होते. ५१

### ज्योतिर्नि० गर्ग

नोखेटमैत्र्यं नो वश्यं न वर्णो न च तारका ।

सद्भकूटे परा प्रीतिर्न सा वज्रेण भिद्यते ॥५२॥

अर्थ—राशिकूट उत्तम असेल तर ग्रहमैत्री, वश्यकूट, वर्ण आणि ताराकूट यांचा विचार आवश्यक नाहीं कारण राशिकूट उत्तम असल्यामुळें जी वधूवरांची परस्पर प्रीति असते ती इंद्राच्या वज्रानेंही छिन्न होत नाहीं.

ग्रहमैत्र्यं शुभा तारा राशिवश्यं त्रिभिः शुभम् ।

षडष्टकं बुधाः प्राहुर्द्वाभ्यां व्यर्कं त्रिकोणकं ॥५३॥

अर्थ—ग्रहमैत्री, ताराकूट शुद्धि आणि वश्यकूट शुद्धि हीं तीन असलीं म्हणजे षडष्टकाचा दोष नाहीं. त्या तिहींतून कोणतीही दोन असल्यास द्विर्द्वादश व नवपंचम यांचा दोष नाहीं. ५४.

## पीयूषधारास्थ विचारानुसारी.

यद्वा दुष्टभकूटके परिणयस्त्वैकाधिपत्ये शुभो– ।
थो राशीश्वरसौहृदेऽपि तदभावे राशिवश्येऽपि च ॥
यद्वा भागपयोर्बलित्वसखिते स्यातां तदा शोभन– ।
स्ताराशुद्धिवशेन वा भवति चेत्सर्वेषु नाडीभिदा ॥५५॥

अर्थ—वधूवरांच्या राशींचा स्वामी एक असेल अथवा राशींच्या स्वामींची परस्पर भिन्नता असेल किंवा स्वामींची भिन्नता नसून राशींची परस्पर वश्यता असेल किंवा अंशपति बलिष्ठ असून त्यांची परस्पर मैत्री असेल अथवा ताराकूट शुद्धि असेल तर षडष्टक वगैरे दुष्टराशिकूट असतांही विवाह करावा परंतु सर्वत्र नाडीभेद असलाच पाहिजे. ५५.

## ज्योतिर्निबंधस्थ नारद–मुहूर्तगणपत्यनुसारी.

यद्वा नृराशिर्विषमो भवेच्चेत्स्वषष्ठयुक्तः स शुभः प्रदिष्टः ।
वध्वा यदि स्यात्समसंख्यराशिः शुभः स्वषष्ठेन युतः स्मृतोऽसौ ॥५६॥

अर्थ—अथवा वराचा राशि विषम ( मेष मिथुन इत्यादिक ) असल तर तो आपल्यापासून सहावा जो वधूचा राशि त्याशीं युक्त असल्यास शुभप्रद आहे. किंवा वधूचा राशि सम ( वृषभ कर्क इत्यादिक ) असल्यास तो आपल्यापासून सहावा जो वराचा राशि त्याशीं युक्त असला म्हणजे शुभप्रद होतो. ५६.

## ज्योतिर्निबंधांत संहितादीपकः

यदा तु कन्याभवनं द्वितीयं षट्पंचमं स्यात् पुरुषस्य राशेः ।
तद्राशिनाथौ सुहृदौ समौ वा सुहृत्समौ वा तदतीव शस्तम् ॥५७॥

अर्थ—ज्या घटितांत वराच्या राशीपासून कन्येचा राशि. द्वितीय किंवा षष्ठ अथवा पंचम असेल तेथें त्या दोन्ही राशींचे स्वामी परस्पर मित्र किंवा सम किंवा एक मित्र आणि दुसरा सम असे असतील तर तें कूट प्रशस्त होतें. ५७.

मेशारिभावे गणवृत्त्यभावे नाडीसमाजेऽपि कृतो विवाहः ।
भवेत्सुतप्रीतिसुखायुराप्त्यै सद्राशिकूटे जगुरेवमन्ये ॥५८॥

अर्थ—वधूवरांच्या राशिपतींचें परस्पर शत्रुत्व, गणांचा दोष, आणि एक नाडी हीं तीन असतांही जर राशिकूट उत्तम असेल तर विवाह केला असतां त्यापासून पुत्र, परस्परांची प्रीति, सुख आणि दीर्घ आयुष्य हीं प्राप्त होतात. असें कोणी ऋषि म्हणतात. ५८.

## वैद्यनाथ.

द्विषष्ठाभ्यां समो राशिर्विषमोऽष्टव्ययान्वितः ।
शुभोविलोमतो नेष्टः सिंहोपीष्टोऽबलान्वितः ॥५९॥

अर्थः—समराशि आपल्यापासून द्वितीय किंवा षष्ठ ह्या राशींनीं युक्त असेल किंवा विषम राशि आपल्यापासून आठवा अथवा बारावा ह्या राशींनीं युक्त असेल तर प्रशस्त आहे. विपरीत असल्यास प्रशस्त नाहीं. तथापि सिंहराशि कन्याराशीसहित असल्यास प्रशस्त आहे. ५९.

### शार्ङ्गधर.

मीनालिभ्यां युते कीटे कुंभे मिथुनसंयुते ॥
मकरे कन्यकायुक्ते न कुर्यान्नवपंचकं ॥६०॥

**अर्थ**—मागें लिहिलेला अपवाद असला तरी मीन, वृश्चिक आणि कर्क यांच्या योगानें आलेलें कुंभ व मिथुन यांचें, मकर आणि कन्या यांचें, नवपंचक वर्ज करावें ६०.

### पीयूषधारेंत सर्गोदय.

आद्यांशेन चतुर्थांशं चतुर्थांशन चादिमम्
द्वितीयेन तृतीयं तु तृतीयेन द्वितीयकम् ॥६१॥
एवं भांशव्यधो येषां जायते वरकन्ययोः ॥
तेषां मृत्युर्न संदेहः शेषांशाः स्वल्पदोषदाः ॥६२॥

**अर्थः**—वधूवरांचीं नक्षत्रें एका नाडींत असून एकाचा प्रथम चरण आणि एकाचा चतुर्थ चरण असेल किंवा एकाचा द्वितीय चरण व एकाचा तृतीय चरण असेल तर मरण प्राप्त होतें यांत संदेह नाहीं. याहून विपरीत चरण असल्यास अल्पदोष आहे. ६१–६२

पर्याये प्रथमासन्ना द्वितीये पार्श्वमेव च ।
तृतीये तु व्यवहिता चतुर्थे तु शुभावहा ॥६३॥

**अर्थः**—वधूवरांचीं नक्षत्रें मध्यनाडींत असलीं तर मरण होतें. पार्श्वनाडींत असतील तर हा दोष नाहीं. मध्यनाडीमध्येंही दोघांचीं नक्षत्रें जवळ असलीं तरच मरण होतें. दूर असल्यास विवाह केला असतां दोष नाहीं. त्यांतही विशेष असा कीं, दोघांच्या नक्षत्रांत व्यवधान नसेल तर मरणफळ आहे. वास्तव उपयोग नाहींच. दुसरें नक्षत्र दुसऱ्या पर्यायांत असल्यास कनिष्ठ आहे. तिसऱ्या पर्यायांत असतां मध्यम. चवथ्या आणि पांचव्यां पर्यायांत असेल तर शुभदायक जाणावें. ६३.

### ज्योतिर्निबंधांत ज्योतिःप्रकाश.

करग्रहे पृष्ठनाड्यौ न निंद्ये इति यद्वचः ।
तत्क्षत्रियादि विषयं गौतम्यायाम्यतस्तथा ॥६४॥

**अर्थ**—पार्श्वनाडी एक असली तर विवाहास दोष नाहीं असें जें वाक्य तें क्षत्रियादिकांस ग्राह्य आहे. वास्तव ब्राह्मणांस कोणतीही एकनाडी वर्ज केली पाहिजे. हा प्रकार गोदावरी नदीचे उत्तरभागीं जाणावा. तिच्या दक्षिणभागीं तर ब्राह्मणादिक सर्वांनींही पार्श्वनाडी घेतली तरी सवड आहे. ६४.

### ज्योतिर्निबंधानुरागी.

रोहिण्यार्द्रामृगेंद्राग्निपुष्यश्रवणपौष्णभे ॥
आहिर्बुध्न्ये च नो नाडीदोषः संकीर्णजातिषु ॥६५॥

**अर्थः**—रोहिणी, आर्द्रा, मृग, ज्येष्ठा, कृत्तिका, पुष्य, श्रवण, रेवती आणि उत्तराभाद्रपदा ह्या नक्षत्रांस एकनाडीचा दोष नाहीं, अशी सवड संकीर्ण जातीस आहे. ६५.

### बुधवल्लभः

न वर्गवर्णौ न गणो न योनिर्द्विर्द्वादशे चैव षडष्टकेऽपि ।
वैरे च दूरे नवपंचमे च मैत्री यदिस्याच्छुभदो विवाहः ॥६६॥

अर्थ—वर्ग, वर्ण, गण आणि योनि यांची शुद्धि नसून द्विर्द्वादशक, षडष्टक, नवपंचम व नृद्दूर हे दोष असतांही जर ग्रहमैत्री असेल तर विवाह करणें प्रशस्त. ६६.

## पीयूषधारेंत विवाहपटल.

नभोगारिभावं हरेत्सद्भकूटं तथा खेटमैत्रीविरुद्धं भकूटं ।
सदा नाशयत्येकनाडीसमाजो भकूटादिकान् सप्तभेदांश्च ते ताम् ॥६७॥

अर्थ—राशिकूट उत्तम असेल तर ग्रहवैराचा दोष नाहीं. राशिस्वामींची परस्पर मैत्री असल्यास षडष्टक वगैरे दुष्ट राशिकूटाचा दोष नाहीं. नाडीशुद्धि असेल तर इतर कूटें वाईट असल्याचा दोष नाहीं. कदाचित् इतर सर्व कूटें शुद्ध असतील तर एकनाडीचाही दोष जातो. ६७.

## मागें लिहिलेलीं कूटें अपवादाशिवाय शुद्ध असतील तर त्यांचे गुणांचा विचार.

## मुहूर्तमार्तंड.

भूर्वर्णैक्यवरोत्तमेथ वशभक्ष्येर्धं द्वयं मित्रयोः ।
खं वैराशनके धरारिवशकेऽथो सद्भयोरभ्रयः ॥
मिश्रं तच्छकलं त्वथातिसुहृदोर्वेदास्त्रयो मित्रयो- ।
रेकः स्याद्द्विषतोः स्वभावगुणयोर्द्वौ खं महावैरिणोः ॥६८॥

अर्थः--वधूवरांचा वर्ण एक किंवा वराचा वर्ण वधूपेक्षां उत्तम असल्यास एक गुण जाणावा. १ वश्यकूटामध्यें मिथुन, कन्या, तुला, धनूचें पूर्वार्ध आणि कुंभ ह्या नरराशीस कर्क व मीन हे दोन वश असून भक्ष्य आहेत यास्तव अर्धा गुण धरावा. दोघांचेही राशि एक जातीचे किंवा एक नरराशि आणि इतर मेष, वृषभ, धनु राशीचें उत्तरार्ध व मकराचें पूर्वार्ध ह्या चतुष्पदांतील असल्यास परस्पर मित्रता आहे, ह्मणून २ गुण घ्यावे. परंतु त्यांतही ब्राह्मणाहून इतर जातीला चतुष्पाद हे वश असून भक्ष्य आहेत. यास्तव पूर्वी लिहिल्याप्रमाणें अर्धाच गुण समजावा. तेव्हां वर लिहिलेले दोन गुण ब्राह्मणजातींत मात्र घ्यावे, असें सिद्ध झालें. नरराशीस मकराचें उत्तरार्ध वैरी असून भक्ष्य आहे यास्तव गुणाचें शून्य जाणावें. वृश्चिक हा नरराशीचा शत्रू असून त्यास वशही आहे ह्मणून एक गुण धरावा. सिंहास नरराशी वैरी असून भक्ष्य आहे यास्तव गुणाचें शून्य समजावें. सिंह आणि वृश्चिक यांचें नित्य वैर आहे. कारण सिंहास वृश्चिकाचा दंश झाल्यास सिंह मरतो. अशी प्रसिद्धि आहे. ह्मणून येथेंही गुणाचें शून्यच धरावें. वृश्चिक व नरराशि यांहून इतर सर्व राशि सिंहास वश्य असून भक्ष्य आहेत यास्तव अर्धा गुण घ्यावा. २ ताराकूटामध्यें दोघांचीं नक्षत्रें शुभ असल्यास तीन गुण धरावे आणि एकीकडून शुभ व एकीकडून अशुभ असेल तर दोड गुण घ्यावा. ३ योनिकूटामध्यें वधूवरांच्या नक्षत्रांची योनि एक असून महिष, अश्व, उंदीर, मेष, वानर, मृग, गौ, मुंगुस आणि सर्प ह्या नवांतील असल्यास त्यांची अतिमित्रता असते यास्तव ४ गुण जाणावे. श्वान आणि मेष यांची व गौ आणि महिष यांची परस्परमैत्री आहे, ह्मणून तीन गुण धरावे. सिंह व हस्ती, उंदीर आणि मांजर, श्वान व मृग, गौ आणि व्याघ्र, मुंगुस व सर्प ह्या पांच युग्मांतील दर एक युग्मांत परस्पराचें महावैर आहे यास्तव गुणाचें शून्य समजावें. सर्प उंदीर आणि मुंगुस यांहून इतरांशीं व्याघ्राचें व सिंहाचें वैर आहे. तसेंच सर्प आणि मांजर, उंदीर व सर्प ह्या दर एक युग्मांत परस्पराचें वैर आहे ह्मणून एक गुण घ्यावा. वर लिहिलेल्या उदाहरणांवरून इतर उदाहरणांत उदासीनपणा असल्यामुळें दोन गुण धरावे. ६८.

ऐकेशोभयमैत्र्ययोः शरमिता अर्धं समारातिके ।
चत्वारः सममित्रके रिपुहिते भूमिर्द्विसाम्ये त्रयः ॥

ना देवो मनुजा वधूरिह रसास्तद्वैपरीत्ये शराः ।
षट्साम्येऽसपापुरुषः सुरवधूस्त्रैकोन्यऽत्र खम् ॥८२॥

**अर्थ**–ग्रहमैत्रीकूटामध्यें, वधूवरांच्या राशींचा स्वामी एक किंवा परस्पर मित्र असल्यास पांच गुण घ्यावे. एक सम आणि दुसरा शत्रु असेल तर ।॥ अर्धा गुण धरावा. एक सम व इतर मित्र असल्यास चार गुण जाणावेत. एक शत्रु आणि दुसरा मित्र असेल तर एक गुण समजावा. दोघे परस्पर सम असल्यास तीन गुण घ्यावे. गणकूटामध्यें वराचा देवगण आणि वधूचा मनुष्यगण असला तर ६ गुण धरावे. वराचा मनुष्यगण असून वधूचा देवगण असल्यास ५ गुण समजावे. वधूवरांचा गण एक असेल तर ६ गुण जाणावे. वराचा राक्षसगण असून वधूचा देवगण असल्यास एक गुण घ्यावा. याहून इतर उदाहरणांत गुणांचें शून्य समजावें. ६९.

दुष्कूटे यदि योनिमैत्र्यमबलादूरं तदा भाधयो ।
नोचेत्खं त्वनयोर्यदैकमिह भूर्भांघ्र्यैक्यके खं गुणः ॥
सत्कूटे वरदूरता भरिपुता षट् भिन्नराश्येकभे ।
पंचान्यत्र सुकूटके च गिरयोऽथो नाडिभेदे गजाः ॥७०॥

**अर्थ** —राशिकूट चांगलें नसून जर योनींचा मित्रता आणि स्त्रीदूर हीं दोन असल्यास ४ गुण धरावे. हीं दोन्ही नसतील तर गुणांचें शून्य जाणावें. दोहोंतून एक असल्यास १ गुण घ्यावा. वधूवराचें नक्षत्र एक असून चरणही एक असेल तर गुणाचें शून्य समजावें. राशिकूट चांगलें असतांही नृदूर आणि योनि वैर असल्यास ६ गुण धरावे. वधूवरांचे राशि वेगळे असून नक्षत्र एक असेल तर ५ गुण घ्यावे. वर लिहिलेल्या दोषाशिवाय चांगलें राशिकूट असेल तर ७ गुण जाणावे. ७ नाडीचा भेद असला म्हणजे ८ गुण धरावे. ७०.

## मुहूर्तमाला.

इत्थं मिथः स्याद्घटितार्थचिंतने निंद्यो गुणैः षोडशभिः परिग्रहः ॥
मध्यो नखैः स्वामिमितैस्तथोत्तमस्ततोऽधिकैश्चेत्पुनरुत्तमोत्तमः ॥७१॥

**अर्थ**–वर लिहिल्याप्रमाणें घटिताचा विचार केला असतां जर सोळा गुण उतरतील तर तो संबंध कनिष्ठ वीस गुण आल्यास मध्यम, तीस गुण येतील तर तो उत्तम आणि त्याहून अधिक गुण आले असतां उत्तमोत्तम असें जाणावें. ७१.

## मुहूर्तकल्पद्रुम

अविदितं रमणीवरयोर्भवेद्भमभिधागृहतस्तु भमेलकः ॥
विदितमेकतरस्य भमेतयोर्गुरुबलादिततोऽभिधया युतिः ॥७२॥

**अर्थः**–ज्या वधूवरांचें जन्मनक्षत्र ठाऊक नाहीं त्यांच्या चालत्या नांवावरून अवकडहचक्रानें जीं नक्षत्रें येतील त्यावरूनच वर लिहिल्याप्रमाणें घटित पहावें. दोघांतून एकाचें नक्षत्र ठाऊक असल्यास त्या नक्षत्राप्रमाणें गुरु, रवि, आणि चंद्र यांचीं बळें पाहून नांवाच्या राशींशीं घटित पहावें. ७२.

## नांवावरून राशि पाहण्याचा प्रकार.

## मुहूर्तमार्तंड.

भंनामादिमवर्णतोऽवकहडाद्युज्यादिवर्णाद्ववौ ।
तुल्याचत्रशसौखषौ यदभिधाबह्वोस्य नामांतिमं ॥

देशग्रामगृहज्वरव्यवहृतिद्यूतेषु दाने मनौ ।
सेवाकाकिणि वर्गसंगरपुनर्भूमेलके नामभं ॥ ७३ ॥

अर्थः-नक्षत्रप्रकरणांत लिहिलेल्या अवकहडचक्राच्या अनुसारें नांवाच्या प्रथम वर्णापासून नक्षत्र पहावें ज्या प्रद्युम्नादि नांवाच्या आरंभीं संयुक्त व्यंजनें असतील तेथें प्रथम व्यंजनावरून नक्षत्राचा निर्णय करावा. त्या चक्रामध्यें बकार आणि वकार, शकार आणि सकार, खकार आणि षकार, हे तुल्य समजावे. ह्मणजे ह्या तीन युग्मांतील जे दोनदोन वर्ण आहेत त्यांनीं परस्परांचें ग्रहण होतें तें असें कीं त्यास बकाराचा पाठ नसतां ही वकार पठित आहे त्यानेंच बाळकृष्ण ह्या नांवाचे रोहिणी नक्षत्र आहे असें जाणावें. ज्या मनुष्यास अनेक नांवें असतील त्यांत जें शेवटचें नांव असेल त्यावरून नक्षत्रादिकांचा निर्णय करावा. देश, ग्राम, गृह, ज्वर, व्यवहार, द्यूत ( जुवा ), दान, मंत्र, सेवा, काकिणी ( वास्तुप्रकरणांत सांगणें आहे ), वर्गकूट, संग्राम, आणि पुनर्भूविवाह इतक्या कार्यांविषयीं नामनक्षत्रच घ्यावें. ७३.

## ज्योतिर्निबंधांत विवाहपटल.

आजौ जिता संधिलब्धा प्रीत्या दत्ता तथाऽध्वरे ।
स्वयमेवागता कन्या नैवस्तः शुद्धिमेलकौ ॥७४॥

अर्थ--युद्धांत जिंकलेली, विरोध मोडतांना दिलेली, प्रीतीनें दिलेली, यज्ञामध्यें दक्षिणाकालीं दिलेली आणि स्वयंवरांत आलेली ह्या पाचांतील कन्येशीं विवाह करणें असल्यास कुलशुद्धि व घटित पाहण्याची गरज नाहीं. ७४.

आसुरादिविवाहेषु राशिकूटं न चिंतयेत् ।
तथा व्यंगातिवृद्धानां दुर्भगानां पुनर्भुवां ॥७५॥

अर्थः—आसुर ( मुलीच्या बापास यथेच्छ द्रव्य देऊन करतात तो ) गांधर्व ( वधूवरांच्या परस्पर संतोषानें होतो तो ) ह्या विवाहांस आणि आंधळा, बहिरा, थोटा, पांगळा इत्यादि दोषयुक्त, अतिवृद्ध, कुरूप आणि पुनर्विवाह करणारी स्त्री यांच्या विवाहास घटित पाहणें नको. ७५.

## अथ जन्ममासादि निषेधः ।

## मूलानुसारी.

जन्मभतिथिमासेषु प्रथमजयोः पुत्रकन्ययोर्न चरेत् ।
सकलं मंगलकार्यं विवाहमेव त्यजेदिति तु कश्चित् ॥७६॥

अर्थः—जन्मकाळाचें नक्षत्र, तिथि आणि मास यांमध्यें प्रथम उत्पन्न झालेला पुत्र किंवा कन्या यांचें कोणतेंही मंगल कार्य करूं नये. कोणी एक ऋषि ह्मणतो कीं, जन्मनक्षत्रादिकांत विवाह मात्र करूं नये; इतर मंगल कार्यास दोष नाहीं. ७६.

## कालतत्त्वविवेचनांत वृद्ध गार्ग्य.

आरभ्य जन्मदिवसं यावत्त्रिंशद्दिनं भवेत् ।
जन्ममासः स विज्ञेयः सर्वकर्मसु गर्हितः ॥ ७७॥

अर्थः-जन्मकाळची तिथि किंवा वार अथवा संक्रांतीतील सूर्याचा अंश यांपासून तीसपर्यंत जो तिथींचा किंवा वारांचा अथवा सूर्याच्या अंशाचा समुदाय त्याला जन्ममास असें ह्मणावें. हा सर्व कर्मास निंद्य आहे. ७७.

### जन्ममासादिक घेण्यास सवड.
### निर्णयसिंधूमध्यें राजमार्तंड.

जन्ममासे तिथौ भे च विपरीतदले सति ।
कार्यंमंगलमित्याहुर्गर्गभार्गवशौनकाः ॥७८॥

अर्थः—जन्ममास, जन्मतिथि आणि जन्मनक्षत्र यांचे अर्ध विपरीत झाले असतां ह्मणजे पूर्वार्धांत जन्म असल्यास उत्तरार्धांत व उत्तरार्धांत जन्म असेल तर पूर्वार्धांत मंगल कार्य करावें असें गर्ग, भार्गव आणि शौनक ह्मणतात. ७८.

---

## अथ गोचरप्रकरणम् ॥

### मुहूर्तमाला.

गौरादित्यस्तस्य चारश्चंद्रादेरुपलक्षणात् ।
तत्फलं गोचरफलं ग्रहा यच्छन्ति जन्मभात् ॥१॥

अर्थ–गो ह्मणजे आदित्य त्याचा चर ह्मणजे संचार त्याला गोचर असें नांव आहे. ह्या पदानें चंद्रादि ग्रहांचें उपलक्षण केल्यामुळें गोचर शब्दानें नवग्रहांच्या संचाराचें ग्रहण होतें, त्याचें जें फल तें गोचर फल असें जाणावें. ज्याच्या जन्मराशीपासून ज्या ज्या स्थानीं ग्रह असतात त्या त्या प्रमाणें ते गोचर फल त्यास त्यास देतात. १.

सूर्यःस्थानविनाशं भयं श्रियं मानहानिमथ दैन्यं ।
विजयं मार्गं पीडां सुकृतहतिं सिद्धिमायमथ हानिं ॥२॥

अर्थ—सूर्य जन्मराशीपासून द्वादशस्थानांत असतां, जन्मस्थानापासून क्रमानें फलें देतो तीं अशीं कीं, स्थाननाश १, भय २, संपत्ति ३, मानहानि ४, दारिद्र्य ५, विजय ६, प्रवास ७, पीडा ८, पुण्यहानि ९, कार्यसिद्धी १०, लाभ ११, हानि १२. २.

चन्द्रोऽन्नमधनं सौख्यं रोगं कार्यक्षतिं श्रियं ॥
स्त्र्युक्थे मृत्युं नृपभयं सुखमायं व्ययं क्रमात् ॥३॥

अर्थः–चंद्र जन्मराशीपासून क्रमानें फलें देतो ती– अन्न १, दारिद्र्य २, सौख्य ३, रोग ४, कार्यनाश ५, संपत्ति ६, स्त्री आणि धन ७; अपमृत्यु ८, राजभय ९, सुख १०, लाभ ११, व्यय १२. ३.

भौमोऽरिभीतिं धननाशमर्थं भयं तथार्थक्षतिमर्थलाभं ।
धनात्ययं शत्रुभयं च पीडां शोकं धनं हानिमनुक्रमेण ॥४॥

अर्थ—मंगळ जन्मराशीपासून क्रमानें फलें देतो तीं– शत्रुभीति १, धननाश २, धनप्राप्ति ३, भय ४, धननाश ५ धनलाभ ६, धननाश किंवा रोग ७, शत्रुभय ८, पीडा ९, शोक १०, धनलाभ ११, हानि १२. ४.

बुधस्तु वंधं धनमन्यभीतिं धनं रुजं स्थानमथास्य पीडां ।
अर्थं रुजं सौख्यमथार्थलाभमर्थक्षतिं जन्मगृहात्करोति ॥५॥

अर्थः--बुध जन्मराशीपासून क्रमानें फळें देतो तीं— बंध किंवा भय १, धनलाभ २, अन्यापासून भय ३ धनलाभ ४ रोग ५ स्थानलाभ ६, पीडा ७, धन ८, रोग ९, सुख १०, धनलाभ ११, धननाश १२. ५.

गुरुर्भयं धनं क्लेशं धननाशं सुखं शुचं ।
मानं रोगं सुखं दैन्यं लाभं पीडां च जन्मभात् ॥६॥

अर्थ—गुरु, जन्मराशीपासून क्रमानें फळें देता तीं भय १, धन २, क्लेश ३, धननाश ४, सुख ५, शोक किंवा रोग ६, मान ७, महारोग किंवा धननाश ८. सुख किंवा धनवृद्धि ९, दारिद्र्य १०, लाभ ११, पीडा १२. ६.

कविः शत्रुनाशं धनं सौख्यमर्थं सुताप्तिं रिपोः साध्वसं शोकमर्थं ।
बृहद्वस्त्रलाभं विपत्तिं धनाप्तिं धनाप्तिं तनोत्यात्मनो जन्मराशेः ॥७॥

अर्थ--शुक्र, जन्मराशीपासून क्रमानें फळें देतो तीं, शत्रुनाश १, धन २, सौख्य ३, धन ४, पुत्रप्राप्ति ५, शत्रुभय ६, शोक ७, धन ८, महावस्त्रलाभ ९, विपत्ति १०, धनलाभ ११, धनलाभ १२. ७.

सर्वनाशं शनिर्वित्तनाशं धनं शत्रुवृद्धिं सुतार्थक्षतिं च श्रियं ।
दोषसंघं रुजं द्रव्यनाशं तथा दौर्मनस्यं धनं वव्हनर्थं क्रमात् ॥८॥

अर्थः--शनि, जन्मराशीपासून क्रमानें फळें देतो तीं, सर्वनाश किंवा वित्तभ्रंश अथवा रोग १, धननाश २ धन ३, शत्रुवृद्धि ४, पुत्र, धन आणि पोष्यवर्ग यांचा नाश ५, संपत्ति ६, दूषण ७, रोग ८, द्रव्यनाश किंवा धर्मनाश ९, मनाचें अस्वस्थता १०, धन ११. अनेक प्रकारचे अनर्थ १२. ८.

राहुर्हानिं तथा नैःस्व्यं धनं वैरं शुचं श्रियं ॥
कलिं व्यसुं च दुरितं वैरं सौख्यं शुचं क्रमात् ॥९॥

अर्थ-राहु जन्मराशीपासून क्रमानें फळें देतो तीं, हानि १, दरिद्रता २, धन ३, वैर ४, शोक ५, संपत्ति ६, कलह ७, अपमृत्यु ८, पाप ९, वैर १०, सौख्य ११, शोक १२. ९.

केतुः क्रमाद्रुजं वैरं सुखं भीतिं शुचं धनं ॥
गतिं गदं दुष्कृतं च शोकं कीर्तिं च शत्रुतां ॥१०॥

अर्थः-केतु जन्मराशीपासून क्रमानें फळें देतो तीं, रोग १, वैर २, सुख ३, भय ४, शोक ५, धन ६, प्रवास ७, रोग ८, पाप ९, शोक १०, कीर्ति ११, शत्रुता १२. १०.

## ह्या फळांतील शुभफळांचा संक्षेप.

### मुहूर्तकल्पद्रुम

सर्वे लाभे त्र्यंगखे भानुरिंदुः सास्ताद्येज्ञो रिष्फहीने समेसः ॥
इज्यः कोणद्व्यस्तगोऽस्तारिखोने शुक्रस्त्र्यंगेभौममंदत्रयंसत् ॥११॥

अर्थः-सर्व ग्रह एकादशस्थानीं तृतीय, षष्ठ आणि दशम ह्या तीन स्थानीं रवि रवीचीं तीन, सप्तम व प्रथम ह्या पांच स्थानीं चंद्र, द्वितीय, चतुर्थ, षष्ठ, अष्टम, आणि दशम या पांच स्थानीं बुध, नवम, पंचम, द्वितीय व सप्तम ह्या चार स्थानीं गुरु; सप्तम, षष्ठ, आणि दशम हीं तीन स्थानें वर्ज्य करून इतर स्थानीं शुक्र, तृतीय व षष्ठ ह्या दोन स्थानीं मंगळ, शनि, राहु आणि केतु हे सर्व शुभ फळें देतात. ११.

### पीयूषधारेंत कमलासन.

ऋक्षसंधिगता ये च राशिसंधिगता ग्रहाः ।
एप्यराशेः फलं दद्युर्वक्री तद्विपरीतगं ॥१२॥

**अर्थः**—नक्षत्राच्या किंवा राशीच्या संधींत जे ग्रह असतात ते पुढील राशींचें फळ देतात. वक्री ग्रह तसा असल्यास तो पूर्वराशीचें फळ देतो. १२.

## मुहूर्तमाला.

पंचाष्टसप्ताद्रिदिनानि भानुमद्बौ नज्ञशुक्रा घटिका त्रयं शशी ।
मासे च सार्धैकरसत्रिभिः फलं प्रागम्य राशेर्गुरुसौरिराहवः ॥१३॥

**अर्थ**—पूर्व राशीस असलेला ग्रह राशीचें फळ, कांहीं काळापासून देतो तो काळ येणेंप्रमाणें, रवि ५ दिवस, मंगळ ८ दिवस, बुध ७ दिवस, शुक्र ७ दिवस, चंद्र ३ घटका, गुरु दीडमास, शनि साडेसहा मास, राहू साडेतीन मास. १३.

प्रवेशे कुजार्कौ कवीज्यौ तु मध्ये तथा निर्गमे मंदचंद्रौ सदाज्ञः ।
फलं गोचरोत्थं प्रयच्छन्ति पूर्णं ततस्तत्र ते पूजनीयाः प्रयत्नात् ॥१४॥

**अर्थ**-मंगळ आणि रवि स्थानाचें फळ प्रवेशकाळीं पूर्ण देतात; शुक्र व गुरु, मध्यमकाळीं पूर्ण देतात; शनि आणि चंद्र हे शेवटीं पूर्ण फल देतात; व बुध सर्वकाळ पूर्ण फल देतो. यास्तव त्या त्या काळीं प्रयत्नानें त्यांचें पूजन करावें. १४.

## मुहूर्ततत्वाच्या टीकेंत नारद.

गोचरं वेधजं चाष्टवर्गजं रूपजं बल ।
यथोत्तरं बलाधिक्यं स्थूलं गोचरमार्गजं ॥१५॥

**अर्थ**—जन्मराशीपासून ज्या स्थानीं ग्रह असेल त्या स्थानाचें बळ प्रथम १ पुढें वेध सांगणें आहे त्यावरून जें बळ तें द्वितीय २ जातकशास्त्रांत अष्टवर्ग पाहणें सांगितलें आहे त्यावरून बळ पहाणें तृतीय ३ उच्च, मूल त्रिकोण इत्यादि स्थानाचें बळ चतुर्थ ४ असें चार प्रकारचें बळ आहे, त्यांत पूर्वपूर्वापेक्षां उत्तरोत्तर अधिक जाणावें. केवळ स्थानाचें बळ जें प्रथम सांगितलें आहे, तें स्थूल आहे. यास्तव वेधादिकांचा विचार अवश्य करावा.

## उच्चादि बळ पाहण्याचा प्रकार.

## रघुवंशटीकेंत राजमृगांक.

स्वोच्चे पूर्णं स्वर्क्षकेऽर्धं सुहृद्भे पादं द्विड्भेऽल्पं शुभं खेचरेंद्रः ।
नीचस्थायी वाऽस्तगो वा न किंचित्पादन्यूनं स्वत्रिकोणे ददाति ॥१६॥

**अर्थ**—जो ग्रह शुभ फळ देणारा तो, उच्च राशीस असला तर पूर्ण फळ देतो १, स्वगृहीं असल्यास अर्ध २, मित्रगृहीं असल्यास चतुर्थांश ३, शत्रुगृहीं असतां चतुर्थांशापेक्षांही न्यून ४, नीचराशीस किंवा अस्तंगत असेल तर शून्य ५, स्वकीय त्रिकोणीं असल्यास तीन चरण फळ देतो. १६.

## वेध पाहण्याचा प्रकार—रत्नमाला.

लाभविक्रमखशत्रुषु स्थितः शोभनो निगदितो दिवाकरः ।
खेचरैः सुततपोजलांत्यगैर्व्यर्कभिर्यदि न विध्यते तदा ॥१७॥

**अर्थः**—११।३।१०।६ ह्या चार स्थानीं रवि असल्यास शुभप्रद होतो परंतु अनुक्रमानें ५।९।४।१२ ह्या चार स्थानीं असलेल्या ग्रहांनें विद्ध नसेल तर शुभ होतो त्यांतही शनीनें विद्ध होत नाहीं.

सूनजन्मरिपुलाभखत्रिगश्चंद्रमाः शुभफलप्रदस्तदा ।
स्वात्मजांत्यमृतिबंधुधर्मगैर्विध्यते न विबुधैर्यदि ग्रहैः ॥१८॥

### आश्वलायन.

तस्माद्दातुमशक्तो यो दक्षिणां चान्नमेव वा ॥
जपैः प्रणामैः स्तोत्रैश्च तर्पणैस्तोषयेद्ग्रहान् ॥३८॥

अर्थ-ग्रहयज्ञाची यथोक्त दक्षिणा देण्यास आणि ब्राह्मणभोजन करण्यास जो अशक्त असेल त्यानें ग्रहमंत्रांच्या जपांनीं किंवा नमस्कारांनीं अथवा स्तोत्रपाठांनीं यद्वा तर्पणांनीं ग्रहांचा संतोष करावा. ३८.

### मूलानुसारी स्फु०

जप्या अशक्तैर्मनवो ग्रहाणां मिताः स्वसंख्याप्रमितैः सहस्रैः ॥
सप्तेश्वराशाब्ध्यतिधृत्यथाष्टिस्त्रचक्षीणि धृत्यब्दमिनात्तु संख्या ॥३९॥

अर्थ-ज्या ग्रहाची जी संख्या आहे त्या संख्येप्रमाणें जी सहस्रसंख्या तितके तितके सहस्र त्या त्या ग्रहाच्या मंत्राचा जप अशक्तानें करावा. ती सूर्यादिकांची संख्या येणें प्रमाणें ७।११।१०।४।१९।१६।२३।१८।१७. ३९.

### ज्योतिर्निबंधांत कश्यप.

जन्मसंपद्विपत्क्षेमप्रत्यरिः साधिकावधः ॥
मैत्राऽतिमैत्रास्तारास्त्रिर्जन्मभान्नामवत्फलाः ॥४०॥

अर्थ—जन्म १, संपत् २, विपत् ३, क्षेम ४, प्रत्यरी ५, साधिका ६, वध ७, मैत्र ८, अतिमैत्र ९, अशा नांवाच्या ९ तारा जन्मनक्षत्रापासून क्रमानें असतात. ह्या नांवाच्या तीन आवृत्ति पुनः पुनः कराव्या. ह्या नवांची फलें नांवांच्या अर्थाप्रमाणें आहेत. ४०.

पूर्वीच्या श्लोकांत लिहिल्याप्रमाणें दर एक नांवाच्या तीन तारा प्रत्येक मनुष्यास असतात त्यांचें त्वरित ज्ञान होण्यासाठीं

### संग्रहश्लोक.

जन्मर्क्षादित्रिकाणि क्रमत इह बुधैर्वेदनीयान्यमूनि ।
त्वाष्ट्रंवस्वृक्षचांद्रं शिवकपमरुतोद्वीशमात्राजपादं ॥
पुष्यानूराधबुध्न्या अहिवृषचरमाण्यश्विनीपित्र्यमूलं ।
याम्यं भाग्यं जलर्क्षं श्रुतिरविविधिभान्यर्यमाग्नेयवैश्वं ॥४१॥

अर्थ—जन्म संपत् इत्यादि नांवांच्या तारा तीन तीन असतात त्या येणेंप्रमाणें क्रमेंकरून जाणाव्या. चित्रा, धनिष्ठा, मृग १; आर्द्रा, शततारका, स्वाति २; विशाखा, पुनर्वसु, पूर्वाभाद्रपदा ३, पुष्य, अनुराधा, उत्तराभाद्रपदा ४; आश्लेषा, ज्येष्ठा, रेवती ५; अश्विनी, मघा, मूळ ६; भरणी, पूर्वाफाल्गुनी, पूर्वाषाढा ७; श्रवण, हस्त, रोहिणी ८; उत्तराफाल्गुनी, कृत्तिका, उत्तराषाढा ९. ४१.

### मुहूर्तमाला.

स्वोच्चत्रिकोणकेंद्रस्थः स्वमित्रशुभवर्गगः ।
क्षीणोऽपि क्षणदानाथस्तारादोषं व्यपोहति ॥४२॥

अर्थ—वृषभराशीस किंवा लग्नापासून ५, ९, १, ४, ७, १० ह्या स्थानीं अथवा आपल्या यद्वा मित्राच्या किंवा शुभग्रहाच्या वर्गांत चंद्र असल्यास तो क्षीण असला तरी तारा दोषाचा नाश करतो. ४२.

मुहूर्तचिंतामणि.

मृत्यौस्वर्णतिलान्विपद्यपि गुडं शाकं त्रिजन्मस्वथो ।
दद्यात्प्रत्यरितारकासुलवणं सर्वो विपत्प्रत्यरिः ॥
मृत्युश्चादिमपर्ययेन शुभदोऽथैषां द्वितीयेऽग्रयः ।
पूर्वप्रांत्यतृतीयका अथ शुभाः सर्वे तृतीये स्मृताः ॥४३॥

अर्थ—वधतारा असल्यास सुवर्ण आणि तीळ यांचें दान करावें. विपत्तारा असेल तर गुळाचें दान करावें. जन्मतारा असेल तर भाजीचें दान करावें. प्रत्यरितारा असतां मीठ द्यावें. ह्मणजे तारेचा दोष जातो. दुसरा प्रकार असा कीं, विपत्, प्रत्यरि व वध ह्या तीन तारा, प्रथम पर्यायांत सर्वच टाकाव्या. दुसऱ्या पर्यायांत विपत्तारेचा प्रथम चरण, प्रत्यरि तारेचा चौथा चरण आणि वधतारेचा तिसरा चरण असे चरण वर्जावे. इतर चरणास दोष नाहीं. तिसऱ्या पर्यायांत ह्या तिन्ही तारांचा दोष नाहीं. ४३.

मुहूर्तकल्पद्रुम.

याने क्षौरे भेषजे वाग्विवादे तारा निंद्या सिद्धिदाऽन्यत्र चाद्या ।
चांद्रं वीर्यं सर्वकार्ये विलोक्यं तल्लाभे स्यात्सर्वखेटानुकूल्यं ॥४४॥

अर्थ--प्रयाण, क्षौर, औषध, आणि कलह यांविषयीं जन्मतारा निंदित आहे. यांहून अन्यकार्यांविषयीं प्रशस्त जाणावी. सर्व कार्यांस चंद्राचें बळ अवश्य पहावें. कारण चंद्रबळ असल्यानें सर्व ग्रह अनुकूल होतात. ४४.

मुहूर्तकल्पद्रुमाच्या टीकेंत वसिष्ठ.

हिमकरवीर्याद्वीर्यं संचित्यैव ग्रहाश्च साधुफलं ।
दधतींद्रियाणि मनसा सहितानि यथा स्वकार्यदक्षाणि ॥४५॥

अर्थ--चंद्रबळ असल्यानें सर्व ग्रह बलिष्ठ होऊन उत्तम फळ देतात जशीं सर्व ज्ञानेंद्रियें मनाशीं युक्त झालीं ह्मणजे आपआपलें रूपादि विषय दाखविण्यास समर्थ होतात तद्वत्. ४५.

पीयूषधारेंत वराह.

कृषिवणिजविवाहद्यूतसंग्रामकाले ।
नगरग्रहशिलायां भूषणे चारुलेपे ॥
प्रथमयुवतियोगे जन्मचंद्रः प्रशस्त ।
इति वदति वराहः क्षौरयात्रां विहाय ॥४६॥

अर्थ-शेतकी, व्यापार, विवाह, जुवा, युद्ध, नगरांत प्रवेश करणें, घराच्या पायाचा प्रथम दगड ठेवणें, भूषण करणें, किंवा धारण करणें, अंगास अथवा गृहादिकांस लेप करणें आणि स्त्रीचा प्रथम उपभोग घेणें इतक्या कार्यांस जन्मस्थ चंद्र प्रशस्त आहे. क्षौर व प्रयाण यांस मात्र उपयोगी नाहीं. ४६.

ज्योतिर्निबंधांत वसिष्ठ.

मांडव्यगर्गादिमतादिहोत्थं बलाबलं तारकशीतभान्वोः ।
विचारितं सम्यगसौ तदर्थः श्लोकस्तदीयः सुरसंहितायां ॥४७॥

अर्थ—मांडव्य आणि गर्गादिकरून ऋषींच्या मतानें तारा व चंद्र यांत कोण केव्हां बलिष्ठ ह्याचा जो सुरसंहितेंत सुंदर विचार केला आहे त्या अर्थाचा बोधक श्लोक पुढें लिहितों. ४७.

## ज्योतिर्निबंधस्थ सुरसंहितानुसारी.

वलक्षषष्ठ्यादिषु वीर्यमिंदोः कृष्णाष्टमी प्रांत्यदलाद्भवेत्प्राक्।
तदूर्ध्वमांतात्खलु तारकायाः शुक्लादिपंचस्वपि चोभयोस्तु ॥४८॥

अर्थ--शुक्लपक्षींच्या षष्ठीपासून कृष्णाष्टमीच पूर्वार्ध संपेतोंपर्यंत चंद्रबळ मुख्य, कृष्णाष्टमीच्या उत्तरार्धापासून अमावास्येच्या समाप्तीपर्यंत ताराबळ मुख्य, शुक्लप्रतिपदेच्या आरंभापासून पंचमीच्या समाप्तीपर्यंत तारा आणि चंद्र या दोहींचें बळ मुख्य असें जाणावें. ४९.

## मुहूर्तमाला

शुभदोपींदुः पापात्द्यूने पापांतरेऽथ पापयुतः ॥
न शुभः स्याद्विपरीतं यदि गुरुदृष्टः शुभाधिमित्रांशे ॥४९॥

अर्थ—चंद्र शुभस्थानीं असतांही जर, पापाग्रहापासून सप्तमस्थानीं किंवा दोन पापग्रहांच्या मध्यें अथवा पापग्रहानें युक्त असेल तर तो शुभप्रद नव्हे. अशुभचंद्रावर गुरूची दृष्टि असेल किंवा तो चंद्र, शुभग्रहाच्या अथवा अधिमित्राच्या अंशांत असेल तर त्याचा दोष नाहीं. ४९.

चंद्रः शुक्लाद्यतिथौ शुभोऽशुभो वा तथा स पक्षोऽपि ॥
व्यत्यासेन च कृष्णे चंद्रबलं संकटे महत्येतत् ॥५०॥

अर्थः--शुक्लपक्षांतील प्रतिपदेच्या आरंभीं चंद्र, शुभ किंवा अशुभ असेल त्याप्रपाणें चंद्रबल पक्ष समाप्तीपर्यंत समजावें. कृष्णपक्षांतील प्रतिपदेच्या आरंभीं चंद्र अशुभ असल्यास तो सर्व पक्ष शुभप्रद, आणि चंद्र शुभ असल्यास तो सर्व पक्ष अशुभ असें जाणावें. ह्याप्रमाणें चंद्रबळ फार संकट असल्यास घ्यावें. ५०.

## ज्योतिर्निबंधांत ज्योतिःसागर.

स्वोच्चेऽथवा स्वभवने स्फुटरश्मिजालः ।
सौम्यालये हितगृहे शुभवर्गयोगे ॥
जामित्रवेधयुतिपूर्वकदोषराशिं ।
हित्वा ददाति बहुशः सुखमेव चंद्रः ॥५१॥

अर्थ—वृषभ किंवा कर्क या राशीस अथवा शुभग्रहांच्या राशीस यद्वा सिंह राशीस किंवा शुभग्रहाचे वर्गांत असणारा चंद्र तेजस्वी असेल तर तो, जामित्रवेध इत्यादि दोषांचा परिहार करून बहुधा सुखच दतो.

## रत्नमाला.

ताराबलादिंदुरथेंदुवीर्याद्दिवाकरः संक्रममाण उक्तः ।
ग्रहाश्च सर्वेपि बलेन भानोर्भवंत्यशस्ता अपि सुप्रशस्ताः ॥५२॥

अर्थ--ताराबलाच्या अनुसारें चंद्र बलिष्ट होतो. सूर्याच्या संक्रांतिकाळीं जसें चंद्रबळ असेल त्याप्रमाणें सूर्य इष्ट किंवा अनिष्ट होतो. याप्रमाणेंच सूर्याच्या बलानें इतर ग्रह इष्ट अथवा अनिष्ट होतात. ५२.

## कार्यविशेषीं ग्रहबल.

रविर्नृपविलोकने सुरगुरुर्विवाहोत्सवे ।
रणे धरणिनंदनो भृगुसुतः प्रयाणे बली ॥
शनिश्च खलु दीक्षणे सकलशास्त्रबोधे बुधः ।
शशी सकलकर्मसु ध्रुवमुदाहृताः सूरिभिः ॥५३॥

अर्थः—राजदर्शनकालीं रवीचें बल असावें. विवाहकालीं गुरूचें, युद्धकालीं मंगळाचें, प्रयाणकालीं शुक्राचें, मंत्रदीक्षाग्रहणास शनीचें, विद्यारंभकालीं बुधाचें आणि सर्व कर्माविषयीं चंद्राचें बल असावें याप्रमाणें ऋषीनीं सांगितलें आहे ५३.

## ग्रहाचें राश्यंतर झाल्यावर ग्रह कोणत्या पादानें आला हें पाहणें.

जन्मे रसे रुद्रसुवर्णपादे द्विपंचनंदा रजतं शुभं स्यात् ।
त्रिदिक्सप्त ताम्रपादं वदन्ति तुर्याअष्टद्वादश लोहकष्टं ॥१॥
सुवर्णपादं लभते च चिंता रौप्ये च पादे धनमागमं च ।
ताम्रे च पादे धनधान्यलाभौ लोहे च पादे कलहं च मृत्युः ॥२॥

अर्थ-कोणत्याही ग्रहाचें राश्यंतर झाल्यावर तो ग्रह कोणत्या पादानें आला हें पाहण्याचें तें असे—कोणत्याही ग्रहाचें राश्यंतर होईल त्या दिवशीं जें दिननक्षत्र असेल त्या दिननक्षत्राची जी राशि ती आपल्या जन्मराशीपासून १।६।११ यांपैकीं असल्यास तो ग्रह सुवर्णपादानें आला, २।५।९ यांपैकीं असेल तर तो रौप्यपादानें आला, ३।१०।७ यांपैकीं असल्यास ताम्रपादानें आला, आणि ४।८।१२ यांपैकीं असेल तर तो ग्रह लोहपादानें आला असें जाणावें सुवर्णपादानें ग्रह आला असेल तर चिंता लागेल. रौप्यपादानें आला असेल तर धन मिळेल. ताम्रपादानें आला असेल तर धनधान्यप्राप्त होईल. आणि लोहपादानें आला असेल तर कलह होईल किंवा मृत्यु तरी येईल. त्याचा विशेष ताम्रपादानें मंगळ आला असेल तर धन, धान्य प्राप्त होईल. आणि शनि लोहपादानें आला असेल तर विपुल धनधान्य मिळेल असें केचित् मत आहे. १।२.

## साडेसाती येते त्या वेळची शनीची स्थिति.

द्वादशस्थे शनौ दृष्टिरुदरे जन्मनि स्थितिः ।
लत्ता मोक्ता द्वितीयस्थे इत्येते कालसंक्रमे ॥१॥

अर्थ--शनि आपल्या जन्मराशीपासून बारावा आला असेल तर तो दृष्टीस आला, पहिला आला असेल तर उदरीं आला आणि दुसरा आला असेल तर लत्तेस [ पादास ] आला असें समजावें. १.

---

## रोग्याविषयींप्रश्न.

लग्ने लाभत्रिकोणस्थे तृतीये दशमे रिपौ ॥
सौम्या व्याधिविनाशाय क्रूरास्तत्र मृतिप्रदाः ॥ १ ॥

अर्थ-रोग ज्यावेळीं उत्पन्न होईल त्या वेळचें तत्काल लग्न असेल, अथवा कोणी मनुष्य येऊन रोग्याविषयीं प्रश्न विचारील त्यावेळीं जें लग्न गणितानें येईल त्या लग्नीं व लग्नापासून ५।९।३।११।१०।६ या स्थळीं शुभग्रह असतील तर रोगी मनुष्य बरा होईल. ( आणि याच स्थानीं पाप ग्रह असतील तर रोगी मरेल आणि याच स्थानीं शुभ पाप ग्रह मिश्र असतील तर पुष्कळ दिवस तो रोगी रोगपीडित होऊन बरा होईल ). १.

सूर्ये केंद्रे ज्वरमतितरं शीतबातं च चंद्रे ।
भौमे रक्तं ज्ञगुरुभृगवो रोगनिर्मुक्तिदाः स्युः ॥
मंदे मंदं शिखिनि मरणं जीवनाशं च राहौ ।
लग्ने शस्तं ग्रहबलयुतं यातु वैद्यो विलोक्य ॥ २ ॥

अर्थ--सूर्य १।४।७।१० या केंद्रांत असेल तर रोगी ज्वरानें पीडित झाला आहे. चंद्र या केंद्रांत असेल तर थंडीपासून वातविकार झाला आहे. मंगळ असेल तर रक्तविकार झाला आहे. बुध, गुरु, शुक्र असे

जर असतील तर रोगी बरा होईल. शनि असेल तर पुष्कळ दिवस रोग राहील. केतु असेल तर रोगी मरेल. राहू असेल तर रोग्याच्या जिवित्वाचा नाश होईल. लग्नेशाचें महबल वगैरे पाहून वैद्यानें रोग्यास औषधोपचार सुरूं करावा २.

चरे विलग्ने कुमुहूर्तयोगे रिक्तातिथौ चंद्रबलेन हीने ॥
वारे च भौमेऽपि रवौ च योगे स्नानंहितं रोगविमुक्तजंतोः ॥ ३ ॥

अर्थ–रोगमुक्त मनुष्यास स्नान घालण्याचे वेळीं, चरलग्न, कुयोग ४।९।१४ या रिक्ता तिथि बलहीन चंद्र मंगळवार, रविवार, या प्रमाणें योग पाहून रोगमुक्तास त्या योगावर स्नान घालावें म्हणजे रोगी रोगापासून निर्मुक्त होतो. ३.

सजीवं सप्तऋक्षाणि निर्जीवं द्वादशं तथा ॥
व्याधिता नवऋक्षाणि सूर्यभाद्गणयेत्पुनः ॥ ४ ॥

अर्थ–सूर्यनक्षत्रापासून दिवसनक्षत्रापर्यंत मोजावें, पाहिल्या सात दिननक्षत्रास सजीव नक्षत्रें म्हणावीं; आणि पुढचीं बारा दिन नक्षत्रें निर्जीव नक्षत्रें म्हणावीं, व त्या पुढच्या नऊ नक्षत्रांस व्याधीचीं नक्षत्रें म्हणावीं, याप्रमाणें गणना करावी. ४.

व्याधिते व्याधिपीडा च सजीवं सुखमश्नुते ।
निर्जीवं मरणं प्रोक्तं ज्ञातव्यं व्याधितो बुधैः ॥ ५ ॥

अर्थ —सूर्यनक्षत्रापासून दिननक्षत्र जर व्याधीचें आलें असेल तर व्याधीपासून पीडा होईल, सजीव नक्षत्र आलें तर सुखप्राप्ति होईल. निर्जीव आलें तर मरण येईल. याप्रमाणें ज्ञात्यांनीं व्याधिग्रस्तास सांगावें. ५

स्वात्याश्लेषारौद्रपूर्वात्रिशाक्रे रोगोत्पत्तिर्जायते यस्य पुंसः ।
तद्भैषज्यं व्याधितो निष्प्रयत्नःस्याद्दुग्धाब्धेर्लब्धजन्मापि वैद्यः ॥६॥

अर्थ–स्वाती, आश्लेषा, आर्द्रा, पूर्वा, पूर्वाषाढा, पूर्वाभाद्रपदा, ज्येष्ठा या नक्षत्रांवर कोणत्याही मनुष्यास रोग उत्पन्न होईल तर धन्वंतरीचे प्रयत्नसुद्धां निष्फळ होतील. ६.

रोगश्चेद्वसुशतसार्पशाक्रपूर्वा
द्वीशार्द्रानिलयमभेषु पापवारे ।
स्याद्रिक्ताहरितिथिवाहर्नीयतिथ्यां
योगेस्मिन्मृतिरचिरेण रोगिणः स्यात् ॥७॥

अर्थ–धनिष्ठा, शततारका, आश्लेषा, ज्येष्ठा, पूर्वा, पूर्वाषाढा, पूर्वाभाद्रपदा, विशाखा, आर्द्रा, स्वाती आणि भरणी या नक्षत्रांस ४।९।१४।१५।१२।१ या तिथींचा योग असून रवि, मंगळ आणि शनि या वारांचा योग असेल तर रोगी मरेल किंवा पुष्कळ दिवसपर्यंत रोगवृद्धि होऊन पुढें मरेल. ७.

अथ देवतादोषज्ञानं—नराणां रोगे सति बाधादिषु प्रश्ने ॥
प्रेतश्च राहौ पितरः सुरेज्ये चंद्रे च देव्यास्तपने च देवी ॥
स्वगोत्रदेव्याः क्षितिजे शनौ च बुधे च भूतव्ययरंध्रसंस्थाः
शाकिन्य आरे भृगुजेंदुदेव्यो गृण्हन्ति मर्त्यं विमुखं मुकुंदात्
स्वर्क्षोच्चगे वीर्ययुते च साध्याश्चंद्रे च नीचेप्यबले च साध्यः ॥९॥
केंद्रस्थैर्बलिभिः पापैरसाध्या देवता ग्रहाः ।
सौम्यग्रहैश्च केंद्रस्थैः साध्या मंत्रेण वार्चनैः ॥१०॥

अर्थ—तनुभवनापासून व्ययस्थानीं किंवा अष्टमस्थानीं राहु असेल तर प्रेतापासून बाधा झाली आहे. गुरु असेल तर पितरांची बाधा झाली आहे. आणि चंद्र व सूर्य असेल तर देवीपासून बाधा झाली आहे; शनि किंवा मंगळ असेल तर कुलदेवतेची बाधा आहे. बुध असेल तर भूतापासून बाधा आहे; मंगळ असेल तर शाकिनीची बाधा आहे; गुरु असेल तर जलदेवतेची बाधा आहे असें सांगावें व हे ग्रह उच्च, स्वगृहींचे किंवा बलवान असतील तर देवता साध्य व चंद्र नीच निर्बळ असेल तरी देवता साध्य होईल. तसेंच केंद्री सौम्य ग्रह असतील तरी ती देवता मंत्रपूजनादिकानें साध्य व क्रूर ग्रह असतील तर असाध्य जाणावी. ८–१०.

## ग्रहांचें कारकत्व.

**रविः**—राजा, अधिकारी, सत्ताधारी, न्यायाधीश, राजपुरुष, राजाचे प्रधान, वैद्य किंवा डाक्टर इत्यादि.

**चंद्रः**—प्रजा; जनसमाज, सामान्य दर्जाचे लोक, देशांतील स्त्रिया इत्यादि.

**मंगळः**—सेनापती, लढवय्ये लोक, डॉक्टर, सर्जन, आरमारावरचे अधिकारी, योद्धे, युद्ध, मारामाऱ्या, अग्निप्रळय, असंतोष इ.

**बुधः**—ग्रंथकार, लेखक, वृत्तपत्राचे संपादक, ग्रंथप्रकाशक, परराष्ट्राची वकीली करणें, बौद्धिक परिश्रम करणारा, व्यापार इ.

**गुरुः**—न्यायाधीश, वकील, पेढीवाला, धनाढ्य, व्यापारी, आणि धार्मिक बाबतींत पुढारीपणानें काम करणारा इ.

**शुक्रः**—कलाकौशल्यसंपन्न, चित्रकार, गवई, तंतुकार, बजबय्ये, स्त्रीमहोत्सव करणारा, नूतन संतति उत्पन्न करणारा इ.

**शनिः**—वृद्ध मनुष्य, जमीनदार, शेतकरी, मजूर, खाणी आणि खनिज पदार्थ इ.

**हर्षलः**—रेल्वे रस्ते, देशांतरांतील मंडळी, संस्था, शास्त्री, संशोधकपणा, ज्योतिषी, संप, मारामाऱ्या, वैमानिक शोध, शास्त्रीय विषयांची प्रगति, भौतिक क्षोभ, माथेफिरू लोकांचा अत्याचार इ.

**नेपच्यूनः**—गुप्त कारस्थानें, कट, राजद्रोह, पैशासंबंधानें ठकवाठकव, दिवाळखोर, समाजांतील अस्पृश्यता, अतींद्रिय, षड्शास्त्र जाणणारा असें कारक ग्रह आहेत.

## स्फुट.

तिथिवारदिशायामनक्षत्राणि च योजयेत् ।
राशिं कृत्वा विजानीयादष्टभिर्भागमाहरेत् ॥१॥
नाशं घातं तथा लाभं संतोषं धनमेव च ।
उत्साहं हानिमृत्यू च शिंका पल्ली च जांबुकम् ॥२॥

अर्थः—शिंकाशब्द, पालीचा शब्द, अगर जंबूकशब्द झाला असतां त्यावेळची तिथि, वार, ज्या दिशेस शब्द झाला असेल ती दिशा, प्रहर व नक्षत्र यांची बेरीज करून ८ नी भागावें. बाकी १ राहील तर नाश, २ घात, ३ लाभ, ४ संतोष, ५ धनलाभ, ६ उत्साह, ७ हानि, ० राहिल्यास मृत्यु याप्रमाणें क्रमानें फलें जाणावींत.

# अशौचनिर्णय.

## सामान्यनियम.

१ रात्रिं कृत्वा त्रिभागां तु द्वौ भागौ पूर्व एव च । उत्तरांशः प्रभातेन युज्यते मृतसूतके ॥ २ विगतं तु विदेशस्थं शृणुयाद्योह्यनिर्दशम् । यच्छेषं दशरात्रस्य तावदेवाशुचिर्भवेत् ॥ पुत्रादेरपि शेषदिनैरेव शुद्धिः ॥ ३ द्विदिवा रात्रिरेका च पक्षिणीत्यभिधीयते ॥ ४ निर्दशं ज्ञातिमरणं श्रुत्वा पुत्रस्य जन्म च । सवासा जलमाप्लुत्य शुद्धो भवति मानवः ॥

१. सुवेर, सूतक, आणि रजस्वला स्त्री ह्यांच्या प्रथम दिवसाचा निर्णयः-रात्रीचें जनन, मरण किंवा स्त्रीला रजोदोष घडला असतां रात्रीचे तीन विभाग करावे. पहिल्या दोन भागांत जननमरणादिक होईल तर जो चालू दिवस तो आशौचाचा प्रथम दिवस व तिसऱ्या विभागांत होईल तर उजाडता दिवस तो प्रथम दिवस समजावा.

२. पुढे जेथें जेथें दहा दिवस किंवा तीन दिवस आशौच धरावें असें लिहिलें आहे तेथें तेथें दहा किंवा तीन दिवसांच्या आंत केव्हांही आशौच समजलें तर, अवशिष्ट काळानें, ह्मणजे दहा किंवा तीन दिवस पूर्ण होण्याला जे दिवस बाकी राहिले असतील तेवढ्या दिवसांनी शुद्धि होते, असें समजावें. उदाहरणार्थः- दहाव्या दिवसाचे रात्रीं आशौच कळलें तरी दुसऱ्या दिवशीं उजाडतां दहा दिवसांचें आशौच जातें. पुत्राला पित्याचेंही, दहा दिवसांचे आंत, याचप्रमाणें आशौच जाणावें. दशाहांतील मृत पुरुषादिकांचें दहा दिवसानंतर कोणी किती दिवसांचें आशौच धरावें, याविषयीं पुढें टीप २३-२८ मध्यें लिहिलें आहे.

३-४ **पक्षिणीः**-जर दिवसास केव्हांही मनुष्य मृत होईल किंवा आशौच कळेल तर तो दिवस, ती रात्र व दुसऱ्या दिवशीं नक्षत्रदर्शनापर्यंत जो बारा प्रहरांचा काळ त्यास पक्षिणी ह्मणावें; किंवा रात्रीं केव्हांही मृत असेल तर ती रात्र, दुसरा दिवस व दुसरी रात्र मिळून पक्षिणी समजावी. रात्रीं मृत असतां किंवा आशौच कळलें असतां दुसऱ्या दिवशीं नक्षत्रदर्शनापर्यंत जो काळ त्यासही कित्येक ग्रंथकार पक्षिणी असें ह्मणतात, तेंही सयुक्त आहे. एक दिवस-दिवसास किंवा मध्यरात्रीच्या पूर्वी केव्हांही आशौच समजलें तरी उजाडेपर्यंत आशौच धरिलें ह्मणजे पूर्ण एक दिवस आशौच धरिलें असें होतें. जेथें तीन दिवस, पक्षिणी अथवा एक दिवस मूळ आशौच सांगितलें असेल तेथें मरणापासून तितका काळ निघून गेल्यावर आशौच समजलें तर स्नानानें शुद्धि होते.

५ द्विवर्षस्य खननं मुख्यं ॥ पूर्णद्विवर्षोर्ध्वं दाहो मुख्यः ॥ खनने तु स्नानात् शुद्धिः ॥ ६ महानद्यंतरं यत्र गिरिर्वा व्यवधायकः ॥ वाचो यत्र विभिद्यंते तद्देशांतरमुच्यते ॥ देशांतरं तु विप्रस्य विंशतिर्योजनांतरम् ॥ ७ अनुपनीतपदेन कृतचूडश्च चूडाया अभावे 'तृतीये पंचमे वापि चौलकर्म' इतिवचनात् त्रिवर्षोर्ध्वः पंचवर्षोर्ध्ववयस्को वा ग्राह्यः ॥ ८ सपिंडता तु पुरुषे सप्तमे विनिवर्तते ॥ समानोदकभावस्तु निवर्तेत चतुर्दशे ॥ एकविंशतिपर्यंतं सगोत्राः पुरुषास्ततः ॥ ९ सपिंडानां दशाहं च सोदकानां त्र्यहं भवेत् ॥ नाशौचं तु सगोत्राणामिति साधारणं स्मृतम् ॥ १० जाताशौचं मृताशौचं चाशौचं द्विविधं भवेत् ॥

५. ज्याचें दहन न करितां खनन [ भूमींत पुरणें ] केलें असेल, अशा कोणत्याही नात्याचें बालक मृत असतां आईबापाखेरीज इतरांस स्नानानें शुद्धता होते. दोन वर्षे होत तोपर्यंत मृत असतां खनन व पूर्ण दोनवर्षांपासून पुढें मात्र दहन अवश्य आहे.

६. पुढें जेथें देशांतर सांगितलें आहे तेथें सुमारें ऐंशी कोसांच्या पलीकडील प्रदेश असें समजावें वस्तुतः देशांतर याचा खरा अर्थ येथें ग्रामांतर असाच होतो. कारण हिमालयाच्या उच्च शिखरापासून तो दक्षिणेच कन्याकुमारीपर्यंत सध्या एकच देश समजतात. असो ज्या दोन देशांमध्यें मोठी नदी, समुद्र, किंवा पर्वत असेल अथवा भाषा निराळी असेल तेथेंही देशांतर होतें; परंतु त्या दोन देशांतील अंतर निदान ऐंशी कोसांपेक्षां कमी नसावें. नाहींतर महानदीच्या अलीकडील व पलीकडील तीराला राहाणारे किंवा एखाद्या पर्वताच्या अलीकडील व पलीकडील तीराला राहणारे किंवा एखाद्या पर्वताच्या अलीकडील व पलीकडील बाजूला राहणारे यांच्यामध्येंही देशांतर घडेल. ह्मणून देशांतर होण्यास वीस योजनें ह्मणजे ८० कोस तरी दोन देशांत अंतर असावें असा निर्बंध बहुतेक ग्रंथकारांनीं ठरविला आहे.

७. मुंज न झालेला ह्याचा अर्थ संस्कारयुक्त चूडाकर्म झालेला किंवा चूडाकर्म झालें नसतां तीन किंवा पांच वर्षांचा असा समजावा. सन्निध या पदाचा अर्थ एका गांवांत असणें, असा समजावा.

८. **सपिंड वगैरेः**—स्वकुलांत उत्पन्न झालेले जे पहिले व पुढील सात पुरुष तें आपल्याला सपिंड होत. व्यवहारांत सपिंडांस दशाहांतील असें ह्मणतात. आठव्या पिढीपासून चवदाव्या पिढीपर्यंत, तें समानोदक होत; व पुढील सात पिढींतले पुरुष ते सगोत्र होत.

९. सपिंडाचें दहा दिवस आशौच, समानोदकांचें तीन दिवस व सगोत्रांचें स्नान, याप्रमाणें सुवेर व सूतक यांविषयीं नियम जाणावा.

१०. आशौच दोन प्रकारचें आहे. एक जननाशौच ह्मणजे सुवेर व दुसरें मृताशौच ह्मणजे सूतक यांपैकीं प्रथम सुवेराविषयीं माहिती सांगतों.

## जननाशौच [ सुवेर ]

११ आचतुर्थाद्भवेत्स्रावः पातः पंचमषष्ठयोः ॥ अत ऊर्ध्वं प्रसूतिः स्यात्तत्राशौचं विविच्यते ॥ १२ रात्रिभिर्मासतुल्याभिर्गर्भस्रावे विशुध्यति ॥ पित्रादीनां सपिंडानां स्रावे स्नानं प्रकीर्तितम् ॥ १३ पाते मातुर्यथामासं पित्रादीनां दिनत्रयम् ॥ १४ सप्तममासप्रभृतिप्रसूतौ तु मातुः सर्वेषां सपिंडानां दशाहं जननाशौचं ॥

११. गर्भवती स्त्रियेचा चवथ्या महिन्यांत गर्भनाश झाला तर त्याला स्राव असें ह्मणतात.

१२. स्राव झाला असतां चार रात्रींपर्यंत गर्भिणीला अस्पृश्यत्वरूप आशौच असतें. ह्मणजे तिनें कोणाला शिवूं नये. पिता आदिकरून सर्व सपिंडांनीं स्नान करावें. पांचव्या व सहाव्या महिन्यांत गर्भनाश झाला तर त्याला पात ह्मणतात.

१३. पात झाला असतां जितके महिने झाले असतील तितके दिवस आईला अस्पृश्यत्वरूप आशौच आहे. पिता व तीन पिढ्यांतील सपिंड यांनीं तीन दिवस सुवेर धरावा.

१४. सातव्या महिन्यापासून प्रसूति होय. *

१५ मृतजाते शिशौ सपिंडानां संपूर्णमेव जननाशौचं मृताशौचं नास्ति ॥ १६ जाताशौचं त्रिरात्रं स्यात्प्राङ्नाभिच्छेदनान्मृतौ । मृताशौचं नास्ति ॥ १७ दशाहाभ्यंतरे बाले प्रमृते तस्य बांधवैः । शावाशौचं न कर्तव्यं सूत्याशौचं विधीयते ॥ १८ पितृगृहे कन्याप्रसूतौ पित्रोस्तद्गृहवर्तिभ्रातॄणां चैकाहः । कन्याया पतिगृहे प्रसवे पित्रादीनां नाशौचम् ॥

---

* प्रसूति झाली असतां आईस दहा दिवस. अस्पृश्यरूप आशौच असतें. व पिता इत्यादि सर्व सपिंडांना दहा दिवस फक्त सुवेर आहे. दहा दिवसांनंतर कळल्यास मुळीच सुवेर नाहीं. पित्याला मात्र स्नान आहे.

१५. बालक मेलेलें उत्पन्न झालें तर सर्व सपिंडास दहा दिवस फक्त सुवेर आहे. सुतक नाहीं.

१६. बालक उत्पन्न झाल्यानंतर नालच्छेदन करण्यापूर्वी जर मृत होईल तर पिता आदिकरून सर्व सपिंडास तीन दिवस सुवेर.

१७. नालच्छेदन केल्यानंतर दहा दिवसांच्या आंत मृत होईल तर सर्व सपिंडांस प्रसूतिकालापासून फक्त दहा दिवस सुवेर आहे. सूतक नाहीं.

१८. बापाच्या घरीं कन्या प्रसूत होईल तर आईबापांस एक दिवस सुवेर. नवऱ्याच्या घरीं कन्या प्रसूत झाली तर आईबापांस सुवेर नाहीं.

## मृताशौच [ सूतक ].

१९ दशाहानंतरम् ' यत्रोपनयात्पूर्वं पुत्रः प्रेतत्वमृच्छति । अशौचं त्रिदिनं तत्र मातापित्रोः समं सदा ' ॥ २० दशाहानंतरं दंतोत्पत्तिपर्यंतं कन्यामरणे मातापित्रोश्चैकाहः । तदूर्ध्वं यावद्विवाहं मातापित्रोस्त्रिरात्रमेव ॥ सापत्नमातुः सर्वत्र पितृवत् ।

१९. लहान मुलांचें आईबापांसः--अकराव्या दिवसापासून मुंज होईपर्यंत मुलगा मृत होईल तर आईबापांस तीन दिवस सुतक.

२०. अकराव्या दिवसापासून पूर्ण सहा महिन्यांची होईतोपर्यंत कन्या मृत होईल तर एक दिवस, व सातव्या महिन्यापासून लग्न होईपर्यंत मृत झाली तर तीन दिवस आईबापांनीं सूतक धरावें. सावत्र आईला बापाप्रमाणें.

२१ नामकरणोत्तरं दंतोत्पत्तेः प्राक् पुत्रमरणे सपिंडानां खनने स्नानाच्छुद्धिः । द्विवर्षस्य खननं तदूर्ध्वं चूडाकरणपर्यंतं सपिंडानामेकाहः ॥ तदूर्ध्वं प्रागुपनयनात्सर्वेषां सपिंडानां त्रिदिनं । उपनयनोत्तरं सर्वेषां सपिंडानां दशाहं सोदकानां त्रिरात्रं ॥ २२ वर्षत्रयपर्यंतं कन्यामृतौ तु सपिंडानां स्नानाच्छुद्धिः । तदूर्ध्वं वाग्दानात्प्राक्मरणे त्रिपुरुषसपिंडानामेकाहः ॥ वाग्दानानंतरं यत्र यदि कन्या प्रमीयते । आशौचं त्रिदिनं तत्र पित्रपत्योश्च वै कुले ॥ २३ पितरौ चेन्मृतौ स्यातां दूरस्थोऽपि हि पुत्रकः । श्रुत्वा तद्दिनमारभ्य दशाहं सूतकी भवेत् ॥ श्रुत्वा तु वपनं च ॥ २४ अनेकेऽब्देऽपि दंपत्योस्तथैव स्यात्परस्परम् ॥ २५ सापत्नमातुर्मरणे पुत्रस्य दशाहोर्ध्वं देशकालांतरेऽपि त्रिरात्रम् ॥ २६ सपत्नीनां परस्परं देशकालांतरेऽपि दशाहमेव ॥ २७ औरसपुत्रमृतौ मातापित्रोर्वत्सरांतरेऽपि त्रिरात्रम् ॥ सापत्नमातुः पितुरिव ॥ २८ देशांतरे तु सपिंडमरणे दशाहोर्ध्वं ज्ञाते स्नानमात्रमित्याह विज्ञानेश्वरः ॥ माधवमते तु आत्रिपक्षात् त्रिरात्रं स्यात् षण्मासात्पक्षिणी ततः । परमेकाहमावर्षादूर्ध्वं स्नातो विशुध्यति ॥

२१. लहान मुलाचें सपिंडांसः-अकराव्या दिवसापासून पूर्ण दंतोत्पत्ति होईपर्यंत मुलगा मृत होईल व त्याचें खनन ( भूमींत पुरणें ) केलें असेल तर सपिंडांस स्नान. ( टीप ५ पहा ). दांत आल्यानंतर संस्कारपूर्वक चौल होईपर्यंत मृत होईल तर तीन दिवस. जेथें संस्कारयुक्त चौल झाल्यानंतर मुंज होईपर्यंत मृत होईल तर तीन दिवस. जेथें संस्कारयुक्त चौल झालें नसेल तेथें सुमारें पांच वर्षांची चौलाची इयत्ता समजावी.

२२. अकराव्या दिवसापासून पूर्ण तीन वर्षें होतपर्यंत. कन्या मृत झाली तर सपिंडांस स्नान. तीन वर्षांनंतर विधीयुक्त वाग्दान होण्यापूर्वी मृत झाली तर ३ पिढ्यांच्या आंतील सपिंडास एक दिवस. विधिपूर्वक वाग्दान झाल्यानंतर विवाहापूर्वी मृत झाल्यास कन्येच्या बापाच्या व नवऱ्याच्या कुलांतील तीन पिढ्यांतील सर्व सपिंडांनीं तीन दिवस सूतक धरावें.

**दहा दिवसानंतर सापिंडाचें**:–[ दशाहांताल ] सपिंड मृत असतां दहा दिवस आशौच धरावें हें वर सांगितलेंच आहे. परंतु दहा दिवस होऊन गेल्यानंतर कोणाचें किती दिवस आशौच धरावें याविषयीं येथें माहिती लागते.

२३. आईबाप मृत होऊन दहा दिवस झाल्यानंतर केव्हांही समजलें तरी पुत्रांनीं समजल्या दिवसापासून दहा दिवस आशौच धरावें, व एकल्याबरोबर क्षौर करावें. २४.

२४. तसेंच नवराबायकोचें– परस्परास दहा दिवसानंतर केव्हांही कळलेस परस्परांनीं दहा दिवस आशौच धरावें.

२५. सापत्न मातेचें– दहा दिवसानंतर केव्हांही कळलें तरी तीन दिवस.

२६. सवत मृत असेल तर दहादिवसानंतर केव्हांही समजले तरी सवतीस दहा दिवस.

२७. औरसपुत्र–मृत असतां दहा दिवसानंतर केव्हांही कळले तरी तीन दिवस. सापत्न मातेस बापाप्रमाणेंच.

२८. ह्याशिवाय इतर सपिंडाचें मरण दूरदेशीं घडेल व दहा दिवसानंतर कळेल तर सर्व सपिंडांची स्नानानें शुद्धि होते, असें विज्ञानेश्वराचें मत आहे. आणि तें सध्याच्या परिस्थितीला ग्राह्य आहे.

* माधवाच्या मताप्रमाणें दहा दिवसानंतर सपिंडाचें मरण झालेलें कळेल तर दीड महिन्यापर्यंत तीन दिवस, सहा महिन्यापर्यंत दीड दिवस, वर्षपर्यंत एक दिवस व नंतर स्नानानें शुद्धता जाणावी. परंतु हे अविभक्त कुटुंबांतील सपिंडांविषयीं असेल असें विज्ञानेश्वराचे मताविरुद्ध वाटतें.

२९ यत्र तूढ्वाहिता कन्या पितृगेहे प्रमीयते। पित्रोस्त्रिदिनमन्येषामेकाह इति देवलः ३० ऊढायाः कन्यायाः पतिगृहे मरणे पित्रोः सापत्नमातुश्च त्रिरात्रं ॥ ३१ पितृगेहादतोन्यत्र यदि कन्या प्रमीयते। पक्षिणी तत्र पित्रोः स्यान्नान्येषामिति निश्चितम् ( षडशीतौ ) ३२ पित्रोरुपरमे स्त्रीणामूढानां तु कथं भवेत्। त्रिरात्रेणैव शुद्धिः स्यादित्याह भगवान् रामः ॥ दशाहानंतरं पुत्री पक्षिण्याशौचभाग्भवेत् ॥ ऊढकन्यायाः पितामहपितृव्यादि मरणे स्नानमेव ॥ ३३ भगिनीनिलये भ्राता यद्वा भ्रातृगृहे स्वसा ॥ परस्परस्य त्रिदिनं सूतकं मरणे तदा ॥ अन्यत्र मृतौ परस्परस्यैकाहः ॥ अनुपनीतभ्रातृमरणे भगिन्याः स्नानात् शुद्धिः ॥ ३४ मातुलमरणे भगिन्यपत्यस्य पक्षिणी ॥ स्वगृहे मातुलमरणे वा त्रिरात्रम् ॥ ग्रामांतरे अनुपनीतमातुलमरणे चैकरात्रम् ॥ सापत्नमातुलमरणेप्येवम् ॥ ३५ मातुलानीमरणे भर्तृभगिन्यपत्यस्य पक्षिणी ॥ सापत्नमातुलानीमरणे तु नाशौचम् ॥

२९. विवाहित कन्या बापाच्या घरीं मृत होईलः–तर आईबाप व सावत्र आई यांस तीन दिवस सख्खे भाऊ, सावत्र भाऊ, चुलते एकाच घरांत असतील तर एक दिवस, नाहीं तर स्नानें करून शुद्धि होते.

३०. विवाहित कन्या एकाच गांवांत पतीच्या घरीं मृत असतां आईबाप व सावत्र आई यांस तीन दिवस.

३१. विवाहित कन्या दुसऱ्या गांवांत पतिगृहीं मृत होईल तर आईबापांस पक्षिणी व बंधूस फक्त स्नान.

३२. विवाहित मुलीस, आईबाप, आजा व चुलते यांचें:–आईबाप व सावत्र आई मृत असतां विवाहित कन्येस दहा दिवसाच्या आंत तीन दिवस. परंतु नवव्या किंवा दहाव्या दिवशीं कळलें असतां इतरांबरोबर अकराव्या दिवशीं शुद्धि होते. दहा दिवसांनंतर वर्षानें किंवा केव्हांही कळलें तरी पक्षिणी. आजा, काका, इत्यादिकांचे फक्त स्नान.

३३. बहिणभाऊ व बहिणी बहिणीः–लग्न झालेली बहिण किंवा मुंज झालेला भाऊ हीं परस्परांच्या घरीं मरतील तर परस्परांस ( बहिणभावांस ) त्रिरात्र, दुसऱ्या गांवांत मरतील तर एक दिवस. याचप्रमाणें सावत्र बहिणभांवांचे जाणावें. मुंज न झालेला भाऊ मरण पावला असतां बहिणीस स्नानानें शुद्धि होते.

३४. मामा व मामी यांचेंः–मुंज झालेला मामा मेला असतां भाच्यास व भाचीस पक्षिणी भाच्याच्या घरीं मामा मृत झाला तर भाच्यास तीन दिवस. दुसऱ्या गांवीं मृत होईल तर किंवा मुंज झालेला नसेल तर एक दिवस. सावत्रमामाचें याच प्रमाणें.

३५. मामी मेली असतां भाचा व भाची यांस पक्षिणी. सावत्र मामीचें म्हणजे आईच्या सावत्र भावाच्या बायकोचे सूतक नाहीं.

३६ स्वगृहे उपनीतभागिनेयमरणे मातुलस्य मातुलभगिन्याश्च त्रिरात्रं । ग्रामांतरे वा अनुपनीतभागिनेयमरणे मातुलस्य मातुलभगिन्याश्च पक्षिणी । भागिनेयीमरणे तु स्नानमात्रम् ॥ ३७ मातामहमरणे दुहित्रपत्यस्य त्रिरात्रम् । ग्रामांतरे पक्षिणी । मातामह्यां मृतायां दुहित्रपत्यस्य पक्षिणी । ३८ दौहित्रमरणे मातामहस्य मातामह्याश्च पक्षिणी । उपनीतदौहित्रमरणे त्रिरात्रमिति केचित् । दौहित्रमरणे तु स्नानमेव । ३९ श्वश्रूश्वशुरयोर्मृतौ जामातुः सन्निधौ तु त्रिरात्रं । असन्निधौ तु पक्षिणी । ग्रामांतरे चैकरात्रम् । भार्यामरणेन निवृत्तसंबंधयोरेकाहः । ४० स्वगृहे जामातरि मृते तु श्वश्रूश्वशुरयोस्त्रिरात्रम् । अन्यथा स्नानात् शुद्धिः । ४१ उपनीते शालके मृते भगिनीभर्तुरेकाहः । अनुपनीते वा ग्रामांतरे शालके मृते स्नानम् । शालिकायां मृतायां स्नानं । भगिनीभर्तृमरणे सन्निधौ तु स्नानमेव । ४२ मातुः स्वसरि पितुः स्वसरि सापत्नमातुः स्वसरि च मृतायां स्वस्रपत्ययोः पक्षिणी पितुः सापत्नस्वसृमरणे स्नानमात्रम् । स्वगृहे मातृस्वसृपितृस्वसृमरणे त्र्यहम् । सापत्नमरणे तु पक्षिणी । ४३ उपनीतबंधुत्रयमरणे पक्षिणी । अनुपनीतस्यैकाहः । स्वगृहमरणे तु त्रिरात्रम् । ४४ पितृष्वस्रादिकन्यानां तु विवाहितानां मरणे तद्बंधुवर्गस्यैकाहः पितृस्वस्रादिकन्याभिस्तु बंधुत्रयमरणे स्नानमात्रं ।

भाचा व भाची यांचेः–मुंज झालेला भाचा मामाच्या किंवा मावशीच्या घरीं मृत होईल तर मामास व मावशीस तीन दिवस व ग्रामांतरीं मृत असतां पक्षिणी. पांच वर्षांहून अधिक असा चूडाकर्म झालेला भाचा मृत असतां मामा व मावशी यास पक्षिणी व चूडाकर्म न झालेला भाचा मृत असतां स्नान. भाची मृत असतां स्नान. भावाचा मुलगा मृत झाला तर स्नानानें शुद्धि होते.

३७ आईचा बाप व आईची आईः–नातवास व नातीस आजा मेला असतां सन्निध असेल तर तीन दिवस; सन्निध नसेल तर पक्षिणी. आजी मेली असतां नातवास व नातीस पक्षिणी.

३८ मुलीचीं मुलेंः–मुंज झालेला नातू मेला असतां आजा व आजी यांस जवळ असतां पक्षिणी. कित्येकांच्या मतें तीन दिवस. नात मेली असतां स्नान.

३९ सासूसासऱ्यांचें जांवयासः–सासू सासरा मेले असतां सन्निध असेल तर तीन दिवस, जवळ नसल्यास पक्षिणी, दुसऱ्या गांवीं मेला असतां एक दिवस, बायको मेल्यामुळें संबंध तुटलेल्या जावयास एक दिवस.

४० जांवयाचें सासूसासऱ्यासः–जांवई सासऱ्याचे घरीं मेला असतां सासूसासऱ्यांस तीन दिवस. आपले घरीं मेला तर स्नानें करून शुद्धि होते.

४१ मेहुणा व मेहुणीः–मुंज झालेला वायकोचा भाऊ मेला असतां एक दिवस. मुंज झाली नसेल किंवा ग्रामांतरी मेला असल तर स्नान मेहुणी मेली असतां स्नान. व वहिणीचा नवरा एका गांवांत मेला असतां स्नान.

४२ आत व मावशीः–सख्खी आत, सख्खी किंवा सावत्र मावशी मेली असतां पक्षिणी सावत्र आत मेली असतां स्नान. भाच्याच्या घरीं सख्खी आत व मावशी मेली असतां भाच्यास तीन दिवस व सावत्र मेली असतां पक्षिणी

४३ मामेभाऊ, मावसभाऊ, आतेभाऊः–हे मुंज झालेले असून आपापल्या घरीं मेले असतां पक्षिणी. मुंज झाली नसेल तर एक दिवस, परस्परांच्या घरीं मेले असतां परस्परांस तीन दिवस.

४४ मामेबहीण, मावसबहीण, आतेबहीणः–ह्या विवाहित असून मेल्या असतां सन्निध असतील तर अनुक्रमें मामेभाऊ, मावसभाऊ, आतेभाऊ यांस एक दिवस. सन्निध नसतां किंवा अविवाहित असतां स्नान.

ह्याचप्रमाणें मामा, मावशी, आत ह्यांच्या कन्यांनीं मामेभाऊ, मावसभाऊ, व आतेभाऊ मृत असता स्नान करावें.

४५ दत्तकस्य मरणे पूर्वापरपित्रोस्त्रिरात्रं सपिंडानामेकाहमाशौचं । दत्तकेनापि पूर्वापरपित्रोर्मृतौ त्रिरात्रं पूर्वापरसपिंडानां मरणे एकाहः ॥ दत्तकस्य पुत्रपौत्रादेर्जनने मरणे च पूर्वापरसपिंडानामेकाहः । सगोत्रसपिंडे सोदके च दत्तीकृते यथाक्रमं दशाहं त्रिरात्रमाशौचं ४६ मंत्रोपदेशकवेदाध्यापकगुरुमरणे त्वेकाहः । असन्निधौ तु स्नानं । उपनीयाध्यापक आचार्य इत्युच्यते । आचार्यमृते त्रिरात्रं ग्रामांतरे पक्षिणीति केचित् ॥ ४७ शवनिर्हरणे दिवा चेन्नक्षत्रदर्शनात् रात्रौ चेत्सूर्यदर्शनाच्छुद्धिः ॥ ४८ गृहमध्ये यावत् शवस्तिष्ठति तावत् गृहस्याशौचम् ॥ ४९ अंत्यकर्मकर्तृत्वे तु दशाहमाशौचं । दशाहोर्ध्वकर्मकर्तृत्वे तु त्र्यहं वा कर्मसमाप्तिपर्यंतमाशौचं ॥ ५० संबंधिप्रेतस्य दाहकरणे त्रिदिनं च धर्मार्थमनाथप्रेतसंस्कारकरणे स्नानमात्राच्छुद्धिः सज्योतिराशौचमिति केचित् ॥ ५१ अनुपनीतस्य अविवाहितकन्यायाश्च मातापितृमरणे दशाहमाशौचं । अन्यमरणे नाशौचम् ॥ ५२ यत्किंचिच्छरीरसंबंधे सति तु सचैलं स्नानम् ॥ ५३ यतीनां ब्रह्मचारिणां च सपिंडजननमरणयोर्नाशौचम् । पित्रो मृतौ तु यतिब्रह्मचारिणोः सचैलं स्नानमात्रम् ॥ ५४ नांदीश्राद्धोत्तरं सूतकमृतकयोः प्राप्तावपि विवाहादिकं कार्यम् । व्रतयज्ञविवाहेषु श्राद्धे होमेऽर्चने जपे। आरब्धे सूतकं न स्यादनारब्धे तु सूतकम् । इति विष्णुस्मृतिः ।

४५. परगोत्रांत दत्तक दिलेला पुत्र मृत असतांः–पूर्वीच्या आईबापास तीन दिवस व सपिंडास एक दिवस; तसेंच दिलेल्या पुत्रास पूर्वीच्या आईबपांचें तीन दिवस व सपिंडांचे एक दिवस. दत्तक दिलेल्या पुत्राचा मुलगा किंवा नातू मृत असतां पूर्वीच्या सपिंडास एक दिवस तसेंच दत्तकाच्या पुत्रपौत्रांना पूर्वीच्या सपिंडांचें एक दिवस दशाहांतील किंवा त्रिरात्रसंबंधी पुरुषांतील दत्तक असल्यास यथाक्रम दहा किंवा तीन दिवस परस्परपक्षीं आशौच धरावें.

४६. गुरुः–आपला आचार्य किंवा गुरु मृत असतां सन्निध असेल तर एक दिवस, असन्निध असतां स्नान. उपनयन करून सकल वेद पढविणारा असेल तर तो आचार्य व मंत्रोपदेश करणारा तो गुरु— सन्निध असतां आचार्याचें तीन दिवस. व असन्निध असतां पक्षिणी धरावें. असें कित्येक ग्रंथकारांचें मत आहे. परंतु मृताविषयीं जशी ज्यांची पूज्य बुद्धि असेल त्याप्रमाणें तीन दिवस, पक्षिणी किंवा एक दिवस आशौच धरावें.

४७. किरकोळः-शवास दिवसा खांद्या घातला असतां नक्षत्रदर्शनापर्यंत व रात्रौ असतां सूर्यदर्शनापर्यंत आशौच धरावें.

४८. घरांत प्रेत असेल तेथपर्यंत घरांतील सर्व मनुष्यांस आशौच असतें. ह्मणून प्रेत गेल्यानंतर सर्वांनीं स्नानें करावीं.

४९. ज्याची अंत्यक्रिया कर्तव्य असेल तो कितीही दूरचा संबंधी असला तरी त्याचें क्रिया करणारास दहा दिवस. दहा दिवसांनंतर अंत्यकर्म केलें असतां कर्म समाप्तीपर्यंत किंवा तीन दिवस सूतक धरावें.

५०. संबंधीप्रेतास मंत्राग्नि देणारास तीन दिवस. व अनाथ प्रेतसंस्कार केल्यास सज्योति आशौच धरावें. ह्मणजे दिवसा मृत असतां सूर्यास्तसमयीं आणि रात्रीं मृत असतां सूर्योदयाबरोबर स्नानानें शुद्धि.

५१ उपनयन न झालेला पुत्र किंवा अविवाहित कन्या यांस आईबाप मृत असतां मात्र दहा दिवस आशौच आहे. याशिवाय दुसरा कोणीही मृत असतां लहान मुलास कोणतेंच आशौच नाहीं.

५२. ज्याच्याशीं स्वल्पही संबंध असेल असा कोणीही मृत असतां सचैल स्नान करावें. मृत्यु वर्तमान कानीं पडेल त्यावेळीं अंगावर जीं वस्त्रें असतील त्यांसह स्नान तें सचैल स्नान होय.

५३ संन्यासी व सोडमुंज न झालेले ब्रह्मचारी यास सुवेर व सूतक धरावें लागत नाहीं. आईबाप मेले असतांही त्यानीं स्नानच करावें. आपल्या ब्रह्मचर्यावस्थेमध्यें जे पित्रादि सपिंड मेले असतील त्यांचें ब्रह्मचारी यानें सोडमुंजीनंतर तीन दिवस आशौच धरावें.

५४ नांदीश्राद्ध केल्यानंतर सुवेर किंवा सूतक प्राप्त झालें असतांही विवाहादि कार्यें करणें दोषास्पद नाहीं असें विष्णुस्मृतींत आहे.

## अतिक्रांताशौच.

५५ जनने जननं चेत्स्यान्मरणे मरणं तथा। पूर्वशेषेण शुद्धिः स्यादुत्तराशौचवर्जनम्। इति माधवीये। ५६ शावाशौचे समुत्पन्ने सूतकं तु यदा भवेत्। शावेन शुध्यते सूतिर्नसूतिः शावशोधिनी। मृतेन शुध्यते जातं न मृतं जातकेन तु। इति षट्त्रिंशन्मते। ५७ स्वल्पाशौचस्य मध्ये तु दीर्घाशौचं भवेद्यदि। न पूर्वेण विशुद्धिः स्यात्स्वकालेनैव शुद्ध्यति। दशाहांत्यरात्रौ यदि दशाहं सूतकमुपस्थितं भवति तदा दिनद्वयमधिकं कार्यं।

५५. अतिक्रान्ताशौचम्ः—दहा दिवसाच्या सुवेरांत दुसरा दहा किंवा तीन दिवसांचा सुवेर प्राप्त झाला तर पूर्वीच्या सुवेराची शुद्धि झाली ह्मणजे मागाहून प्राप्त झालेला सुवेर जातो. तीन दिवसांचे सुवेरांत तीन दिवसाचा सुवेर जातो. दहा दिवसाचे सूतकांत दहा किंवा तीन दिवसांचा सुवेर जातो. दहा दिवसांच्या सूतकांत दुसरे दहा किंवा कमी दिवसांचें सूतक प्राप्त होईल तर पहिल्या सूतकाबरोबर मागाहून प्राप्त झालेल्या सूतकांची शुद्धि होते. तीन दिवसांच्या सूतकांत तीन दिवसाचें सूतक किंवा सुवेर जातो. पक्षिणी सूतकांत दहा दिवसांचा सुवेर जात नाहीं. परंतु तीन दिवसांचे सूतकांत तो जातो असे कांहीं ग्रंथकारांचें मत आहे.

५६ एका सूतकामध्यें सुवेर प्राप्त झाला तर सूतकशुद्धिबरोबर सुवेर जातो परंतु सुवेराबरोबर सूतकशुद्धि होत नाहीं, तीन दिवसांच्या सूतकांत दहा दिवसांचें सूतक जात नाहीं. याचा साधारण नियम असा आहे कीं,

५७ अधिक दिवसांच्या आशौचांत कमी दिवसांचें अशौच जातें. परंतु कमी दिवसांचे आशौचांत अधिक दिवसांच्या आशौचाची निवृत्ति होत नाहीं. दहाव्या दिवसाच्या रात्रीं नवें दहा दिवसांचें सूतक उत्पन्न झालें तर दोन दिवस अधिक सूतक धरावें.

# बृहत्पंचांगफलादर्श भाग ३.

## पंचांगांतील गणितभागाची माहिती.

### क्षितिज.

अफाट मैदानांत उभें राहून सभोंवतीं नजर फेंकली असतां, ज्या ठिकाणीं आकाश व पृथ्वी हीं मिळालेलीं दिसतात, व ज्या ठिकाणीं पलीकडे जमीन आहे असें वाटत नाहीं, व ज्याचे खालीं आकाश नाहींसें भासतें, असें जें काळें धारेचें वर्तुळ त्यास क्षितिज असें ह्मणतात. याप्रमाणें चारी दिशेला पाहिले असतां दिसते.

### ध्रुव.

पृथ्वीच्या आंसाच्या दक्षिणोत्तर बिंदूस अनुक्रमें दक्षिणध्रुव व उत्तरध्रुव ह्मणतात.

### पृथ्वीचा आंस.

ज्या कल्पित रेषेसभोंवतीं पृथ्वी आपल्या दैनंदिन गतीनें, पश्चिमेकडून पूर्वेकडे, फिरते ती कल्पित रेषा तिचा आंस होय.

### खस्वस्तिक आणि अधःस्वस्तिक.

मनुष्य भूपृष्ठावर उभा असून त्याच्या डोकीवरचा जो आकाशांतील बिंदु त्याला खस्वस्तिक असें ह्मणतात. आणि पाया खालचा जो पाताळांतील बिंदु त्यास अधःस्वस्तिक असें ह्मणतात. क्षितिजापासून खस्वस्तिकापर्यंत ९० अंश अंतर असतें.

### महावृत्तें.

जीं वृत्तें पृथ्वीचे समान दोन भाग करितात त्यांस महावृत्तें ह्मणतात.

### अक्षवृत्तें.

विषुववृत्ताशीं उत्तरेस किंवा दक्षिणेस समांतर काढलेलीं जीं वृत्तें त्यांस अक्षवृत्तें किंवा अहोरात्र वृत्तें ह्मणतात.

### अयनवृत्तें.

विषुववृत्तापासून २३॥ अंशावर उत्तरेस एक, व दक्षिणेस एक, अशीं जीं दोन वृत्तें काढलेलीं असतात त्यांस अयनवृत्तें ह्मणतात. उत्तरेकडील कर्कादिवृत्त, व दक्षिणेकडील मकरादिवृत्त असेंही ह्मणतात.

### ध्रुववृत्तें.

ध्रुवापासून २३॥ अंशांवर जीं वृत्तें काढलेलीं असतात त्यांना ध्रुववृत्तें ह्मणतात.

### प्रकाशवृत्त.

सूर्यकिरणें ज्या ठिकाणीं लंब पडतात त्या ठिकाणापासून चोहोंकडे ९० अंशपर्यंत पसरून जो प्रकाशाचा तळ होतो त्यास प्रकाशवृत्त असें ह्मणतात.

### विषुववृत्त.

उत्तरध्रुवापासून व दक्षिणध्रुवापासून सारखे अंतरावर काढलेलें जें पूर्वपश्चिम वर्तुळ त्यास विषुववृत्त असेंही ह्मणतात. या वृत्तास नाडीमंडळ व मध्यवृत्त असेंही ह्मणतात. या वृत्तानें भूगोलाच समान दोन भाग होतात.

## याम्योत्तरमहावृत्त.

दोन्हीं ध्रुवांतून पार जाऊन विषुववृत्तास दोन ठिकाणीं छेदणारें जें वर्तुळ त्यास याम्योत्तरमहावृत्त ह्मणतात.

## पहिलें याम्योत्तरवृत्त.

ग्रहादिकांचे वेध घेण्याकरितां नियमित स्थळ योजिलें असतें, तें स्थळ ज्या याम्योत्तरावर असेल तें पहिलें याम्योत्तरवृत्त जाणावें. ग्रीनविच, प्यारिस, म्याड्रिड, आणि कन्याकुमारी, इत्यादि अनुक्रमें इंग्लिश, फ्रेंच, स्पानिश आणि हिंदु, हे, तें तें पहिलें याम्योत्तर मानितात. ज्या स्थळामधून जें याम्योत्तर जातें तें त्या स्थळाचें याम्योत्तर होय. ह्मणजे आपल्या खस्वस्तिक व अधःस्वस्तिक, आणि उत्तर आणि दक्षिणध्रुवांतून जाणारें जें वृत्त तें त्या स्थळाचें याम्योत्तर होय.

## क्रांतिवृत्त.

सूर्याचा गमन मार्ग ज्या वर्तुळानें गोलावर दाखविलेला असतो त्या वर्तुळास क्रांतिवृत्त असें ह्मणतात. वस्तुतः तें वृत्त पृथ्वीच्या गमनमार्गाचें आहे.

## विक्षेपवृत्तें.

चंद्रादिग्रह ज्या वर्तुळांतून फिरतात त्यांस विक्षेपवृत्तें असें ह्मणतात, आणि क्रांतिवृत्त व विक्षेपवृत्त यांच्या छेदनबिंदूस क्षेपपात असें ह्मणतात.

## पूर्वापरवृत्त.

खस्वस्तिक, अधःस्वस्तिक, आणि पूर्वक्षितिज बिंदूतून जाणारें जें वृत्त त्याला पूर्वापरवृत्त ह्मणतात.

## दृङ्मंडल.

खस्वस्तिक, आणि कोणताही ग्रह किंवा तारा आणि अधःस्वस्तिक, या तीन बिंदूतून जाणारें जें वृत्त त्याला दृङ्मंडल असें ह्मणतात.

## उन्नतांश.

दृङ्मंडल क्षितिजाला ज्या ठिकाणीं स्पर्श करितें त्या बिंदूपासून ग्रह किंवा तारा यापर्यंत जें दृङ्मंडलावरचें अंशात्मक अंतर त्याला उन्नतांश असें ह्मणतात.

## नतांश.

खस्वस्तिकापासून ग्रह किंवा तारा यापर्यंत दृङ्मंडलावरचें जें अंशात्मक अंतर त्यास नतांश असें ह्मणतात.

## लग्न.

कोणत्याही प्रश्नकाळीं किंवा जन्मकाळीं क्रांतिवृत्तावरील राशीचा जो भाग क्षितिजाला लागलेला असतो त्यास लग्न असें ह्मणतात.

## अयनांश.

संपात गतीस अयनांश असें ह्मणतात.

## संपात.

विषुववृत्तास ज्या ठिकाणीं क्रांतिवृत्त छेदितें त्या ठिकाणास संपात किंवा क्रांतिपात असें ह्मणतात. हे संपात दोन आहेत. एक मेष संपात, व दुसरा तूळ संपात.

## भोग.

कोणताही ग्रह किंवा तारा यापासून क्रांतिवृत्तावर लंब टाकिला असतां, तो लंब क्रांतिवृत्ताच्या ज्या ठिकाणीं पडत असेल, तेथपर्यंत संपातापासून जें अंशात्मक अंतर असतें त्यास भोग असें ह्मणतात.

## विषुवांश.

कोणताही ग्रह किंवा तारा आकाशामध्यें ज्या ठिकाणीं असेल त्यापासून विषुववृत्तावर लंब काढला असतां तो लंब विषुववृत्ताच्या ज्या ठिकाणीं पडेल, त्या स्थानापर्यंत संपातापासून अंशात्मक जें अंतर असेल, त्यांस विषुवांश असें ह्मणतात.

## शर.

ग्रह किंवा तारा यापासून क्रांतिवृत्तावर लंब पाडला असतां त्या लंबाचे जितके अंश होतील त्यास शर असें ह्मणतात. हा शर क्रांतिवृत्ताच्या उत्तरेस असेल तर उत्तर शर असें ह्मणतात, आणि तो शर क्रांतिवृत्ताच्या दक्षिण बाजूस असेल तर त्यास दक्षिण शर असें ह्मणतात.

## क्रांति.

ग्रह किंवा तारा यापासून विषुववृत्तावर लंब पाडला असतां त्या लंबाचे जितके अंश होतील त्यास स्पष्टक्रांति असें ह्मणतात. आणि ती क्रांति विषुववृत्ताच्या उत्तरेस असेल तर तीस उत्तर क्रांति असें ह्मणतात, आणि ती क्रांति विषुववृत्ताच्या दक्षिणेस असेल तर तिला दक्षिण क्रांति असें ह्मणतात.

## राशि.

क्रांतिवृत्ताचे २७ भाग नक्षत्रांचे करून त्या २७ भागांचे आणखी १२ भाग केले तर एकेक भाग सव्वा दोन नक्षत्रांचा होतो त्या भागास राशि अशी संज्ञा आहे.

पूर्वी सांगितलेल्या कित्येक व्याख्यांचें स्पष्टीकरण समजण्यासाठीं ही आकृति देत आहे.




* ग्र = ग्रह. अ ब = विषुववृत्त.
क ड = क्रांतिवृत्त. ई फ=याम्योत्तरवृ.
ग्र म = शर. ग्र य = क्रांति.
स = संपात. स य = विषुवांश
स म = भोग.

---

## लघुचिंतामणींतील मंगलाचरण.

यश्चिंतामणिरंकलेख्यबहुलोत्यल्प क्रियोमत्कृति— ।
स्तिथ्याद्यावगमप्रदोस्य सुखिनो ये लेखने भीरवः ॥

तस्मैत्यै लघुमल्पकृत्यममलं तिथ्यादिचिंतामणिं ।
विघ्नेशार्कमुखान्प्रणम्य कुरुते श्रीमद्गणेशः कृती: ॥१॥

अर्थ--तिथ्यादिकांचें ज्ञान देणारा व ज्याची गणितक्रिया फारच अल्प असा पूर्वी बृहच्चिंतामणि|| नामक ग्रंथ मी केला आहे, परंतु त्याचें अंकलेखन फार आहे. त्यामुळें सुखी व लेखनाविषयीं भित्रे अशा गणकांच्या संतोषार्थ कुशल मी गणेशदैवज्ञ श्रीगणपति व सूर्यादि ग्रहांस नमस्कार करून गणितक्रियेंत अल्प व निर्दोष असा लघुचिंतामणि नामक ग्रंथ करितो. १.

## पंचांगाचें उपकरण साधन.

व्यगैर्युगमनुशाकः स्यात्समौघोहतो यां स्वैरैरखख ।
कुभि राप्ता नागैंशत्याऽब्दपः स्यात् ॥
द्युमुख इह पलेषु व्यैठिधत्तद्वर्षयुक्तः
श्रुतिभिरिपुसमुद्रैर्भैर्युतोः सप्ततष्टः ॥२॥

अर्थ--ज्या शकाचें पंचांग करावयाचें असेल तो शक घेऊन त्यांतून १४४७ [ गणेशदैवज्ञांनीं १४४७ शकांत लघुचिंतामणि नामक ग्रंथ केला त्या कालापासून पुढील सालचें पंचांग करणें झाल्यास त्या शकांत १४४७ ] हा शक वजा करून जी बाकी राहील त्यास समौघ असें ह्मणावें [ समौघास वर्ष असें ह्मणतात. ] त्या समौघास १००७ यांनीं गुणून त्या गुणाकारास ८०० नीं भागावें. भाग वार, घटी, पळें असा घ्यावा; नंतर समौघास ४३ नीं भागून जो भागाकार पलात्मक येईल; तो वर आलेल्या भागाकाराचे पळांत मिळवावा; नंतर त्या वार, घटी, पलांत हा ( वा. ४ घ. ४५ प. २७ ) क्षेपक मिळवावा; वारांकास मात्र ७ नीं भागून बाकी जी राहील तो वार व पुढें असलेली घटी व पळें मांडावी ह्मणजे तो अब्दप होतो. २.

## उदाहरण.

### शके १८३६ या वर्षाचा समौघ व अब्दप आणतों.

शके १८३६ - १४४७ = ३८९ हा समौघ आला.

समौघ ३८९ यांस × १००७ = ३९१७२३ यांस ÷ ८०० = ४८९ वार ३९ घ. १३ पळें.. पुनः समौघ ३८९ यांस ÷ ४३ = ९ पळें आली; ही पळें वारादि, घटी, पळांत मिळवावी. ( ४८९ वा. ३९ घ. १३ प. + ९ प. = ४८९ वा. ३९ घ. २२ प. + क्षेपक ४ वा. ४५ घ. २७ प. = ४९४ वा. २४ घ. ४९ प. ) वारांक ४९४ यास ÷ ७ बाकी ४ उरली.

∴ ४ वार २४ घटी ४९ पळें हा अब्दप झाला.

## अब्दपास देशांतरसंस्कार.

×रेखायाः*स्वपुरस्थयोजनानि स्वांघ्र्यूनानि पलैश्च तत्प्रमाणैः ।
हीनाढ्यं विदधीत वर्षनाथं रेखायाः परपूर्वगे स्वदेशे ॥३॥

अर्थ--ज्या गांवाचें पंचांग करण्याचें असेल त्या गांवापासून जितक्या अंतरावर मध्यरेषा असेल त्या अंतराच्या योजनांचा चतुर्थांश घेऊन तो त्याच योजनांतून वजा करून बाकी राहील ती, गांव रेषेच्या पश्चिमेस असल्यास वजा करावी अगर पूर्वेस असल्यास मिळवावी; ह्मणजे शुद्ध अब्दप होतो. ३.

---

|| शके १४४१ त बृहच्चिंतामणी ग्रंथ केला.

× पुरी राक्षसी देवकन्या (लंका) थकांचा ॥ सितः पर्वतः पर्यली वत्सगुल्मं पुरीचोजयन्योन्हयागर्गराट् । कुरुक्षेत्रमेरुभुवोमध्यरेखायः ॥ १ ॥

* स्वस्थितिमध्ये असाही पाठ आहे.

### उदाहरण.

अब्दप ४ वा. २४ घ. ४९ प. आहे. ( कोल्हापूरची मध्यरेषा २४ योजनें आहे त्याचा चतुर्थांश ६ घेऊन तो त्यांतूनच वजा करावा:- २४-६=१८ हीं पळें आलीं हीं अब्दपांतून, कोल्हापूर हें मध्यरेखेच्या पश्चिमेस असल्यानें तीं पळें वजा करावी म्हणजे शुद्ध अब्दप होईल. अब्दप ४ वार २४ घ. ४९ पळे – १८= ४ वार २४ घटी ३१ पळें हा शुद्ध अब्दप झाला.

### तिथि–शुद्धि.

भंदनिघ्नसमाः स्वषट्सहस्रांशकहीनाः शरैंदा दिनांशयुक्ताः ।
तिथिपूर्वकशुद्धिरन्वितार्थैः कृतबाणैःश्च जिनैः खरामतष्टा ॥४॥

अर्थ—समौघास ११ नीं गुणावें. त्या गुणाकारास ६००० नीं भागून तिथ्यात्मक भागाकार घ्यावा. तो त्या गुणाकारांतून [ ११नीं गुणलेल्या समौघांतून ] वजा करावा आणि त्या बाकीस समौघास १५नीं भागून आलेला तिथ्यात्मक भागाकार मिळवावा नंतर त्यांत ( सृष्टीच्या आरंभापासून ग्रंथकालपर्यंत जे ति. ५ घ. ५४ प. २४ ) क्षेपक आले ते अंक मिळवून वरील अंकास मात्र ३० नीं भागून बाकी वरील अंकाच्या ठिकाणीं मांडावी म्हणजे तिथिशुद्धि झाली.

### उदाहरण.

शके १८३६ सालचा समौघ ३८९.

३८९ × ११ = ४२७९ यांस ÷ ६००० = ० ति. ४२ घ. ४७ पळें हे ४२७९ ति., घ., प. यांतून – ० ति. ४२ घ. ४७ प. = ४२७८ ति. १७ घ. १३ प. यांत + ( समौघ ३८९ ÷ १५ = २५ ति. ५६ घ. ० प. ) = ४३०४ ति. १३ घ. १३ प. यांत + क्षेपक ५ ति. ५४ घ. २४ प. = ४३१० ति. ७ घ. ३७ प. वरील अंक ४३१० ÷ ३० = १४३ बाकी २० ति. ७ घ. ३७ प. ही तिथिशुद्धि झाली चैत्रकृष्ण ५ सुद्धा. २० तिथि या मागील सालच्या उपकरणावरून करव्यात चैत्र कृष्ण ६ पासून चालू शक १८३६ च्या उपकरणावरून कराव्यात, चैत्र शुद्ध १ प्रतिपदेपासून कृष्ण ५ पंचमीसह २० तिथि यांस वाढा तिथि असें म्हणतात.

### तिथिध्रुव आणि नक्षत्रयोगध्रुव.

शुद्धिःखंषट् शोधितनाडिकाः स्यात्तिथिध्रुवोऽथ स्वदशांशहीना ।
शुद्धिस्तु मूर्ध्न्यैकयुक्ता खषट्भ्यः संशुद्धनाडीभयुजोध्रुवः स्यात् ॥५॥

अर्थः—तिथिशुद्धीच्या घटी व पळें मात्र ६० घटींतून वजा करावी, म्हणजे तिथिध्रुव येतो. नंतर शुद्धीचाच दशांश घेऊन शुद्धींत वजा करावा आणि पहिल्या ( वरील ) अंकात एक मिळवावा आणि घटी, पळें मात्र ६० तून वजा करावीं; म्हणजे तो नक्षत्रध्रुव व तोच योगध्रुव होतात. ५.

### उदाहरण.

तिथिशुद्धि वर आलेली २० ति. ७ घ. ३७ पळें.

६० – ७ घ. ३७ प. = ५२ घ. २३ प. ∴ २० ति. ५२ घ. २३ प. हा तिथीध्रुव झाला.

तिथीशुद्धि २० ति. ७ घ. ३७ प. चा दशांश ÷ १० = २ ति. ० घ. ४५ पळें हा त्यांतूनच वजा करून बाकी = १८ ति. ६ घ. ५२ प. + १ ति. = १९ ति. ६ घ. ५२ प. नंतर याची घटी, पळें ६० तून वजा करून = १९ ति. ५३ घ. ८ पळें हा नक्षत्रयोगध्रुव झाला.

## तिथिमध्यमकेंद्र.

सप्ताहतोजलधिशेषितवर्षसंघोऽब्दांगांशयुक्शरदिलादशनांशहीनः ।
केंद्रं तिथेर्भवति मध्यमिदं समुद्रैः सांघ्रैचऽब्धिवह्निभिरुपेतमिभाश्वितष्टम् ॥६॥

अर्थ–समौघास ४ नीं भागून बाकीस सातांनीं गुणून त्या गुणाकारांस, समौघास ६ नीं भागून भाग तिथ्यात्मक घेऊन मिळवावा आणि त्या बेरजेंतून समौघास ३२१ नीं भागून भागाकार तिथ्यात्मक घेऊन तो उणा करावा, नंतर त्यांत [ गणितारंभाचा तिथिमध्यमकेंद्राचा ) क्षेपक ४ ति. ३४ घ. १५ पळें मिळवून वरील अंकास २८ नीं भागून बाकी मात्र घ्यावी, ती त्या अंकाच्या ठिकाणीं मांडावी, ह्मणजे तिथिमध्यमकेंद्र होतें. ६.

### उदाहरण.

समौघ ३८९ यांस ÷ ४ = ९७ बाकी १ यांस × ७ = ७–०–०.

समौघ ३८९ यांस ÷ ६ = ६४–५०–० आणि,

समौघ ३८९ यांस ÷ ३२१ = १–१२–४२; ∴ ७–०–० + ६४–५०–० = ७१–५०–० – १–१२–४२ = ७०–३७–१८ + क्षेपक अंक ४–३४–१५ = ७५–११–३३ प. ∴ वरील अंक ७५ ÷ २८ = बाकी १९–११–३३ हे तिथिमध्यमकेंद्र झालें.

## नक्षत्रमध्यमकेंद्र व योगमध्यमकेंद्र.

## तिथिस्पष्टकेंद्र नक्षत्रस्पष्टकेंद्र व योगस्पष्टकेंद्र.

तद्विधास्वरसरामलवोनं स्वाश्विदस्रलवयुक्क्रमशस्तः ।
केंद्रके उडुयुजोर्निजकेंद्रं स्यात्स्फुटं ध्रुवघटीमुखयुक्तं ॥७॥

अर्थ–तिथिमध्यमकेंद्रास ३६ नीं भागून भागाकार अंशात्मक घेऊन तो त्यांतून [ तिथिमध्यमकेंद्रांतूनच ] वजा करावा ह्मणजे नक्षत्रमध्यमकेंद्र होतें. तसेंच तिथिमध्यमकेंद्रास २२ नीं भागुन अंशात्मक भागाकार त्यांतच मिळवावा ह्मणजे योगमध्यमकेंद्र होतें. यांस त्यांच्या ध्रुवांचीं घटी पळें मिळविली असतां [ तिथिमध्यम केंद्रांत तिथि-ध्रुवांची घटी, पळें आणि नक्षत्रयोग यांच्या मध्यमकेंद्रांत नक्षत्रयेगध्रुवांची घटी, पळें मिळवावी ] ह्मणजे तिथिस्पष्टकेंद्र व नक्षत्रस्पष्टकेंद्र आणि योगस्पष्टकेंद्र अशीं होतात. ७.

### उदाहरण.

तिथिमध्यमकेंद्र १९–११–३३ ÷ ३६ = ०–३१–५९. ति. म. केंद्र १९–११–३३ – ०–३१–५९ = १८–३९–३४ हें नक्षत्रमध्यमकेंद्र झालें.

ति. म. केंद्र १९–११–३३ ÷ २२ = ०–५२–२०. ति. म. केंद्र १९–११–३३ + ०–५२–२० = २०–३–५३ हें योगमध्यमकेंद्र आलें.

ति. म. केंद्र १९–११–३३ + ति. ध्रुं. ०–५२–२३ = २०–३–५६ हें तिथिस्पष्टकेंद्र आलें.

न. म. केंद्र १८–३९–३४ + न यो. ध्रुव ०–५३–८ = १९–३२–४२ हें नक्षत्रस्पष्टकेंद्र आलें.

यो. म. केंद्र २०–३– ५३ + यो. ध्रुव ०–५३–८ = २० - ५७ - १ हें योगस्पष्टकेंद्र आलें.

## भोगसाधन.

तिथेर्ध्रुवघटीमुखं स्वयुगर्षट्कभागोनितं ।
ह्युडोर्भवतियन्निजांबुधिगजांशकेनान्वितं ॥
युतेर्निजशिलो–च्चैयंक्षितिलवोनितंतद्युतः ।
पृथक् पृथगिहाब्दपो निजनिजश्च भोगो भवेत् ॥८॥

अर्थ–तिथिध्रुवांची घटी, पळें घेऊन त्याला ६४ नीं भागून आलेला भागाकार त्यांतच वजा करावा. तसेंच नक्षत्र ध्रुवांची घटी, पळें घेऊन त्याला ८४ नीं भागून तो भागाकार त्यांतच मिळवावा. तसेंच योग-ध्रुवांची घटी, पळें घेऊन त्याला १७ नीं भागून तो भागाकार त्यांतच वजा करावा. नंतर प्रत्येकांत अब्दप मिळवावा ह्मणजे अनुक्रमें तिथि भोग, नक्षत्र भोग, व योग भोग असे होतात.

## उदाहरण

तिथि–ध्रुव–२०–५२–२३ ∴ घटीमुख=५२–२३÷६४ = ०–४९(५२–२३–०–४९)=५१–३४ + अब्दप ४।२४।३१ = ५–१६–५ हा तिथि–भोग आला.

नक्षत्रध्रुव–१९–५३–८ ∴ घटीमुख = ५३–८÷८४ = ०–३७( ५३–८+०–३७ ) = ५३–४५+ अब्दप ४–२४–३१ = ५–१८–१६ हा नक्षत्र भोग झाला.

योगध्रुव १९–५३–८ ∴ घटीमुख=५३–८÷१७ = ३–७ (५३–८–३–७ )= ५०–१ + अब्दप ४–२४–३१=५–१४–३२ हा योग भोग आला.

## नक्षत्रस्पष्टभोग.

भस्पष्टकेंद्रमूर्धांकः स्ववेदाष्टांशसंयुतः ।
सप्ततष्टस्तदूनोहर्मुखः कार्योभभोगकः ॥९॥

अर्थ—नक्षत्र स्पष्ट केंद्राचा पहिला ( वरील ) अंक घेऊन त्यांस ८४ नीं भागून भागाकार अंशात्मक घेऊन त्यांतच ( पहिल्या अंकांतच ) मिळवून पहिले अंकास मात्र ७ नीं भागून जे शेष राहील; नक्षत्रभोगांत वजा करावें ह्मणजे नक्षत्र स्पष्टभोग होतो यासच भभोग असें ह्मणतात.

## उदाहरण.

नक्षत्र स्पष्ट केंद्र १९–३२–४२ याचा पहिला अंक १९ ∴ १९÷८४= ०–१३–३४ हे आलेले त्यांतच ह्मणजे १९।०।०+०–१३–३४ = १९–१३–३४ पहिला अंक १९÷७ शेष ५ उरले हे ( पहिला जो अंक १९ त्याचे ठिकाणीं मांडून बाकी राहिलेले अंक पुढें मांडावे ) ५–१३–३४ ( नक्षत्रभोग ५–१८–१६ यांतून–५–१३–३४ )=०–४–४२ हा नक्षत्र स्पष्ट भोग झाला यालाच भभोग ह्मणावें.

शके १८३६ सालचा समोघ ३८९ व या सालास पंचांग साधनाकरितां लागणारीं उपकरणें गणितानें आलीं ती खालीं लिहिल्याप्रमाणें:—

| | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ अब्दप ... ... | ४ | २४ | ३१ | ६ न० म० केंद्र ... | १८ | ३९ | ३४ | ११ तिथि–भोग ... | ५ | १६ | ४ |
| २ तिथि–शुद्धि ... | २० | ७ | ३७ | ७ यो० म० केंद्र ... | २० | ३ | ५३ | १२ नक्षत्र–भोग ... | ५ | १८ | १६ |
| ३ तिथि–ध्रुव ... | २० | ५२ | २३ | ८ ति० स्प० केंद्र | २० | ३ | ५६ | १३ योग–भोग ... | ५ | १४ | ३२ |
| ४ न० यो० ध्रुव ... | १९ | ५३ | ८ | ९ न० स्प० केंद्र... | १९ | ३२ | ४२ | १४ भ० स्प० भोग | ० | ४ | ४२ |
| ५ ति० म० केंद्र. | १९ | ११ | ३३ | १० यो० स्प० केंद्र | २० | ५७ | १ | | | | |

टीप–भाग घेतानां बाकी टाकावी.

* ही तिथि, तिथिध्रुवाच्या वरील अंकापुढची येते. मागील तिथि साधण्याची असेल तर मागील अंकाच्या ध्रुवांकावरूनच साधावी.

वर्षाच्या आरंभीं तिथिशुद्धीचा जो ऊर्ध्वांक असेल तितक्या चैत्र शुद्ध प्रतिपदेपासून गततिथी जाणाव्या.

नेहमीं तिथिशुद्धीचा ऊर्ध्वांक आणि तिथिध्रुवाचा ऊर्ध्वांक बरोबर असतो; ह्मणून अंतरही शून्य होतें. याकरितां तिथि, नक्षत्र आणि योग यांच्या आरंभास शून्य कोष्टक होतें.

# अथ पंचांगसाधन.

## तिथिदिनकोष्टक नक्षत्रदिनकोष्टक व योगकोष्टक.

चैत्रादेर्गततिथयो ध्रुवस्य तिथ्या हीनाः स्युस्तिथिदिनकोष्टकाद्विधाते ॥
स्वांगाग्न्यंशकराहिताः क्रमात् स्वदृक्दृक्भागाढ्या उडुयुतिजोस्त्यजेत्तदग्रं ॥१०॥

**अर्थ**—आपणास जी तिथि * आणावयाची असेल त्या तिथीपर्यंत चैत्रशुद्ध प्रतिपदेपासून गततिथि घेऊन त्यांतुन तिथिध्रुवाचा तिथ्यांक ह्मणजे पहिला [वरील ] अंक वजा करावा. जी बाकी राहील तो तिथिदिन-कोष्टक होय. ( हे सारणींत दिलें आहे ) त्या तिथिदिनकोष्टकला ३६ नीं भागून आलेला भागाकार त्यांतच [ तिथिदिनकोष्टकांत ] वजा करावा बाकी राहील ते नक्षत्रकोष्टक होय. त्याचप्रमाणें तिथिदिनकोष्टकांस २२ नीं भागून जो भागाकार आला असेल तो त्यांच कोष्टकांत मिळवावा ह्मणजे अनुक्रमें नक्षत्रकोष्टक व योगकोष्टक निघर्तं. १०.

### उदाहरण.

शके १८३६ कार्तिक कृष्ण ५ मी ही तिथि काढावयाची आहे. ही तिथि सूर्योदयीं कोणत्या वारीं येते व त्या दिवशीं ती किती भोगावयाची आहे हें पहावयाचें आहे.

चैत्र शु० १ दे पासून कार्तिक कृष्ण ५ मीपर्यंत गत ( तिथि ) २२९ दिवस गेले; यांत शके १८३६ चा तिथिध्रुव २०–५२--२३ आहे:- त्याचा पहिला अंक २० हा त्यांत २२९--२० वजा केला=२०९ बाकी ही तिथि दिनकोष्टक होय. तिथि सारणीकोष्टकांतील २०९ घरांत जी तिथि लिहिली आहे ती २ वा. ३४ घ. २३ प. अशी सारणींत आहे.

या २०९–तिथि दिनकोष्टकास ३६ नीं भागून जो भागाकार आला तो ५ त्यांत ( २०९–५ )=२०४ हा नक्षत्र दिनकोष्टक झाला.

तिथिदिनकोष्टक २०९ ÷ २२ = ९ हे त्यांत ( २०९ + ९ ) = २१८ हा योगदिनकोष्टक झाला.

## पराख्यादि तिथि व योग यांचें साधन.

स्वकेंद्रमूर्धांकयुताः स्वकोष्टकाः स्युस्ते पराख्या अथयत्तिथीयुजोः ।
द्युकोष्टकाधोद्युमुखं स्वभोगयुक् पराख्यकोष्टस्थघटीयुतोनितं ॥ ११ ॥

**अर्थ**—तिथिदिन, नक्षत्रदिन व योगदिन कोष्टकांत आपापले केंद्रावरील अंक मिळवावे ह्मणजे ते अनुक्रमें तिथि, नक्षत्र व योग यांचे पराख्य झालें. नंतर तिथीच्या व योगाच्या दिनकोष्टकाखालील ( सारणींतील वारादि अंक ) घेऊन त्यांत आपापला भोग मिळवावा आणि त्यांत [ सारणींतले ] पराख्य कोष्टकाखालचे अंक ज्याप्रमाणें ( सारणींत ) धनऋण असतात त्याप्रमाणें करावें. ११.

### उदाहरण.

तिथिदिन कोष्टक २०९ यांत तिथिस्पष्ट ( २० ति. ३ घ. ५६ प. ) केंद्रावरील + अंक २० व नक्षत्र-दिनकोष्टक २०४ यांत नक्षत्रस्पष्ट (१९ ति. ३२ घ. ४२ प. केंद्राचा पहिला अंक १९ व योगदिनकोष्टक २१९ यांत योगस्पष्ट ( २० ति. ५७ घ. १ प. ) केंद्राचावरील अंक २० हे अनुक्रमें मिळवून २२९।२२३।२३९ हे अंक तिथि, नक्षत्र, व योग यांचे पराख झाले आतां तिथिदिनकोष्टक २०९ ह्याच्याखालील सारणींतील वारादि अंक २ वा. ३४ घ २३ प. + तिथिभोग ५-१६-४ = ० वा. ५० घ २७ प. यांत तिथि पराख्य कोष्टकाचा अंक २२९ याच्याखालील सारणींतील अंक २३–१० हे धन आहेत. ∴ ० वा ५० घ २७ प.+ २३ घ. १० प. = १ वा. १३ घ. ३७ प. योगदिनकोष्टक २१९ ह्याच्याखालील सारणींतील वारादि अंक

३ वा. १८ घ. १७ प + योगभोग ५-१४-३२ = १ वा. ३२ घ. ४९ प. यांत योग पराख्य कोष्टकाचा अंक २३९ याच्याखालील सारणींतला अंक १९ - ३९ हे धन करणेचे आहेत. ∴ १ वा ३२ घ. ४९ प. + १९-३१=१-५२-२०.

## तिथि व योग ह्यांस हारसंस्कार.

अधस्थहारोधृतकेंद्रनाडिका सुसंस्कृतं स्यात्तपनोदयात्स्फुटं ।
तथैव चैकैकसमेतकोष्टकस्तदग्रतिथ्यादि दिनादिकं भवेत् ॥१२॥

अर्थः—तिथिस्पष्टकेंद्राच्या व योगस्पष्टकेंद्राच्या घटीपलास सारणींतील त्याच्या त्याच्या पराख्यकोष्टका-खालील हारानें भागावें. आलेला घटीपलात्मक भागाकार पूर्वी अलेल्या तिथींस व योगास धनऋण जसा असेल तसा संस्कार करावा ह्मणजे तिथि व योग सूर्योदयापासून स्पष्ट होतात. याप्रमाणें एकेका कोष्टकापासून पुढील दिनादिक येतील. १२.

### उदाहरण.

तिथिस्पष्टकेंद्राची ३ घ. ५६ प. यास पराख्यकोष्टकाखालील हारअंक ३८ यांनीं तिथिकेंद्राचे घ. ३ प. ५६ यांस ÷ ३८=६ पळें हीं धन आहेत. ∴ पूर्वी ११ श्लोकावरून आलेली तिथि १ वा. १३ घ. ३७ प. + ६ प. = १ वा. १३ घ. ४३ प. ही सूर्योदयाची तिथि कार्तिक कृष्ण ५ मी होय.

योगस्पष्टकेंद्राची ५७ घ. १ प. यास पराख्यकोष्टकाखालील हारअंक ४० यानीं. ∴ ५७१ ÷ ४० =१-२५ हे धन आहेत. पूर्वी ११ श्लोकावरून आलेला योग १ वा. ५२ घ २० प. + १ घ २५ प.= १ वा. ५३ घ. ४५ प. हा सूर्योदयाचा योग झाला.

## नक्षत्रसाधन.

पराख्यकोष्टे द्युमुखं तु भस्य स्वहारहृत्केंद्रघटीमुखेन ।
सुसंस्कृतं तच्च परिस्फुटं स्यात् स्वभोगयुक्तं तपनोदयात्स्यात् ॥१३॥

अर्थः—पूर्वी आलेला जो नक्षत्रपराख्य त्याच्या खालील सारणींतील वारादि कोष्टक घेऊन त्याच्या खालील हारानें नक्षत्र स्पष्ट केंद्राच्या घटी पलास भागून घटीपलात्मक आलेला भागाकार सारणींत धन ऋण असेल त्याप्रमाणें संस्कार करावा आणि त्यांत नक्षत्रभोग मिळवावा. ह्मणजे सूर्योदयापासून वारादिनक्षत्र स्पष्ट येईल. १३.

### उदाहरण.

नक्षत्र पराख्य कोष्टक २२२ या खालील सारणींतील वारादि अंक ० वा० ५७ घ. ५२ प. याचा हार २७ हा धन आहे यांनीं नक्षत्रस्पष्टकेंद्राची घ. ३२ प. ४२ यास ÷ २७ भागून भागाकार १ घ. १३ प. हं धन आहेः—वरील वारादि नक्षत्र ० वा. ५७ घ. ५२ प. + १ घ. १३ प. = ० वा. ५९ घ. ५ प. + नक्षत्रभोग ० वा ४ घ. ४२ प. = १ वार ३ घ. ४७ पळें हे सूर्योदयाचे स्पष्ट नक्षत्र झालें.

## तिथि क्षयवृद्धि.

उल्लंघ्य चेद्दिवसमेति तिथिः पराहं पूर्वेऽन्हि षष्टिघटिकाः स्युरिवंदिनार्द्धिः ।
एकान्हि चेत्तिथियुगं परनाडिकास्ताः पूर्वोनिताः स्युरिह पूर्वगमात्क्षयोयं ॥१४॥

अर्थ—तिथि ज्या वारीं यावयाची तो वार सोडून पुढचे वारीं आली तर पूर्व दिवशीं साठ घटिका मांडाव्या, त्यास दिनवृद्धि ह्मणतात; आणि एकाच वारीं जर दोन तिथी ( तिथियुग्म ) आल्या तर पूर्व तिथीनी घटी पळें दुसऱ्या तिथीच्या घटिका पळांतून वजा करावी यालाच क्षय ह्मणतात.

## उदाहरण.

शके १८३६ ज्ये० शु० ६ व ७ मी काढावयाची आहे.

चैत्रापासून गत तिथि ६५ यांतून तिथिध्रुवा (२०-५२-२३) चा वरील अंक २० हा वजा करून बाकी ४५ राहिलों हा तिथिदिनकोष्टक झाला.

यांत तिथिस्पष्टकेंद्र [२०।३।५६] चा वरील अंक २० मिळवून = ६५ हा तिथिपराख्य कोष्टक झाला.

तिथिदिनकोष्टक ४५ याचे खालील सारणींतील वारादि अंक [२-२४-५१] यांत + तिथिभोग ५-१६-४ = ०।४०।५५ हे आले.

यांत तिथिपराख्यकोष्टक ६५ याचे खालील सारणींतील अंक २१।१० घन आहे ह्मणून मिळवून = १-२-५ यांतून पराख्यकोष्टक ६५ याचे खालील हारांक १९ यांनीं तिथिस्पष्टकेंद्राची [घ. ३ प. ५६] यास भागून भागाकार १२ पळें आलीं हा हारांक ऋण आहे; ह्मणून व वजा करून बाकी १-१-५३ राहिली यावरून ज्येष्ठ शु॥ ६ रविवारीं घ. १ प. ५३ यावेळीं आहे.

चैत्रापासून गत तिथि ६६ यांतून तिथिध्रुव [२०-५२-२३] याचा वरील अंक २० वजा करून (६६-२०) = ४६ राहिली हा तिथिदिनकोष्टक झाला. यांत तिथिस्पष्टकेंद्र [२०-३-५६] याचा वरील अंक २० हा मिळवून [४६ + २०] = ६६ हा तिथिपराख्यकोष्टक झाला. तिथिदिनकोष्टक ४६ याचे खालील सारणींतील अंक वारादि घेऊन (३-२३-४६) यांत [तिथिभोग + ५-१६ ४] मिळवून = १-३९-५० हे आले. यांत तिथिपराख्यकोष्टक ६६ याचे खालील सारणींतील अंक १७-५६ धन आहेत ते मिळवून (१-३९-५० + १७-५६) = १-५७-४६ यांतून पराख्यकोष्टक ६६ याचे खालील सारणींतील हारांक १५ यानें तिथिस्पष्टकेंद्रच्या [३-५६ यास ÷ १५ नीं भागून भागाकार] = १६ पळें आलीं. हीं हारांक ऋण आहे ह्मणून १।५७।४६ यांतून १६ पळें --उणी करून बाकी १ वा. ५७ घ. ३० प. आलीं. यावरून ज्ये. शु॥ ७ रविवारीं ५७ घ. ३० प. आहे; परंतु या दोन्ही तिथी रविवारीं आल्या ह्मणून पूर्वतिथीच्या घटी १ प. ५३ ही दुसऱ्या तिथीच्या घ. ५७ प. ३० यांतून वजा करून बाकी = घ. ५५ प. ३७ हा ७ मीचा क्षय झाला असें समजावें.

शके १८३६ वैशाख कृष्ण १३ व १४ काढावयाची ह्मणून चैत्रापासून गत तिथि ५७ यांतून तिथिध्रुव (२०-५२-२२) याचा वरील २० वा अंक वजा करून बाकी ३७ राहिली. हा तिथिदिनकोष्टक झाला. यांत + तिथिस्पष्टकेंद्रावरील [२०-३-५६] २० वा अंक मिळवून = ५७ आले. हा तिथिपराख्य-कोष्टक झाला. तिथिदिनकोष्टक ३७ याचे खालील सारणींतील वारादि अंक [१ वार ३३घटी २२पळें] यांत + तिथिभोग ५।१६।४ मिळवून = ६ वार ४९ घटी २६ पळें हे आले. त्यांत तिथिपराख ५७ याचे खालील सारणींतील अंक ६-३७ हे धन आहेत ह्मणून मिळवून = ६-५६-३ आले; तिथिपराख्यकोष्टक ५७ याचे खालील हारांक (१०।।।) धन आहेत ह्मणून तिथिस्पष्टकेंद्राच्या [३ घ. ५६] यास १०।।। नीं भागून भागाकार २१ पळें आलीं. हीं धन आहेत ह्मणून ६-५६-३ + २१ प. = ६ वा. ५६ घ. २४ प. शुक्रवारीं वैशाखकृष्ण १३ घ. ५६ प. २४ आहे.

चैत्रापासून गततिथि ५८ यांतून तिथिध्रुव (२०-५२-२२) याचे वरील अंक २० वजा करून बाकी ३८ राहिली हा तिथिदिनकोष्टक झाला; यांत + तिथिकेंद्राचा वरील (२०-३-५६) अंक २० मिळवून = ५८ आले हा तिथिपराख्यकोष्टक झाला; तिथिदिनकोष्टक ३८ याचे खालील सारणींतील अंक २-३२-१९ वारादि यांत + तिथिभोग ५-१६-४ = ० वा. ४८ घ. २३ प आलीं. यांत तिथिपराख्यकोष्टक ५८ याचे खालील सारणींतील अंक १२ घटी १३ पळें धन आहेत ह्मणून मिळवून = १ वार ० घटी ३६ पळें आलीं; यांत तिथिपराख्यकोष्टक ५८ याचे खालील सारणींतील हारांक; १२ यानीं तिथिस्पष्टकेंद्राच्या घ. ३ प. ५६ यास ÷ १२ भागून भागकार ० घ. २० पळें आला हा हारांक धन आहे ह्मणून मिळवून १ वा. ० घ. ३६

+ २० पळें = १ घा. ० घ. ५६ प. हे आलें. यावरून वैशाखकृष्ण १४ रविवारीं घ ० प. ५६ आहे. परंतु वास्तविक म्हटलें म्हणजे शनिवारी असावी म्हणून चतुर्दशीची वृद्धि झाली. म्हणजे शनिवारीं चतुर्दशी ६० घ. ० प. भोगून दुसरे दिवशीं रविवारीं ० घ. ५६ प. चतुर्दशी शेष आहे असें झालें.

## नक्षत्र, योगज्ञान आणि त्यांची क्षयवृद्धि

निजध्रुवोर्ध्वांकयुतायुकोष्टका भैः शेषितास्ते भयुती च तेस्तः ॥

एकैकयुक्ते प्रतिकोष्टमत्र क्षयेऽपिवृद्धौ तिथिवद्विधिः स्यात् ॥१५॥

**अर्थ**—नक्षत्र व योग यांच्या दिनकोष्टकांत त्यांच्या ध्रुवांकांच्या वरील अंक मिळवून त्या बेरजेस २७नीं भागून बाकी जी राहील ती नक्षत्र व योग राहतात. त्यांत एकेक मिळवावा, म्हणजे पुढचें नक्षत्र व योग असे येतात. नक्षत्र आणि योग यांच्या क्षयवृद्धीविषयीं तिथीप्रमाणेंच विधि करावा. १५.

## उदाहरण.

शके १८३६ कार्तिक कृष्ण ५ या दिवशीं नक्षत्रयोग कोणते हे काढावयाचें नक्षत्रदिनकोष्टक २०३ यांत नक्षत्रध्रुव १९--५३--८ याचा वरील अंक १९ मिळवून [ २०३ + १९ ] = २२२ आले यांस २७ नें भागून बाकी ६ राहिली तेव्हां ६ वे नक्षत्र आर्दा हें आहे. योगदिनकोष्टक २१९ यांत योगध्रुवा ( १९–५३–८ ) वरील अंक १९ मिळवून [ २१९ + १९ ] = २३८ यास २७नीं भागून बाकी २२ उरलें; बाविसावा योग साध्य आहे.

## संक्रांति व महानक्षत्रें, आणि त्यांचा प्रवेश पूर्वपद्धतीनें कोणत्या तारखेस होतो ती तारीख.

साब्दे शकाः संक्रमणप्रवेशाद्वृषाद्यमर्क्षाच्च परिस्फुटाः स्युः ।

तिथिद्युकोष्टे लिखितं स्वनामयस्मिंस्तदासन्नदिनेथवा स्युः ॥१६॥

**अर्थ**—सारणींत संक्रांति आणि नक्षत्रें यांचीं कोष्टकें दिलीं असतात. त्यांत अब्दप मिळवावा. म्हणजे वृषभ संक्रांतिपासून संक्रमणप्रवेश होतात. आणि तसेंच भरणी नक्षत्रापासून महानक्षत्रांचे प्रवेश होतात. तिथिदिनकोष्टकांत जेथें संक्रांति व नक्षत्रें यांचीं नांवें लिहिलीं असतात त्या दिवशीं अथवा त्याचे जवळचे दिवशीं प्रवेश होतात. संक्रांतिप्रवेश झाल्यापासून तीस दिवसांचे अंतरानें दुसरा संक्रांतिप्रवेश होतो. आणि नक्षत्रप्रवेश झाल्यापासून चवदा दिवसांचे अंतरानें दुसरा नक्षत्रप्रवेश होतो.

## उदाहरण—संक्रांति प्रवेश शके १८३६ चा काढा.

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| मेष. | क्षेपक | ४–४९-- १ + | अब्दप ( ४--२४--३१ ) | = २।१३।३२ | अश्विनीमेषेर्कः एप्रिल ता. १३ |
| वृषभ | ,, | ४–४४-५७ + | ,, ,, | = ५। ९।२८ | वृषभेर्कः मे. ता. १४ |
| मिथुन | ,, | ४–१०--५० + | ,, ,, | = १।३५।२१ | मिथुनेर्कः जून ता. १४ |
| कर्क | ,, | ०-४८--४७ + | ,, ,, | = ५।१३।१८ | कर्केर्कः जुलई ता. १६ |
| सिंह | ,, | ४–१७–३७ + | ,, ,, | = १।४२। ८ | सिंहेर्कः आगस्ट ता. १७ |
| कन्या | ,, | ०–१९– ४ + | ,, ,, | = ४।४३।३५ | कन्येर्कः सप्टंबर ता. १६।१७ |
| तूळ | ,, | २–४५–४१ + | ,, ,, | = ०।१०।१२ | तुलार्कः आक्टोबर ता. १७ |
| वृश्चिक | ,, | ४–३९–२१ + | ,, ,, | = २। ३।५२ | वृश्चिकेर्कः नोव्हेंबर ता. १६ |
| धनु. | ,, | ६– ८–४६ + | ,, ,, | = ३।३३।१७ | मूळेधनुष्यर्कः दिसेंबर ता. १५ |
| मकर | ,, | ०–२७–४३ + | ,, ,, | = ४।५२।१४ | मकरेर्कः जानेवारी ता. १३।१४ |
| कुंभ | ,, | १–५४–२८ + | ,, ,, | = ६।१८।५९ | कुंभेर्कः फेब्रुवारी ता. १२ |
| मीन | ,, | ३–४३–३३ + | ,, ,, | = ३। ८। ४ | मीनेर्कः मार्च ता. १४ |

## उदाहरण महानक्षत्र प्रवेश शके १८३६ चा काढा.

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| अश्विनी | क्षेपक | ४-४९-- १ + | अब्दप ( ४-२४-३१ ) | = | २।१३।३२ | अश्विनीमेषेर्कः एप्रिल ता. १३ |
| भरणी | ,, | ४--२९--४१ + | ,, ,, | = | १।५४।१२ | भरण्यर्कः एप्रिल ता. २६ |
| कृत्तिका | ,, | ४-१७- ७ + | ,, ,, | = | १।४१।३८ | कृत्तिकार्कः मे. ता. १० |
| रोहिणी | ,, | ४--१०--४३ + | ,, ,, | = | १।३५।१४ | रोहिण्यर्कः मे. ता. २४ |
| मृग. | ,, | ४- ९--२३ + | ,, ,, | = | १।३३।५४ | मृगेर्कः जून ता. ७ |
| आर्द्रा | ,, | ४-११-४३ + | ,, ,, | = | १।३६।१४ | आर्द्रार्कः जून ता. २१ |
| पुनर्वसु | ,, | ४-१५-५३ + | ,, ,, | = | १।४०।२४ | पुनर्वस्वर्कः जुलई ता. ५ |
| पुष्य | ,, | ४-१९--४० + | ,, ,, | = | १।४४।११ | पुष्येर्कः जुलई ता. १९ |
| आश्लेषा | ,, | ४-२०-४८ + | ,, ,, | = | १।४५।१९ | आश्लेषार्कः आगस्ट ता. २ |
| मघा | ,: | ४-१७-३७ + | ,, ,, | = | १।४२। ८ | मघासिंहेर्कः आगस्ट ता. १६ |
| पूर्वा | ,, | ४- ८-५७ + | ,, ,, | = | १।३३।२८ | पूर्वार्कः आगस्ट ता. ३० |
| उत्तरा | ,, | ३-५३-५४ + | ,, ,, | = | १।१८।२५ | उत्तरार्कः सप्टंबर ता. १३ |
| हस्त | ,, | ३--३१-५१ + | ,, ,, | = | ०।५६।२२ | हस्तेर्कः सप्टंबर ता. २६।२७ |
| चित्रा | ,, | ३- २-४८ + | ,, ,, | = | ०।२७।१९ | चित्रार्कः आक्टोबर ता. १० |
| स्वाती | ,, | २-२६-५६ + | ,, ,, | = | ६।५१।२७ | स्वात्यर्कः आक्टो ता. २३।२४ |
| विशाखा | ,, | १-४४-४४ + | ,, ,, | = | ६। ९।१५ | विशाखार्कः नोव्हेंबर ता. ६ |
| अनुराधा | ,, | ०-५६-५६ + | ,, ,, | = | ५।२१।२७ | अनुराधार्कः नोव्हेंबर ता. १९ |
| ज्येष्ठा | ,, | ०- ४-३१ + | ,, ,, | = | ४।२९। २ | ज्येष्ठार्कः दिसेंबर ता. २ |
| मूळ | ,, | ६- ८-४६ + | ,, ,, | = | ३।३३।१७ | मूलेधनुष्यर्कः दिसेंबर ता. १५ |
| पूर्वाषाढा | ,, | ५-१०-४४ + | ,, ,, | = | २।३५।१५ | पूर्वाषाढार्कः दिसेंबर ता. २८ |
| उत्तराषाढा | ,, | ४-१२-१३ + | ,, ,, | = | १।३६।४४ | उत्तराषाढार्कः जानेवारी ता.१० |
| श्रवण | ,, | ३-१४-५८ + | ,, ,, | = | ०।३९।२९ | श्रवणेर्कः जानेवारी ता. २३ |
| धनिष्ठा | ,, | २-२०--१९ + | ,, ,, | = | ६।४४।५० | धनिष्ठार्कः फेब्रुवारी ता. ५ |
| शततारका | ,, | १-२९--३८ + | ,, ,, | = | ५।५४। ९ | शततारकार्कः फे. ता.१८।१९ |
| पूर्वाभाद्रपदा | ,, | ०--४३--५६ + | ,, ,, | = | ५। ८।२७ | पूर्वाभाद्रपदार्कः मार्च ता. ४ |
| उत्तराभाद्रपदा | ,, | ०-- ४-१२ + | ,, ,, | = | ४।२८।४३ | उत्तराभाद्रपदार्कः मार्च ता.१६।१७ |
| रेवती | ,, | ६-३०-४९ + | ,, ,, | = | ३।५५।२० | रेवत्यर्कः मार्च ता. ३० |

वर दाखविल्याप्रमाणें इंग्रजी महिन्याचे तारखेस संक्रांति व महानक्षत्रें यांचे प्रवेश होतात. परंतु शतकांचें शेवटीं एक किंवा दोन दिवसाचें अंतर हल्लीं येऊं लागलें आहे.

## अधिकमास, क्षयमास, स्पष्ट मेषसंक्रांति आणि वाढातिथि.

मेषाद्द्वादशसंक्रमैश्च सहिताश्चैत्रादिमासा अमां– ।
तो मासः सविसंक्रमोधिक इति द्विःसंक्रमः सक्षयः ॥
स्यात्स्पष्टोजभसंक्रमः प्रथमतः शुद्धेस्तृतीये दिने ।
शुद्धेः प्राक्तिथयोमधुः प्रतिपदः स्युः पूर्ववर्षध्रुवैः ॥१७॥

**अर्थ**—मेषसंक्रांतीपासून बारा संक्रांतींनीं युक्त असे चैत्रादिमास होतात. हा महिना अमावास्येपर्यंत समजावा. ज्या महिन्यांत संक्रांति मुळींच येत नाहीं तो अधिकमास व ज्यांत दोन संक्रांति येतात तो

क्षयमास* जाणावा. स्पष्ट मेषसंक्रांति तिथि शुद्धीच्या पूर्वी तीन दिवस होते. तिथिशुद्धीच्या पूर्वींच्या चैत्र शुद्ध प्रतिपदेपासून तिथि, पूर्ववर्षाच्या उपकरणावरून होतात यासच वाढातिथि ह्मणतात.

## उदाहरण,

शके १८३७ चैत्रकृष्ण ३० बुधे घ. २५ प. १७ अशी तिथि आहे त्याचे पूर्वी ह्मणजे चैत्र कृष्ण १४ भौमवार घ. २१ प. ५३ या दिवशीं अश्विनीमेषेर्कः [ मेषसंक्रांत ] झाली. पुढें वैशाख महिन्यांत शुद्ध प्रतिपदेपासून अमावास्येपर्यंत संक्रांत मुळींच नाही. तेव्हां वैशाखमास, अधिकमास आहे. यावरून ज्येष्ठमासाच्या ठिकाणीं वैशाखमासआला. शुद्ध वैशाखकृष्ण ३० भृगुवासरे घ. ६ प. १४ आहे. यापुढें ज्येष्ठमासास आरंभ होतो आणि त्याच दिवशींवृषभेर्कः घ. २५ प. ० यावेळीं वृषभसंक्रमण येतें.

## करणसाधन

पूर्वार्धे करणं बवाद्गततिथिर्द्विघ्न्यद्रितष्टा भवेत् ॥

तत्सैकं त्वपरे दलेऽथ शकुनेः स्युः कृष्णभूतोत्तरादर्धात् ॥ १ ॥

अर्थ—शुक्लप्रतिपदेपासून ज्या तिथीचें करण आणावयाचें असेल त्या तिथिच्या पूर्वतिथि [ गततिथि ] मोजून जी संख्या येईल तिची दुप्पट करून त्यास ७ नीं भागावें आणि शेष उरेल तें बवकरणापासून त्या तिथीच्या पूर्वार्धी करण होतें. आणि त्यांत एक मिळविला ह्मणजे उत्तरदलीचें करण होतें. प्रत्येक तिथीस दोन करणें भोगतात. करणाचीं नावें करणप्रकरणांत दिलीं आहेत तीं पहावीं. १.

## विष्टि ( भद्रा, किंवा कल्याणि )

शुक्ले पूर्वार्धेष्टमीपंचदश्योर्भद्रैकादश्यां चतुर्थ्यां परार्धे ॥

कृष्णेंऽत्यार्धे स्यात् तृतीयादशम्योः पूर्वे भागे सप्तमीशंभुतिथ्योः ॥२॥

अर्थ—शुक्लपक्षीं ८ आणि १५ यांचे पूर्वदलीं, एकादशीं व चतुर्थी यांचे उत्तरदलीं कृष्णपक्षीं तृतीया आणि दशमी यांचे उत्तरदलीं, सप्तमी व चतुर्दशी यांच्या पूर्वदलीं भद्रा येते. २.

## करणाच्या घटिकादि साधन.

ज्या तिथीस करणाच्या घटिका आणावयाच्या असतील त्या तिथीच्या गतैष्य [ भुक्त भोग्य ] घटिका पलांचा योग करून त्यास २ नीं भागून भागाकार घटिपलात्मक घेऊन त्यांतून इष्ट तिथीचीं भुक्त घटीपलें वजा करावीं आणि जी बाकी राहील ती करणाचीं भोग्य घटी पलें आहेत असें समजावें. तिथ्यर्ध तुल्य घटिका असतील तर त्याच करणाच्या भोग्य घटी आहेत असें जाणावें. तिथीचा क्षय किंवा वृद्धि झाली ह्मणजे करणाचीही होते.

## उदाहरण.

शके १८३६ कार्तिक कृष्ण ५ रविवार घ. १३ प. ४३ त्या दिवशीं कोणतें करण आहे व त्याचीं घटीपलें किती आहेत हें सांग.

गत तिथि १९ × २ = ३८ ÷ ७ = ३ उरले तेव्हां तिसरें कारण कौलव आहे. परंतु तिथि अर्ध्या तिथीच्या पुढें आहे. ह्मणून त्यांत एक १ अधिक केला ह्मणजे तिथीच्या उत्तरार्धाचें करण तैतिल येतें. तिथ्यर्ध तुल्य ही तिथि आहे ह्मणून तैतिल करण घ. १३ प ४३ त्या दिवशीं आहे.

शके १८३६ कार्तिक कृष्ण १२ शनिवार घ. ५४ प. २४ या दिवशीं करण कोणतें येतें व त्याचीं घटी पलें किती. हें उदाहरण क्षयतिथीच्या पुढचें मुद्दाम करण कोणतें व त्याचीं घटीपलें करीं काढावीं हे समजण्याकरितां दिलें आहे.

---

* अधिकमास व क्षयमास या बद्दल पूर्वी मासप्रकरणांत विशेष माहिती दिली आहे ह्मणून येथें दिली नाहीं.

गततिथि २६ × २ = ५२ ÷ ७ = ३ बाकी राहिली ह्मणून तिसरें करण कौलव आहे. याचीं घटी पळें काढावयाचीं आहेत. ह्मणून दशमी तिथि ४ घ. ३३ प. व एकादशीचा क्षय आहे. परंतु त्याची घ. ५५ प. १४ याप्रमाणें आहे. तेव्हां दोन्हीं तिथींचा योग केला तो ५९ घ. ४७ प. आला. ह्मणून ६० घ. –५९.–४७ = ० घ. १३ प. आला यांत + द्वादशीच्या घ. ५४ प. २४ मिळविल्या त्या = ५४ घ. ३७ प. आली याख ÷ २ = २७–१८ – ० घ. १३ प. = २७ घ. ५ पळें कौलव करण त्या दिवशीं आहे.

## हा ग्रंथ कोणकोणत्या सिद्धांतांतून ग्रह घेऊन केला त्याची माहिती ग्रंथकार देतो.

सौरोर्कोपि विधूच्चमंककलिकोनाब्जस्तमस्त्वार्यज-
स्तेभ्यः स्याद्ग्रहणादिदृक्समिमयं प्रोक्ता मया सा तिथिः ॥
ग्राह्या मंगलधर्मनिर्णयविधावेषा यतो दृक्समा—
थापेक्षा यदि चालितोपकरणैस्तत्पक्षजास्यात्तिथिः ॥१८॥

अर्थ–सूर्य सिद्धांतातील सूर्य व चंद्रोच्च व त्यांच सिद्धांतातील नऊ कलानीं उणा चंद्र व आर्य सिद्धांतातील राहू यापासूनच सिद्ध केलेलें ग्रहणादि अनुभव बरोबर मिळतात ह्मणून तत्पक्षीय ग्रहापासून येथें तिथिसाधन कलें आहे. व हीच तिथि दृष्टीला बरोबर मिळतें ह्मणून याच तिथीवरून घर्मनिर्णय विधि व मंगलादि कार्यें करावीं. जर कोणाला आर्यसिद्धांतादि पक्षाच्या तिथींची अपेक्षा असेल तर उपकरणास चालन देऊन साधावी.

हा ग्रंथ ज्यांनीं केला त्याची परंपरा अशी आहे कीं, सर्व वेदामध्यें निपुण, ज्याला शिष्य व प्रशिष्य अनेक आहेत, पृथ्वीवरील सर्व पंडित ज्याची सत्कीर्ति गातात, ज्योतिष विद्या जाणणाऱ्यांमध्यें श्रेष्ठ व सत्यवक्ता व गुणाचा केवळ समुद्र असा केशव नामक गुरू सर्वोत्कर्षेंकरून राहतो. सर्वांच्या कृपावलोकनानें ज्यास ज्ञान प्राप्त झालें आहे असा व वर लिहिलेल्या गुरूचा पुत्र जो क्षीर समुद्राच्या पूर्वेकडे कोंकणांत नंदिग्रामीं राहणारा अशा गणेश दैवज्ञानें ही तिथि सिद्धि केली आहे.

---

# छत्रेकृत पंचांगसाधन कोष्टकावरून.

## संक्रांतिमानें, आणि मेषसंक्रांतीचे आरंभापासून कोणत्याही संक्रांतीचे आरंभापर्यंतचा काल.

| | संक्रांतीचीं नांवें | प्रत्येक संक्रांतीचें मान. | | | मेषारंभापासून पुढील संक्रांतीचे आरंभापर्यंत. | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | दि. | घ. | प. | | | दि. | घ. | प. |
| १ | मेष. | ३० | ४८ | ५८·७६ | मेषारंभापासून. | वृषभारंभापर्यंत. | ३० | ४८ | ५८·७६ |
| २ | वृषभ. | ३१ | १४ | १७·८५ | ,, | मिथुनारंभापर्यंत. | ६२ | ०३ | १६·६१ |
| ३ | मिथुन. | ३१ | २६ | ५०·४१ | ,, | कर्कारंभापर्यंत. | ९३ | ३० | ०७·०२ |
| ४ | कर्क. | ३१ | २२ | ३९·६९ | ,, | सिंहारंभापर्यंत. | १२४ | ५२ | ४६·७१ |
| ५ | सिंह. | ३१ | ०२ | ५९·३२ | ,, | कन्यारंभापर्यंत. | १५५ | ५५ | ४६·०३ |
| ६ | कन्या. | ३० | ३३ | ३४·७९ | ,, | तूलारंभापर्यंत. | १८६ | २९ | २०·८२ |
| ७ | तूळ. | ३० | ०२ | ४१·७९ | ,, | वृश्चिकारंभापर्यंत. | २१६ | ३२ | ०२·६१ |
| ८ | वृश्चिक. | २९ | ३८ | ३०·३४ | ,, | धनारंभापर्यंत. | २४६ | १० | ३२·९५ |
| ९ | धन | २९ | २६ | ५८·७१ | ,, | मकरारंभापर्यंत. | २७५ | ३७ | ३१·६६ |
| १० | मकर. | २९ | ३० | ५०·१५ | ,, | कुंभारंभापर्यंत. | ३०५ | ०८ | २१·८१ |
| ११ | कुंभ. | २९ | ४९ | ०९·८२ | ,, | मीनारंभापर्यंत. | ३३४ | ५७ | ३१·६३ |
| १२ | मीन. | ३० | १७ | ५१·५१ | ,, | मेषारंभापर्यंत. | ३६५ | १५ | २३·१४ |

## सौर शकांत संक्रांतीच्या आरंभीची तिथि व तिथिकेंद्र समजण्याचें, आणि संक्रांति ज्या हिंदू व इंग्रजी महिन्यांत येतात त्यांचीं नांवें—

| ज्या संक्रांति ज्या मासांत येतात त्यांचीं नांवें. | | | | मेष संक्रांतीपासून तिथिभेद. | | | संक्रांतीच्या वेळेचे तिथि केंद्रभेद. | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| सं. ना. | हिंदू महिन्याचे नांव. | इं. महिन्याचें नांव. | तारीख | तिथि. | घ. | प. | केंद्र. | घ. | प. |
| मेष | चैत्र | एप्रिल | ९ | ० | ०० | ०० ०० | ० | ०० | ५४·=० |
| वृषभ | वैशाख | मे | १० | १ | १८ | ५६·८७ | ३ | १८ | ४९·१९. |
| मिथुन | ज्येष्ठ | जून | १० | ३ | ०७ | ००·३० | ७ | ३ | १७·५१ |
| कर्क | आषाढ | जुलै | १२ | ५ | ९ | १७·४६ | ११ | ० | ३९·२९ |
| सिंह | श्रावण | आगष्ट | १३ | ७ | ७ | ४६·२४ | १४ | ५४ | २८·४३ |
| कन्या | भाद्रपद | सप्टेंबर. | १२ | ८ | ४२ | ४५·३३ | १८ | २६ | ३७·९४ |
| तूळ | आश्विन | आक्टोबर | १३ | ९ | ४५ | ५९·३७ | २१ | २९ | ४०·७६ |
| वृश्चिक | कार्तिक | नवंबर | १२ | १० | १५ | ८·१३ | २४ | १ | २७·१० |
| धन | मार्गशीर्ष | दिसेंबर | १३ | १० | १७ | ३७·६८ | २६ | ८ | ३७·४२ |
| मकर | पौष | जानेवारी | ९ | १० | ७ | ४२·६९ | ० | ४ | ६·२० |
| कुंभ | माघ | फेब्रुवारी | ८ | १० | २ | ४·४८ | २ | ३ | ३०·७६ |
| मीन | फाल्गुन | मार्च | ९ | १० | १६ | ३८·१५ | ४ | २१ | ३०·२० |

## नॉटिकल अल्मनाकवरून हिंदु पंचांग करण्याची रीति.

ज्या ठिकाणचें पंचांग करावयाचें असेल त्या ठिकाणचे प्रथम ग्रीनिचपासून अक्षांश व रेखांश घ्यावेत. से पुढें दिले आहेत.

उदाहरणार्थ.–कोल्हापूरचें पंचांग तयार करावयाचें. ह्मणजे इष्टस्थान कोल्हापूर. कोल्हापूरचे अक्षांश –१६ अं. ४१ क. ५७ वि. रेखांश– ७४ अं. १३ क. यांचे तास करावेत. ह्मणजे रेखांशास १५ नीं भागावें. ( २४ तासास ३६० अं. भोगतात तर १ तासास किती अं. = १५ अं. पंधरा अंशांचा एक तास. ) ह्मणून ४ ता. ५६ मि. ५२ से. हा ग्रीनिचपासून कोल्हापूरचा रेखांतर काल होय.

नॉटिकल अल्मनाकमध्यें दररोजचा ग्रीनिच येथील १२ वाजतांचा सूर्याचा भोग ( लाँजीट्यूड ) प्रत्येक महिन्याच्या ३ ऱ्या पृष्ठामध्यें दिला असतो. व चंद्राचा भोग दिवसा १२ वाजतांचा व रात्रौ १२ वाजतांचा ४ थ्या पृष्ठावर दिला असतो.

ज्या दिवसाचे तिथि नक्षत्र योग साधन करणें असेल त्या तारखेचे व त्याच्या मागील व पुढील तारखांचे [ वर्तमान, गत व एष्य ] ग्रीनिच मध्यान्हीचे स्पष्ट सूर्य व चंद्र घेऊन प्रथम व द्वितीय आणि तृतीय व द्वितीय यांतील अंतरें काढून त्यांच्या बेरजेचें अर्ध करावें ह्मणजे सूर्यचंद्राची वर्तमानदिवशीं स्पष्ट गति येईल. [ सूक्ष्मतेकरितां चंद्राची गति १२ तासांची घ्यावी ]. नंतर त्या गतीवरून व इष्टस्थलाचे रेखांशावरून इष्टकालाचे ग्रह करावेत.

नॉटिकल आल्मनाकमध्यें ग्रीनिच येथील मध्यन्हीचे ग्रह दिले असतात. ते इष्टस्थलाचे व इष्टकालचे इष्टदिवसाचे करावेत. इष्टस्थल उदाहरणार्थ आह्मी कोल्हापूर घेतलें आहे. कोल्हापूरचे रेखांश ४ ता. ५६ मि. ५२ से. आहेत. ह्मणजे नॉ. अल्मनाकमध्यें दिलेले ग्रह कोल्हापूरचे बारा वाजून ४ ता. ५६ मि. ५२ से. चे आहेत. इष्टकाल उदाहरणार्थ मध्यम सूर्योदय घेऊं. ह्मणजे प्रातःकालीं ६ वाजताचे ग्रह काढणेचे आहेत. ह्मणून ४ ता. ५६ मि. ५२ से. यांत ६ ता. मिळविले असतां १० ता. ५६ मि. ५२ से. हा मध्यमसूर्योदयाचा ध्रुवक [ काल ] झाला.

आतां इष्टदिवसाचे ग्रह करणेचे, उदाहरणार्थ शके १८३५ च्या अक्षय्य (वैशाख शुद्ध) तृतीयेचे [ ह्म ता ९ मेचे ] तिथि, नक्षत्र व योग आणणेचे. त्यास नॉ. अल्मनाकवरून त्या दिवशीचे कोल्हापूरचे मध्यम सूर्योदय कालीन रवि व चंद्र आणिले पाहिजेत.

शके १८३५ ची अक्षय्य ( वै. शु. ) तृतीया तारीख ९ मे १९१३ रोजीं आहे. ह्मणून १९१३ च नॉटिकल आल्मनाकचे मे महिन्याचे पान २ व ३ वरून ता. ८।९ व १० चे रविचंद्राचे भोग वगैरे घतले ते खालीं दिले आहेत.

## सूर्य.

| तारीख वार. | रविभोग ( लॉंजिट्यूड् ) | | | कान्ति ( अपेरंट डेक्लिनशन् ) | | | विंबार्ध ( सेमिडाय ) मिटर | | नाक्षत्रकाल ( सायडीरियल ) टाइम | | | वलांतर धन इंक्वशनआफ्) टाइम | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | अं. | क | वि. | अं. | क. | वि. | N क. | वि. | ता. | मि. | से. | मि. | स. |
| ८ गुरु | ४७ | १६ | २९.८ | १७ | ० | १.५ | १५ | ५१.९८ | ३ | २ | ५० | ३ | ३५.९९ |
| ९ शुक्र | ४८ | १४ | ३०.५ | १७ | १६ | १६ | १५ | ५१.७६ | ३ | ६ | ४६ | ३ | ३९.४३ |
| १० शनि | ४९ | १२ | २९.५ | १७ | ३२ | १३ | १५ | ५१.५५ | ३ | १० | ४३ | ३ | ४२.३१ |

### यावरून.

| | | | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ता. ८ व ९ मधील अंतर. | ० | ५८ | ०.७ | ० | १६ | १४.५ | ० | ०.२२ | ० | ३ | ५६ | ० | ३.४४ |
| ता. ९ व १० मधील अंतर | ० | ५७ | ५९.० | ० | १५ | ५७ | ० | ०.२१ | ० | ३ | ५७ | ० | २.८८ |
| वेरीज | ० | ११५ | ५९.७ | ० | ३२ | १२ | ० | ०.४३ | ० | ७ | ५३ | ० | ६.३२ |
| निम्मे करून गति | ० | ५७ | ५९.८ | ० | १६ | ६ | ० | ०.२२ | ० | ३ | ५६ | ० | ३.१६ |

मे महिन्याचे पृष्ठ ३।४ वरून.

## चंद्र.

| तारीख व वेळ | भोग ( लॉंजिट्यूड ) | | | विंबार्ध सेमिडायामिटर | | लंबन हॉरिझाँटल पॅरलॅक्स | | शर ( लॅटिट्यूड् ) | | | एज् | मेरीडियन् पॅसेज् ऊर्ध्व अधर |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | अं. | क. | वि. | क. | वि. | क. | विं. | अं. | क. | विं. | विं. | |
| ८ मध्यान्ह | ७३ | १९ | ३८.७ | १५ | ३७.४५ | ५७ | १४.५७ | ४ | ५१ | ३३.८ | २.१५ | |
| ८ मध्यरात्र | ८० | १ | ३३.७ | १५ | ४१.४३ | ५७ | २९.१३ | ५ | १ | ९.१ | | |
| ९ मध्यान्ह | ८६ | ४६ | ३८.८ | १५ | ४५.२६ | ५७ | ४३.१७ | ५ | ६ | ३८ | ३.१५ | |
| पहिलें अंतर | ६ | ४१ | ५५ | ० | ३.९८ | ० | १४.५६ | ० | ९ | ३५.३ | | |
| दुसरें अंतर | ६ | ४५ | ५.१ | ० | ३.८३ | ० | १४. ४ | ० | ५ | २८.९ | | |
| बेरीज | १३ | २७ | ०.१ | ० | ७.८१ | ० | २८.६० | ० | १५ | ४.२ | | |
| २ नीं भागून गांत | ६ | ४३ | ३० | ० | ३.९० | ० | १४. ३ | ० | ७ | ३२.१ | | |

हे वरील सूर्यचंद्राचे गतीचे अंक ध्रुवकालीन आहेत. ते गतिसंस्कारानें ह्मणजे २४ तासास जर इतकी गतिः तर १० ता. ५६ मि. ५२ सेकंदास किती अशा त्रैराशिकानें प्रातःकालीन केले ते—

| ग्रह | भोग | | | गति | | | ग्रह | भोग | | | गति | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | अं. | क. | वि. | अं. | क | वि. | विंबार्धलंबन | अं. | क. | वि. | क | वि. |
| स्पष्टरवि | ४७ | ४८ | ३ | ० | ५७ | ५९ | रविंविंबार्ध | ० | १६ | ५१.८५ | ० | ०.२२ |
| स्पष्टचंद्र | ८० | ३८ | ४६ | १३ | २७ | ० | चंद्रविंबार्ध | ० | १५ | ४२.३४ | ० | ३.९ |
| रविक्रांति | १७ | ८ | ५६ | ० | १६ | ६ | चंद्रपरमलंबन | ० | ५७ | ३०.२८ | ० | १४.३ |
| चंद्रशर | ४ | ५९ | ५० | ० | ७ | २७ | | | | | | |
| | | | | बारा तासाचा | | | | | | | | |

## तिथिसाधन.

* स्पष्ट चंद्रांतून स्पष्टरवि वजा करावा. बाकी राहील त्याचे अंश करावेत. आणि त्यास १२ नीं भागावें. भागाकार येईल तितक्या गततिथी झाल्या. बाकी राहील तितके अंश पुढील तिथीचे भुक्तांश झाले व ते १२ अंशांतून वजा केले ह्मणजे भोग्यांश येतात. नंतर भुक्तांश व भोग्यांश यांच्या विकला करून त्यांस ६० नीं गुणावें आणि रविचंद्रांच्या स्पष्टगतीच्या वजाबाकीनें भागावें. भागाकार येतील तितक्या घटिका व पळें त्या तिथीच्या अनुक्रमें भोगून गेल्या व भोगण्याच्या राहिल्या असें समजावें.

चालू उदाहरणांवरून पहातां--

स्पष्ट. चंद्र ८० अं. ३८ क. ४९ वि. – स्प. र ४७ अं. ४८ क. ३ वि. = ३२ अं ५० क. ४६ वि. ÷ १२ = २ गततिथी येतात व बाकी ८ अं. ५० ४६ वि. = ५३० क. ४६ वि. राहते हे तृतीयेचे भुक्तांश. आणि तेच बाकी १२ तून वजा केले ह्मणजे = ३ अं. ९ क. १४ वि. = १८९ क. १४ वि. येते हे तृतीयेचे भोग्यांश होत. चंद्रगति – ( १३ अ. २७ क. ० वि. ) रविगति – ( ० अं. ५७ क. ५९ वि. ) = १२ अं. २९ क. १ वि. = ४४९४१ वि.

भुक्तांश = ५३० क ४६ वि. = ३१८४६ वि. यास × ६० = १९१०७६० ÷ ४४९४१ = तृतीयेची भुक्त ४२ घ. ३१ प.
भोग्यांश = १८९ क. १४ वि. = ११३५४ वि. यास × ६० = ६८१२४० ÷ ४४९४१ = तृतीयाभोग्य १५ घ. ९ प.

सर्व तिथि = ५७ घ. ४० प.

---

## नक्षत्रसाधन.

नक्षत्रसाधनास अयनांशाची गरज आहे यासाठीं प्रथम अयनांश काढले पाहिजेत.

शके ४९७ या वेळीं अयनांश शून्य होते.

अयन ( संपात ) गति दरवर्षास ५०·२ विकला आहे.

शके १८३५ – ४९७ = १३३८.

एका वर्षास ५०·२ विकला गति आहे तर १३३८ वर्षास किती? याप्रमाणें त्रैराशिकानें १३३८ × ५०·२ = ६७१६८ विकला = १८ अंश ३९ कला २९ विकला हे वर्षप्रतिपदेचे अयनांश झाले. आह्मास वैशाख शुद्ध ३ चे पाहिजेत. दर वर्षास किंवा १२ महिन्यास जर ५०·२ विकला गति तर १ महिन्याची किती. याप्रमाणें ४·१ विकला गति येते. फक्त चैत्र हा एकच महिना गेला असल्यामें वरील अयनांशांत ४ विकला मिळविले ह्मणजे १८ अंश ३९ कला ३३ विकला हे अयनांश आले.

निरयण स्पष्ट चंद्रास कलात्मक करावा व त्या कलास ८०० नीं भागावें. कारण ८०० ही एका नक्षत्राच्या ४ चरणांची गति आहे. ( १३ कला २० विकला = ८०० विकला ) भागाकार येईल तितकीं गतनक्षत्रें समजावीं. बाकी राहील ती पुढील नक्षत्रसंबंधाची आहे.

## प्रस्तुत उदाहरणांत.

सायन स्पष्ट चंद्र ८० अंश ३८ कला ४९ विकला आहे. यांत अयनांश १८ अंश ३९ कला ३३ वि. वजा केले ह्मणजे नि. स्पष्ट चंद्र ६१ अंश ५९ कला १६ विकला = ३७१९ कला १६ विकला यास ८०० नीं भागिलें ह्मणजे भागाकार ४ येतो. ह्मणजे अश्विन्यादि ४ नक्षत्रें गत झालीं. बाकी ५१९ कला १६ विकला राहिली ती ४ + १ = ५ वें ह्मणजे मृगनक्षत्राच्या भुक्तकला व ८०० कला – ( ५१९ कला १६ विकला ) = २८० कला ४४ विकला भोग्य कला होत. भोग्य विकलांस ६० नीं गुणावें व चंद्राच्या स्पष्ट गतीनें

---

* ( तिथीचा संबंध आरंभस्थानाशीं नाहीं ). ह्मणून सायन किंवा निरयण तिथि घटिपलात्मक एकच येते. सबब तिथि काढतानां अयनांशाची गरज नाहीं.

भागावें. भागाकार येईल तितक्या भोग्य घटिका आहेत. असें समजावें. हेंच कृत्य भुक्तकलांस करून भुक्त घटिका पलें काढावींत. भुक्त व भोग्य घटिका पलांची बेरीज तें सर्वर्क्ष होय.

प्रस्तुत उदाहरणांत चंद्राची स्पष्टगति १३ अंश २७ कला = ८०७ कला = ४८४२० विकला आहे.
भुक्तकला ५१९ क. १६ वि. = ३११५६ वि. यास × ६० = १८६९३६० ÷ ४८४२० वि. = ३८ घ. ३६ प. भुक्त घ. प.
भोग्यकला २८० क. ४४ वि. = १६८४४ वि. यास × ६० = १०१०६४० ÷ ४८४२० वि. = २० घ. ५२ प. भोग्य घ. प.

५९--२८ = सर्वर्क्ष.

## करणसाधन

गततिथींच्या संख्येस २ नीं गुणून ७ नीं भागावे. भाग सोडून बाकी मात्र घ्यावी. या बाकीस अंकाप्रमाणें बवकरणापासून क्रमानें मोजावें. जो करण येईल तो तिथीच्या पूर्वार्धाचा समजावा. त्यांत १ मिळविला ह्मणजे उत्तरार्धाचा करण येतो.

तिथीच्या भुक्त व भोग्य घटिकांचे बेरजेस २ नीं भागावें आणि त्यांतून भुक्त घटीपलें वजा करावींत ह्मणजे अर्धात करणाच्या भोग्य घटिका पलें§ येतात.

दर महिन्याच्या कृष्ण चतुर्दशीच्या उत्तरार्धीं शकुनिकरण, अमावास्येच्या पूर्वार्धीं चतुष्पद व उत्तरार्धीं नाग; शुद्ध प्रतिपदेचे पूर्वार्धीं किंस्तुघ्न अशी स्थिर करणें आहेत. व बाकीची बवादि ७ करणें चल आहेत.

याप्रमाणें चालू उदाहरणांत गततिथि २ आहे. यास २ नीं गुणून ७ नीं भागिलें ह्मणजे बाकी ४ राहते. यावरून तैतिलकरण तृतीयेचें पूर्वार्धीं गेलें. तृतीया १५ घटी ९ पळें भोग्य आहे ह्मणून उत्तरार्धीं गरजकरण आहे त्याच्या १५ घटी ९ प.

तिथ्यर्ध कमी असल्यानें घटी काढण्याचें कारण नाहीं.

## योगसाधन.

निरयण स्पष्ट रविचंद्राच्या भोगांची बेरीज ( योग ) करून त्याच्या कला कराव्या व त्यास ८०० नीं भागावें. जो भागाकार येईल ते गतयोग होत, आणि जी कलादि बाकी राहील ती भुक्तयोग ह्मणजे योगाचा गेलेला भाग होय. तो ८०० कलांतून वजा करून जी बाकी राहील तो भोग्य योग होय. नंतर भुक्त व भोग्य योगांच्या विकला करून त्यास प्रत्येकीं ६० नीं गुणून गुणाकारास रविचंद्राच्या स्पष्टगतीच्या बेरजेच्या विकलांनीं ( योगाच्या ) भागावें ह्मणजे अनुक्रमें योगाच्या भुक्त व भोग्य घटिका पलें येतील. प्रस्तुत उदाहरणांत

सायन स्प. र. ४७अं. ४८क. ३वि. उणें अयनांश १८अंश. ३९क ३३वि. = २९अं. ८क. ३०वि. = नि. स्प. र.
„ „ चं. ८०अं. ३८क. ४९वि. „ „ १८अं. ३९क. ३३वि. = ६१अं. ५९क. १६वि = नि. स्प. चं.
यांचा योग ( बेरीज ) ९१अं. ७क. ४६वि. = ५४६७·७वि.*

५४६७·७वि. ÷ ८०० = ६ $\frac{६६७·७}{८००}$ ह्मणजे ६ योग भोगून जाऊन ७ वा सुकर्मा योग चालू आहे. आतां त्याच्या घटी काढणेच्या.

रविगति—( ५७ कला ५९ विकला ) + चंद्रगति ( १३ अंश २७ कला ) = १४अं. २४ क. ५९ वि. = ८६५ अं.
६६७·७ क. ( वरील बाकी ) × ६० = ४००७२ ÷ ८६५ = ४६ घ. २० प. भुक्त घटि.

§ टीप—एका तिथींत २ करणें असतात. तिथि ३० घटींहून कमी असते तेव्हां उत्तरार्धाच्या करणाच्या भोग्य घटि देतात. व तिथि ३० घटींहून अधिक असते तेव्हां उत्तरार्धाच्या करणाच्या भोग्य घटि देतात.

* दशांशांत उदाहरण केलेस विकला करणेचें कारण नाहीं.

८०० क. ६६७·७क = १३२·३क.×६० = ७९३८÷ „ = ९ घ. १० प. भोग्य „

वरील सूर्यचंद्रावरून तिथ्यादि आली ती.

| | | |
|---|---|---|
| तृतीया | १५ घ. | – ९ प |
| मृगनक्षत्र | २० | – ५२ |
| सुकर्मायोग | ९ | – १० |
| गरजकरण | १५ | – ९ |
| वार | ६ | – ० |

यापेक्षां सूक्ष्म चंद्रसूर्य आणून सूक्ष्म तिथ्यादि करणें असल्यास खालील रीतीनें करावें.

सूक्ष्मसूर्य–प्रत्येक महिन्याच्या पृष्ठ ३ वरून स्पष्टसूर्य घेऊन तो वर सांगितल्याप्रमाणें मध्यम सूर्योदयाचा करून त्यांत प्रिसेशन् [ अयन चलन ] व न्यूटेशन् ( अक्षवलन ) दर दिवसाची दिली असतात त्यांचा संस्कार करावा. अयनचलन वजा करावे व अक्षवलन असेल तसें धन किंवा ऋण करावें. अंबिरेशन् ( विभ्रमण ) पृष्ठ १ मध्यें दिले असतें तें मिळवावें ह्मणजे सूक्ष्मसूर्य येईल.

चालू उदाहरणांत

मध्यम सूर्योदयाचा स्पष्टसूर्य ( ध्रुवकालीन ) – ४७ अं. ४८ क. ३ वि.

त्यांत उणें पृष्ठ २१९ वरून अयन वलन ता ९ मेचे– ० ० १७·६९.

४७ ४७ ४५·३१.

ता० ९ मेचें अक्षवलन ऋण असल्यानें तें वजा करणेचें – ४७ अं. ४७ क. ४५ ३१ वि.

– १·४०

४७ – ४७ –४३·९१

पृष्ठ १ प्रमाणें विभ्रमण मिळविणेचें तें + २०·२७

सूक्ष्मसूर्य = ४७ अं. ४८ क. ४·१८ वि.

सूक्ष्मचंद्र प्रत्येक महिन्याच्या ५ ते १२ पृष्ठांत प्रत्येक तासाचे चंद्राचे विषुवांश [ राइट असेनशन् ] व क्रान्ति ( डेक्लिनेशन ) दिलेली असते. नॉ. अल्मनाकमध्यें दोन प्रहरीं १२ वाजतांचे ग्रह दिलेले असतात. ग्रीनिचच्या पूर्वेस प्रातःकाल ध्रुवपरिमित घटिकांनीं पूर्वी होतो ह्मणून ध्रुव इष्ट तारखेतून वजा करून बाकी राहील त्या कालाच्या चंद्राचे विषुवांश व क्रांति काढावी.

प्रस्तुत उदाहरणांत १० तास ५६ मिनिटें ५२ सेकंदें हा ध्रुवकाल आहे तो ९ तारखेंतून [ ह्मणजे २४ तासांतून ] वजा केला ह्मणजे बाकी १३ तास ३ मिनिटें ८ सेकंदें राहिली त्या वेळेच्या चंद्राचे विषुवांश काढावेत. मे महिन्याचे ६ वे पृष्ठावर दिल्याप्रमाणें ८ तारखेच्या १३ तासांचे विषुवांश ५ तास १७ मिनिटें २२ सेकंदें आहे व १४ तासांचे ५ ता. १९ मि. ५३· ५४ से. आहे. यावरून त्रैराशिकानें ३ मि. ८ से. चे काढून ते १३ तासांच्या विषुवांशांत मिळविले ह्मणजे ५ ता. १७ मि. ३० से. [ अ ] इष्टकालाचे विषुवांश तासात्मक आले व यांस १५ नीं गुणिलें ह्मणजे ७९ अंश २२ कला ३० विकला अंशात्मक आले. याचप्रमाणें क्रांति [ डेक्लिनेशन ] २८ अंश ८ कला १३ विकला [उ] येते. कारण १२ तासांची क्रांति २८ अंश ४ कला ५३ विकला व १३ तासांची २८ अंश ८ कला ३ विकला आहे. यावरून त्रैराशिकानें ३ मिनिटें ८ सेकंदांची अदमासे १० वि. निघते तीं १३ तासांचे क्रांतींत ह्मणजे २८ अंश ८ कला ३ विकला यांत मिळविली ह्मणजे वर दिलेली क्रांति येते.

याप्रमाणें विषुवांश व क्रांति काढल्यानंतर ग्रहांचे भोग व शर काढण्याचे नियम ( फॉर्म्युले ) आहेत त्याप्रमाणें काढावेत;

विषुवांश ( राइट असेंशन ) आणि क्रांति ( डेक्लिनेशन ) यांवरून ग्रहांचे भोग ( लॉंजिटयूड ) व शर (कदंबाभिमुखशर=लॅटिट्युड) काढण्याचे नियम [फॉ.] अ कोणाची स्पर्शरेषा टँजंट= $\frac{\text{क्रांतीची स्पर्शरेषा}}{\text{विषुवांशाचा चाप [साइन]}}$

प्रस्तुत उदाहरणांत क्रांति २८अंश ८कला १३विकला आहे; याची स्पर्शरेषा ९·७२८१७४५

विषुवांश ७९अंश २२कला ३०विकला आहे याचा चाप (साइन) ९·९९२४८९५

या दोहोंचा भागाकार ९·७३५६८५० येतो. हा २८ अंश ३३कला ३ विकलाची स्पर्शरेषा टँजंट आहे ह्मणून २८ अं. ३३ क. ३ वि हा अकोन [उत्तर*] आला.

आतां दुसरा कोन काढणेचा; त्यास आपण व कोन ह्मणूं. तो काढण्यास सूर्याची परमक्रांति नॉ. अल्मनॉकमध्यें दिली असते ती घ्यावी. सन १९१३ स ती ( =मीन ऑब्लिक्विटी). २३अंश २७क. २·१वि. आहे. ही वर्षारंभाची आहे. आमचा मे महिना आहे ह्मणून ती २३अंश २७कला ४विकला धरावी.

परमक्रांतीची दिशा विषुवांशाच्या ( राइट असेंशन ) गोलाप्रमाणें १२ तासपर्यंत उत्तर व पुढें २४ तासांपर्यंत दक्षिण असते. उदाहरणांत सूर्योदयाची परमक्रांति घ्यावयाची आहे ह्मणून तिची दिशा उत्तर.

परमक्रांति व अकोन यांची भिन्न दिशा असेल तर परमक्रांतीची व अकोनाची बेरीज [ योग ] करावी व एकच दिशा असेल तर वजावाकी करावी; उत्तर येईल तो वकोन होय.

उदाहरणांत परमक्रांति = २३अंश २७कला ४विकला ( उत्तर ) आहे.

व अकोन = २८अंश ३३कला ३विकला ( उत्तर ) आहे.

यांची दिशा एक सबब वजावाकी ५अंश ५ कला ५९ विकला किंवा अदमासें ५अंश ६कला = वकोन.

अकोन परमक्रांतीपेक्षां कमी असून दोहोंची एक दिशा असेल तर ग्रहक्रांतीचे भिन्न दिशेचा शर येतो.

अकोन परमक्रांतीपेक्षां मोठा असेल किंवा दोहोंची दिशा भिन्न असेल तर ग्रहक्रांति दिशेचा शर येतो.

विषुवांश ( राइट असेंशन ) प्रथम पदांत असेल तर ह्मणजे ९० अंशांपेक्षां कमी असतील तर गणितानें येईल तोच ग्रह. दुसरे पदांत ह्मणजे ९० अंशांपेक्षां अधिक पण १८० अंशांपेक्षां कमी असेल तर ६ राशींतून वजा करावा तिसरे पदांत ह्मणजे १८० पेक्षां अधिक पण २७० पेक्षां कमी असेल तर ६ राशी मिळवाव्या. चवथ्या पदांत ह्मणजे २७० अंशापेक्षां अधिक पण ३६० अंशापेक्षां कमी असेल तर १२ राशींतून वजा करावा. ह्मणजे ग्रह व नक्षत्रें यांचे भोग ( लॅांजिट्यूड ) येतात.

परंतु व कोन ९० अंशापेक्षां अधिक असेल तर वरील रीतीनें आणिलेला भोग ३६० अंशांतून वजा करावा ह्मणजे भोग येतात.

उदाहरणांत अकोन परमक्रांतीपेक्षां मोठा आहे व क्रांतिदिशा उत्तर आहे सबब वकोन उत्तरेचा आला. अकोन निघाला, वकोन निघाला. आतां शरसाधनार्थ कर्ण काढला पाहिजे त्याची रीती.

१ कोसाइन कर्ण = कोसाइन विषुवांश × कोसाइन क्रांति

= कोसा. ( ७९ अंश २२ क. ३० वि. ) × कोसा. ( २८ अं. ८ क. १३ वि. )

= ९·२६५७१४२ × ९·९४५३८७९

कोसा [८०अं ३९क. २७वि.] = ९·२११1०२१

∴ ८० अं ३९ क. २७ वि. हा कर्ण

२ साइन शर = साइन कर्ण × साइन वकोन

= सा. ( ८० अं. ३९ क. २७ वि. ) × सा. ( ५ अं. ६ क. ० वि. )

---

* क्रांति ज्या दिशेची असेल त्या दिशेचा अकोन असतो. चालू उदाहरणांत क्रांति उत्तरेची आहे ह्मणून अकोन उत्तरेचा आला.

= ९.९९४२००८ × ८.९४८८७३९

= ८.९४३०७४७=सा ( ५ अं. २ क. ४ वि. ) ∴ शर=५ अं. २ क. ४ वि.

आतां भोग काढण्याचा नियम

भोगाची ( लॅांजिट्यूड ) स्पर्शरेषा = कर्णाची स्प. रे × वक्रोनाचा को. चाप.

=( ८० अं. ३९ क. २७ वि. )ची स्प. रे×( ५ अं. ६ क. )चा कोचाप

= १०.७८३७८६० × ९.९९८२७७२

= १०.७८२०६३२=( ८० अं. ३७ क. १६ वि. )ची स्प. रे.

∴ भोग = ८० अं. ३७ कला १६ विकला.

वर दिल्याप्रमाणें सूक्ष्म रवि ४७ अंश ४८ कला ४ विकला गति ० अंश ५७ कला ५९ विकला व चंद्र ८० अंश ३७ कला १६ विकला गति १३ अंश २७ कला यावरून तिथ्यादि आली ती.

तिथि तृतीया १५ घ १७ प. नक्षत्रमृग २० घ. ५९ प. गरजकरण १५ घ. १७ प. सुकर्मायोग ९ घ. ८ प. हा तिथ्यादिकाल मध्यमोदयांपासून आहे यास वेलांतर व वक्रीभवन संस्कार केला म्हणजे स्पष्टोदयाचे मध्यरेषेवर विषुववृत्तावरील तिथ्यादि येतील.

वेलांतर वक्रीभवन संस्कार करून तिथ्यादि आले ते.

तिथि तृतीया १५ घ. २१ प नक्षत्रमृग २१ घ. ३ प. करण गरज १५ घ. २१ प. योगसुकर्मा ९ घ. १२ प. आमचे उदाहरणांत ता. ९ मे रोजी वेलांतर [ इक्वेशन ऑफ टाइम ] ३ मि. ३९.४३ से. म्हणजे अदमासे ९ पलें असून तें धन आहे सबब वरील तिथ्यादिकांचे कालांत मिळवावें व वक्रीभुवन ५ पलें आमचा इष्टकाल सूर्योदयाचा आहे म्हणून वजा करावें. *

## सप्ततारासाधन.

मागें सूर्य व चंद्र यांचें साधन कसें करावें तें उदाहरणासह दाखविलें. आतां इतर ग्रहांचें साधन करावयाचें.

नॉटिकल अल्मनाकमध्यें रविचंद्रांपुढें बुध, शुक्र, मंगळ, गुरु, शनि, इंद्र (युरेनस्) आणि वरुण (नेपच्यून) यांचे दररोजचे ग्रीनिच मध्यान्हींचे विषुवकाल ( रा. अ. ), स्पष्टक्रांति ( डेक्लिनेशन् ), शीघ्र ( चल ) कर्णाचे ( पृथ्वीपासून खऱ्या अंतराचें ) लागर्थम्, ऊर्ध्व याम्योत्तरलंघनकाल ( मेरिडियन प्यासेज ), मंदस्पष्ट ग्रह ( रविमध्यभोग = हेलिओ सेंट्रिक लॉंजिट्यूड ), रविमध्यशर ( हेलिओसेंट्रिक लॅटिट्यूड ) व मंदकर्णाचे (रॅडि. व्हेक्टरचे ) लॉगर्थम असे क्रमानें दिलेले असतात. त्यास. इष्टकालीन करतेवळीं रेखांतर संस्कार करावा म्हणजे ते ग्रह स्पष्ट होतात. रेखांतर संस्कार फक्त ग्रहास करावयाचा असतो.

याप्रमाणें आह्मांस वैशाख शु. १५/१८३५ ( ता. २०/५/१९१३ ) चे सूर्योदयाचे ग्रह तयार करावयाचे आहेत. ते खालीं लिहिल्याप्रमाणेंः--

## नॉटिकल अल्मनॅकवरून रविमध्यस्थ ग्रहांचे भूमध्यस्थ ग्रह करण्याची रीति ( फॉर्म्युले ).

१ बुध व शुक्र यांचीं मंदकर्णें स्वतःचीं घ्यावयाचीं असतात व इतर ग्रहांस सूर्याचीं घ्यावयाचीं असतात.

---

* रवि, चंद्र, ग्रह व नक्षत्रें हीं जीं आपणास दिसतात त्यांचे किरण हवेंतून येतांनां वाकडे [वक्र] होतात त्यामुळें तीं आपणास वास्तविक स्थितींत दिसत नाहींत; म्हणून या किरण वक्रीभवनाचा संस्कार रवि, चंद्र, ग्रह, नक्षत्रें व दिनमान करितेवेळीं नेहमीं १० पलें धन आणि रविउदयाचेवेळीं ५पलें ऋण व रविअस्ताचेवेळीं ५ पलें धन असे संस्कार करावे लागतात. वक्रीभवनानें खस्थ पदार्थ सर्वदा पूर्वस्थितीच्या वर दिसतो यासाठीं दृश्य नतांशांत वक्रीभवन मिळवावें आणि दृश्य उन्नतांशांतून वजा करावें.

२ बुध व शुक्र यांचीं मंदकर्णें रविमध्यस्थ दिलेलीं असतात म्हणून भोग व शर काढतेवेळीं तीं क्रांतिवृत्तस्थ करावीं लागतात. इतर ग्रह करतेवेळीं रवीचेंच मंदकर्ण घ्यावयाचीं असल्यानें त्यास कांहीं संस्कार करणेचें कारण नाहीं. कारण तीं क्रांतिवृत्तस्थच असतात.

३ सर्व ग्रहांचीं चलकर्णें क्रांतिवृत्तस्थ दिलेलीं असतात.

## या नियमाचे फॉर्म्युले.

$$(१)\quad \text{सा. भूमध्यशर} = \frac{\text{सा. र. म. शर} \times \text{ग्रहमंदकर्ण}}{\text{चलकर्ण.}}$$

$$(२)\quad \text{क्रांतिवृत्तस्थ मंदकर्ण} = \frac{\text{ग्रहमंदकर्ण} \times \text{को. सा. भूमध्यशर ( लॅटिट्यूड )}}{\text{त्रिज्या (१०)}}$$

[३] चलोच्च = ( रवि ) उणें मंगळ, गुरु, शनि, युरेनस व नेप्च्युन = केंद्र

बुध शुक्र उणा रवि = केंद्र

मंगळ, गुरु, शनि, युरेनस व नेप्च्यून यांचें केंद्र काढतांना चलोच्च रवि समजून त्यांतून ते ते ग्रह वजा करावेत; बाकी राहील त्यास त्या त्या ग्रहांचें केंद्र म्हणावें. बुध व शुक्र यांचें केंद्र काढतांना तेच चलोच्च समजून त्यांतून रवि वजा करावा. जी बाकी राहील त्यांस त्यांचें केंद्र म्हणावें.

केंद्र ६ राशीचे आंत असेल तर जें फल येईल तें धन करावें व ६ राशीचे पुढें असेल तर तें फल ग्रहांत ऋण करावें.

$$[४]\quad \text{सा॰ शीघ्रफल} = \frac{\text{सा॰ केंद्राचा भुज} \times \text{क्रांतिवृत्तस्थ मंदकर्ण.}}{\text{क्रांतिवृत्तस्थ शीघ्रकर्ण. ( चलकर्ण )}}$$

जें शीघ्रफल येईल तें केंद्राप्रमाणें ग्रहांस [ मंगळ, गुरु, शनि, युरेनस व नेप्च्यून यांस ] धन ऋण करावें म्हणजे ते ग्रह स्पष्ट होतात.

बुध व शुक्र स्पष्ट करण्यास तें फल रवीस धन ऋण करावें म्हणजे बुध व शुक्र स्पष्ट होतात.

याप्रमाणें २ दिवसांचे ग्रह तयार करून त्यांचें अंतर करावें. जी बाकी राहील ती त्या ग्रहाची स्पष्टगति समजावी.

अंतर करतेवेळीं दुसरे दिवशीचे ग्रहांतून पहिले दिवशीचा ग्रह वजा गेला नाहीं तर तो वक्री आहे असें समजावें व त्यांची वजाबाकी उलट करावी.

मंगळ, गुरु, शनि, युरेनस व नेप्च्युन यांचीं शीघ्र फलें आणतेवेळीं रवीचेच मंदकर्णाचा उपयोग करावा.

उदाहरण—वैशाख शुद्ध १५ शके १८३५ तारीख २० मे १९१३ चे प्रातःकालचे ग्रह तयार करणेचे.

| त्यास प्रथम बुध | तारीख १९ | तारीख २० |
|---|---|---|
| भोग [ लॉंजि. ] | ३५५।१५।३५ | ३५९।५९।२६ |
| शर [ लॅटि. ] | ५।३१।५६ | ५। ९।३४ |
| मंदकर्ण | ९.५५५३९२७ | ९.५४८४५२५ |
| चलकर्ण [शीघ्रकर्ण] | ०.०८५९९५३ | ०.०९०९५४९ |

वरील नियमाप्रमाणें— सा. ( भूम. शर. )

$$१\quad \text{साइन [भूमध्यशर]} = \frac{\text{साइन रविमध्यशर} \times \text{मंदकर्ण}}{\text{चलकर्ण.}} = \frac{\text{साइन ५।९।३४} \times \text{मंदकर्ण}}{\text{चलकर्ण.}}$$

$$= \frac{\text{साइन [ ५।३१।५६ ]} \times \text{मंदकर्ण.}}{\text{चलकर्ण.}} = \frac{८.९५३९१४२ \times ९.५४८४५२५}{०.०९०९५४९}$$

टीप—१ वक्रगति येईल तेव्हां देशांतरसंस्कार जो करणेचा तो ऋण असेल तर धन करावा व धन असेल तर ऋण करावा.

$$= \frac{८.९८४१०१८ \times ९.५५५३९२७}{०.०८५९९५३} = ६.४५३४९९२ = \text{साइन} ( ११३७।४१ )$$

∴ भूमध्यशर = १।३७।४१

= ८.४११४११८ = सा.(१।२८।४०)

∴ भूमध्यशर = १।२८।४०

---

२ क्रांतिवृत्त मं. $= \frac{\text{ग्रह मंदकर्ण} \times \text{कोसा. [ भूमध्यशर ]}}{\text{त्रिज्या} = १०}$

$$= \frac{९.५५५३९२७ \times ९.९९९८२४६}{१०}$$

= ९.५५५२१७३ [ क्रांतिवृत्त मंदकर्ण ]

$\frac{९.५४८४५२५ \times ९.९९९८५१५}{\text{त्रिज्या} = १०}$

= ९.५४८३०८० क्रांतिवृत्त मंदकर्ण.

---

३ ग्रह भोग ३५९।१५।३५
– रवि ५७।५३। १
२९७।२२।३४ = केंद्र
३६०—( „ )
= ६२।३७।२६
= भुज.

३५९।५९।२५
५८।५०।४३
३०१। ८।४३ = केंद्र.
३६०—( „ )
= ५८।५१।१७
= भुज.

---

४ साइन [शीघ्रफल ] $= \frac{\text{साइन भुज} \times \text{क्रांतिवृत्त मं.}}{\text{चलकर्ण}}$

$$= \frac{\text{साइन ( ६२।३७।२६ )} \times \text{क्रांतिवृत्त मं.}}{\text{चलकर्ण}}$$

$$= \frac{९.९४८४१६४ \times ९.५५५२१७३}{०.०८५९९५३}$$

= ९.४१७६२८४ = साइन [ १५।९।५४ ]

∴ शीघ्रफल = १५।९।५४

सा. ( शीघ्रफल ) $= \frac{\text{सायन [५८।५१।१७]} \times \text{क्रांतिवृत्त मं.}}{\text{चलकर्ण}}$

$$= \frac{९.९३२४०२० \times ९.५४८३०८०}{०.०९०९५४९}$$

= ९.३८९७५५१ = सा. [ १४।१२।५

∴ शीघ्रफल = १४।१२।५.

---

रवि [ = ५७।५३।१ ] – शीघ्रफल [ १५।९।५४ ]
= ४२।४३।७ कोल्हापूर मध्यान्हींचा बुध ता. १९

[ ५८।५०।४३ ] – [ १४।१२।५ ]
= ४४।३८।३८ को० म० बुध ता. २०

२० तारखेच्या बुधांतून १९ तारखेचा बुध वजा केला ह्मणजे गति = १।५५।३१. २४ तासास जर १।५५।३१ गति तर १०तास ५६मिनिटें ५२सेकंदें (आह्मास प्रातःकालचा बुध पाहिजे आहे) ह्मणून ५५कला ४२विकला गति येते. ती २० तारखेच्या बुधांतून ह्मणजे ४४अंश ३८कला ३८विकला यांतून वजा केली असतां प्रातःकालीन बुध सायन ४३अंश ४५कला ५६विकला आला. यांत अयनांश १८अंश ३९कला ३३ विकला वजा केले ह्मणजे ०राशि २५अंश ६ कला २३विकला = निरयण बुध.

| याचप्रमाणें शुक्र | तारीख १९ | तारीख २० |
|---|---|---|
| भोग | २५३।१३।४४ | २५४।४८।५८ |
| शर | ०। ९।३० | ०। ३।५१ |
| मं. कर्ण | ९.८६०९३३२ | ९.८६१००२० |
| चलकर्ण | ९.५६३७८७५ | ९.५७०७८१२ |

यावरून बुधासारखेंच गणित केलें ह्मणजे येतो तो– ० राशि ७ अंश ३९ कला १६विकला. (गति ८क. ८वि )

बुध व शुक्र हे ग्रहमालेंतील अन्तर्वर्ती ग्रह असल्यामुळें तेंच ग्रह चलोच आहेत इतर ग्रह वहिर्वर्ती असल्यानें त्यांचे चलोच रवि आहे. म्हणून त्याचें गणितांत थोडा फेर असल्यानें त्यांचे उदाहरणाकरितां मंगळाचें गणित खालीं दिलें आहे.

| मंगळ | तारीख १९ | तारीख २० |
|---|---|---|
| ग्रहभोग– | ३३४।५८।४४ | ३३५।३६।५० |
| चल कर्ण– | ०·२५७७९९३ | ०·२५६७८२९ |
| रवि–– | ५७।५३।१ | ५८।५०।४३ |
| रविमंदकर्ण–– | ०·००५१७६२ | ०·००५२६०१ |

मंगळ आदिकरून ग्रहांस रवीचेंच मंदकर्ण घेणेचें असल्यानें त्या त्या ग्रहांचें मंदकर्ण काढण्याचें कारण नाहीं

३ रवींतून मंगळ वजा जात नसल्यामुळें रवींत ३६० अंश मिळवावयाचे.

३६० + [ ५७।५३।१ ] – [ ३३४।५८।४४ ] = ८२।५४।१७ = केंद्रभुज.

३६० + [ ५८।५०।४३ ] – [ ३३५।३६।५० ] = ८३।१३।५३

सायन [ शीघ्रफल ] = $\frac{\text{सायन [ केंद्रभुज ] × रविमंदकर्ण.}}{\text{चलकर्ण}}$

= $\frac{\text{सायन (८२।५४।१७) × रविमंदकर्ण}}{\text{चलकर्ण}}$

= $\frac{\text{९·९९६६६१४ × ०·००५१७६२}}{\text{०·२५७७९९३}}$

= ९·७४४०३८३ = सा. [ ३३–४१–१८ ]

∴ शीघ्रफल = ३३।४१।१८

सा [ शीघ्रफल ] = $\frac{\text{सायन [ ८३।१३।५३ ] × रविमंदकर्ण.}}{\text{चलकर्ण}}$

= $\frac{\text{९·९९६९६२४ × ०·००५२६०१}}{\text{०·२५६७८२९}}$

= ९·७४५४३९६ = सा. (३३।४८।४२)

∴ शीघ्रफल = ३३।४८।४२

| | तारीख १९ | तारीख २० |
|---|---|---|
| ग्रहभोग | ३३४–५८–४४ | ३३५–३६–५० |
| केंद्र ६ राशींत आहे सबब + | + ३३·४१–१८ ( शीघ्रफल ) | + ३३–४८–४२ |
| मध्यान्हीचा सायन ग्रह | = ३६८–४०–२ | ३६९–२५–३२ |

२० तारखेच्या मंगळांतून १९ तारखेचा मंगळ वजा केला म्हणजे ४५ क. ३० वि. ही गति आली. प्रातःकाल ध्रुवइष्टकाल असल्यानें १० ता. ५६ मि. ५२ से. याची गति २० क. ४५ वि. ता. २० च्या मंगळांतून वजा केले म्हणजे इष्टकालचा सायन मंगळ आला. त्यांत अयनांश १८ अं. ३९ क. ३३ वि वजा केले म्हणजे इष्टकालचा इष्टस्थानचा निरयण मंगळ आला तो ११ रा. २० अं. २५ क १४ वि.

---

याचप्रमाणें इतर ग्रहांचे भोग आले ते:—

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| गुरुः— | ८ रा. | २८ अं. | ४९ क. | २९ वि. | गति २ क ३८ | वि वक्री. |
| शनिः— | १ ,, | १७ ,, | ३८ ,, | ४७ ,, | ,, ७ ,, ४५ | ,, |
| युरेनसः— | ९ ,, | १८ ,, | ५१ ,, | २९ ,, | ,, ० ,, १९·२५ | ,, वक्री. |
| नेपच्यूनः— | ३ ,, | ५ ,, | ७ ,, | २८ ,, | ,, १ ,, २३ | ,, |

याप्रमाणें सप्तग्रहांचें साधन झालें. आतां राहु व केतु यांचें साधन करावयाचें आहे. त्यांस नॉ. अ. च्या पहिल्या पृष्ठांत राहूचा [ असेंडिंग नोडचा ] मध्यम भोग ( मीन लाँजिटयुड ) व दैनिक गति ( डेली मोशन ) दिलेली असते त्यावरून हें गणित करणेचें.

इ. स १९१३ त दैनिक गति ०°०५२९५ आहे. ही दशांशांत आहे या संख्येस ६० नीं गुणिलें झ. पूर्णांक येतील त्या कला होत. पुन्हा अपूर्णांकांस ६० नीं गुणिलें झ. पूर्णांक येतील त्या विकला होत. या प्रमाणें ३ क. १०.६ वि. = ३ क. ११ वि. ही गति आली. व ती नेहमीं वक्र असते.

इ. स. १९१३ च्या मे महिन्याचे २१ तारखेचा राहूचा मध्यम भोग ०.२८८५ आहे. आम्हांस २० तारखेचा पाहिजे म्हणून ०°२८८५० + °०५२९५ [ गति वक्र सबब मिळवणी ] = .३४१४५°=२० तारखेचा ग्रीनिच येथील राहूचा भोग आला. आम्हास कोल्हापूरचा राहूचा प्रातःकालीन भोग काढणें आहे. सबब २४ तासास जर ३ क. १०°६ वि. गति तर १० ता. ५६ मि. ५२ से. स किती? याप्रमाणें °०२४२७ येते. ती ग्रीनिच्या भोगांत मिळवली म्हणजे °३६५७२ (वरील प्रमाणें ६० नीं गुणून ० रा. ० अं २१ क. ५६ वि.) हा कोल्हापूरचा इष्टकालाचा सायन राहू आला. यात अयनांश १८ अं. ३९ क. ४२ वि. वजा केले म्हणजे ११ रा. ११ अं. ४२ क. १४ वि. हा निरयण राहू आला. यांत ६ राशि मिळविल्या म्हणजे केतु येतो तो ५ रा. ११ अं. ४२ क. १४ वि. आला.

## आतां ग्रहांचे उदयास्त काल काढणेची रीति.

प्रथम ग्रहाची ऊर्ध्व याम्योत्तर लंघनकालीन क्रांति आणि इष्टस्थलाचे अक्षांश यापासून चर आणून दिनार्ध आणावे. त्याचे नियमः—

चर ज्या [ = साइन् ( चर ) ] = अक्षांशस्पर्शरेषा × क्रांतिस्पर्शरेषा.

चरपळें = चरज्या ( चापांश ) × १०.

दिनार्ध = १५ घ. + { क्रांति उत्तर असल्यास / − { ,, दक्षिण ,, } चर

ध्रुव = दिनार्ध + प्रत्येक स्थलाचे ग्रीनिच रेखांतर ( मध्यमोदयापासून मध्यान्हपर्यंत काळ ).

या नियमाप्रमाणें दिनार्ध आणून त्यांत वक्रीभवन मिनिटें २ आणि नक्षत्रकाल ( सायडीरियल टाइम ) व स्पष्टकाल यांतील अंतर १ मिनिट मिळवून जी बेरीज येईल ती ग्रहाच्या ऊर्ध्व याम्योत्तर लंघनकालांत वजा करावी म्हणजे ग्रहाचा उदय येईल व मिळवावी म्हणजे अस्त येईल.

ग्रहांच्या याम्योत्तर लंघनकाळास वेलांतर संस्कार केलेला असल्यानें उदयास्तकाल काढतेवेळीं तो पुन्हां करण्याची जरूरी नाहीं.

नॉटिकल अल्मनाकांत कालमानाचा आरंभ ग्रीनिचचे दुपारीं १२ वाजतांचा दिलेला असतो. परंतु येथें व्यवहारांत मध्यरात्रींपासून दिनारंभ होतो. म्हणून नॉ. अ. चे कालांत १२ तास मिळविले म्हणजे व्यावहारिक काल येईल.

## चंद्रोदयास्त.

प्रत्येक महिन्याच्या ४ थ्या पृष्ठावर चंद्राचे ऊर्ध्व व अधर याम्योत्तर लंघनकाल दिलेले असतात त्यापैकीं उदय काढतानां ऊर्ध्व, व अस्त काढतानां अधर याम्योत्तर लंघनकाल घेऊन त्याच्या दिनगतीस (दोन दिवसांचे लंघनकालांतील अंतरास ) रेखांतरकालानें गुणून २४ तासानीं भागावें. जो भागाकार येईल तो, रेखांतर पूर्व असल्यास लंघनकालांतून वजा करावा व पश्चिम असल्यास मिळवावा. म्हणजे स्वदेशीय याम्योत्तर लंघनकाल येतील. त्यांवरून चंद्राचे उदयास्त आणावेत.

उदयः--ऊर्ध्व याम्योत्तर लंघनकालांत ६ तास वजा करून त्या वेळची क्रांति ( प्रत्येक महिन्याच्या ५ पृष्ठापासून १२ पृष्ठापर्यंत दिलेली असते त्यावरून ) आणून, स्वदेशीय अक्षांश घेऊन, चर आणून चंद्राचे

दिनार्ध करावें. नंतर लंघनकालाच्या दिनगतीस दिनार्धानें गुणून २४ नीं भागावें. आलेला भागाकार दिनार्धांत मिळवून वक्रीभवन २ मि. वजा करावीं, ह्मणजे स्पष्टदिनार्ध येईल. तें ऊर्ध्व याम्योत्तरलंघनकालांत वजा करावें ह्मणजे चंद्रोदय येईल.

अस्तः—अधर याम्योत्तर लंघनकालांत ६ तास वजा करून त्या वेळची क्रांति आणून, चर काढून राज्यर्ध करावें. नंतर लंघनकालाच्या दिनगतीस राज्यर्धानें गुणून २४ नीं भागावें. आलेला भागाकार व वक्रीभवन २ मि. राज्यर्धांत मिळवावींत. ह्मणजे स्पष्ट राज्यर्ध येईल. तें अधर याम्योत्तर लंघनकालांत वजा केलें ह्मणजे चंद्रास्त येईल.

## उदाहरण.

वैशाख वद्य ३ शके १८३५ ता. २३ मे १९१३ रोजीं चंद्रोदय केव्हां होईल ?

ता. २३ मे रोजीं, आह्मांस उदय काढावयाचा असल्यानें, ऊर्ध्व याम्योत्तर लंघनकाल १५ ता. २२ मि. आहे. यांत १२ तास मिळविले ह्मणजे ३ ता. २२ मि. व्यावहारिक काल आला. याम्योत्तर लंघनकालाची दिनगति ५१ मि. आहे. यास कोल्हापूरचा रेखांतर काल ४ ता. ५७ मि. आहे त्यानें गुणून २४ तासानीं भागिलें ह्मणजे भागाकार १० मि. आला. तो रेखांतर पूर्व असल्यानें लंघनकाल ३ ता. २२ मि. यांतून वजा केला ह्मणजे ३ ता. १२ मि. हा स्वदेशीय याम्योत्तर लंघनकाल आला. यांत ६ तास वजा केले ह्मणजे ९ ता. १२ मि. उरले. या वेळची क्रांति २७ अं. २२ क. आहे. कोल्हापूरचे अक्षांश १६–४२ आहेत. त्यावरून चर ३६ मि. आले व चंद्राचे दिनार्ध ५ ता. २४ मि. आले यास दिनगति ५१ मि. यांनीं गुणून २४ नीं भागिलें ह्मणजे भागाकार ११ मि. आला. तो दिनार्धांत [ ५ ता. २४ मि. यांत ] मिळवून वक्रीभवन २ मि. वजा केलें असतां ५–३३ हा स्पष्टदिनार्ध आला. तो ऊर्ध्व याम्योत्तर लंघनकाल ३–१२ [ स्वदेशीय ] यांतून वजा केला ह्मणजे ९ ता. ३९ मि. हा उदयकाल आला. यांत ३३ मिनिटें मिळविली ह्मणजे १० ता. १२ मि. हा स्टँडर्ड टाइमप्रमाणें उदयकाल आला.

---

## लग्न.

आतांपर्यंत तिथि, नक्षत्र, योग, करण यांचें साधन नॉटिकल अल्मनाकवरून कसें करावयाचें, ग्रह कसे करावयाचे, व अस्तोदय कसे काढावयाचे हे दाखविलें. आतां फक्त लग्न आणण्याचा प्रकार तेवढा दाखवावयाचा राहिला आहे. तो दाखविला ह्मणजे पंचांगांतील बहुधा सर्व विषय झाले. करितां आतां लग्नाकडे आपण वळूं.

प्रत्येक स्थलाचे पलभा व अक्षांश निरनिराळे असतात. ह्मणून लग्नाचा उदय एकाच वेळी सर्वत्र सारखा होईल असें नाहीं. तो निरनिराळ्या ठिकाणीं निरनिराळ्या वेळीं व्हावयाचा. सबब आपणास पलभा व अक्षांश यांचें ज्ञान अगोदर करून घेतलें पाहिजे.

पलभा ह्मणजे काय व ती कधी आणि कशी काढणेची ? पलभा ह्मणजे अक्षभा.

मेष किंवा तुला राशीस रवीचें संक्रमण होतें त्या दिवशीं पलभा काढणेची असते. संक्रमण मध्यान्हापूर्वी ज्या दिवशीं होईल तो दिवस घ्यावयाचा. मध्यान्हानंतर संक्रमण झाल्यास दुसरे दिवशीं मध्यान्हीस सूर्य आला ह्मणजे ती काढावी. तुला संक्रमणकालीं अभ्र असण्याचा संभव असतो ह्मणून मेषसंक्रमणादिवशींच मध्यान्हीस सूर्य आल्याबरोबर ती काढावी.

प्रथम १२ अंगुलांचा शंकु घ्यावा. सूर्य खस्वस्तिकास येतो त्यावेळीं तो समभूमीवर ठेवावा. ह्मणजे त्याची जी छाया पडेल ती पलभा होय. तिलाच अक्षभा ह्मणतात. आपण पृथ्वीच्या कोणत्या अक्षांशावर आहोंत हें पलभेवरून समजतें.

## पलभेवरून अक्षांश काढण्याचा नियम

$$\frac{\text{त्रिज्या} ( = १० )}{\text{शंकूची लागर्थमसंख्या}} \times \text{पलभेची लागर्थमसंख्या} = \text{अक्षांशाची स्पर्शरेषा}$$

उ.- कोल्हापूरची पलभा ३ अंगुळें ३६ प्रतिअंगुले आहे. यावरून अक्षांश काढणेचे.

अंगुलास ६० नीं गुणिले ह्मणजे प्रतिअंगुलें येतात. ह्मणून ३ अं. – ३६ प्र. अं. = २१६ प्र. अं. व शंकु = १२ अंगुलें यास ६० नीं गुणिलें ह्मणजे ७२० प्र. अं. झालीं.

$$\text{वरील नियमाप्रमाणें}\text{—}\frac{१०}{\text{* ७२०ची लॉ. सं.}} \times \text{२१६ ची लॉ. सं.} = \frac{१०}{२\text{·}८५७३३२५} \times २\text{·}३३४४५३८$$

= ९·४७७१२१३ = ( १६ अं ४१ क. ५७ वि. ) ची स्पर्शरेषा ∴१६ अं. ४१ क. ५७ वि. हे कोल्हापूरचे अक्षांश आले.

---

## अक्षांशावरून पलभा काढण्याचा नियम—

अक्षांशाची स्पर्शरेषा घेऊन तिला शंकू १२ अंगुलें × ६० = ७२० प्रतिअंगुलें याची लॉगर्थम संख्या व त्रिज्या ( = १० ) यानीं गुणावें. जो गुणाकार येईल त्यांतील पूर्णांक सोडून अपूर्णांक कशाचा स्वाभाविक लागर्थम आहे हें काढावें. ह्मणजे पलभा येतात.

उ०–कोल्हापूरचे अक्षांश १६ अं. ४१ क. ५७ वि. यावरून तेथील पलभा काढणेची.

वरील नियमाप्रमाणें––

अक्षांशाची स्प०रेषा × ७२० चा लागर्थम × १० = ९·४७७१२१३ × ०·८५७३३२५ × १० = २०·३३४४५३८ यांतील पूर्णांक २० सोडून दिले ह्मणजे ३३४४५३८ ही २१६ची लागर्थम संख्या आहे. २१६ ÷ ६० = ३ अं. ३६ प्र. अं. ही पलभा आली.

याप्रमाणें इष्टस्थलाची पलभा व अक्षांश यांचें ज्ञान झाल्यानंतर लग्न काढण्याकरितां प्रथम निरक्ष देशांत ( लंकेंत ) लग्नांचे उदय काढिले पाहिजेत. ह्मणजे त्यावरून स्वदेशीय उदय काढतां येतील.

त्यास खस्वस्तिकापासून क्षितिजापर्यंत ९० अं. होतात त्याचे ६ भाग करावेत ह्मणजे अतिसूक्ष्म लंकोदय येतील.

९० अं. चे ९०, ७५, ६०, ४५, ३० व १५ असे ६ भाग पडले यांचे विषुवांश काढिले पाहिजेत. त्याचा नियम.

---

## इष्टांशाचे विषुवांश काढण्याचा नियम

$$\frac{\text{इष्टांशाची स्पर्शरेषा} \times \text{परमक्रांतीची कोभुजज्या}}{\text{त्रिज्या} ( = १० )} = \text{विषुवांशाची स्पर्शरेषा.}$$

अंशांस ६ नीं भागिलें ह्मणजे कलाविकला येतात व ६० नीं गुणिलें ह्मणजे पलें विपलें येतात.

सूर्याची परमक्रांति २३–२७ कायम ठरलेली आहे.

---

* टीपः–लागर्थमचा नियम–ज्या रकमेची लागर्थमसंख्या घेतली असेल त्या रकमेस जर २ आंकडे असतील तर त्या संख्येच्या दशांशचिन्हापूर्वी १ हा पूर्णांक मांडावा; ३ आंकडे असतील तर २ हा पूर्णांक; ४ आंकडे असतील तर ३ याप्रमाणें जितके आंकडे असतील त्यापेक्षां १ कमी पूर्णांक मांडावा.

वरील नियमाप्रमाणें—

| अं. | इष्टांशाची स्प. रेषा×प. क्रांतींकोभु=विषुवांशाची स्प. रे. | यावरून विषुवांश | यास ÷ कला ६ विकला | त्यास × ६० | = पलें वि. |
|---|---|---|---|---|---|
| ९० | यास गणित करण्याचें कारण नाहीं. कारण तेच विषुवांश असतात. | ९० | १५ | × ६० | ९००- ० |
| ७५ | ७५ ची स्प. रे.×(२३-२७)ची कोभु=वि. ची स्प. रे. | अं. क. वि. | | | |
| | १०.५७१९४७५×९.९६२५६२४=१०.५३४५०९९ | ७३-४३-६ | १२-१७-११ | ,, | ७३७-१० |
| ६० | वरील प्रमाणें गणित करून. | ५७-४९ | ९-३८- १ | ,, | ५७८-१० |
| ४५ | ,, | ४२-३२ | ७- ५-२० | ,, | ४२५-२० |
| ३० | ,, | २७-५५ | ४-३९- १ | ,, | २७९-१० |
| १५ | ,, | १३-५० | २ १८- १ | ,, | १३८-१० |

## अर्धोदय.

| अंश | प. वि. | प. वि. | |
|---|---|---|---|
| ९० | ९००- ० | १६२-५० | मिथुन. |
| ७५ | ७३७-१० | १५९ | |
| ६० | ५७८-१० | १५२-५० | वृषभ. |
| ४५ | ४२५-२० | १४६-१० | |
| ३० | २७९-१० | १४१ | मेष. |
| १५ | १३८-१० | १३८-१० | |

आतां ९०, ७५, ६०, ४५, ३० व १५ हे रवींचे भोग आहेत असें मानून त्यांची क्रांति काढावी. त्याचा नियम—

ग्रहाच्या भोगाची भुजज्या × परमक्रांतीची भुजज्या = क्रांतीची भुजज्या. यावरून क्रांति.

| ग्र भोग. | त्याची भुजज्या×प. क्रां. (२३-२७-७) ची भुजज्या | | = क्रांतीची भुजज्या. | यावरून क्रांति. |
|---|---|---|---|---|
| ९० | १०.००००००० × | ९.५९९८६०९ | = ९.५९९८६०९ | २३-२७- ७ |
| ७५ | ९.९८४९४३८ × | ,, | = ९.५८४८०४७ | २२-३६-२८ |
| ६० | ९.९३७५३०६ × | ,, | = ९.५३७३९१५ | २०- ९-४० |
| ४५ | ९.८४९४८५० × | ,, | = ९.४४९३४५९ | १६-२०-४० |
| ३० | ९.६९८९७०० × | ,, | = ९.२९८८३०९ | ११-२८-४० |
| १५ | ९.४१२९९६२ × | ,, | = ९.०१२८५७१ | ५-५४-४४ |

वर इष्टांक धरून निरक्ष देशांतील—लंकेतील —लग्नांचे उदय काढून दाखविले. आतां इष्टस्थलाचे लग्नोदय कसे काढावयाचे हें उदाहरणासह दाखवितों.

१ ज्या ठिकाणचे लग्नोदय काढावयाचे असतील तेथील पलभा घ्यावी.

उ. कोल्हापूरचे लग्नोदय काढावयाचे असतील तर कोल्हापूरच्या पलभेची संख्या २१६ आहे ती घ्यावी.

२ पलभेवरून अक्षांश काढण्याचा नियम पूर्वी दिला आहे त्याप्रमाणें अक्षांश काढावेत.

उ. कोल्हापूरची पलभा २१६ त्यावरून कोल्हापूरचे अक्षांश १६ अं. ४१ क. ५७ वि. येतात हे वर दाखविलेंच आहे.

३ पलभेचे ६ भाग करावेत.

उ. कोल्हापूरची पलभा ३—३६ याचे ६ भाग पडले ते २१६, १८०, १४४, १०८, ७२ व ३६.

४ या भागांचीं चरखंडे काढावींत त्यास मागें ९०, ७५, ६०, ४५, ३० व १५ हे रवीचे भोग आहेत असें मानून ग्रहभोगावरून क्रांति काढण्याचा नियम दिला व क्रांति काढल्या आहेत. त्यांच्यापुढें हे पलभेचे ६ भाग मांडावेत व नंतर प्रत्येक भागाचे चर काढावे व पुढें मांडावे.

| ग्र. भोग. | क्रांति. | पलभा. | ग्र. भोग. | क्रांति. | पलभा. |
|---|---|---|---|---|---|
| ९० | २३-२७- ७ | २१६ | ४५ | १६-२०-४० | १०८ |
| ७५ | २२-३६-२८ | १८० | ३० | ११-२८-४० | ७२ |
| ६० | २०- ९-४० | १४४ | १५ | ५-५४-४४ | ३६ |

याप्रमाणें उपकरणें तयार झाल्यानंतर चर काढावें. त्याचा नियम—

$$\frac{\text{अक्षांशाची स्प. रे.} \times \text{त्रिज्या} ( = १० )}{\text{क्रांतीची को. स्प. रेषा.}} = \text{चराची भुजज्या.}$$

| र. भो. | अक्षांश १६-४१-५७ याची स्प. रे. | × १० | क्रांति. | क्रां. ÷ को. स्प. रेषा. | = फल. | कोणत्या चराची भुजज्या. |
|---|---|---|---|---|---|---|
| ९० | ९·४७७११९१ | ,, | २३-२७- ७ | १०·३६२६९५१ | ९·११४४२४० | ७-२८-४० |
| ७५ | ,, | ,, | २२-३६-२८ | १०·३८०४६९४ | ९·०९६६४९७ | ७-१०-३५ |
| ६० | ,, | ,, | २०- ९-४० | १०·४३५१४७१ | ९·०४१९७२० | ६-१९-२५ |
| ४५ | ,, | ,, | १६-२०-४० | १०·५३२७४३३ | ८·९४४३७५८ | ५- २-५० |
| ३० | ,, | ,, | ११-२८-४० | १०·६९२४०१५ | ८·७८४७१८६ | ३-२९-३२ |
| १५ | ,, | ,, | ५-५४-४४ | १०·९८४८३६६ | ८·४९२२८२५ | १-४६-४९ |

| ग्रह भोग | पलभा भाग | वर आलेले चर | चरास ६ नी भागून चरखंडे घ. प. वि. | याची प. वि. | वरच्यांतून खालचीं रक्कम वजा करून अं. | |
|---|---|---|---|---|---|---|
| ९० | २१६ | ७-२८-४० | १-१४-४६ | ७४-४६ | ३- ० | मिथुन |
| ७५ | १८० | ७-१०-३५ | १-११-४६ | ७१-४६ | ८-३२ | |
| ६० | १४४ | ६-१९-२५ | १- ३-१४ | ६३-१४ | १२-४६ | वृषभ |
| ४५ | १०८ | ५- २-५० | ०-५०-२८ | ५०-२८ | १५-३३ | |
| ३० | ७२ | ३-२९-३२ | ०-३४-५५ | ३४-५५ | १७- ७ | मेष |
| १५ | ३६ | १-४६-४९ | ०-१७-४८ | १७-४८ | १७-४८ | |

| मागें काढलेले लंकोदय | | वरील अंतर | दोनीची वजावाकी स्वदेशीय लग्नोदय | | दोनीची बेरीज स्वदेशीय लग्नोदय | |
|---|---|---|---|---|---|---|
| १६२-५० | मिथुन | ३- ० | १५९-५० | मिथुन | १६५-५० | कर्क |
| १५९ | | ८-३२ | १५०-२८ | | १६७-३२ | |
| १५२-५० | वृषभ | १२-४६ | १४०- ४ | वृषभ | १६५-३६ | सिंह |
| १४६-५० | | १५-३३ | १३०-३७ | | १६१-४३ | |
| १४१- ० | मेष | १७- ७ | १२३-५३ | मेष | १५८- ७ | कन्या |
| १३८-१० | | १७-४८ | १२०-२२ | | १५५-५८ | |

यावरून मेषादि राशींच्या २ खंडाच्या बेरजा आल्या त्या अशाः—१ मेष २४४-१५, २ वृषभ २७०-४१, ३ मिथुन ३१०-१८, ४ कर्क ३३३-२२, ५ सिंह ३२७-१९, ६ कन्या ३१४-५, ७ तूळ ३१४-५, ८ वृश्चिक ३२७-१९, ९ धन ३३३-२२, १० मकर ३१०-१८, ११ कुंभ २७०-४१, १२ मीन २४४-१५.

यांतील विपलें सोयीकरितां सोडून पलात्मक व घटीपलात्मक लग्नांचे पूर्णोदय व अर्धोदय देऊन अर्धोदयांची बेरीज खालीं दिली आहे. लग्न काढतांना बेरजेचा वगैरे उपयोग फार आहे.

## लग्नांचे उदयाचें पत्रक.

| नंबर. | राशि लग्न. | लग्नांचे पूर्णोदय पलें. | लग्नांचे पूर्णोदय घ. प. | लग्नाचे अर्धोदय पलें. | लग्नाचे अर्धोदय घ. प. |
|---|---|---|---|---|---|
| १ | मेष. | २४४ | ४ \| ४ | १२४ / १२० | २\|४ / २\|० |
| २ | वृषभ. | २७१ | ४\|३१ | १४० / १३१ | २\|२० / २\|११ |
| ३ | मिथुन | ३१० | ५\|१० | १६० / १५० | २\|४० / २\|३० |
| ४ | कर्क. | ३३४ | ५\|३४ | १६६ / १६८ | २\|४६ / २\|४८ |
| ५ | सिंह. | ३२७ | ५\|२७ | १६५ / १६२ | २\|४५ / २\|४२ |
| ६ | कन्या. | ३१४ | ५\|१४ | १५८ / १५६ | २\|३८ / २\|३६ |
| ७ | तूळ. | ३१४ | ५\|१४ | १५६ / १५८ | २\|३६ / २\|३८ |
| ८ | वृश्चिक. | ३२७ | ५\|२७ | १६२ / १६५ | २\|४२ / २\|४५ |
| ९ | धन. | ३३४ | ५\|३४ | १६८ / १६६ | २\|४८ / २\|४६ |
| १० | मकर. | ३१० | ५\|१० | १५० / १६० | २\|३० / २\|४० |
| ११ | कुंभ. | २७१ | ४\|३१ | १३१ / १४० | २\|११ / २\|२० |
| १२ | मीन. | २४४ | ४ \| ४ | १२० / १२४ | २ / २\|४ |

**अर्धोदयांच्या बेरजा.**

| राशि | नंबर | अर्धोदय | बेरीज घ० प० |
|---|---|---|---|
| मे० | १ | | २–४ |
| | २ | २ | ४–४ |
| वृ० | ३ | २–२० | ६–२४ |
| | ४ | २–११ | ८–३५ |
| मि. | ५ | २–४० | ११–१५ |
| | ६ | २–३० | १३–४५ |
| क० | ७ | २–४६ | १६–३१ |
| | ८ | २–४८ | १९–१९ |
| सिं. | ९ | २–४५ | २२– ४ |
| | १० | २–४२ | २४–४६ |
| कन्या. | ११ | २–३८ | २७–२४ |
| | १२ | २–३६ | ३०– ० |

**अर्धोदयांच्या बेरजा.**

| राशि | नंबर | अर्धोदय | बेरीज घ० प० |
|---|---|---|---|
| | | | ३०– ० |
| तू० | १३ | २–३६ | ३२–३६ |
| | १४ | २–३८ | ३५–१४ |
| वृश्चिक. | १५ | २–४२ | ३७–५६ |
| | १६ | २–४५ | ४०–४१ |
| धन | १७ | २–४८ | ४३–२९ |
| | १८ | २–४६ | ४६–१५ |
| मकर | १९ | २–३० | ४८–४५ |
| | २० | २–४० | ५१–२५ |
| कुं० | २१ | २–११ | ५३–३६ |
| | २२ | २–२० | ५५–५६ |
| मी. | २३ | २– ० | ५७–५६ |
| | २४ | २– ४ | ६०– ० |

याप्रमाणें कोल्हापूरचे लग्नोदय आले, आतां

## इष्टकालचे लग्न काढण्याची रीति.

१ इष्टकाल स्पष्ट सूर्योदयापासून घेणेचा व त्याच कालाचा स्पष्ट रवि करून त्यावरून लग्न काढावें.

उ. शके १८४४ श्रावण शु॥.८ सोमवारीं बारावर चार वाजून दहा मिनिटे हा इष्टकाल आहे. म्हणजे या वेळेचें लग्न काढावयाचें आहे. स्प. सूर्योदयकाल ६ ता. १६ मि. आहे. त्या वेळेपासुन ९ ता. ५४ मि. म्ह. २४ घ. ४५ प. हा इष्टकाल झाला.

यावेळचा रवीचा भोग्यकाल काढला तो खाली लिहिल्याप्रमाणें:—

पंचांगांत आषाढ व ३० रोजीं रवि ३–११–२४–२वि.गति ५७ क. १९ वि. असा आहे. श्रावणपूर्णिमेची गति ५७ क. २९ वि. आहे. म्हणजे १४ दिवसास १० विं. वाढली आहे. यावरून ७ दिवसास

५ वि. गति येते. ह्मणजे इष्ट दिवशीं ( ५७ क. १९ वि. ) + ५ वि. = ५७ क. २४ वि. गति आली. यावरून त्रैराशिकानें इष्टकालचा सूर्याचा भोग्यकाल काढला तो—

६० घ. [ ७ दि २४ घ. ४५ प. ] ५७ क. २४ वि. गति = ७ अं. ५ क. २८ वि. भोग्य येते. ही संख्या अमावास्येचे रवींत मिळविली ह्म. अष्टमीचा इष्टकालचा स्प. सू. आला तो—

( ३रा ११ अं. २४ क. २ वि.) + (०रा. ७ अं ५ क. २८ वि.) = ३रा.१८ अं. २९ क. ३० वि. हा निरयण इष्टकालीचा रवि झाला. यांत अयनांश १८अं.४७क.२७वि. मिळविले ह्म. ४रा.७अं.१६क.५७वि. हा इष्टकालचा सायन रवि झाला.

यावरून इष्टकालचें लग्न काढणेचें—

२ सूर्य किंवा लग्न यांचे त्यांच्या राश्यर्धांचे जें भोग्य किंवा भुक्त अंश असतील त्याला १५नीं भागावें व भागाकारास त्याच राश्यर्धांचे उदयकालानें गुणावें ह्मणजे त्यांचा भोग्य किंवा भुक्तकाल येतो.

उ. वर रवि ४रा. – ( ७ अं. १६ क. ५७ वि. ) आहे. ह्मणजे सिंहाच्या पूर्व राश्यर्धाच्या आंतच ह रवि आहे. ह्मणून तो १५ अंशांतून वजा करावा.

१५ अं. – ( ७ अं. १६ क. ५७ वि. ) भुक्तरवि = ७ अं. ४३ क. ३ वि. भोग्यरवि या संख्यांस १५नीं भागिलें ह्म. भागाकार आले ते ०–२९–७. ०–३०–५२ यांस सिंहाच्या पूर्व राश्यर्धानें ह्म. १६५ नीं गुणून गुणाकार आले ते ४८०४ वि. = ८० प. = १ घ. २० प. भुक्तकाल. ५०९३ वि. = ८४$\frac{५३}{६०}$ प. = ८५ प. = १ घ. २५ प. भोग्यकाल.

३ इष्टकालचा ३६५ वा अंश काढून तो त्यांतच मिळवा.

उ. इष्टकाल २४ घटी ४५ पळें आहे, यांस ३६५नीं भागिलें ह्म, ४प. हा ३६५वा अंश आहे तो इष्टकालांत ह्म. २ घ. ४५ प. यांत मिळविला ह्म. २४ घ. ४९ प. झाले.

४ वर काढलेल्या भुक्त भोग्यकालांत हा काल ( ह्म, २४ घ. ४९ प. ) मिळवावा, आणि रवि ज्या राश्यर्धांत असेल त्या पूर्वीच्या राश्यर्धांची घटिपलात्मक बेरीज मिळवावी, जी बेरीज येईल तींतून मेषापासून जितके राश्यर्ध वजा जातील तितके वजा करावेत. बाकी राहील तीस पुढील राश्यर्धानें भागावें व भागाकारास १५ नीं गुणावें ह्मणजे अंशादि गुणाकार येईल. त्यात अशुद्ध [= जो वजा केला नाहीं,] ते राश्यर्धाच्या पूर्वीचे राश्यर्ध मिळवावेत ह्मणजे सायन लग्न येतें,

उदाहरण—

| | | घ० प० |
|---|---|---|
| | वर काढलेला भुक्तकाल | १।२० |
| + | ३६५ अंशासहित इष्टकाल | २४।४९ |
| + | रवि सिंहाच्या पूर्व राश्यर्धांत ह्मणजे १५ अंशांचे आंत आहे ह्मणून कर्क अखेरपर्यंत राश्यर्धांची बेरीज— | १९।१९ |
| | | ४५।२८ |
| – | वजा जात असलेली राश्यर्धोदयाची बेरीज [ = धनाच्या पूर्वार्धापर्यंतची ] | ४३।२९ |
| | | १।५९ = ११९ प० |
| ÷ | अशुद्ध राश्यर्धोदय -- धनाचा पुढील राश्यर्धोदय ह्म० १६६ भागाकार— | ०।४३। ०।४३ |
| | | × १५ |
| | | १०अं. ४५क. १०'४५वि. |
| + | धनाचा पूर्वार्ध [ ∵ उतरार्ध वजा जात नाहीं ह्मणून । | ८.रा१५अं. |
| = | अंशात्मक सायनलग्न | ८रा. २५अं. ४५क. ११वि. |
| – | अयनांश | १८अंश४७कला२७वि. |
| = | निरयण लग्न | ८राशि ६अंश५७कला४४वि. |

अयनांश १८–५० धरून लग्नमानाचें कोष्टक नवीन पद्धतीनें कोल्हापूरचें तयार केलें आहे. या कोष्टकावरून तात्कालिक लग्न करण्याचें असेल तर सूर्य ज्या राशीस असेल त्या राशीचे जितके अंश इष्टकालपर्यंत भोगिले असतील तितके अंशाखालील कोष्टकांतील अंक घेऊन त्यांत इष्टकाल घटी पळें मिळवावीं आणि जी बेरीज येईल तितके अंक कोणत्या अंश कोष्टकांत आहेत तें पहावें. ज्या राशीपुढें हे अंक येतील तच तात्कालिक लग्न समजावें.

| रा. / अं. | मेष ० | वृषभ १ | मिथुन २ | कर्क ३ | सिंह ४ | कन्या ५ | तूळ ६ | वृश्चिक ७ | धनु ८ | मकर ९ | कुंभ १० | मीन ११ |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ० | २ ३४ | ६ ५५ | ११ ५१ | १७ १६ | २२ ४६ | २८ ५ | ३३ १९ | ३८ ४० | ४४ १२ | ४९ ३१ | ५४ १६ | ५८ ३० |
| १ | २ ४३ | ७ ५ | १२ १ | १७ २८ | २२ ५७ | २८ १६ | ३३ ३० | ३८ ५१ | ४४ २३ | ४९ ४१ | ५४ २५ | ५८ ३८ |
| २ | २ ५१ | ७ १४ | १२ १२ | १७ ३९ | २३ ७ | २८ २६ | ३३ ४२ | ३९ २ | ४४ ३४ | ५९ ५२ | ५४ ३४ | ५८ ४६ |
| ३ | २ ५९ | ७ २४ | १२ २२ | १७ ५१ | २३ १८ | २८ ३६ | ३३ ५२ | ३९ १३ | ४४ ४५ | ५० २ | ५४ ४३ | ५८ ५४ |
| ४ | ३ ७ | ७ ३३ | १२ ३२ | १८ १ | २३ २९ | २८ ४६ | ३४ २ | ३९ २४ | ४४ ५६ | ५० १२ | ५४ ५२ | ५९ २ |
| ५ | ३ १५ | ७ ४२ | १२ ४३ | १८ १२ | २३ ४० | २८ ५७ | ३४ १२ | ३९ ३५ | ४५ ८ | ५० २३ | ५५ २ | ५९ ११ |
| ६ | ३ २३ | ७ ५० | १२ ५३ | १८ २४ | २३ ५१ | २९ ९ | ३४ २१ | ३९ ४६ | ४५ १९ | ५० ३३ | ५५ १२ | ५९ १९ |
| ७ | ३ ३२ | ७ ५९ | १३ ४ | १८ ३५ | २४ २ | २९ २१ | ३४ ३२ | ३९ ५७ | ४५ ३० | ५० ४३ | ५५ २१ | ५९ २७ |
| ८ | ३ ४० | ८ ९ | १३ १४ | १८ ४६ | २४ १३ | २९ ३२ | ३४ ४३ | ४० ८ | ४५ ४१ | ५० ५४ | ५५ ३० | ५९ ३६ |
| ९ | ३ ४८ | ८ १८ | १३ २४ | १८ ५७ | २४ २४ | २९ ४३ | ३४ ५३ | ४० १९ | ४५ ५२ | ५१ ४ | ५५ ३९ | ५९ ४४ |
| १० | ३ ५६ | ८ २६ | १३ ३४ | १९ ८ | २४ ३५ | २९ ५५ | ३५ ३ | ४० ३० | ४६ ४ | ५१ १५ | ५५ ४७ | ५९ ५२ |
| ११ | ४ ४ | ८ ३६ | १२ ४५ | १९ २० | २४ ४६ | ३० ४ | ३५ १३ | ४० ४१ | ४६ १५ | ५१ २५ | ५५ ५६ | ० ० |
| १२ | ४ १३ | ८ ४६ | १३ ५६ | १९ ३१ | २४ ५७ | ३० १५ | ३५ २४ | ४० ५२ | ४६ २६ | ५१ ३४ | ५६ ४ | ० ८ |
| १३ | ४ २२ | ८ ५५ | १४ ७ | १९ ४२ | २५ ७ | ३० २४ | ३५ ३५ | ४१ ३ | ४६ ३६ | ५१ ४३ | ५६ १२ | ० १६ |
| १४ | ४ ३१ | ९ ६ | १४ १८ | १९ ५२ | २५ १७ | ३० ३३ | ३५ ४६ | ४१ १४ | ४६ ४६ | ५१ ५२ | ५६ २० | ० २४ |
| १५ | ४ ४० | ९ १६ | १४ २९ | २० २ | २५ २८ | ३० ४२ | ३५ ५७ | ४१ २५ | ४६ ५६ | ५२ १ | ५६ २८ | ० ३२ |
| १६ | ४ ४८ | ९ २६ | १४ ४० | २० १४ | २५ ३९ | ३० ५२ | ३६ ७ | ४१ ३६ | ४७ ७ | ५२ ११ | ५६ ३६ | ० ४० |
| १७ | ४ ५७ | ९ ३६ | १४ ५१ | २० २५ | २५ ४९ | ३१ २ | ३६ १८ | ४१ ४७ | ४७ १८ | ५२ २० | ५६ ४५ | ० ४८ |
| १८ | ५ ६ | ९ ४७ | १५ २ | २० ३७ | २६ ० | ३१ १३ | ३६ २९ | ४१ ५९ | ४७ २८ | ५२ २९ | ५६ ५३ | ० ५६ |
| १९ | ५ १५ | ९ ५७ | १५ १३ | २० ४७ | २६ १० | ३१ २४ | ३६ ४० | ४२ १० | ४७ ३८ | ५२ ३८ | ५७ १ | १ ४ |
| २० | ५ २५ | १० ८ | १५ २५ | २० ५८ | २६ २० | ३१ ३५ | ३६ ५२ | ४२ २१ | ४७ ४८ | ५२ ४६ | ५७ ९ | १ १३ |
| २१ | ५ ३४ | १० १८ | १५ ३६ | २१ १० | २६ ३० | ३१ ४५ | ३७ ३ | ४२ ३२ | ४७ ५९ | ५२ ५८ | ५७ १७ | १ २१ |
| २२ | ५ ४२ | १० २९ | १५ ४७ | २१ २१ | २६ ४० | ३१ ५५ | ३७ १४ | ४२ ४३ | ४८ ९ | ५३ ६ | ५७ २५ | १ २९ |
| २३ | ५ ५१ | १० ३९ | १५ ५८ | २१ ३२ | २६ ५० | ३२ ५ | ३७ २४ | ४२ ५४ | ४८ १९ | ५३ १४ | ५७ ३३ | १ ३७ |
| २४ | ६ ० | १० ४९ | १६ ९ | २१ ४२ | २७ १ | ३२ १६ | ३७ ३५ | ४३ ६ | ४८ ३० | ५३ २१ | ५७ ४१ | १ ४५ |
| २५ | ६ १० | १० ५९ | १६ २१ | २१ ५२ | २७ १२ | ३२ १६ | ३७ ४६ | ४३ १७ | ४८ ४० | ५३ २८ | ५७ ४९ | १ ५४ |
| २६ | ६ १९ | ११ ९ | १६ ३३ | २२ ३ | २७ २३ | ३२ ३६ | ३७ ५७ | ४३ २८ | ४८ ५० | ५३ ३८ | ५७ ५८ | २ १ |
| २७ | ६ २८ | ११ २० | १६ ४४ | २२ १५ | २७ ३३ | ३२ ४७ | ३८ ८ | ४३ ३९ | ४९ १ | ५३ ४८ | ५८ ६ | २ ९ |
| २८ | ६ ३७ | ११ ३० | १६ ५५ | २२ २५ | २७ ४४ | ३२ ५८ | ३८ १९ | ४३ ५० | ४९ ११ | ५३ ५८ | ५८ १४ | २ १७ |
| २९ | ६ ४६ | ११ ४१ | १७ ५ | २२ ३६ | २७ ५४ | ३३ ८ | ३८ ३० | ४४ १ | ४९ २१ | ५४ ७ | ५८ २२ | २ २८ |

उदाहरणार्थ शके १८८४ श्रावण शुद्ध ८ घ. २४ प. ४९ या वेळचें लग्न काढा.

रवि = ३ रा. १८ अं २९ क. आतां कोष्टकांतील ३।१८ चे खालील आंकडे २०।३७. यांत २९ क. ची

त्रैराशिकानें आलेलीं ५ पलें मिळविलीं ह्मणजे २०।४२ झालीं. यांत इष्ट घ. २४।४९ मिळवून बेरीज ४५।३१येते. हे आंकडे कोणत्या कोष्टकांत कोठें आहेत ते पहावें. ते धनलग्नाच्या ७ व्या अंशांखालील आंकड्याचे जवळ येतात. ह्मणून धनलग्नाचा ७ वा अंश असें समजावें.

## लग्नाचे अंशावरून इष्टकाल काढणें.

वरील उदाहरणांत ८ रा. ७ अं चे समोरील अंक ४५।३० आहेत आणि निरयण रवि ३।३।८।२९ आहे. यावरून रवीचे भोग्य २०।४२ आलें. हे अंक ४५।३० यांतून वजा केले ह्मणजे २४।४८ बाकी राहत. हींच इष्टकालाचीं लग्नाची व अंशाचीं घटींपलें होत.

---

# आधुनिक ज्योतिःशास्त्राधारें ग्रहांचीगतिस्थिति.

## बुध.

बुध वक्री झाल्यापासून मार्गी होण्यास २० पासून २५ दिवस लागतात आणि तो मार्गी झाल्यापासून वक्री होण्यास ८० पासून १०२ पर्यंत दिवस लागतात. बुध पूर्वेस आल्यापासून रविबुधांचें परमांतर पश्चिमेस होण्यास ७० पासून ७५ पर्यंत दिवस लागतात. पश्चिमेस बुध आल्यापासून पूर्वेस रवीचें परमांतर होण्यास ३९ पासून ४९ पर्यंत दिवस लागतात. बुध एकदा कोणत्याही दिशेस दिसूं लागल्यापासून सतत सुमारें २१ पासून ४३ दिवसपर्यंत दिसत असतो. पूर्वेस अस्त झाल्यापासून पश्चिमेस उदय होण्यास आणि पश्चिमेस अस्त झाल्यापासून पूर्वेस उदय होण्यास २१ पासून ४३ पर्यंत दिवस लागतात. तसेंच अस्त झाल्यावर उदय होण्यास कधीं ४३ दिवस लागतात व कधीं ९ दिवसांनींच उदय होतो. बुधाचे अस्त व उदय ३४८ दिवसांत सहा सहा होतात. ह्मणजे सामान्यतः वर्षांत त्याचा सहा वेळ अस्त व सहा वेळ उदय होतो. बुध सूर्यापासून फार तर १८ पासून २७ अंशांपर्यंत दूर गेलेला दिसतो. यासच ( इनापगम ) असें ह्मणतात. बुध व शुक्र हे दोन ग्रह रात्रीं कधींही मध्यान्हीं दिसावयाचे नाहींत. कधीं सायंकाळीं पश्चिमेस दिसतात, कधीं पहांटे पूर्वेस दिसतात. परम अंतराच्या वेळीं बुध व शुक्र वस्तुतः सूर्यापासून किंवा आपल्यापासून परम अंतरावर असतात असें नाहीं. ते आपआपल्या कक्षेंत उचीं असतात तेव्हां सूर्यापासून फार दूर असतात. सारांश परम इनापगम हा केवळ दृश्यमात्र होय. वास्तव नव्हे. बुधाच्या एका वर्षाच्या तारखांत १७ दिवस वजा करावे ह्मणजे वक्री, मार्गी, रविबुधांचें परम अंतर, उदय आणि अस्त यांच्या पुढल्या वर्षाच्या तारखा सुमारानें निघतील. पश्चिमेस बुध सायंकाळीं दिसतो तेव्हां तो सूर्याचे पूर्वेस असतो; आणि पहांटें पूर्व क्षितिजावर असतो तेव्हां सूर्याच्या पश्चिमेस असतो हें उघड आहे. बुध परम इनापगमी असतो तेव्हां सूर्यास्तानंतर सुमारें २६ मिनिटांनीं दिसूं लागतो व सूर्योदयापूर्वी तो २६ मिनिटें दिसेनासा होतो. नुसत्या डोळ्यांनीं बुध चांगला स्वच्छ चकचकीत व किंचित् पिवळसर दिसतो. स्थिर तारा लुब्धक मात्र त्याच्यापेक्षां तेजस्वी दिसतो. बाकी सर्व ताऱ्यांहून तो तेजस्वी आहे. मोठ्या दुर्बिणींतून तो पाहिला असतां चंद्राप्रमाणें त्याला क्षय व वृद्धि आहे असें दिसतें. सर्व ग्रह चंद्राप्रमाणें अप्रकाशित आहेत; ते सूर्याच्या तेजानें प्रकाशतात; त्याचप्रमाणें बुधही सूर्याच्या तेजानें प्रकाशतो बुधाचे कालांश १३ धरले ह्मणजे उदयास्त बरोबर येतात. बुधाची गति सूर्यापेक्षां कधीं जास्त असते व कधीं कमी असते. तो वक्री असतो तेव्हां अर्थातच त्याची गति कमी असते. ग्रह सूर्यापासून जवळच असून त्याची गति सूर्याहून कमी असली ह्मणजे त्याचा अस्त होतो व तो आपल्या पश्चिमेस होतो; कारण त्यावेळीं त्या ग्रहाचा निरास्त सूर्याच्या मागाहून लवकरच होत असतो. तसेंच ग्रह सूर्याच्या पश्चिमेस जवळच असून त्याची गति सूर्याहून कमी असली ह्मणजे त्याचा पूर्वेस उदय होतो मंगळ गुरु, आणि शनि ह्या बहिर्वर्ती ग्रहांची गति नेहमीं सूर्याहून कमी असते ह्मणून त्यांचा नेहमीं पूर्वेस उदय व पश्चिमेस

अस्त होतो. बुधशुक्रांची गति सूर्यगतीहून कमी असेल तेव्हां मात्र त्यांचा अस्त पश्चिमेस व उदय पूर्वेस होतो. जास्त असेल तेव्हां पश्चिमेस उदय आणि पूर्वेस अस्त होतो. बुधशुक्रांचा पश्चिमेस अस्त होतो तेव्हां ते नेहमीं वक्री असतात. व याहून भिन्न प्रसंगीं मार्गी असतात.

---

## शुक्र

शुक्र वक्री झाल्यापासून मार्गी होण्यास ४० ते ४५ दिवसापर्यंत दिवस लागतात आणि तो मार्गी झाल्यापासून वक्री होण्यास ५४० ते ५४५ पर्यंत दिवस लागतात. शुक्राचा एकदा उदय झाल्यावर त्याचे सतत दिसण्याचें परममान अदमासें २४८ दिवसांचें आहे. पूर्वेस अस्त झाल्यापासून पश्चिमेस उदय होण्यास ५८ पासून ७१ दिवसापर्यंत दिवस लागतात; आणि त्याचा पश्चिमेस अस्त झाल्यासून पूर्वेस उदय होण्यास ८ ते १० दिवसापर्यंत दिवस लागतात असा अनुभव आहे. सूर्यापासून तो ४५ ते ४७ अंशापर्यंत दूर जातो. त्यास इनापगम असें ह्मणतात. पूर्वेस शुक्राचा इनापगम झाल्यापासून रविशुक्रांचें परमांतर पश्चिमेस होण्यास ४४० पासून ४४५ पर्यंत दिवस लागतात. आणि पश्चिमेस शुक्राचें परमांतर झाल्यापासून रवि शुक्र इनापगम पूर्वेस होण्यास १४० पासून १४५ पर्यंत दिवस लागतात. १३।१४ महिन्यांनीं गुरुशुक्रांची एकवेळ गांठ पडते. शुक्र एकदा सायंकाळीं पश्चिमेस किंवा पहाटेस, पूर्वेस दिसूं लागला ह्मणजे सुमारें २५५ दिवस दिसतो. नंतर त्याचा अस्त होतो. शुक्राचा इनापगम परम होतो त्याच्या मागें पुढें कांहीं दिवस तर तो फार तेजस्वी दिसत असतो. शुक्रापेक्षां गुरुचें तेज फार कमी आहे तरी गुरु पुष्कळ तेजस्वी आहे. यामुळें ते दोघे एके ठिकाणीं येतात तेव्हां त्यांतला गुरु कोणता व शुक्र कोणता हें ओळखण्यास गैरमाहितगारास अमळ अडचण पडते. २।३ दिवस पहावें ह्मणजे दोघांत ज्याची गति जलद तो शुक्र समजावा.

शुक्र कधीं अवशीस दिसतो, कधीं पहाटेस दिसतो. यामुळें हे निरनिराळे दोन ग्रह असावे अशी प्राचीन काळीं पाश्चात्यांची समजूत होती. आमच्या या भरतखंडांत केव्हांही अशी समजूत होती असें दिसत नाहीं. ते दोन्ही एकच असें आह्मास पहिल्यापासून समजलें आहे. ऋग्वेदांत वेन नांवाची एक देवता आहे, ती शुक्रच होय.

तेजानें सर्व ग्रहांत शुक्र वरचढ आहे. परंतु त्याचे आकार पाहिले तर उलट स्थिति आहे. सर्वांत मंगळ मात्र शुक्राहून लहान आहे. बाकी सर्व ग्रह त्याचेहून मोठे आहेत. त्याच्या खालोखाल तेजस्वी जो गुरु तो आकारांनीं त्याच्या १३०० पट मोठा आहे. आणि सर्व अचल ताऱ्यांत तेजस्वी दिसणारा परंतु गुरुहून कमी तेजस्वी असा जो व्याध तो त्या गुरुहूनही सुमारें १०० कोटिपट मोठा आहे. परंतु यावरून शुक्र फारच लहान असेल आणि त्याची चांदणी एवढीशी दिसते ती कितीशी मोठी असणार असें तुह्मास वाटेल तर तसें मात्र नाहीं. शुक्राभोंवती प्रदक्षिणा करण्यास फार जलद चालणाऱ्या आगबोटीनें दोन महिने लागतील. शुक्र बहुतेक आपल्या अवाढव्य पृथ्वी एवढा मोठा आहे.

दुर्बिणींतून पाहिलें असतां चंद्राप्रमाणें शुक्राच्या कला कमजास्त दिसतात. चंद्र आणि शुक्र यांच्या कलावृद्धिक्षयाचे नियम एकच आहेत. परंतु वस्तुस्थिति थोडीशी निराळी आहे. चंद्र पृथ्वीभोंवतीं फिरतो आणि शुक्र सूर्याभोंवतीं फिरतो. दोघेही पश्चिमेकडून पूर्वेकडे फिरतात. शुक्राच्या कला कमजास्त होतात असे सूक्ष्म दृष्टीच्या मनुष्यांस नुसत्या डोळ्यांनींही कधीं कधीं भासतें. आमचे दैत्यगुरु शुक्राचार्य एकाक्ष आहेत. यावरून ही गोष्ट प्राचीनकाळीं आमच्या पूर्वजांच्या लक्षांत आली होती असें दिसतें.

शुक्र सूर्यबिंबाचें अधिक्रमण ( सूर्यामध्यें शुक्र मिसळणें ) फार वर्षांनीं करतो. २४३ वर्षांत तें फक्त ४ वेळां होतें. अधिक्रमणावरून सूर्याचें अंतर काढतात. शुक्र नियमित काळानें सूर्यबिंबाचें अधिक्रमण करितो ही गोष्ट केप्लरच्या पूर्वी कोणास माहीत नव्हती. इ. स. १६३१ या वर्षाचें अधिक्रमण प्रथम त्यानें वर्तविलें. आणि १६३९ या वर्षाचें अधिक्रमण इंग्लंदांतल्या एका मनुष्यानें पाहिलें परंतु सूर्याचें अंतर काढण्यास त्याचा उपयोग झाला नाहीं. त्याच्या पुढल्या अधिक्रमणावरून सूर्याचें अंतर उत्तरोत्तर सूक्ष्म समजलें. इ. स. १८७४ चें

अधिक्रमण आपल्या देशांत सकाळीं दिसलें तें पुष्कळांनीं पाहिलें असेलच. शुक्राचें अधिक्रमण नुसत्या डोळ्यांनीं दिसतें. सूर्यबिंब वरून एक काळा ठिपका एका बाजूकडून दुसऱ्या बाजूस जातो.

चंद्रशुक्रामुळें होणारीं सूर्यग्रहणें काजळाच्या भिंगाशिवाय नुसत्या डोळ्यांनीं पाहण्याची एक युक्ति आहे. घराच्या छपराला अगर मांडव वगैरेला लहान लहान भोकें असलीं तर त्यांतून सूर्याचा प्रकाश पडतो. हा कवडसा अगदीं वाटोळा असतो. सूर्यग्रहणाचे वेळीं या कवडशास ग्रहण लागलेलें दिसतें. मात्र त्याची दिशा उलटी असते, सूर्यबिंबाचा उत्तरभाग ग्रस्त असला तर दक्षिण भागास ग्रहण लागलेलें दिसतें. या रीतीनें ग्रहण इतकें सूक्ष्मपणें पाहण्यास सांपडतें कीं तें लागलें केव्हां व सुटलें केव्हां हेंही सूक्ष्मपणें समजतें.

शुक्रावर वातावरण आहे. तें फार दाट आहे व त्यांत फार दाट अभ्रें असतात असें अलीकडील सूक्ष्म वेधांवरून दिसून आलें आहे. पृथ्वीवरील वातावरणांत क्षितिजाजवळ किरणाचें वक्रीभवन ३४ कला होतें. शुक्राच्या वातावरणांत क्षितिजाजवळील किरणांचें वक्रीभवन ४४ कला होतें. वातावरणामुळें अधिक्रमणाच्या वेळीं दुर्बिणींतून त्याची कडा किंचित् प्रकाशित दिसते. शुक्राचें तेज फार असल्यामुळें दुर्बिणींतून त्याचे वेध घेण्यास थोडीशी अडचण पडते. आपल्यास जसा चंद्र आहे तसा शुक्रास चंद्र नाहीं. तथापि बऱ्याच गोष्टींनीं शुक्र हा पृथ्वीसारखा आहे. पृथ्वीपेक्षां तो सूर्याला फार जवळ आहे. आपल्यास पृथ्वीवरील दृष्टीनें पाहिले ह्मणजे ह्या चमत्कारिक कृति वाटतात. परंतु ईश्वरी दूरदृष्टीपुढें आपली दृष्टि कितीशी असणार?

शुक्राचे कालांश मार्गी असतांना ८ धरावे व वक्री असेल तर ७॥ धरले ह्मणजे उदयास्त बरोबर येतात असें माझ्या अनुभवास आलें आहे. शुक्राची गति रवीपेक्षां कधीं कमी असते किंवा कधीं जास्त असते. तो वक्री असतो तेव्हां अर्थातच कमी असते. शुक्र रवीच्यां पूर्वेस जवळच असून त्याची गति रवीहून कमी असली ह्मणजे त्याचा अस्त होतो. व तो आपल्या पश्चिमेस होतो. कारण त्यावेळीं त्याचा नित्यास्त सूर्याच्या मागाहून लवकरच होतो. तसेंच तो रवीच्या पश्चिमेस जवळच असून त्याची गति रवीहून कमी असली ह्मणजे त्याचा पूर्वेस उदय होतो. शुक्राचे उदयास्त ५८४ दिवसांत दोन दोन होतात. ह्मणजे इतक्या वेळांत २ वेळां उदय व २ वेळां अस्त होतो. शुक्राचा उदय पूर्वेस असून तो परम इनापगमी ज्यावेळीं होतो त्या-वेळीं तो दिवसास पुष्कळ वेळां दिसतो व त्यावेळीं त्याचें बिंब शुद्ध पक्षांतील अष्टमीच्या अर्धचंद्राप्रमाणें दिसतें. आणि अस्त होण्याच्या अगोदर सुमारें शुक्लपक्षांतील त्रयोदशी चतुर्दशीच्या चंद्राप्रमाणें त्याचें बिंब दिसतें. पुढें त्यावेळीं तो पृथ्वीजवळ येतो ह्मणून तो मोठा दिसतो. पुढें अस्त व वक्रियोग होऊन पश्चिमेस उदय झाल्यावर सायंकाळीं तो दिसतो, तेव्हां त्याचा क्षय होत असतो.

---

## मंगळ.

मंगळ वक्री झाल्यापासून मार्गी होण्यास ६७ पासून ८३ पर्यंत दिवस लागतात आणि तो मार्गी झाल्या-पासून वक्री होण्यास ६८४ पासून ७०२ पर्यंत दिवस लागतात. मंगळ एकदां उदय पावल्यावर सतत सुमारें २१ किंवा २२ महिने दिसत असतो. आणि पुढें अस्त झाल्यावर ९० पासून १५० दिवसपर्यंत तो मुळींच दिसत नाहीं. मंगळाचा अस्तोदय सुमारें ७७९ दिवसांत एक एक होतो. ह्मणजे २ सौरवर्षें ४९ दिवस इतक्या काळांत एकेक होतो. मंगळाची गति रवीहून नेहमीं कमी असते ह्मणून त्याचा नेहमीं पूर्वेस उदय व पश्चिमेस अस्त होतो. सूर्यमालेंत शुक्रापुढें पृथ्वी असून तिच्या पलीकडे मंगळ आहे. या ग्रहाचा तांबूस वर्ण आहे ह्मणून ह्मास अंगारक, लोहितांग, अग्नि इत्यादि नांवें मिळालीं आहेत. जातक, ताजक, मुहूर्त या ज्योतिषशास्त्राच्या शाखांत मंगळ हा क्रूर ग्रह मानिला आहे. तें त्याच्या रक्ततेस अनुसरूनच आहे. प्राचीन पाश्चात्य लोकांनीं तर ह्याला युद्धाची देवता अशा अर्थाचें ( मार्स ) असें नांव दिलें आहे. भारत युद्धाचे वेळीं हा क्रूर ग्रह वक्री होता. मग काय विचारतां? त्यानें प्रळयच उडवून दिला. युद्धाच्या पूर्वीच ज्येष्ठापर्यंत मंगळ येऊन उलटा अनुराधाकडे वळला. अनुराधा नक्षत्राची देवता मित्र आहे. या स्थितीनें ज्येष्ठ राजा जो दुर्योधन त्याचा व त्याच्या मित्रांचा संहार अंगारकानें दर्शविला असें भारतटीकाकार ह्मणतो.

कुजस्तंभ अनिष्टकारक अशी सांप्रत प्रसिद्धि आहे. ग्रह एका नक्षत्रांतून त्याच्या पुढच्या नक्षत्रांत जावयाचे असतात ते कधीं कधीं उलटे वळतात. व तसें वळतानां कांहीं वेळ खांबासारखे स्तब्ध दिसतात. मंगळ एका राशीत असतां वक्र झाला म्हणजे पुन्हा सरळ होऊन त्या राशींतून पुढें जाईपर्यंत बरेच महिने लागतात, तेव्हां त्यास कुजस्तंभ झाला असें म्हणतात. मंगळ हा पृथ्वीचा मुलगा मानिला आहे म्हणून त्यास त्या अर्थाचीं कुज, महीसुत, भौम इत्यादि नांवें आहेत.

मंगळाचे कालांश १७ धरले म्हणजे त्याचे अस्तोदय बरोबर येतात. मंगळ बहिर्वर्ती ग्रह आहे. तो सूर्याजवळच नेहमीं नसतो. म्हणून रात्रीं आकाशांत तो पाहिजे तिकडे दिसतो. तो पृथ्वीच्या बाहेर आहे म्हणून कधीं पृथ्वीच्या एका बाजूस तो व एका बाजूस रवि असें होतें. या वेळीं त्याचें षड्भांतर ( रवीपासून ६-राशींचें अंतर ) झालें असें म्हणतात. यावेळीं सूर्यास्ताबरोबर तो उगवतो व सर्व रात्रभर तो दिसत असतो.

मंगळाचा अमाप्रदक्षिणाचा काळ सुमारें ७८० दिवसांचा आहे म्हणून षड्भांतर, त्रिभांतर, वक्रत्व, मार्गित्व, अस्तोदय यांच्या एकदाच्या वेळेंत ७८० दिवस मिळविले म्हणजे त्या त्या गोष्टीची पुढील वेळ सुमारानें निघते. कधीं तो व पृथ्वी यांच्यामध्यें रवि येतो तेव्हां रवीचा व त्याचा योग * झाला असें म्हणतात. व तेव्हां त्याचा अस्त असतो. रवीपासून पृथ्वीचें अंतर व मंगळाचें अंतर यांच्या बेरजेइतकें अंतर योगाच्या वेळीं पृथ्वी व मंगळ यांमध्यें असतें आणि वजाबाकीइतकें अंतर षड्भांतराच्या वेळीं असतें, अर्थात् षडभांतरीं तो पृथ्वीला अधिक जवळ असतो. त्यावेळीं तो फार मोठा दिसत असून त्याचें तेज गुरुसारखें असतें. मंगळ रवीजवळ असतो तेव्हां त्याचा उदय नुकताच झाला असतो; किंवा अस्ताची संधि असते. तेव्हां तो जेवढा दिसतो त्याच्या सुमारें १५।२० पटषड्भांतरीं दिसतो. पटषडभांतराचे वेळीं तर तो गुरूच्या जवळ जवळ तेजस्वी दिसतो. मंगळ आणि रवि यांच्यामध्यें तीन राशींचें म्हणजे सगळ्या आकाशाचा चौथा हिस्सा इतकें अन्तर होतें त्यास त्रिभांतर म्हणतात. रवीच्या पूर्वेस मंगळ असतां जें त्रिभांतर होतें त्यास पूर्व त्रिभांतर असें म्हणतात. हें योगाच्या पूर्वी होतें. रवीच्या पश्चिमेस मंगळ असतां जें त्रिभांतर होतें त्यास पश्चिम त्रिभांतर म्हणतात हें योग झाल्यावर होतें.

षडभांतराच्या वेळीं मंगळ जर नीची असेल म्हणजे तो पृथ्वीपासून ४८७ लक्ष मैलापेक्षांही कमी अंतरावर असतो. तेव्हां मंगळाच्या नीची पृथ्वी आगष्टच्या २६ तारखेस येते. त्या दिवशीं जर षडभांतर झालें तर पृथ्वीपासून मंगळ फक्त ३४८ लक्ष मैलावर असतो आणि मंगळाच्या उच्चीं पृथ्वी फेब्रुवारीच्या २१ तारखेस असते, तेव्हां षडभांतर झालें तर तो ६२७ लक्ष मैलावर असतो. यामुळें फेब्रुवारींतल्या षडभांतरापेक्षां आगष्टच्या षडभांतराच्या वेळीं तो सुमारें ३। पट मोठा व तेजस्वी दिसतो.

मंगळाला दोन उपग्रह आहेत. असा शोध इ. स. १८७७ या वर्षी लागला हे उपग्रह फार लहान आहेत.

---

## गुरु.

गुरु वक्री झाल्यापासून मार्गी होण्यास ११७ पासून १२४ पर्यंत दिवस लागतात. आणि मार्गी झाल्यापासून वक्री होण्यास २७३ पासून २८४ पर्यंत दिवस लागतात गुरुचा एकदां उदय झाल्यावर तो सतत ३६५ पासून ३७६ दिवसपर्यंत तो दिसतो आणि त्याचा अस्त झाल्यापासून उदय होण्यास २३ पासून ३३ पर्यंत दिवस लागतात. ३९९ दिवसांत गुरुचा एक उदय आणि एक अस्त होतो. त्यांत तो वरील

---

* दोन खस्थ ज्योतीस सांधणारी रेषा ध्रुवांतून जाते तेव्हां त्या दोहोंची युति झाली असें म्हणतात. म्हणजे यावेळीं त्या दोहोंचें पूर्वपश्चिम अंतर शून्य होतें, दक्षिणोत्तर अंतर कितीही असू शकेल. दोन ज्योतींचा भोग सारखा होतो तेव्हां ही युति झाली असें म्हणतात. युतीला योग असेंही म्हणतात. युतिकाळीं दोन ज्योतींचें दक्षिणोत्तर अंतर १ अंशाहून कमी असेल तर त्यांचें युद्ध झालें असें म्हणतात. दोहोंचीं बिंबें परस्परांस लागलीं तर उल्लेख म्हणतात. संपातापासून किंवा दुसऱ्या मानलेल्या आरंभस्थानापासून मोजलेल्या ज्योतीपासून क्रांतिवृत्तावर काढलेला लंब त्यास छेदितो. तेथपर्यंत जें अंतर त्यास भोग असें म्हणतात.

उदयाचे दिवस खेरीजकरून बाकी सुमारें ३६७ दिवस उदित असतो. गुरूचे कालांश ११ धरले म्हणजे त्याचे अस्तोदय बरोबर येतात. गुरुइतका तेजस्वी ग्रह शुक्रावांचून दुसरा नाहीं. त्याच्या अस्तोदयाची संधी असते तेव्हां मात्र हा बारीक दिसतो. इतर वेळीं तो सहज ओळखतां येतो. गुरुची अमाप्रदक्षिणा ३९९ दिवसांत होते. म्हणून त्याचें षड्भांतर, त्रिभांतर, वक्रत्व, मार्गित्व, अस्त, उदय ह्यांच्या एकदांच्या वेळेंत एक सौरवर्ष व ३४ दिवस मिळविले म्हणजे त्याच्या गोष्टीचा पुढला वेळ निघतो.

गुरु आपणास डोळ्यांनीं लहानसा एक बिंदु दिसतो परंतु तो एवढा मोठा आहे कीं आपल्या पृथ्वी एवढाले १२४० गोल एकत्र करावे तेव्हां गुरु एवढा एक गोल होईल. त्याचें द्रव्य पृथ्वीच्या सुमारें तीनशें पट आहे अर्थात् पृथ्वीच्या तीनशें पट त्याचें वजन आहे. तो इतका मोठा आहे कीं त्याच्या द्रव्यांतून सूर्यमालेंतल्या बाकीच्या प्रत्येक ग्रहाएवढाले दोन दोन ग्रह घडविले तरी कांहीं द्रव्य शिल्लक राहून त्याची आणखी कांहीं भुवनें निर्माण करितां येतील. त्यास गुरु हें नांव आमच्या पूर्वजांनीं दिलें तें यासंबंधें अगदीं अन्वर्थ आहे. गुरु इतका मोठा आहे. तेव्हां तो मंद असेल असें मनांत येतें परंतु तसें नाहीं. रविभोंवतीं फिरत असतां तो एका सेकंदांत आठ मैल चालतो व त्याची अक्षभ्रमणगतीही अशीच विलक्षण आहे. पृथ्वीच्या तुलनेनें पाहिलें तर ती फारच विलक्षण आहे. पृथ्वीच्या विषुववृत्तावरील प्रत्येक बिंदु एका सेकदांत जितका चालतो त्याच्या २७ पट म्हणजे सुमारें ८ मैल गुरुवरील बिंदु चालतो. आपल्या पृथ्वीच्या दोन अक्ष प्रदक्षिणा होतात तों गुरूच्या पांच होतात. यामुळें गुरुवरील दिवस आपले ९ तास ५५|| मिनिटें एवढाच काय तो आहे. परंतु त्याचें वर्ष फार मोठें आहे. आपलीं बारा वर्षें होतात तेव्हां त्याचें एक वर्ष होतें. आपलें वर्ष होतें तेव्हां कोठें त्याचा एक सौर महिना होतो. रविपासून पृथ्वीच्या पांचपट अंतरावर गुरु आहे. कधीं तो रविपासून ४६ कोटी मैलावर असतो, कधीं ५० कोटी मैलावर असतो. ह्याचा दक्षिणोत्तर व्यास पूर्वपश्चिम व्यासापेक्षां सुमारें ५००० मैल कमी आहे. ह्यामुळें ह्याचा आकार ध्रुवाकडे किंचित् चपटा आहे.

गुरूच्या पृष्ठभागावर स्थाईक खुणा नाहींत असें म्हटलें तरी चालेल. इ. सं. १८७९ मध्यें त्याच्या दक्षिण गोलार्धांत एक तांबडा ठिपका दिसूं लागला, तो मात्र सन १८८३ पर्यंत दिसत होता. तो दीर्घवर्तुलाकृति होता. त्याचा बृहदक्ष विषुववृत्ताशीं समांतर होता. व तो लघ्वक्षाच्या चौपट होता. त्याचें क्षेत्रफळ जवळ जवळ आपल्या पृथ्वी एवढें होतें. असा एकादा ठिपका दिसतो त्यावरून गुरूचा अक्षप्रदक्षिणा काळ काढिला आहे. त्यांत असें दिसून आलें आहे कीं गुरूचा विषुववृत्तावरील भाग जितका जलद फिरतो त्यापेक्षां ध्रुवाकडील भाग कमी वेगानें फिरतात. ह्या गोष्टींत गुरूचें सूर्याशीं साम्य आहे असें होतें.

गुरूच्या शारीरस्थितीचें पृथ्वीशीं मुळींच साम्य दिसत नाहीं. सूर्याशीं बरेंच साम्य दिसतें. सूर्याप्रमाणें तो कडेपेक्षां मध्यमभागीं सुमारें तिप्पट चकचकीत दिसतो. आणि दुसरी महत्वाची गोष्ट ही कीं त्याला स्वतःचा थोडासा प्रकाश आहे. गुरूचा गोल आपणास दिसतो तो त्याचा वास्तविक गोल नव्हे; दृश्य गोलांत वरच्या भागी अत्युष्णतेमुळें वायुरूप अशीं झालेलीं द्रव्यें अगदीं विरल पसरलेलीं आहेत; व त्यांच्याखालीं बरेंच विस्तृत दाट वातावरण आहे. त्यांत दाट वाफा अथवा अभ्रें आहेत.

ह्या सर्व गोष्टी घडवून आणणारी उष्णता येते कोठून? रविपासून तर गुरूला आपल्या सुमारें पंचविसावा हिस्सा प्रकाश आणि उष्णता मिळते. त्याच्या योगानें वरील परिणाम होणें संभवत नाहीं. यावरून असें अनुमान होतें कीं रविचा अंतरभाग अत्यंत उष्ण आहे, त्याप्रमाणें गुरूचा अंतरभाग, तितका उष्ण नव्हे, तरी पुष्कळ उष्ण आहे. गुरूचा वास्तव गोल तोच होय. मोठ्या महासागरांतील सर्व पाण्याची वाफ होऊन राहील इतकी उष्णता त्याच्या अंगीं आहे.

त्या उष्णतेनें उत्पन्न होणाऱ्या वाफा पृष्ठभागीं सर्वत्र पसरलेल्या असतात. त्या वाफा पोटांतून नुकत्याच बाहेर पडतात तेव्हां स्वयंप्रकाश असतात. त्यामुळें गुरु किंचित् स्वयंप्रकाश दिसतो.

गुरुवरचा वैपुवपट बहुधा नेहमीं पांढरा असतो. परंतु इ. स १८६९ पासून १८७१ पर्यंत तो कधीं सांबूस, कधीं नारंगी रंगाचा, कधी हिरवा, पिवळा या प्रमाणें अनेक प्रकारच्या रंगाचा दिसला. याप्रमाणें इ. स. १८६० मध्येंही त्याच्या स्वरूपांत पुष्कळ चलविचल झाली होती व चमत्कार हा कीं याच सुमारास सूर्यावर डाग फार दिसले. ह्या दोन गोष्टींच्या समकालीनत्वावरून असें अनुमान ज्योतिष्यांनीं काढिलें आहे कीं, सूर्याच्या वातावरणाशीं ग्रहांचा कांहींतरी संबंध आहे व त्यांत गुरूचा संबंध विशेष आहे. हा संबंध काय आहे हें मात्र अद्यापि गूढ आहे. सूर्याच्या फार जवळ गुरु असतो तेव्हांच दोघे परस्परास उपाधि देतात असें नाहीं. दोघांचें अंतर फार असतांही दोघांच्या वातावरणांत उपाधि होतात. ग्रहांच्या या परस्पर संबंधावरून फलज्योतिषांतील गोष्टी साधार असाव्या असें सहज मनांत येतें.

गुरु षड्भांतराच्या वेळीं तो पृथ्वीला अधिक जवळ असतो; त्यावेळीं तो फार तेजस्वी दिसतो. गुरु आणि सूर्य यांच्यामध्यें ३ राशींचें ह्मणजे सगळ्या आकाशाचा चौथा हिस्सा अंतरही होतें त्यास त्रिभांतर ह्मणतात.

गुरूला चार उपग्रह (चंद्र) आहेत. गुरूच्या तेजामुळें तें नुसत्या डोळ्यांनीं दिसत नाहींत. या उपग्रहांचें तेज वारंवार बदलतें. गुरूवरून पहाणारास गुरूच्या चंद्राची अमाप्रदक्षिणा होण्यास जो काळ लागतो तो अतिसूक्ष्मपणें काढिला आहे. पहिला दिवस १८ तास २८ मिनिटें ३६ सेकंदें इतक्या वेळांत एक प्रदक्षिणा करितो. ह्मणजे आपल्या चंद्राची एक अमावास्या होते तों त्याच्या १६ होतात व तितकेंवेळा त्याला आणि रवीला ग्रहणें लागतात. बाकीच्या उपग्रहांचे प्रदक्षिणाकाळ सुमारें अनुक्रमें ३ दिवस १३ तास, ७ दि. ४ तास आणि १६ दिवस १८ तास हे आहेत.

ह्या उपग्रहांच्या छायेनें गुरूला व गुरूच्या छायेंत सांपडून त्यांस ग्रहणें लागतात. तसेंच केव्हां ते गुरुबिंबाचे अधिक्रमण करितात व केव्हां त्यांचें पिधान होतें. ह्याप्रमाणें चार चंद्राचे मिळून १६ चमत्कार होतात. त्यांत प्रति दिवशीं निदान दोन चमत्कार होतात. कधीं कधीं तेरापर्यंत होतात. दुर्बिणींतून ते पाहण्याची मोठी मौज दिसते. आपल्या चंद्राच्या प्रदक्षिणेंत ग्रहणें होत नाहींत, परंतु गुरूच्या पहिल्या तीन चंद्राच्या प्रत्येक प्रदक्षिणेंत होतात. चवथ्याची फारशी होत नाहींत. गुरूची कक्षा, त्याच्या उपग्रहांच्या कक्षा, आणि आपल्या पृथ्वीची कक्षा, ह्यांमध्यें फार मोठाले कोन होत नाहींत. सुमारें तीन अंशाचे होतात. ह्यामुळें हे चारही चमत्कार वारंवार होतात.

कोणत्याही पदार्थाचा प्रकाश आपल्या डोळ्यांत येईपर्यंत त्यास मधला मार्ग क्रमण्यास कांहीं काळ लागतो. असा शोध गुरूच्या उपग्रहांच्या ग्रहणांवरून लागला. सूर्य आणि गुरु यांचा योग असतो तेव्हां पृथ्वीपासून गुरूचें जितकें अंतर असतें त्यापेक्षां षड्भांतराच्या वेळीं सुमारें १८॥ कोटी मैल, ह्मणजे पृथ्वी कक्षेच्या व्यासा इतकें, जास्त असतें. गुरूच्या उपग्रहांच्या ग्रहणाचा काल गणितानें काढावा त्याप्रमाणें योगाच्या वेळीं ग्रहणें लागतात; परंतु षड्भांतराच्या वेळीं सोळा सतरा मिनिटें तीं उशिरां लागतात असें दिसून आलें. दुसऱ्या एक दोन मार्गांनीं प्रकाशाचा वेग काढिला आहे. सूर्यावरून पृथ्वीवर प्रकाश येण्यास ५०० सेकंदें लागतात. ह्मणजे दर सेकंदास तो सुमारें १८५ हजार मैल चालतो. केवढा हा वेग! ३०० वर्षांपूर्वी गुरु हा एक लोक आहे, आणि तो आपल्या पृथ्वीहून अति विशाल आहे, हें कोणासही माहित नव्हतें. मग त्याला चंद्र असतील असें कोणाच्या स्वप्नीं तरी कोठून येणार? परंतु पुढें त्यांचा शोध लागला. त्यांस ग्रहणें लागतात असें दिसलें, आणि त्यांवरून प्रकाशाला वेग आहे असें समजलें. सृष्टचमत्कारांच्या शोधांत असलें ह्मणजे एकामागून एक विलक्षण शोध कसे लागत जातात हें ह्यावरून दिसून येतें.

---

## शनि.

शनि वक्री झाल्यापासून मार्गी होण्यास १३५ पासून १४३ पर्यंत दिवस लागतांत. आणि मार्गी झाल्यापासून वक्री होण्यास २३२ पासून २४९ पर्यंत दिवस लागतात. शनि एकदा उदय पावल्यावर तो सतत

अस्ताचे दिवस खेरीज करून ३४१ पासून ३४७ दिवस पर्यंत दिसतो. उदय होण्यास ३६ पासून ३७ पर्यंत दिवस लागतात. ३७८ दिवसांत एक उदय व एक अस्त होतो. शनीचे कालांश १५ धरले; म्हणजे उदयास्त बरोबर येतात. सूर्यमालेंत गुरूच्या पलिकडे शनि आहे. तो सुमारें पहिल्या प्रतीच्या तारेएवढा किंवा तिच्याहून मोठा दिसतो. त्याचा रंग किंचित् काळसर पिंगट दिसतो. आकाशांत धूर पसरला असतां त्यांतून एखादी तारा जशी दिसते तसा तो कांहींसा दिसतो. शनीच्या असाप्रदक्षिणाचा काल (३७८) दिवसांचा आहे. यामुळें त्याचें षडभांतर, त्रिभांतर, वक्रत्व, मार्गित्व, अस्त, उदय यांच्या एकदाच्या वेळेंत एक सौर वर्ष आणि १३ दिवस मिळविले म्हणजे त्या गोष्टीची पुढील वेळ निघते. शनीला सूर्याभोंवतीं एक प्रदक्षिणा करण्यास सुमारें २९॥ वर्षें लागतात. इतक्या काळांत तो बारा राशि फिरतो; म्हणजे प्रत्येक राशीला तो सुमारें २॥ वर्षांपेक्षां कांहीं दिवस कमी असतो आणि एका राशीला तो असतां तिच्या मागच्या व पुढच्या राशीला पीडा करितो अशी समजूत आहे. अर्थात् एकेका राशीला शनीची ही बाधा ७॥ वर्षें असते. एक मनुष्याची राशि वृषभ आहे अशी कल्पना करा. तर मेष राशीला शनि येतांच वृषभ राशीस साडेसाती सुरू होते. ती वृषभ आणि मिथुन या राशि क्रमून कर्क राशीस शनि जाईपर्यंत असते.

आपलीं सुमारें २९॥ वर्षें होतात तेव्हां शनीचें वर्ष होतें. आपलीं २॥ वर्षें होतात तेव्हां कोठें त्याचा एक महिना होतो इतका शनि मंद आहे, तेव्हां त्याला मंद असें नांव आहे तें यथार्थच आहे. डोळ्यांनीं दिसणाऱ्या ग्रहांत इतका मंद दुसरा कोणी नाहीं. तो वक्री होतो तेव्हां त्याच्या मंदपणाची कमाल होते. तो एका ठिकाणी पुष्कळ काळ घोटाळत असतो. याप्रमाणें त्याचें मंदत्व आहे. तेजाविषयीं पाहिलें तरी हाच प्रकार. गुरु आणि शुक्र यांच्या तेजा पुढें तर त्याचें तेज कांहींच नाहीं; परंतु मंगळ, बुध हे ग्रह देखील बहुधा नेहमीं त्याच्याहून तेजस्वी दिसतात. पायाचा जड, तेजानें हीन, तर मग स्वभावानें कसा असेल ह्याविषयीं सहज अनुमान होतें. मागें पुढें जाऊन येऊन एकेका नक्षत्राची पिच्छा पुरविणारा हा काळा पिंगळा निस्तेज ग्रह बराच काळ एकाच राशीस असतो तेव्हां तो कांहीं तरी अनिष्ट करील असें साहजिकच प्राचीन लोकांच्या मनांत आलें.

शनि हा खलग्रह आहे, अशी सर्व देशांत फार प्राचीन काळापासून समजूत आहे. कौरवपांडव युद्धाच्या वेळीं तो रोहिणी नक्षत्राजवळ होता व तेणेंकरून जगाला अनिष्ट आहे. असें सुचवीत होता असें वर्णन आहे. तो रोहिणी शकटाचा भेद करील तर कसा प्रलय उडेल हें सांगणें नकोच. सांप्रत तो शकटभेद करीत नाहीं हें आपलें केवढें सुदैव आहे. प्राचीन युरोपियन लोकांनींही क्रूर, मंद, अविवेकी अशा सॅटर्न नामक देवतेचें नांव याला दिलें आहे.

केवळ डोळ्यांनीं दिसणाऱ्या बाह्य स्वरूपावरून वस्तूची परीक्षा करण्यांत आपण कधीं कधीं चुकतों हें आकाशस्थ ज्योतींच्या अवलोकनानें चांगलें समजतें. येथून आपणास शनि अगदीं मंद दिसतो परंतु तो आपल्या कक्षेंत दर सेकंदास ६ मैल म्हणजे एक मिनिटांत ३६० मैल चालतो. अग्निरथानें चालणारी आगगाडी फार तर याच्या शतांश चालेल. शनीची स्वपरिभ्रम गति अशीच झपाट्याची आहे. शनीवर स्थाइक खुणा बहुधा कांहींच दिसत नाहींत. कधीं कधीं दिसणाऱ्या एखाद्या ठिपक्यावरून ही गति साधारणपणें काढली होती. परंतु इ. स. १८७६ सालीं दिसलेल्या एका पांढऱ्या तेजस्वी ठिपक्यावरून अक्षप्रदक्षिणाकाल सूक्ष्मपणें काढिलेला आहे. शनीच्या दैनंदिन प्रदक्षिणेस १० तास १४ मिनिटें लागतात. म्हणजे शनीवर अहोरात्र सुमारें १०। तासांचें आहे. इतक्या वेळांत तो स्वतःभोंवतीं एक फेरा करतो. तेव्हां त्याच्या विषुववृत्तावरचा प्रत्येक बिंदु दर सेकंदास सुमारें ६ मैल चालतो. हें त्याच्या गतीविषयीं झालें. त्याच्या स्वरूपाविषयीं म्हणाल तर आकाश स्वच्छ असतां एखाद्या काळोख्या रात्रीं शनीकडे दुर्बीण लावून पहा, म्हणजे ज्याची कल्पनाही करवत नाहीं असें विलक्षण चित्र दिसेल. त्यांत एक भव्य गोल आहे, त्याच्या पृष्ठ-

भागावर नाना तऱ्हेचे रंग चमकत आहेत. ध्रुवाकडे निळा रंग आहे, इतर भागीं पिवळा आहे. माध्यभागीं एक पांढरा पट्टा आहे; व मध्यें मध्यें चमत्कारिक ठिपके असून त्यावर पिंगट, जांभळा, तांबूस अशा रंगांची झाक मारीत आहे असें आढळून येईल. परंतु ह्या चित्रांतला त्याच्यापेक्षांही विलक्षण प्रकार निराळाच आहे. शान पहात असतां आपण महादेवाची पिंडीच पहात आहों कीं काय असें तुम्हांस वाटेल. लिंगाभोंवतीं शाळुंकेचें वेष्टण लागलेलें असतें. शनीभोंवतालची कडी त्यास लागलेली नाहींत. आणि तें एकच कडें नसून त्यांत निरनिराळीं वलयें आहेत. ह्यांचा रंग चित्रविचित्र दिसतो. त्यांतलें आंतलें वलय तर आकाशस्थ तेजांत अद्वितीय आहे. कधीं कधीं तें वलय जांभळें दिसतें आणि तें मध्यें असलें तरी त्यांतून पलीकडचा शनिगोलाचा पृष्ठभाग दिसतो. शनीचा आकार पृथ्वीच्या सुमारें ७०० शें पट आहे. परंतु त्याच्या आकाराच्या मानानें त्याचें द्रव्य नाहीं. त्याचा द्रव्यसंघ पृथ्वीच्या सुमारें ९० पट आहे. परंतु हा देखील कांहीं थोडा नाहीं. शनीहून द्रव्यानें मोठा सर्व ग्रहांत गुरु मात्र. आहे. बाकीच्या प्रत्येक ग्रहाएवढे दोन दोन ग्रह शनीच्या द्रव्यांतून वजा केले तरी आणखी इतकें द्रव्य राहील कीं त्यांतून आपल्या पृथ्वी एवढीं २७ भुवनें बनावतां येतील.

शनीच्या द्रव्याच्या आंगीं आकर्षणशक्ति इतकी असली पाहिजे कीं आपल्या वातावरणापेक्षांही विस्तृत असें शनीचें वातावरण त्या आकर्षणानें प्रवाही किंवा अप्रवाही झालें पाहिजे. परंतु तें तर वायुरूप आहे. तर इतकें आकर्षण सोसून तें वायुरूप रहातें कसें ही मोठी शंका येते. तर मग याचें कारण काय असा प्रश्न उद्भवतो. आणि शनीच्या अंगीं असलेली उष्णता यावांचून त्याला दुसरें उत्तर नाहीं. शनीच्या द्रव्याप्रमाणें त्याच्या अंगीं असणारी जी आकर्षणशक्ति तिचा प्रतिकार करणारी शक्ति उष्णतेशिवाय दुसरी दिसत नाहीं. याचें कारण सूर्याच्या अंगची अतर्क्य उष्णता हें होय. तथापि शनीची उष्णता सूर्याइतकी नाहीं हें उघड दिसत आहे. गुरु आणि शनी यांच्या प्रकाशाचा कांहीं भाग त्यांच्या आंगचा आहे. हे दोन ग्रह शुभ्र अभ्रांचे नलेले असते तर जसे प्रकाशते तसे प्रकाशतात असें झोलनरनामक प्रसिद्ध ज्योतिषानें ठरविलें आहे. ते याहूनही तेजस्वी आहेत असें दुसऱ्या एका ज्योतिष्याचें मत आहे. यावरून हे होन्ही ग्रह पृथ्वीहून अगदीं भिन्न आहेत.

शनि हा केवळ सूर्याचीच लहानशी प्रतिमा आहे असें नाहीं तर सगळ्या सूर्यमालेचीही प्रतिमा आहे. सूर्यमालेंत आठ ग्रह आहेत. शनीभोंवतालीं प्रत्येक बाजूस सुमारें २३ लक्ष म्हणजे ४६ लक्ष मैल इतक्या प्रदेशांत आठ भुवनें त्याभोंवती फिरतात त्यातला जो गोल अगदीं लहान आहे त्याचा व्यास हजार मैल आहे. आणि सर्वांत मोठा आहे तो तर बुधापेक्षां मोठा आहे कदाचित् मंगळा एवढाही असेल.

या ८ उपग्रहांपैकीं सर्वांत मोठ्या उपग्रहाचा शोध इ स. १६५५ मध्यें लागला. पुढें १६८४ पर्यंत ४ उपग्रह सांपडले. त्यांचा शोध एका फ्रेंच ज्योतिषानें एकट्यानें लाविला; पुढें १०० वर्षांनतर हर्शलनें २ उपग्रह शोधून काढले. आणि सर्वांत धाकटा इ. स. १८४८ मध्यें सांपडला. हे उपग्रह आपल्यापासून फार लांब असल्यामुळें फार बारीक दिसतात. मोठा ८ व्या प्रतीच्या ताऱ्याएवढा दिसतो. कांहीं तर शेवटल्या प्रतीच्या तारा एवढे दिसतात. अर्थात् हे दुर्बिणीवांचून दिसत नाहीत. ह्या उपग्रहांच्या कक्षा आणि शनीची कक्षा ह्यामध्यें २८ अंशांचे कोन आहेत. यामुळें त्यांचीं ग्रहणें वगैरे फार क्वचित् होतात. या सर्व कारणांवरून सूर्याची बरोबरी करणारा शनीवांचून दुसरा ग्रह नाहीं म्हणून यासच आमच्या पूर्वजांनीं रविपुत्र असें म्हटलें आहे.

# चरसंस्कार.

क्रांति व अक्षांश एका दिशेचे असले म्हणजे चर संस्कार धन असतो. आणि विरुद्ध दिशेचे असले म्हणजे चर संस्कार ऋण असतो. हिंदुस्थानचे अक्षांश उत्तर असतात.

## चर साधन.

अक्षांशाचे अंश, क्रांतीचे अंशानें गुणून त्या गुणाकारास ५ नीं भागून जो भागाकार येईल तितकीं पलें चरसंस्कार समजावा. हें येणारे चर अदमासाचें आहे. यांत चार पांच पलें चूक येतें.

याकरितां आह्मी सूक्ष्मरीतीनें चर आणण्याकरितां खाली दिलेल्या फॉर्म्युल्यावरून ६ अक्षांशापासून तें ३५ अक्षांशापावेतो अक्षांश घेऊन व क्रांति १ अंशापासून ते ३१ अंशापर्यंत अंश घेऊन त्यावरून चर काढिलें आहे.

## चर काढण्याचा फॉर्म्युला.

$$\text{चर भुजज्या} = \frac{\text{अक्षांश स्पर्शरेषा}}{\text{क्रांति कोस्पर्शरेषा}}$$

उदाहरण—६ अक्षांश आणि क्रांति एक १ अंश याची चर भुजज्या काय?

६ अक्षांशाची स्पर्शरेषा ९.०२१६२०२

१ अंशाची क्रांतिकोस्पर्शरेषा ११.७५८०७८५

६ कलेची ही चर भुजज्या होय = ७.२६३५४१७

१ राशीस म्हणजे १८०० कलेस : ६ कलेस काय :: ३०० पलें या त्रैराशिकानें १ पल आलें हें उत्तर. या प्रमाणें चर पलात्मक, अक्षांशाचे व क्रांति या उपकरणानें काढून कोष्टक रूपानें दिलें आहे.

## दिनमान व रात्रिमान.

चर संस्कार शून्य असला म्हणजे दिनमान व रात्रिमान हीं दोन्ही १२ तास किंवा ३० घटिकांचीं असतात. क्रांति किंवा अक्षांश या दोहोंतून एक शून्य असले म्हणजे चरशून्य होतो. म्हणून.

१ निरक्ष ( लंका ) देशीं बाराही महिने दिनमान ३० तीस घटिकांचें असतें.

२ सर्व पृथ्वीवर वर्षांतून २ दोन दिवस बरोबर ३० तीस घटिकांचे असतात. हे दोन दिवस विषुव होत. विषुव दिवस म्हणजे ज्या दिवशीं सूर्य विषुव वृत्तांत जातो ते दिवस. हे दिवस २१ मार्च आणि २३ सप्टेंबर या सुमारास येतात.

इतर दिवशींचें दिनमान काढणें झाल्यास चर संस्काराची २ पट करून चर धन असल्यास तीं ३० स घटिकेंत मिळवावी. ऋण असल्यास वजा करावी म्हणजे मध्यम दिनमान येतें. ते ६० घटिकांतून वजा करून जी बाकी राहील तें मध्यम रात्रिमान होतें.

उदाहरण-मुक्काम कोल्हापूर तारीख ३१ माहे आक्टोबर १९१४ या दिवशीं दिनमान व रात्रिमान काय? त्या दिवसाची क्रांति, कोष्टकावरून १४।१२ द. आली.

| | |
|---|---|
| अक्षांश १६—४२ उ. | त्यावरून चर कोष्टकांतून चर काढलें तें ४४ प ऋ. |
| क्रांति १४—१२ द. | आणि किरण वक्री भवन संस्कार नेहमी १० पलें धन. |

मध्यम दिनमान ३० घटिकेचें असतें यांस चर संस्कार करावा म्हणजे जे दिनमान स्पष्ट होतें.

इंग्रजी घड्याळानें उदय सकाळचे ६ वाजतां व अस्त संध्याकाळचे ६ वाजतां होतो.

पासून ते पौष कृष्ण ५ पर्यंत इसवी सनास आरंभ होतो. पन्नास साठ वर्षांचे सुमारास एक दोन दिवसाचें अंतर हल्लीं येऊं लागलं आहे. ह्मणून तिथींत किंवा तारखेंत एक किंवा दोन दिवस कमी जास्त करून घेऊन वाराचा मेळ पाहून घ्यावा. हें अंतर येण्याचें कारण पंचांगांतील रवीची गति मध्यममानाची असते. त्यामुळें हें अंतर येतें.

शालिवाहन शकांत ७८ मिळविले ह्मणजे इसवी सन येतो. परंतु पौष, माघ आणि फाल्गुन या महिन्यांत विचारल्यास त्यांत एक अधिक मिळवावा. ह्मणजे बरोबर इसवी सन येईल.

पौष शुद्ध ६ षष्ठी पासून पौष कृष्ण पंचमीपर्यंत जानेवारीची पहिली तारीख आल्यास त्या सनांत अधिक मास आहे असें समजावें.

जानेवारीची पहिली तारीख शुद्ध १ प्रतिपदेपासून कृष्ण ५ पंचमीपर्यंत आल्यास पौष मास समजावा आणि त्याचे पुढें इतर तिथि आल्यास मार्गशीर्ष मास समजावा.

वर सांगितल्याप्रमाणें इसवी सन काढल्यावर इसवी सनास १९ नीं भागून जी बाकी राहील तें चक्र होय. तें चक्र नंबर ३ चे कोष्टकांत काढून त्याच्या खालीं इष्ट तिथि काढावी. नंतर शालिवाहन शकास १९ नीं भागून जी बाकी राहील, तें चक्र नंबर २ चे कोष्टकांत काढून त्यांत तो इष्ट महिना काढून तेथून सरळ रेषेनें समोर उजव्या हाताकडेस वर आलेल्या चक्राखालीं यावें; जेथें दोहोंचा मिलाफ होईल तो महिना लक्षांत ठेवावा. नंतर नंबर ३ चे कोष्टकांत काढलेलें जें चक्र व त्याखालीं काढलेली जी इष्ट तीथ तेथून सरळ रेषेनें समोर डाव्या बाजूस वर लक्षांत ठेवलेल्या महिन्याखालीं यावें, जेथें दोहोंचा मिलाफ होईल ती तारीख त्या इष्ट महिन्याच्या तिथीची होय.

उदाहरण—शके १८३६ आश्विन शुद्ध १५ पौर्णिमा रोज रविवार या दिवशीं इसवी सन, महिना, तारीख आणि वार काढा?

शालिवाहन शक १८३६ त्यांत + ७८ एकूण १९१४ (इ. स.) यास १९नीं भागून बाकी १४ राहिली तें चक्र नंबर ३चे कोष्टकांत काढून त्याचेखालीं इष्टतिथि १५ काढली. नंतर शालिवाहनशक १८३६ यास १९ नीं भागून बाकी १२ उरली तें चक्र नंबर २ चे कोष्टकांत काढून तो इष्ट आश्विन महिना त्यांत काढला. नंतर सरळ रेषेनें उजव्या बाजूस समोर १२ च्या चक्राखालीं आलों, जेथें दोहोंचा मिलाफ झाला, तेथें सप्तंबर १९ वी तारीख मिळाली. ही तारीख आश्विन शुद्ध प्रतिपदेची होय, परंतु आह्मांस पौर्णिमेस कोणती तारीख हें पाहिजे. सबब १९ सप्तंबर मध्यें १४ तिथी मिळविल्या. ती बेरीज ३३ झाली. तेव्हां अर्थात आक्टोबर महिना झाला. कारण सप्तंबरच्या तारखा ३० त्याहून जास्त बेरीज ३ आली. ह्मणून हा आक्टोबर महिना होय. हा लक्षांत ठेवून नंबर ३ चे कोष्टकांत काढलेलें १४ चें चक्र व त्याच्या खालीं काढलेली जी पौर्णिमा तिच्या समोर सरळ रेषेनें डाव्या हाताकडे आक्टोबर महिन्याखालीं आलों. जेथें दोहोंचा मिलाफ झाला तेथें आक्टोबरची ३ री तारीख सांपडली. नंबर १ एकचे कोष्टकाप्रमाणें वाराचा मेळ पाहिला असतां एक दिवसाचें अंतर येऊं लागलें ह्मणून त्यांत आणखी वरील नियमा * प्रमाणें एक जास्त मिळविला ३ + १ = ४ ही आक्टोबरची तारीख आली. ह्मणून वाराचा मेळ रविवाराशीं जमला.

इसवी सन १९१४ तारीख ४ आक्टोबर रोज रविवार हें उत्तर. मागें मासप्रकरणांत ग्रहलाघवावरून अधिक व क्षयमास यांचें कोष्टक दिलें आहे. त्यावरून कोणत्या शालिवाहन शकांत कोणता अधिकमास व क्षयमास आहे. हें समजेल. इष्ट शकांत जो अधिकमास असेल तो या नंबर दोनचे कोष्टकांत मिळाल्यास बरें, न मिळाल्यास पाटीमार्गील महिन्यांत पाहून वरीलप्रमाणें सर्व कृति करावी.

---

* केव्हां केव्हां तिथींत १।२ दिवसांची तफावत पडत, तेव्हां एक किंवा दोन कमीजास्त करून घेऊन वाराशीं मेळ पाहून बरोबर करून घ्यावी.

# इसवी सन, महिना, तारीख आणि वार दिला असतां शालिवाहन शक, महिना, पक्ष, तिथि, आणि वार, काढावयाची रीत.

इसवी सनास १९नीं भागून बाकी राहील त्यास चक्र ह्मणावें, व तें चक्र नंबर तीनच्या कोष्टकांत काढावें, नंतर त्याच कोष्टकांत इष्ट महिन्याची तारीख काढून तेथून सरळ रेषेनें उजव्या हाताकडे आलेल्या चक्राखालीं समोर यावें. जेथें दोहोंचा मिलाफ होईल, ती इष्ट तारखेची तिथि होय. परंतु ही तिथि कोणत्या महिन्याची हें समजत नाहीं. ह्मणून इसवी सनांवरून शालिवाहन शक काढून त्यास १९ नीं भागावें, बाकी राहील तें चक्र नं. २ चें कोष्टकांत काढून नंतर त्या चक्राखालीं इष्ट महिना काढून त्यांत नमूद असलेली तारीख इष्ट तारखेंत वजा जात असल्यास त्याचेसमोर डाव्या बाजूस दुसऱ्या घरांत नमूद असलेला जो महिना तो त्या इष्ट तारखेचा होय. परंतु नमूद असलेली तारीख इष्ट तारखेंत वजा न होईल, तर ३० किंवा ३१ त्यांत मिळवावे. आणि त्याच्या पूर्वीचा महिना इष्ट तारखेचा समजावा.

उदाहरण—इ. सन १९१४ ता. २० नोव्हेंबर शालिवाहन शक, महिना, पक्ष, तीथि आणि वार कोणता होता?

इ. सन १९१४ स १९ नीं भागलें बाकी १४ उरली; तें चक्र नंबर ३ चें कोष्ठकांत काढलें; नंतर इष्ट महिना नोव्हेंबर याची २० वी तारीख त्यांत काढून तेथून सरळ रेषेनें समोर वर आलेल्या १४ चें चक्राखालीं आलों. जेथें दोहोंचा मिलाफ झाला तेथें शुद्ध ४ थी मिळाली; परंतु ही चतुर्थी कोणत्या महिन्याची हें त्यावरून समजलें नाहीं. ह्मणून शालिवाहन शका ( इ. स. १९१४–७८=१८३६ हा शालिवाहन शक या ) स १९ नीं भागून बाकी १२ उरली. हें चक्र नंबर २ च्या कोष्टकांत काढून त्याचें खालीं इष्ट नोव्हेंबर महिना काढला. तों नोव्हेंबरची १७ वी तारीख त्यांत नमूद असलेली मिळाली व ही १७ वी तारीख ही इष्ट जी २० वी तारीख त्यांत ती वजा केली. २०–१७=३ बाकी उरली. १२ व्या चक्राच्या डाव्या हाताकडेस त्याच सरळ रेषेनें आलों. तो तेथें मार्गशीर्ष शुद्ध प्रतिपदा मिळाली. त्यांत मार्गशीर्ष महिन्याची शुद्ध ३ या आली आहे. ही ३ तिथि व पूर्वी आलेली चतुर्थी ४ ति. त्यांत १ कमी केले ह्मणजे ३ तिथि होते, आणि या दोन्ही तिथींचा व शुक्रवाराचा मेळ बरोबर येतो ह्मणून श. १८३६ मार्गशीर्ष शु. ३ रोज शुक्रवार हें उत्तर.

---

## इंग्रजी महिन्यांचीं नांवें व दरमहिन्याचे तारखेची संख्या व त्यांचीं एकोत्तर मिळवणी.

| महिन्यांची नांवें | तारखा | एकोत्तर मिळवणी. | महिन्यांची नांवें | तारखा | एकोत्तर मिळवणी |
|---|---|---|---|---|---|
| १ जानेवारी | ३१ | ३१ | ७ जुलई | ३१ | २१२ |
| २ फेब्रुवारी | * २८ | ५९ | ८ आगष्ट | ३१ | २४३ |
| ३ मार्च | ३१ | ९० | ९ सप्टेंबर | ३० | २७३ |
| ४ एप्रिल | ३० | १२० | १० आक्टोबर | ३१ | ३०४ |
| ५ मे | ३१ | १५१ | ११ नोव्हेंबर | ३० | ३३४ |
| ६ जून | ३० | १८१ | १२ दिसेंबर | ३१ | ३६५ |

* ज्या इसवी सनास ४ नीं निःशेष भाग तुटतो त्या वर्षी फेब्रुवारीच्या २९ तारखा धराव्या व एकोत्तर मिळवणींत एक अधिक मिळवावा.

## आर्बी सनांच्या संख्येचीं नांवें.

| | | | |
|---|---|---|---|
| १ इह्दिे | १२ इसन्ने अशर | ३० सल्लासीन | ३०० सल्लास मय्या |
| २ इसन्ने | १३ सल्लास अशर | ४० अर्बैन | ४०० अर्बा मय्या |
| ३ सल्लास | १४ अर्बा अशर | ५० खमसैन | ५०० खंमस मय्या |
| ४ अर्बा | १५ खंमस अशर | ६० शीतैन | ६०० शीत मय्या |
| ५ खंमस | १६ शीत अशर | ७० सब्बैन | ७०० सब्बा मय्या |
| ६ शीत | १७ सब्बा अशर | ८० संमानीन | ८०० समान मय्या |
| ७ सब्बां | १८ संमान अशर | ९० तिस्सैन | ९०० तिस्सा मय्या |
| ८ संमान | १९ तिस्सा अशर | १०० मय्या | १००० अल्लफ |
| ९ तिस्सा | २० अशरीन | १०१ इह्दिे मय्या | उदाहरण—९८७ |
| १० अशर | २१ इह्दिे अशरीन इत्यादि | इत्यादि | या प्रमाणें लिहितात |
| ११ इह्दिे अशर | | २०० मय्यातैन | |

सब्बा ( ७ ) संमानीन ( ८० ) तिस्सा मय्या ( ९०० ). तसेंच ( ११०१ )–इह्दिे ( १ ) मय्य ( १०० ) व अलफ ( १००० ). तसेंच ( १४६० )–शीतैन ( ६० ) अर्बा मय्या ( ४०० ) व अल्लफ ( १००० )

टीप—दरएक अंका पुढें " ऐन " जोडल्यानें त्या अंकाची दसपट होते. जसें

खंमस ५ + ऐन = खंमसैन ५० तिस्सा + ऐन = तिस्सैन ९० इत्यादि.

हिजरी सन–हा मूळचा अरबस्थानांतला होय. मुसलमानांच्या अमलापासून तो ह्या देशांत आला. हिजरा ह्मणजे पळणें. मुसलमानांचा पैगंबर महंमद हा इसवी सन ६२२ ता. १५ जुलई शक ५४४ श्रावण शुद्ध १ गुरुवार रात्रीं ( मुसलमानी शुक्रवारच्या रात्रीं ) मक्केहून मदिनेस पळून गेला. ह्मणून ह्या सनास हिजरी ह्मणतात. आणि त्या पळण्याची वेळ ही ह्या सनाची आरंभ वेळा धरिली आहे. ह्या सनाचे महिने मोहरम इत्यादि चांद्र आहेत. आणि अधिकमास मुळींच धरित नाहींत, यामुळें हें वर्ष केवळ चांद्र ह्मणजे ३५४ किंवा ३५५ दिवसांचें आहे. आणि यामुळें दर ३२ किंवा ३३ सौर वर्षांत या सनाच्या वर्षाचा अंक कोणत्याही सौर कालाच्या वर्षाच्या अंकापेक्षां १ वाढतो. शुद्ध प्रतिपदा किंवा द्वितीया या तिथीस चंद्रदर्शन झाल्यापासून महिना सुरूं होतो. महिन्याचा पहिला दिवस, दुसरा दिवस असें ह्मणण्याऐवजीं पहिला चंद्र, दुसरा चंद्र असें ह्मणतात. असे चंद्र ( दिवस किंवा तारखा ) महिन्यांत २९ किंवा ३० होतात. वाराचा आणि तारखेचा आरंभ सूर्यास्तीं होतो. यामुळें आमची गुरुवारची रात्र ती मुसलमानी शुक्रवारची रात्र होय. दिवसास वाराचें नांव दोघांचें एकच असतें.

फारशी किंवा फसली सनः–हें पिकाच्या हंगामाच वर्ष अकबर यानें सुरूं केलें. प्रथम हिजरी सनाचाच वर्षांक यास लाविला; परंतु हिजरी वर्ष केवळ चांद्र ( ३५४ दिवसांचें ) आहे; व फसली हें सौर आहे; यामुळें पुढें वर्षाच्या अंकांत फरक पडत चालला. हिजरी सन ९६३, इसवी सन १५५६, यावर्षी ह्मणजे अकबर राज्यावर बसला त्यावर्षी उत्तर हिंदुस्थानांत फसली सन सुरू झाला आणि दक्षिण हिंदुस्थानांत शहाजहान बादशहानें इ. स १६३६ ह्मणजे हिजरी सन १०४६ या वर्षी तो सुरूं केला. प्रथम त्यास वर्षांक हिजरी सनाचा ह्मणजे १०४६ वे वर्षी लागला. आणि त्यावेळीं उत्तरेकडील फसली सन १०४४ होता. यामुळें दक्षिणेकडील फसली वर्षाचा अंक उत्तरेच्या अंकापेक्षां जास्त झाला. ( हिजरी वर्ष केवळ चांद्र ह्मणून असें झालें. ) वर्षारंभ दोहोंकडे भिन्न धरल्यामुळें आणखी कांहीं महिन्यांचें अंतर पडलें. हें वर्ष केवळ सरकारी असल्यामुळें, आणि याचा धर्माशीं संबंध नसल्यामुळें ह्याचा वर्षारंभ अनियमित झाला असें दिसतें. मद्रास इलाख्यांत प्रथम ह्या वर्षाचा आरंभ आडी ( कर्क ) महिन्याच्या पहिल्या दिवशीं होत असे. इ. स. १८००

मध्यें इंग्लिश सरकारानें जुलईच्या १३ व्या तारखेस फसली वर्षाचा आरंभ ठरविला; आणि पुढें इ. स. १८५५ मध्यें तो जुलईच्या पहिल्या तारखेस ठरविला. मुंबई इलाख्याच्या कांहीं भागांत सूर्य मृगनक्षत्रीं जातो त्या दिवशीं ( हल्लीं जूनच्या ५, ६, किंवा ७ तारखेस ) फसली वर्षाचा आरंभ होतो. थोड्या वर्षांपूर्वी हल्लींचे निजाम सरकारचें वडिलांनीं जुन्या फसलीच्या तारखेंत फेरफार करून आजूर महिन्यापासून सनाचा आरंभ ठरविला आहे. तो भाद्रपद किंवा आश्विन या महिन्यांत असतो. फारशी महिन्यांचीं नांवें व दिवस—आजूर ३०, दय २९, बहमन ३०, इसपिंदाद ३०, फरवर्दी ३१, आर्दिबेहस्त ३१, खूर्दाद ३१, तीर ३१, अमरदाद ३१, शहरेवार ३१, मेहर ३० आणि आबान ३०. ह्याप्रमाणें वर्षाचे एकंदर दिवस ३६५ असतात. दर वर्षांत पूर्ण वर्षाचा काल भरण्यास सुमारें ६ तास २३ मिनिटें कमी पडतात. ह्मणून इंग्रजी पद्धतीप्रमाणें ज्या फसली सनाच्या अंकास चार या संख्येनें निःशेष भाग जातो त्याखालीं दय महिना ३० तारखेचा धरतात. फसली साल हिजरी सालाप्रमाणें चांद्रमानाचें नसून सौरमानाचें असल्यामुळें, दर ३३ वर्षांनीं त्या दोहोंत एक वर्षाचें अंतर पडतें. ह्मणजे तें वर्ष सौर आहे; परंतु त्याचे महिने मोहरम इत्यादि चांद्र आहेत. उत्तर हिंदुस्थानांत बहुधा सर्वत्र पूर्णिमांत मानाच्या आश्विन कृष्ण प्रतिपदेस फसली वर्षाचा आरंभ होतो. ह्मणजे तेथलें फसली वर्ष चांद्र सौर आहे. बंगाल्यांत फसली १३०० या वर्षाचा आरंभ इ. स. १८९२ च्या सप्टेंबरांत झाला. आणि दक्षिणेंत इ. स. १८९० च्या जून किंवा जुलई महिन्यांत फसली सन १३०० हें वर्ष लागलें. दक्षिणेंतील फसली सनाच्या वर्षांत ५१२।१३ मिळवले ह्मणजे शक निघतो; आणि ५९०।९१ मिळवले ह्मणजे इसवी सन निघतो. बंगाल्यांतील फसली वर्षांत ५१४।१५ मिळविले ह्मणजे शकवर्ष निघतें आणि ५९२।९३ मिळविले ह्मणजे इ. स. निघतो. बंगाल्यांतील फसली, विलायती, आणि अमली, या तिन्ही सनाचा अंक वर्षांत फार तर १८ दिवस खेरीज करून एकच असतो. या तिन्ही सनांहून बंगाली सन फक्त सुमारें ६।७ महिन्यांनीं धाकटा आहे. वस्तुतः बंगाली, विलायती, अमली, आणि बंगाली फसली यांचें मूळ एकच–फसली सन हें–होय, पुढें त्यांच्या आरंभांत थोडथोडा फरक पडला, हें उघड दिसतें.

सूरसन अथवा शाहूरसन याला कधीं कधीं आरबीसन असेंही ह्मणतात. इ. स. १३४४ हिजरी सन ४५ या वर्षी सूरसन सुरू झाला, आणि प्रथम हिजरी सनाचा अंक ७४५ हाच त्यास लाविला. फसली सन दक्षिणेंत सूरसनानंतर २९२ वर्षांनीं हिजरी सन १०४६ या वर्षी सुरू झाला. तेव्हां सूरसन १०३७ होता ह्मणून सूरसन आणि दक्षिणी फसली यांत ९ वर्षांचें अंतर पडलें. मराठ्यांच्या कारकीर्दींत सूरसन फार प्रचारांत होता. हा मुंबई इलाख्यांतील फसली सनाहून नऊ वर्षांनीं लहान आहे. परंतु इतर सर्व गोष्टींत दोन्ही एकच आहेत. ह्याच्या वर्षाचा आरंभ सूर्य मृग नक्षत्रीं जातो तेव्हां होतो. ह्मणजे याचें वर्ष सौर आहे. परंतु याचे महिने मोहरम इत्यादिक चांद्र आहेत. सूरसनाच्या वर्षांत ५२१।२२ मिळविले ह्मणजे शक येतो, आणि ५९९।६०० मिळविले ह्मणजे इ. स. येतो.

बंगाली, विलायती, अमली हे सन उत्तरेकडील फसलीचे विशेष प्रकार होत; आणि उत्तरेकडील फसली दक्षिणेकडील फसली व सूरसन हे हिजरीचे विशेष प्रकार होत.

पारशी शक—पारशी लोकांचे शकाला एजदीजर्द असें ह्मणतात. हाही आपले पंचांगांत दाखवितात, हा शालिवाहन शकाच्या ५५२ वर्षांनंतर किंवा इसवी सनाच्या ६३० वर्षांनंतर सुरू झाला. हा सन परशियांत ( इराणांत ) सुरू झाल्यानंतर सुमारें ४०।५० वर्षांनीं पारशी लोक हिंदुस्थानांत आले. ते परशिया देशांतून आले ह्मणून त्यांस पारशी ह्मणतात. पारशी लोकांना हिंदुस्थानांत येऊन सुमारें १२५० वर्षें होऊन गेलीं. यांचा महिना सावन ह्मणजे पूर्ण ३० दिवसांचा असतो. अर्थात् वर्षाचे दिवस ३६० होतात. परंतु सौर वर्षाशीं मेळ बसावा ह्मणून हे लोक वर्षाच्या शेवटीं पांच दिवस अधिक धरतात, त्यास गाथागंबर असें ह्मणतात. हे दिवस पारशी लोक फार महत्वाचे समजतात. त्यांच्या महिन्याचीं नांवें:–१ फरवर्दीन २ आर्दीबेहस्त. ३ खोरदाद. ४ तिर. ५ अमरदाद. ६ शरेवर. ७ मेहर. ८ आबान. ९ आदर. १० देहे. ११ बहमन. १२ अस्पंदादमाद. अशीं आहेत.

## शालिवाहन शक, विक्रम शक, शिवाजी महाराजांचा राजशक आणि इतर हिंदुस्थानांत चालणारे सन वगैरे यांचा आरंभ कधीं होतो याजबद्दलची माहिती.

१ शालिवाहन शकास आरंभ चैत्र शुद्ध १ प्रतिपदेस [ तारीख १४ मार्च ते ता० १० किंवा १२एप्रिल चे दरम्यान ) होतो.

२ विक्रम शकाचा (संवत्) आरंभ कार्तिक शुद्ध प्रतिपदेस ता. १६ आक्टोबर ते १६ नोव्हेंबर यांचे दरम्यान ] होतो.

३ शिवाजी महाराजांचा राजशक [ त्यांनीं आपणांस राज्याभिषेक करून घेतला तेव्हांपासून राजशक सुरू केला आहे ] याचा आरंभ ज्येष्ठ शुद्ध त्रयोदशीस ह्मणजे मे किंवा जून महिन्यांत होतो.

४ आरबी सनास आरंभ सूर्य ज्यादिवशीं मृग नक्षत्रास येतो ह्मणजे जून महिन्याचे हल्लीं ६।७ तारखेस [ वैशाखअखेर किंवा ज्येष्ठ महिन्यांत ) होतो.

+ पूर्वी मृग नक्षत्रास आरंभ ता० ५।६ जून रोजीं होत असे, आतां ता० ६।७ जूनला आरंभ होऊं लागला आहे. जुने पंचांगाप्रमाणें ह्या तारखा समजाव्यात.

५ फसली सनास आरंभ वरील प्रमाणेंच मृग महानक्षत्रास होतो; परंतु मार्जी निजामसरकारांनीं तो आज़र महिन्यापासून सुरू केला. तो महिना भाद्रपद किंवा आश्विन महिन्यांत येतो.

६ इसवी सनास आरंभ जानेवारीच्या पहिल्या तारखेस (मार्गशीर्ष वर्षांत किंवा पौष महिन्यांत) होतो.

७ हिजरी सनास आरंभ मोहरम महिन्याचे पहिले तारखेस होतो.

८ पारशी सनास आरंभ पूर्वी सन १८३७ मध्यें आक्टोबर महिन्यांत होत होता. हल्लीं सप्तंबर महिन्यांत होऊं लागला आहे, त्यावेळीं मराठी महिना भाद्रपद असतो. ज्यावेळीं इंग्रजी फेब्रुवारी महिन्याचे २९ दिवस येतात त्या वर्षी या वर्षाचा आरंभ एक दिवस पूर्वी होतो. वर्षाचे दिवस ३६५ असतात, प्रत्येक महिना ३० दिवसांचा, त्या मानानें १२ महिन्यांचे ३६० दिवस होतात आणि वर्षाचे अखेरच्या महिन्यांत शेवट ( गाथा ] अशा पांच अक्षरांच्या तारखा घालून ३६५ दिवस पुरे करून घेतात.

९ यहुदी सन भाद्रपद कृष्ण ३० पर्यंत असतो. पुढें आश्विन शुद्ध प्रतिपदेपासून पुढील सनास आरंभ होतो. यहुदी लोकांत अधिक मास मानण्याची चाल आहे. तो सर्वदा फाल्गुन मासांत धरतात. इतर महिन्यांत धरीत नाहींत. याकरितां कदाचित् भाद्रपद शुद्ध प्रतिपदेपासून सन फिरवितात.

---

## शालिवाहन शकांवरून गतकलि काढणें. व गत कलीवरून शालिवाहन शक काढणें.

रा. ॥ नंदात्यष्टिगणैर्युक्तः शालिवाहनकः शकः ॥
॥ कलिर्गतोऽथ हीनोऽसौ तेनांकेन शको भवेत् ॥ १ ॥

पं. सा. सा. ॥ शालिवाहनगताब्द संयुताः खेचराद्रिकुगुणाः कलेर्गताः ॥
॥ ताः समः खखनखाब्धिसिंधुषु प्रच्युता अथ समास्त देष्यकाः ॥ २

**अर्थः**—शालिवाहन शकांत ३१७९ मिळवावे ह्मणजे गतकलि निघतो. आणि गतकलींत ३१७९ वजा करावे ह्मणजे शालिवाहन शक निघतो. ४३२००० यांत गत कलि वजा केला ह्मणजे भोग्य अथवा शेष कलि निघतो.

**उदाहरणः**—शालिवाहन शके १८३६ + ३१७९ = ५०१५ हा गत कलि चैत्र शुद्ध प्रतिपदेचा. गत कलि ५०१५-३१७९ = १८३६ हा शालिवाहन शक चैत्र शुद्ध प्रतिपदेचा. कलियुग ४३२०००-५०१५ गतकलि =४२६९८५ शेष कलि हें उत्तर.

---

## विक्रमशका ( संवत ) वरुन गत कलि काढणें.

॥ तथात्र विक्रमः शाको वेदवेदाभ्रगावकैः ॥ ३ ॥

**अर्थः**—वरील प्रमाणेंच विक्रम शकांत ३०४४ मिळविले ह्मणजे गत कलि निघतो. आणि गत कलींत ३०४४ वजा केले ह्मणजे विक्रम शक निघतो.

**उदाहरण**—विक्रमशक १९७१ + ३०४४=५०१५ गत कलि गत कलीं व ५०१५ – ३०४४= १९७१ हा विक्रम शक आला.

---

## २ शालिवाहन शकावरून विक्रम शक काढणें.

शालिवाहन शकांत १३४ मिळविले ह्मणजे चैत्र शुद्ध प्रतिपदेपासून आश्विन कृष्ण ३० पर्यंत शक (संवत्) निघतो. आणि त्यांत एक जास्त मिळविला ह्मणजे कार्तिक शुद्ध प्रतिपदेपासून विक्रम शका ( संवत ) स आरंभ समजावा.

**उदाहरण**—शालिवाहन शक १८३६ + १३४ =१९७० हा चैत्र शुद्ध प्रतिपदेचा संवत होय .यांत अधिक एक मिळविला ह्मणजे १९७१ हा कार्तिक शुद्ध प्रतिपदेचा विक्रमशक ( संवत ) आरंभाचा होय.

---

## ३ शालिवाहन शकांवरून शिवाजीचा राजशक काढणें.

शकांत १५९६ वजा करावे ह्मणजे ज्येष्ठ शुद्ध त्रयोदशीस राजशकाची समाप्ति होते. पुढें राजशकाचा आरंभ काल काढणें झाल्यास समाप्तीच्या शकांत एक अधिक मिळवावा. ह्मणजे राजशकाचा आरंभाचा काल निघतो.

**उदाहरण**—शालिवाहन शके १८३६ च्या श्रावण मासीं राजशक कोणता? शालिवाहन शके १८३६– १५९५ = २४१ हा राजशक ज्येष्ठ शुद्ध १३ शीच्या अगोदरचा समजावा. यांत आणखी एक जास्त मिळविला ह्मणजे २४१ + १ = २४२ हा राजशक ज्येष्ठ शुद्ध १३शी पासून आरंभाचा समजावा. अर्थात श्रावण मासांतील हाच राजशक हें उत्तर.

---

## ४ शालिवाहन शकांवरून आरबी सन काढणें.

शकांत ५२२ वजा करावे बाकी राहील तो आरबीसन समजावा. परंतु त्यांत एक जास्त केला ह्मणजे पुढील सन समजावा.

**उदाहरण**—शके १८३६ ज्येष्ठ मासीं आरबी सन कोणता?

शके १८३६ – ५२२ = १३१४ हा आरबी सन होय. यांत एक जास्त केला ह्मणजे १३१४+ १ = १३१५ हा ज्येष्ठ शुद्ध पौर्णिमेच्या सुमाराचा होय. १४ अर्बाअशर, ३०० सल्लासमया, १००० अलफ ही बेरीज केलीं ह्मणजे १३१४ हा सन आला.

---

## ५ शालिवाहन शकावरून फसली सन काढणें.

शकांत ५१३ वजा करावे; बाकी राहील तो फसली सन झाला. यांत एक जास्त केला ह्मणजे पुढील वर्षाचा फसली सन समजावा.

**उदाहरण**—शके १८३६ – ५१३ = १३२३ हा फसली सन होय. यांत एक जास्त केला ह्मणजे ( १३२३ + १ = १३२४ हा आश्विन महिन्यांतील फसली सन होय. )

---

## ६ शालिवाहन शकावरून इसवी सन काढणें.

शालिवाहन शकांत ७८ मिळविले ह्मणजे चैत्रापासून ते मार्गशीर्ष कृष्ण पक्षांपर्यंत इसवी सन होतो. त्यांत एक जास्त मिळविला ह्मणजे जानेवारीच्या आरंभाचा इसवी सन येतो.

उदाहरण–शके १८३६ चैत्र मासीं इसवीसन कोणता ?

शके १८३६ + ७८ = १९१४ हा इसवीसन चैत्रमासांतील होय. यांत एक जास्त मिळविला ह्मणजे १९१४ + १ = १९१५ हा इसवी सन पुढील वर्षाचा ज्यानेवारीचे पहिले तारखेचा झाला.

---

## ७ शालिवाहन शकावरून हिजरी सन काढणें.

शालिवाहन शक तीन ठिकाणीं मांडून नंतर पहिल्या प्रतीस ३२ नीं भागून भाग वर्षे व महिन्याचा घ्यावा त्यांत दुसरे प्रतीस १६२ नीं भागून मासादि जो भागाकार येईल तो वजा करावा आणि ती बाकी तिसरे प्रतींत मिळवून त्यांत ५६० वर्षे व १ महिना वजा करावा. जी बाकी राहील तो हिजरी सन आणि मोहरमादि महिना समजावा.

उदाहरण - शके १८३६ आश्विन मासीं हिजरी सन आणि मोहरमादि महिना कोणता ?

| प्र. १. | प्र. २ | प्र. ३ |
|---|---|---|
| ३२) श. १८३६ । ७ (५७ व ४ म. | १८३६ | १८३६ – ७ |
| १६०    – ११ | १६२) १८३६ (११ | + ५६ – ५ |
| २३६    ५६ व. ५ म. | १६२ | १८९२ – १२ |
| २२४ | २१६ | – ५६० – १ |
| १२ | १६२ | १३३२ – ११ |
| × १२ | ५४ | हा हिजरी सन व जिल्काद महिना. |
| ३२) १४४ (४ | | |
| १२८ | | |

---

## ८ शालिवाहन शकावरून पारशी सन [ एजदीजर्द ] काढणें.

शालिवाहन शकांत ५५३ वजा केले ह्मणजे भाद्रपद मासापर्यंत मागील सन येतो. पुढील सन काढणें झाल्यास त्यांत एक जास्त मिळवावा ह्मणजे भाद्रपद मासांतील पुढील पारशी सन येतो.

उदाहरण—शके १८३६ – ५५३ = १२८३ हा पारशी सन भाद्रपद मासापर्यंतचा आला. यांत १ जास्त मिळविला ह्मणजे १२८३ + १ = १२८४ हा पारशी सन भाद्रपद कृष्णांतील पुढील सालाचा वर्षारंभ आला.

---

## ९ शालिवाहन शकावरून यहूदी सन काढणें.

शालिवाहन शकांत ३८३८ मिळवावें ह्मणजे तो यहूदी सन होतो; हा भाद्रपद कृष्ण ३० पर्यंत असतो.

उदाहरण—शके १८३६ + ३८३८ = ५६७४ हा भाद्रपद कृष्ण ३० शा पर्यंत आहे. यांत एक जास्त मिळविला ह्मणजे ५६७४ + १ = ५६७५ हा पुढील वर्षारंभाचा यहूदी सन आला.

## जानेवारीचे पहिले तारखेस कोणती तिथी होती ?

इसवी सनांत १६०१ वजा करावे. बाकी राहील त्यास ४०० नीं भागावें. भागाकार येईल त्यास चतुःशति ह्मणावें, शेष बाकी राहील त्यास १०० नीं भागावें; भागाकार येईल त्यास शेंकडा ह्मणावें. बाकी राहील त्यास ४ नीं भागावें; भागाकार येईल त्यास चौकडा ह्मणावें; शेष राहील त्यास वर्ष ह्मणावें.

चतुःशतीस नक्र तिथी आणि १९॥ घटिकांनीं गुणावें; शेकड्यास २४ तिथी आणि ३५ घटिकांनीं गुणावें. चौकड्यास १४ तिथी आणि १३॥ घटिकांनीं गुणावें आणि वर्षांस १० तिथी आणि ४८ घटिकांनीं गुणून एकंदर गुणाकाराचीं बेरिज करावी व त्यांत २६ तिथि ५२ घटका मिळवून बेरजेचे तिथीस ३० नीं भागून जी बाकी राहील ती जानेवारीचे आरंभास गत तिथी होय.

## महिना काढणें.

जानेवारीची पहिली तारीख शुद्ध प्रतिपदेपासून कृष्ण पंचमीपर्यंत आल्यास पौष मास समजावा व त्याचे पुढें इतर तिथि आल्यास मार्गशीर्ष महिना समजावा. पौष शुद्ध षष्ठीपासून पौष कृष्ण पंचमीपर्यंत जानेवारीची पहिली तारीख आल्यास त्या सनांत अधिक मास आहे असें समजावें.

## वार काढणें.

चौकडा व शेंकडा यांचें मिळवणीचे पांचपटींत वर्षे मिळवून आणखी दोन मिळवावें व त्यास ७ नीं भागावें; आणि बाकी राहील तो वार समजावा. वार रविवारापासून मोजावेत.

## शालिवाहन शक काढणें.

इसवी सनांत ७९ वजा करावे ह्मणजे इसवीचें आरंभापासून शक समाप्तीपर्यंत शक होतो. पुढें एक मिळविला ह्मणजे इसवीचे समाप्तीपर्यंत शक होतो.

उदाहरण—इसवीसन १९१५ ला जानेवारीची पहिली तारीख कधी झाली आणि त्याचा शालिवाहन शक महिना, पक्ष, तिथि आणि वार सांगा.

इ. स. १९१५ उणे ७९ = १८३६ + १ = १८३७ हा शालिवाहन शक झाला.

इ. स. १९१५ उणें १६०१ = ३१४ ÷ ४०० = चतुःशति ० × ५।१९॥ = ०

बाकी ३१४ ÷ १०० = शेकडा ३ × २४।३५ = ७३।४५

बाकी १४ ÷ ४ = चौकडा ३ × १४।१३॥ = ४२।४०॥

बाकी २ शेष ∴ वर्षे २ × १०।४८ = २१।३६

एकूण १३८।१॥

एकूण बेरीज १३८।१॥ + तिथी २६।५२ = १६४।५३॥ ÷ ३० भागाकार ५ बाकी १४

∴ गत तिथी १४ + १ = १५ पौष शुद्ध पौर्णिमा. ही जानेवारीच्या पहिल्या तारखेची तिथि होय.

## वार काढण्याची रीति.

शेंकडा ३ + चौकडा ३ = ६ × ५ = ३० + वर्षे २ = ३२ + २ = ३४ ÷ ७ = भागाकार ४

∴ बाकी ६ हा वार शुक्रवार होय.

इसवी सन १९१५ चे जानेवारीच्या पहिले तारखेस शालिवाहन शके १८३६ पौष शुद्ध १५ रोज शुक्रवार हें उत्तर.

## इंग्रजी तारखेवरून मराठी महिना, पक्ष, तिथि आणि वार काढणें.

इंग्रजी गतमासांचे एकंदर दिवस करून त्यांत चालू महिन्याच्या सांगितलेल्या तारखासुद्धां बेरीज घ्यावी. आणि त्यांत त्याचा त्रेसष्टावा हिस्सा मिळवावा आणि इसवी आरंभाची तिथि मिळवून ३० नीं भागावें. बाकी राहील ती तिथि समजावी; पंधराचे आंत शुक्लपक्ष व पुढें कृष्णपक्ष समजावा.

---

## महिना काढणें.

तिसानीं भागून जो भागाकार आला असेल त्यांत इसवी आरंभाचे महिने मिळवून त्यांत १२ वजा करावे, बाकी राहील तो गत महिना समजावा. बारा वजा न जातील तर तोच गत महिना. म्हणून त्याचेपुढील महिना तो कायमचा समजावा.

---

## वार काढणें.

इंग्रजी गत मासाचे चालू महिन्याच्या तारखासुद्धां बेरीज करून त्यांत जानेवारीच्या पहिले तारखेचा वार मिळवून ७नीं भागावें, बाकी राहील त्यांत एक वजा करावा. जी बाकी राहील तो वार समजावा. वार रविवारापासून मोजावे.

उदाहरण--इसवी सन १९१४ तारीख ४ आक्टोबर रोजीं शालिवाहन शक, महिना, पक्ष, तिथि आणि वार कोणता होता?

इसवी सन १९१४ यांत<br>
− ७८ वजा<br>
हा शालिवाहन शक १८३६<br>
वार काढणें<br>
ग. मा. चे दि. २७७<br>
जा. च्या पहिले तारखेचा वार + ५<br>
७ ) २८२ ( ४०<br>
२८०<br>
बाकी २ यांत<br>
− १ वजा.<br>
१ हा वार रविवार

इंग्रजी गत मासांचे चालू ४ चार आक्टोबर महिन्याच्या तारखे सुद्धां बेरीज.<br>
६३ ) २७७ ( ४ हा भागाकार तो<br>
+ ४ त्यांतच मिळवून<br>
२८१<br>
इसवी सन आरंभाची तीथ + ५<br>
३० ) २८६ ( ९<br>
२७० + ९ इ. स. आरंभाचे<br>
ही तीथ १६ १८ मराठी महिने<br>
बाराचा मेळ येणेंकरितां − १−१२<br>
तिथि १५− ६ हा गत महिना<br>
भाद्रपद याचे पुढील<br>
महिना आश्विन.

शके १८३६ आश्विन शुद्ध १५ पौर्णिमा रविवार हें उत्तर.

---

## इसवीचे आवलीचे पुढील तारखा काढण्याची रीती

## तिथीवरून इंग्रजी तारीख काढणें.

ज्या महिन्यांतील ज्या तिथीस इंग्रजी तारीख पाहिजे त्या शकाचे आरंभापासून इसवी समाप्तीपर्यंत मात्र १२ बारा मिळवावेत आणि त्यांत इसवीचे तिथींत महिनें वजा देऊन बाकी राहील त्या महिन्यास ३० नीं गुणून त्यांत त्या वरच्या तिथी मिळवून त्यांत त्याचा ६४ वा हिस्सा वजा करून बाकी राहील त्याच्या दोन प्रती ठेवाव्या. एके प्रतींत जानेवारीपासून जितक्या महिन्याच्या तारखा वजा जातील तितक्या वजा देऊन बाकी राहील त्यांत एक मिळवावा म्हणजे चालू महिन्याची तारीख झाली.

## वार काढणें.

दुसरे ठेविलेल्या प्रतींत इसवी आरंभाचा वार मिळवून ७ नीं भागून जी बाकी राहील तो वार समजावा. वार न चं मिळाल्यास त्यांत एक अधिक किंवा उणा करावा.

---

## महिना काढणें.

जानेवारी पासून जितक्या महिन्याचे दिवस वजा जातील तितके गतमास झाले. पुढील महिना कायम समजावा.

उदाहरण--शके १८३६ आश्विन शुद्ध १५ पौर्णिमा ह्या दिवशीं इंग्रजी सन, महिना, तारीख आणि वार कोणता तें सांगा?

```
          शके १८३६ यांत          महिने ६          तिथी १५ यांत
               + ७८               + १२              + ०
हा इंग्रजी सन  १९१४                १८                 १५
                                  - ९               - १ जानेवारीच्या पहिल्या तारखेस मराठी
                                    ९                १० महिने आणि तिथी.
          प्रत दुसरी              × ३० = २७० + १० = २८०
              २७६             ६४) २८० (४ भागाकार हा त्यांतच वजा.
इसवी आरंभाचा + ५                  - ४
      वार ७) २८१ (४०         बाकी  २७६ यांत प्रत पहिली.
             २८०                  -२७३ जानेवारीपासून सप्तंबरअखेर तारखांची बेरीज वजा.
               १ हा रविवार होय. बाकी ३ यांत
                                   + १
          ही बेरीज आक्टोबरची. ४ थी तारीख होय. हें उत्तर.
```

इसवी सन १९१४ तारीख ४ आक्टोबर रोज रविवार हें उत्तर.

---

## हिजरीसन व मोहरमादि महिना दिला असतां, शालिवाहन शक आणि महिना काढणें.

हिजरी सनास ३७ नीं गुणून त्या गुणाकारांत मोहरमादि महिन्याची तिप्पट मिळवून त्यास १२४१ नीं भागून भाग वर्षे व महिन्याचा लावावा. आणि तो इष्ट हिजरी सनांत वजा करून बाकींत ५४२ वर्षे व ४ महिने मिळवावे ह्मणजे ती बेरीज शालिवाहन शक व महिना होतो.

उदाहरण—हिजरी सन १३३२ जिल्काद ११ या महिन्यांत शालिवाहन शक आणि मराठी महिना कोणता होता तें सांगा?

```
   हिजरी सन १३३२            जिल्काद ११ वा महिना याची ३ पट
        × ३७                      × ३
      ४९२८४ यांत                   ३३      हिजरी सन १३३२-११ यांत
      +   ३३                              वर्षे  - ३९- ८
१२४१) ४९३१७ (३९ वर्षे-८ महिने                   १२९३- ३
                                                + ५४३- ४
                                         शक    १८३६- ७  आश्विन
```

शालिवाहन शक १८३६-७ आश्विन महिना हें उत्तर.

## शालिवाहन शक, महिना, व तीथ दिली असतां, + हिजरीसन, महिना व तारीख काढणें

शालिवाहन शकांत ५४३ वजा करून बाकीस १२नीं गुणून त्या गुणाकारांत दिलेला मराठी महिना मिळवून त्याच्या दोन प्रती कराव्या पहिलींत १४० वजा करून बाकीस ६१नीं भागून जो भागाकार येईल तो त्यांतच वजा करावा आणि बाकीस ३२नीं भागावें जो भागाकार येईल तो दुसऱ्या प्रतींत मिळवून त्या बेरजेस १२ नीं भागावें, जो भागाकार येईल तो हिजरीसन, आणि जी बाकी राहील तो मोहम्मादि महिना समजावा.

कोणत्याही मराठी महिन्याचे बहुधा शुद्ध द्वितीयेस अथवा तृतीयेस मुसलमानी महिन्याचा चंद्र पहिला असतो.

**उदाहरण**--शालिवाहन शके १८३६ मार्गशीर्ष शुद्ध तृतीया रोज शुक्रवार या दिवशीं हिजरी सन, महिना, चंद्र अथवा तारीख कोणती होती हें सांग ?

```
शालिवाहन शक १८३६ यांत
             -५४३
             ----
             १२९३ बाकीस
             × १२
             ----
            १५५१६ या गुणाकरांत
मराठी महिना +   ९
            -----
            १५५२५ प्रत १ यांत
            - १४०
            -----
     ६१ )१५३८५ यांत (२५२ भागाकार ही वजा
            - २५२
            -----
     ३२ )१५१३३ बाकी यास ( ४७२ भागाकार
                आला तो दुसऱ्या प्रतींत+

            १५५२५ प्रत २ यांत
            + ४७२
            -----
     १२ )१५९९७ ( १३३३ हा हिजरी सन
          १२
          --
           ३९
           ३६
           --
            ३९
            ३६
            --
            ३७
            ३६
            --
             १बाकी हा मोहरम महिना शुद्ध तृतीया
                          ह्मणून चंद्र १
```

हिजरी सन १३३३ माहे मोहरम चंद्र १ अथवा तारीख पहिली हें उत्तर.

---

## इसवी सन पालटण्याचे दिवशीं ह्मणजे जानेवारीचे पहिले तारखेस हिजरीसन व मोहरमादि महिन्याची कोणती तारीख होती हें काढणें.

दिलेल्या इसवी सनांत १६०० शें वजा करून त्याच्या तीन प्रती कराव्या एकीस ३३ तेहतीसांनीं भागून भागाकार वर्षें महिने व दिवसांचा घ्यावा, आणि तो भागाकार, दुसरे प्रतीची दुप्पट करून त्यास ४३१ नीं भागून, भाग महिनें व दिवसांचा घेऊन त्यांत मिळवून ती बेरीज तिसरे प्रतींत मिळवून त्यांत १००८ वर्षें ६ महिने १५ दिवस मिळवावे ह्मणजे जानेवारीचे पहिले तारखेस हिजरी सन, मोहरमादि महिना व तारीख ( चंद्र ) कोणती होती ती समजेल.

**उदाहरण**--इसवी सन १९१५ जानेवारीचे पहिले तारखेस हिजरी सन महिना आणि तारीख ( चंद्र ) कोणती होती तें काढा ?

---



+ मागें हिजरी सन काढण्याची रीती दिली आहे त्यापेक्षां ही सोपी ह्मणून दुसरी रीत देत आहे.

इसवी सन १९१५ यांत
− १६०० वजा
३१५

| प्रत १ | प्रत २ | प्रत ३ |
|---|---|---|
| ३३ ) ३१५ यांस | ३१५ | ३१५ |
| २९७ | × २ | + ९-७-२९ |
| १८ (९व. ६म. १६दि. ४३१ ) | ६३० यांस ( १ म १३ दि. | ३२४-७-२९ |
| × १२ + १ १३ | ४३१ | + १००८-६-१५ |
| ३३ ) २१६ ९--७--२९ | १९९ | १३३३-२-१४ |
| १९८ | × ३० | |
| १८ | ४३१ ) ५९७० | |
| × ३० | ४३१ | |
| ३३ ) ५४० | १६६० | |
| ३३ | १२९३ | |
| २१० | ३६७ | |
| १९८ | | |
| १२ | | |

हिजरी सन १३३३ माहे सफर २ चंद्र ( तारीख ) १४ हें उत्तर.

---

## इसवी सनाच्या महिन्याची पहिली तारीख दिली, असतां हिजरी सन, महिना व तारीख काढणें.

जानेवारीपासून इष्ट महिन्याच्या तारखांची बेरीज घेऊन त्यांत गतमहिन्यांचे निम्मे मिळवून आणखी त्यांत इसवी आरंभाचे पहिले तारखेस जी मोहरमादि तारीख असेल, ती मिळवून त्या एकंदर बेरजेस तिसांनीं भागावें, भाग येईल तो इसवी आरंभाचे महिन्यापासून महिने होतात ते त्या महिन्यांत मिळवावे म्हणजे इष्ट इसवी महिन्याचा महिना, आणि तिसा ३० नीं भागून बाकी राहिलेली ती तारीख होय.

टीपः-वाराकरितां तारखेंत एखादी तारीख कमजास्त होण्याचा संभव असतो. अर्धी तारीख धरूं नये.

उदाहरण—इसवी सन १९१४ तारीख १ आक्टोबर रोजीं हिजरी सन, महिना, व तारीख कोणती होती तें सांग?

जानेवारीपासून सप्तेंबरअखेर आणि आक्टोबरचे पहिले तारखेपर्यंत.

दिवस २७४ त्यांत
+ ४॥ गत निम्मे महिने
+ ३ इ. स. १९१४ जानेवारीचे पहिले तारखेस सफर महिन्याची ३ तारीख
३० ) २८१॥ ( ९ महिने + २ सफर = ११ जिलकाद.
२७०
११ ही तारीख यांत एक कमी केली तेव्हां १० तारीख आली.

इ. स १९१४ ता. १ आक्टोबर रोजी हिजरी सन पूर्वी काढलेला १३३२ माहे जिलकाद तारीख ( चंद्र ) १० हें उत्तर.